M-2799

| शिर्षक | ग्रंथकार | विषय | विस्तार (पुर्ण/अपूर्ण) | टिकाकार | आकार | पृष्ठे | लिपी | सामग्री | Lines per page | Letters per line | Condition & age (शके/विक्रम सवंत) | Additional Particulars / Remark |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| अद्भुतरामविजय अध्याय-1 ते 28 | वाल्मीकि | पुराण | पूर्ण | – | 3/6 | 600 | मराठी | कागद | | | | |

श्रीगणेशायनमः ॥ श्रीसरस्वत्यैनमः ॥ श्रीगुरुचरणाभ्यांनमः ॥ श्रीसीतारामचंद्राभ्यांनमः ॥
जयजयाजी परमेश्वरा ॥ जयजयाजी परात्परा[1] ॥ जय जगद्गुरो दिगंबरा ॥ निर्विकारा परब्रह्मा ॥ १ ॥ जयजय हरे आत्मारामा ॥ त्रिगुणातीता पूर्णकामा ॥ भक्तजनमनोविश्रामा ॥ क्षीराब्धिधामा[2] परमेशा ॥ २ ॥ जय विभो[3] पुराणपुरुषा ॥ योगिजनचित्तनिवासा ॥ सच्चिदानंदा[4] मायाविलासा ॥ परमहंसा[5] परमात्मया ॥ ३ ॥ विश्वैकवंद्या[6] निरामया[7] ॥ निरुपाधिका शुद्धा अव्यया[8] ॥ ज्ञानैकगम्या[9] नित्या अद्वया ॥ अजा[10] अजेया[11] नारायणा ॥ ४ ॥ विश्वजनका दीनोद्धरणा ॥ स्वसंवेद्या[12] सज्जनरक्षणा ॥ अविद्याध्वांतचंडकिरणा[13] ॥ भवद्रुभंजना[14] भगवंता ॥ ५ ॥ तूं आदिमायेचा निजभर्ता ॥ जगदुत्पत्तिस्थित्यंतकर्ता ॥ धर्मरक्षणाचिये अर्था[15] ॥ दुष्टसंहर्ता तूंच होसी ॥ ६ ॥ तूं निरंजन[16] देवाधिदेव ॥ सर्वातर्क्य[17] तुझें वैभव ॥ त्वांचि विरंचि विष्णु शिव ॥ तिघे देव निर्मियेले ॥७॥ तयांहातीं अनंत जगतें ॥ तूंचि घडविलीं जगत्पते ॥ इंद्रादिक देव निरुते[18] ॥ तुझिये सत्तें वर्तती ॥ ८ ॥ स्वजनविघ्नें हरावयासी ॥ गजानन तूं जाहलासी ॥ जो चतुर्दशविद्यांचा राशी ॥ गिरिजाकुशीं[19] उद्भवला ॥ ९ ॥ आणि जयापुढें

---

टीप. १ मायातीता, परमश्रेष्ठा. २ क्षीरसमुद्रीं राहणारा. ३ सर्वव्यापका, समर्था. ४ सत्यज्ञानानंदस्वरूपा. ५ निरपेक्षा. ६ सकळविश्व मुख्यत्वें ज्यास वंदितें तो. ७ रोगरहिता. ८ नाशरहिता. ९ केवळ ज्ञानानें मात्र लाभणारा. १० जन्मरहिता. ११ अजिंक्या. १२ ज्ञानस्वरूपा. १३ अज्ञानरूपांधकारनाशकसूर्या. १४ जन्ममरणरूप संसारवृक्षाच्या नाशका. १५ साठीं. १६ निष्कलंक. १७ सर्वांस अतर्क्य (कोणत्या प्रकारचें आहे याविषयीं तर्क करतां येत नाहीं असें). १८ खरोखर. १९ पार्वतीच्या पोटीं.

सिद्धि समस्त ॥ कर जोडूनि सदा तिष्ठत ॥ तो साक्षात् श्रीसदाशिवसुत[1] ॥ कैवल्यनाथ[2] तूं-चि होय ॥ १० ॥ जयजय वरद कल्याणमूर्ती ॥ ब्रह्मांडभरित तव कीर्ती ॥ सुरासुरनर तुज नमिती ॥ श्रीगणपती दयार्णवा ॥ ११ ॥ अरुण[3] बालार्क संध्याराग[4] ॥ तैसें आरक्त तुझें अं-ग ॥ कीं सिंदूरें चर्चित महानग[5] ॥ तैसें सुरंग विलसे पैं ॥ १२ ॥ अति सुकुमार रातोत्पलें[6] ॥ तैसीं सुंदर पदकमळें ॥ वांकी नेपुरें[7] तेजागळें[8] ॥ सदा रुणझुण वाजती ॥ १३ ॥ रम्य सरळ कर्दळीस्तंभ ॥ कीं प्रवाळाचे[9] उगवले कोंभ ॥ कीं माणिकें गाळूनि सुप्रभ ॥ पोटऱ्या स्वयंभ वोतिल्या ॥ १४ ॥ सुरम्य वर्तुळ बालभानू[10] ॥ तैसे घोंटीव उभय जानू[11] ॥ मांड्या सुंदर आखूड घनू[12] ॥ प्रभा वानूं काय त्यांची ॥ १५ ॥ कांसे झळके श्वेतांबर ॥ जैसा साक्षात्क्षीरसागर ॥ कीं निर्दोष यशाचि पवित्र ॥ वस्त्र सुंदर जाहलें ॥ १६ ॥ स्वर्णकांचीची[13] दिव्य दीप्ती ॥ वरी जडित हिरे झळकती ॥ वळीनें बैसले कीं गभस्ती[14] ॥ ऐसे चित्तीं भासत ॥ १७ ॥ सर्व ब्रह्मांड सांठवेल ॥ ऐसें लांब उदर दोंदिल ॥ दिव्य पद्माकृति[15] वर्तुळ ॥ नाभी सखोल ऱ्हदापरी[16] ॥ १८ ॥ अति उत्तुंग[17] आणि विस्तृत ॥ वक्षस्थळ बहु विलसत ॥ वरी पदक रत्नखचित ॥ लखलखत साजिरें[18] ॥ १९ ॥ चंपळेसमान[19] यज्ञसूत्र[20] ॥ तळपे विराजमान पवित्र ॥ परिघांपरी दीर्घ विचि-

---

टी. १ शिवाचा पुत्र. २ मोक्षाचा स्वामी. ३ सूर्याचा सारथी. (रक्तवर्ण आहे). ४ संध्याकाळचे आकाशाचा रंग. ५ मोठा पर्वत. ६ लाल कमळें. ७ पैंजण, घुंगूर. ८ तेजस्वी. ९ पोंवळ्याचे. १० सूर्य. ११ गुडघे. १२ मोठ्या, जाड. १३ कंबरेंतील सोन्याच्या दावेची. १४ सूर्य. १५ कमळाकार. १६ डोहासारखी. १७ उंच. १८ सुंदर. १९ विजेप्रमाणें. २० यज्ञोपवीत.

त्र ॥ भुजा चार शोभती ॥ २० ॥ एके हस्तें अंकुश घेतला ॥ आणिकें[1] परश आकळिला ॥ तिजें धरिलें लीलाकमळा ॥ वरद ठेला[2] चतुर्थ ॥ २१ ॥ कल्पांतविजूचे उमाळे ॥ तैसे दिव्य केयूर[3] मिरवले ॥ कंकणांचें तेज आगळें ॥ दिग्मंडळें प्रकाशती ॥ २२ ॥ करकमळें अति सुरेख ॥ पाहतां तल्लीन भक्तलोक ॥ दशांगुळींच्या मुद्रिका अनेक ॥ अधिकाधिक झळकती ॥ ॥ २३ ॥ कंबुकंठ[4] सुरम्य अती ॥ तयाची शोभा वानूं किती ॥ गुणीं[5] वोंविल्या नक्षत्रपंक्ती ॥ तेंवी डोलती मुक्तहार ॥ २४ ॥ वरी सुरम्य गजेंद्रमुंड[6] ॥ लंबायमान शुंडादंड ॥ तेणें भक्तांचीं विघ्नें प्रचंड ॥ लवडसवड[7] आकळिसी ॥ २५ ॥ शरद्राकेचा[8] रोहिणीकांत[9] ॥ तैसा झळके एक दंत ॥ गंडस्थळांपासूनि सतत ॥ अखंड स्रवत मदधारा ॥ २६ ॥ नयन दिसती बहु सान[10] ॥ परी देखसी सर्व त्रिभुवन ॥ भाळपट्टीं निशारमण ॥ अक्षय भूषण जाहला ॥ २७ ॥ शूर्पीपरी[11] तुझे श्रवण[12] ॥ ह्मणोनि नाम शूर्पकर्ण ॥ मकरकुंडलें[13] देदीप्यमान ॥ कविगुरुंसमान[14] तळपती ॥ २८॥ एकवटल्या सहस्र चपळा[15] ॥ कीं कल्पांत भानूच उदेला ॥ ऐसा किरीट तेजागळा[16] ॥ शिरीं वेल्हाळा तळपत ॥ २९ ॥ तूं सच्चिदानंद[17] निर्विकार ॥ पुराणपुरुष साचार[18] ॥ परी भक्तजनालागीं परिकर[19] ॥ ऐसा साकार झालासी ॥ ३० ॥ रत्नखचित सिंहासनीं ॥ बैस-

---

टी. १ दुसऱ्या हातानें. २ राहिला. ३ बाहुभूषणें. ४ शंखासारखा सुरेख कंठ. ५ दोऱ्यांत. ६ हत्तीचें शिर. ७ सत्वर. ८ शरदृतूंतील पूर्णिमेचा. ९ चंद्र. १० लहान. ११ सुपांसारखे. १२ कान. १३ मकराकार कर्णकुंडलें. १४ शुक्र व बृहस्पती यांच्या ताऱ्यांसारखीं. १५ विजा. १६ तेजस्वी. १७ सत्यज्ञानानंदरूप. १८ खरोखर. १९ सुंदर.

ला शोभसी ब्रह्मांडधनी ॥ अष्टसिद्धि[1] चौमरें[2] घेउनी ॥ रात्रंदिनीं वारित ॥ ३१ ॥ प्रमथादिक गण समस्त ॥ सेवेलागीं सदा तिष्ठत ॥ सुरासुरनर जोडूनि हस्त ॥ लीन असत चरणांब्जीं[3] ॥ ३२ ॥ तूं अनाथनाथ दयाघन ॥ तुज जे ध्याती रात्रंदिन ॥ तयां सुलभ मोक्षसदन ॥ नसे कारण आणिकाचें[4] ॥ ३३ ॥ तुझें नाम घेतां शुभार्थ ॥ विघ्नें बारावाटा पळत ॥ जैसा प्रगटतां महामारुत[5] ॥ जळद[6] समस्त वितुळती ॥ ३४ ॥ कीं मृगेंद्रांचा[7] ऐकतां ध्वनी ॥ गजेंद्र[8] पळती रानोरानीं ॥ कीं हरिनाम ऐकतां कर्णीं ॥ जाती पळोनी पिशाचें ॥ ३५ ॥ कीं गृहस्वामी देखूनि जागा ॥ तस्कर[9] पळती आडमार्गा ॥ कीं गरुडगतीच्या ऐकतां वेगा ॥ जैसा उरगां[10] पळ सुटे ॥ ३६ ॥ कीं ससाण्याचा शब्द ऐकुनी ॥ विहंगें[11] पळती तेच क्षणीं ॥ तैसें त्वन्नाम येतां वदनीं ॥ विघ्नें पळती विघ्नहरा ॥ ३७ ॥ तुझ्या नामाचा अगाध महिमा ॥ ब्रह्मांडामाजी नसेचि उपमा ॥ पावावया त्वद्गुणसीमा[12] ॥ कैसा प्रभो शकेन मी ॥ ३८ ॥ कक्षेसि[13] घेऊनि कनकाचळ[14] ॥ पिपीलिका[15] कैसी नाचेल ॥ किंवा सर्व ब्रह्मांडगोळ ॥ कैसा उचलेल मशकासी[16] ॥ ३९ ॥ कीं हालवावया भूगोळासी ॥ मक्षिका समर्थ होईल कैशी ॥ कीं अळिका अरुणबंधूसी[17] ॥ जिंकूं कैसी शकेल ॥ ४० ॥ मी पामर अनाथ दीन ॥ मतिमंद विद्यारहित हीन ॥ भक्ति भाव

टी. १ अणिमा, महिमा, गरिमा, लघिमा, प्राप्ति, प्राकाम्य, ईशित्व आणि वशित्व ह्या आठ सिद्धि. २ चंवऱ्या. ३ चरणकमळीं. ४ दुसऱ्याचें. ५ मोठा वारा. ६ मेघ, ढग. ७ सिंहाचा. ८ हत्ती. ९ चोर. १० सर्पास. ११ पक्षी. १२ तुझ्या गुणांचा अंत. १३ कांखेस. १४ सुवर्णाचा पर्वत (मेरु). १५ मुंगी. १६ मच्छराला. १७ गरुडास.

कीं वैराग्य ज्ञान ॥ नसेचि जाण मजमाजी ॥ ४१ ॥ परी तूं दयार्णव दीननाथ ॥ विद्याबुद्धि-
ज्ञानद समर्थ ॥ आणि जे नर स्तवित नमित ॥ किंवा स्मरत तुजलागीं ॥ ४२ ॥ तयांचीं
संकटें वारून ॥ सर्व कामना करिसी पूर्ण ॥ ऐसी तुझी कीर्ति संपूर्ण ॥ श्रुतिपुराणें वाखाणिती
॥ ४३ ॥ ह्मणोनि देवदेवा गणपती ॥ तव चरणसरोजाप्रती[1] ॥ स्मरणपूर्वक केवळ नंती[2] ॥
बहुप्रीतीं करिताहें ॥ ४४ ॥ तरी दयाळा गणनाथा ॥ मज होऊनि सुमतिदाता ॥ अद्भुतरा-
मविजयग्रंथा ॥ रचवीं समर्था संपूर्ण ॥ ४५ ॥ ऐसा वंदूनियां गणपती ॥ आतां नमितों श्री-
सरस्वती ॥ जे त्रिजगन्माता भगवती ॥ कुंदेंदुतुहिनश्वेतांगी[3] ॥ ४६ ॥ जे[4] श्वेतपद्मासनीं[5] बैस-
ली ॥ जे[4] श्वेतवस्त्र सदा नेसली ॥ जियेच्या सुंदर करकमळीं ॥ वीणा शोभली सर्वदा ॥ ४७ ॥
ब्रह्माच्युतशिवादि निर्जर[6] ॥ जियेसि वंदिती निरंतर ॥ भक्तजनांचें जाड्य[7] दुर्धर ॥ निःशेष स-
त्वर हरी जी ॥ ४८ ॥ जी भक्तहृदयकंजीं[8] निवसे ॥ सदा कविजिव्हाग्रीं विलसे ॥ जियेच्या
कृपाकटाक्षलेशें ॥ मूकही गुरूसे[9] बोलती ॥ ४९ ॥ जयजय माते जगदंबिके ॥ जय स्वानंद-
सरोहंसिके[10] ॥ भक्तकामनाकल्पलतिके[11] ॥ वरदायके सरस्वती ॥ ५० ॥ तूं त्रिगुणातीत मूळ-
प्रकृती ॥ ज्ञानैकगम्य[12] स्वानंदमूर्ती ॥ त्वत्कृपेवीण तुझी निरुती[13] ॥ स्वरूपस्थिती न कळेच ॥

---

टी. १ पादकमलाप्रत. २ नमस्कार. ३ कुंदाचें पुष्प, चंद्र व बर्फ यांप्रमाणें शुभ्र आहे अंगवर्ण जीचा अशी. ४ जी. ५ पांढऱ्या कमळरूपी आसनावर. ६ देव. ७ मंदत्व, मूर्खपणा. ८ भक्तांच्या हृत्कमळांत. ९ बृहस्पतीसारखे. १० आत्मानंदरूपी सरोवरीं राहणाऱ्ये हंसिणी. ११ कल्पलतेप्रमाणें भक्तेच्छा पूर्ण करणाऱ्ये. १२ ज्ञानानें मात्र प्राप्त होणारी. १३ खरोखर.

॥ ५१ ॥ तूं सर्वब्रह्मांडजनित्री ॥ तूंचि स्थितिसंहारकर्त्री ॥ उमा रमा शची सावित्री ॥ तुझी मैत्री इच्छितात ॥ ५२ ॥ सर्व सुरासुर तुज वंदिती ॥ सनकादि योगी तुज ध्याती ॥ किन्नरगण गंधर्व गाती ॥ ऋषिही स्तविती तुजला पैं ॥ ५३ ॥ तूं चातुर्यसागरींची लहरी ॥ परा पश्यंती मध्यमा वैखरी ॥ ह्या चहूंवाचांची ईश्वरी ॥ ह्मणोनि वागेश्वरी ह्मणिजेसी ॥ ५४ ॥ तूं सकळ मातृकांचें जीवन ॥ सुरम्य विचित्र तव ध्यान ॥ ऐकोनि तुझें सुस्वर गायन ॥ निर्जरगण तटस्थ ॥ ५५ ॥ अंबे तुझें सौंदर्य देखुनी ॥ मन्मथ पायीं घेत लोळणी ॥ उर्वश्यादि देवकामिनी ॥ लज्जित होउनी तिष्ठत ॥ ५६ ॥ माते तुझी कृपा जोडतां ॥ मूढही विवरी सर्व वेदार्थां ॥ जन्मपंगुही महापर्वतां ॥ उल्लंघिता होय पैं ॥ ५७ ॥ जन्मांध ते होती जोहरी ॥ मूकही होती व्यवहारी ॥ रंक तेही राणे झडकरी ॥ होत निर्धारीं जननीये ॥ ५८ ॥ अंबे तुझिया वरप्रदानें ॥ त्रिजगीं कांहीं न पडे उणें ॥ सर्वत्र सर्वदा सर्व कल्याणें ॥ सेवेकारणें तिष्ठत ॥ ५९ ॥ अष्टौसिद्धिही दासी होउनी ॥ सदनीं राबती रात्रंदिनीं ॥ शत्रुक्षय होय तत्क्षणीं ॥ विघ्नें पळोनी जातात ॥ ६० ॥ आधि व्याध्यादि दुःखें सकळ ॥ समूळ नासती तत्काळ ॥ कीर्तीनें भरोन दिग्मंडळें ॥ जन्म सफळ होतसे ॥ ६१ ॥ अनन्यभावें तुज जे शरण ॥ तयां तूं देशी मोक्षसदन ॥ केवळ नमितां तव चरण ॥ मनोरथ पूर्ण होतात ॥ ६२ ॥ जननी तुझे

टी. १ ब्रह्मांड उत्पन्न करणारी. २ पालन व संहार करणारी. ३ इंद्राणी. ४ स्वामिणी. ५ देवगण. ६ मदन. ७ स्पष्ट सांगे. ८ जन्मापासून पांगळा तोही. ९ रत्नपारखी. १० वकील, वाद करणारे. ११ मनोव्यथा (मनास दुःख होणें). १२ दशदिशा. १३ माते.

गुण अनंत ॥ वर्णावया कवण समर्थ ॥ सहस्त्रमुखादिक[1] जे समर्थ[2] ॥ तेही कुंठित यदर्थी[3] ॥६३॥ तयां मी मंद मतिहीन ॥ पामर कैसा वर्णूं शकेन ॥ पालवामाजी[4] केंवी गनेन[5] ॥ किंवा पवन[6] बांधवेल ॥६४॥ कीं उर्वीचें[7] करवेल वजन ॥ कीं सिंधूचें[8] गणवेल जीवन[9] ॥ कीं कल्पांतींचा [10]चंडकिरण ॥ मुष्टींत कैसा धरवेल ॥ ६५ ॥ ह्मणोनि माते ब्रह्मनंदिनी ॥ केवळ उभय हस्त जोडुनी ॥ अनन्यभावें तव चरणीं ॥ शिर ठेवुनी वंदिताहें ॥ ६६ ॥ तरी दयाळे कृपा करून ॥ मम जिव्हाग्रीं सदा वसोन ॥ अद्भुतरामविजय ग्रंथ संपूर्ण ॥ सुरस पूर्ण बोलवीं ॥ ६७ ॥ आतां नमो तुज गुरु दत्ता ॥ अत्रितनया महासमर्था ॥ त्रयमूर्ति तूं अनाथनाथा ॥ दीनजन[11]त्राता विख्यात ॥ ६८ ॥ तुज जे भावें शरण रिघती ॥ तयांसि नाहींच भव[12]भीती ॥ मनकामना पुरोनि अंतीं ॥ अक्षय मुक्ती लाभते ॥ ६९ ॥ तूं वर्षतां कृपाघन[13] ॥ हृदयीं प्रगटे दिव्य ज्ञान ॥ ऐसा तुझा प्रभाव महान ॥ ह्मणोनि शरण आलों असें ॥७०॥ तरी कृपा करूनि दयाघना[13] ॥ पुरवीं माझी मनकामना ॥ ममांतरीं करूनि प्रेरणा ॥ ग्रंथरचना बोलवीं ॥ ७१ ॥ आतां जोडूनि उभय करां ॥ वंदितों तुज धूतपापेश्वरा ॥ तूं धोपेश्वरग्रामीं ईश्वरा ॥ जगदुद्धारा वसतोसी ॥ ७२ ॥ तूं आशुतोष[14] गौरीपती[15] ॥ तुज जे भावें शरण रिघती ॥ तयांवरुती करोनि प्रीती ॥ मनोरथपूर्ती करितोस ॥ ७३ ॥ हें जाणोनियां उमाकांता ॥ शरण रिघालों

---

टी. १ शेषादिक. २ मोठे. ३ ज्यांविषयीं. ४ पदरांत. ५ आकाश. ६ वायु. ७ पृथ्वीचें. ८ समुद्राचें. ९ उदक. १० सूर्य. ११ दीनांचें रक्षण करणारा. १२ संसाराची भीति. १३ कृपेचा मेघ. १४ सत्वर प्रसन्न होणारा. १५ पार्वतीचा पति.

तुज सर्वथा ॥ तरी वदवूनि ह्या अद्भुत ग्रंथा ॥ पुरवीं आर्ता मनींची ॥ ७४ ॥ आतां नमो तुज जगन्माते ॥ आर्यादुर्गे कुलदेवते ॥ निरसूनियां सर्व विघ्नांतें ॥ मम इच्छेतें[1] पुरवीं तूं ॥७५॥ आतां नमूं जनक[2]जननी ॥ जीं श्रेष्ठ सकळ तीर्थाहुनी ॥ जयांचे कृपाबळें करुनी ॥ ग्रंथरचने प्रवर्तलों ॥ ७६ ॥ आतां नमूं सज्जन संत ॥ जे भक्तिज्ञानविज्ञानवंत ॥ परम पावन शांत दांत[3] ॥ सर्वत्र विरक्त विवेकी ॥ ७७ ॥ जे हरिपादपद्मींचे भ्रमर ॥ स्वानंदमकरंद[4] सेविणार ॥ जे अविद्याध्वांतदिनकर[5] ॥ सबाह्याभ्यंतर निर्मळ जे ॥ ७८ ॥ जे हरिनामस्मरण कीर्तन ॥ प्रेमें करिती रात्रंदिन ॥ जे भवसागरमग्नालागुन[6] ॥ स्वाश्रय[7] देऊन उद्धरिती ॥ ७९ ॥ जे दीनाविषयीं वत्सल[8] अती ॥ जे भेदरहित सदा वर्तती ॥ आपपरपणाची भ्रांती ॥ नसेच चित्तीं जयांचे ॥ ८० ॥ जैसा शशी[9] उगवोनि गगनीं ॥ सम प्रकाशे सर्वांलागुनी ॥ कीं राजारंकादि जनांसि तरणी[10] ॥ जैसा प्रकाशे सारिखाच ॥ ८१ ॥ कीं जैसें गंगेचें जीवनें[11] ॥ सर्वांसि पवित्र करी समान ॥ उंच नीच कीं थोर लहान ॥ नरपशुभान नसे तेथें ॥ ८२ ॥ कीं जैसा अंबुधर[12] सृष्टीं[13] ॥ सर्वांसि समान करी वृष्टी ॥ तैसीच जयांची कृपादृष्टी ॥ सुष्टीं[14] दुष्टीं समसमान ॥ ॥ ८३ ॥ ऐसे तह्मी महाराज संत ॥ परम समर्थ कृपावंत ॥ ह्मणोनि ग्रंथारंभीं अविघ्नार्थ ॥ जोडूनि हस्त वंदितों ॥ ८४ ॥ तरी दयाळीं स्वकृपेचा भला ॥ आश्रय देऊनियां मजला ॥ ग्रंथ

टी. १ इच्छा. २ मातापिता. ३ इंद्रियें जिंकणारे. ४ आत्मानंदरूप मध (रस). ५ अज्ञानाचा नाश करणारे. ६ संसारसमुद्रांत बुडणारास. ७ आपला आधार. ८ दयाळू. ९ चंद्र. १० सूर्य. ११ पाणी. १२ मेघ. १३ पृथ्वीवर. १४ सज्जनांवर.

सिद्धीतें न्यावया ॥ अभिमान धरिला पाहिजे ॥ ८५ ॥ आतां नमूं कविजन समस्त ॥ जे परम निर्मळ सदा शांत ॥ जे केवळ परोपकारार्थ ॥ सर्व वेदार्थ विवरिते[1] ॥ ८६ ॥ जे हरिपादपद्मींचे भ्रमर ॥ जे चातुर्यनदीचे महापूर ॥ ज्ञानामृताचे जे सागर ॥ जे डोंगर सुबुद्धीचे ॥८७॥ जे भक्तिसरोवरींचे मीन ॥ जे वैराग्यवनींचे पंचानन[2] ॥ जे शांतीचें सुंदर सदन[3] ॥ क्षमास्थान क्षमावत[4] जे ॥ ८८ ॥ जे प्रेमामृताचे दिव्य कुंभ ॥ जे दयेचे तडाग[5] तुडुंब[6] ॥ जे विवेकाचे वृक्ष स्वयंभ ॥ भेदूनि नभ[7] उंचावले ॥८९॥ ऐसे श्रीमद्व्यासवाल्मीक ॥ शंकराचार्य माधवादिक ॥ आणि वामनएकनाथप्रमुख ॥ कवि अनेक समर्थ जे ॥ ९० ॥ कीं जयांचे नवरस[8]पूरित ॥ संस्कृत आणि प्राकृत ग्रंथ ॥ *भवाब्धिमग्नांचे तारणार्थ ॥ अभंग[9] पोतें[10] जाहले ॥ ९१ ॥ कीं मुमुक्षुजना निष्कंटक ॥ मुक्तिमार्गाचे ते दर्शक ॥ कीं ते मोहांधतम[11]नाशक ॥ सूर्य अनेक प्रगटले ॥ ९२ ॥ कीं ते मायाजाळा छेदिते ॥ तीक्ष्णधार खड्गचि निरुते[12] ॥ कीं प्रपंचामय[13] अपहर्ते ॥ धन्वंतरी ते प्रत्यक्ष ॥ ॥ ९३ ॥ कीं ते नवविध[14]भक्तींचे कुंजें[15] ॥ कीं दिव्यज्ञानरत्नांचे पुंज ॥ कीं ग्रंथरूपें कविकीर्तिध्वज ॥ तेजःपुंज फडकती ॥ ९४ ॥ कीं ते सर्वकामकल्पद्रुम ॥

---

टी. १ सांगणारे. २ व्याघ्र, सिंह. ३ गृह. ४ पृथ्वीसारखे. ५ तळें. ६ भरलेला. ७ आकाश. ८ शृंगार, वीर, करुण, अद्भुत, हास्य, भयानक, बीभत्स, रौद्र, आणि शांत ह्या नवरसांनीं भरलेले. ९ अखंड (फुटके नव्हेत असे). १० नौका. ११ मोहरूप जो गाढ अंधकार त्याचे नाशक. १२ खरोखर. १३ प्रपंचरूप रोग. १४ श्रवण, कीर्तन, नामस्मरण, पादसेवन, अर्चन (पूजा), वंदन, दास्य, सख्य व आत्मनिवेदन ह्या नऊ भक्तींचे. १५ झुडुपे. * संसारसमुद्रांत बुडत असणाऱ्यांच्या.

कीं ते चिंतामणीच अत्युत्तम ॥ कीं ते स्वानंदाचें निजधाम ॥ कीं केवळ ब्रह्मस्वरूप ते ॥ ॥ ९५ ॥ असो त्या सर्व कवींलागुन ॥ ग्रंथारंभीं करितों वंदन ॥ तिहीं मजला साह्य करून ॥ ग्रंथ संपूर्ण वदवावा ॥ ९६ ॥ आतां नमूं श्रोते सकळ ॥ जेकां विवेकी अति निर्मळ ॥ भोळे भाविक मननशीळ ॥ शांत निश्चळ विश्वासू ॥ ९७ ॥ क्षुधित भोजनीं आसक्त होती ॥ तैसी श्रवणीं धरित जे प्रीती ॥ भ्रमरगण पुष्परसा झटती ॥ कीं गुडा लगटती मुंगिया ॥ ९८ ॥ कीं गायनीं आसक्त कुरंग ॥ कीं चंदनीं तल्लीन भुजंग ॥ कीं कामुकजन कामिनीसंग ॥ तेथें-चि दंग सर्वदा ॥ ९९ ॥ तैसेचि जे हरिगुणश्रवणीं ॥ प्रेमा राखिती रात्रंदिनीं ॥ ग्राम्यगोष्टी पडतां कर्णीं ॥ अत्यंत मनीं कंटाळत ॥ १०० ॥ श्रवणा बैसतां कदाचित ॥ आळस निद्रा ये-तील तेथ ॥ ह्मणोनि जे तृप्तिपर्यंत ॥ नच जेवित कदापी ॥ १०१ ॥ नित्य जेविलेंच जेविती अन्न ॥ कीं प्राशिलेंच प्राशिती जीवन ॥ तेंवी ऐकिलेचि ऐकती गुण ॥ परी जे कदा न वि-टती पां ॥ १०२ ॥ आणि कीर्तनपुराण रंगा येतां ॥ शेजाऱ्यां ह्मणती न बोला आतां ॥ वक्त्याची पाहूनि प्रेमळता ॥ प्रेमाश्रुपातां सांडित जे ॥ १०३ ॥ घरीं अवश्यकार्य पातलें ॥ ह्मणोनि तांतडी बोलावूं आलें ॥ तथापि श्रवणीं रंगल्यामुळें ॥ तेथूनियां नुठती जे ॥१०४॥ ऐसे सद्गुणमंडित पूर्ण ॥ जे सर्व भाविक श्रोतेजन ॥ तयांसि ग्रंथारंभीं नमन ॥ अनन्यभावें करितसें ॥ १०५ ॥ तरी तिहीं मजवरी सर्वथा ॥ कृपा करूनि अवधान देतां ॥ मम-

टी. १ चिंतिलेलें देणारा मणि. २ गृह. ३ हरिण. ४ विषयी लोक. ५ विषयसंबंधी किंवा या प्रपंचसंबंधी गोष्टी. ६ पाणी.

वाग्वल्ली हर्षोनि तत्वता ॥ चढेल कथाकल्पवृक्षीं ॥ १०६ ॥ आणि मी तों दीन पामर अती ॥ भक्तिभावहीन मंदमती ॥ व्याकरण कीं काव्यपद्धती ॥ मज निश्चिती न कळेच ॥१०७॥ व्युत्पत्तीचाही नाहीं लेश ॥ न बहुश्रुतपणाचा वास ॥ परी हरिकथा वर्णावयास ॥ मनीं आस उदेलीसे ॥ १०८ ॥ माझे केवळ बोबडे बोल ॥ श्रोते जरी मान देतील ॥ तरीच हा ग्रंथ सकळ ॥ सिद्धीप्रति पावेल पां ॥ १०९ ॥ श्रोते ह्मणतील कोण ग्रंथ ॥ तरी सांगतों ऐकिजे यथार्थ ॥ वाल्मीकऋषि श्रीरामभक्त ॥ जगविख्यात आदिकवी ॥ ११० ॥ तेणें जगदुद्धारा लागुन ॥ शतकोटी रचिलें रामायण ॥ तयाचा अद्भुतोत्तरकांड ह्मणोन ॥ महापावन भाग असे ॥ १११ ॥ तो अद्भुतरामायणनामें ग्रंथ ॥ गीर्वाणभाषाबद्ध विख्यात ॥ परी प्राकृतां तेथींचा अर्थ ॥ सुलभ यथार्थ नव्हे पां ॥ १२ ॥ यालागीं तयाच्या अर्थासी ॥ प्राकृतभाषें वदावयासी ॥ श्रीवाल्मीकेंचि स्वकृपेंसीं ॥ मम मानसीं प्रेरियेलें ॥ १३ ॥ ह्मणोनि तोचि वदवील ॥ तैसीच मम वाणी वदेल ॥ संस्कृत प्राकृत हा सकळ ॥ भेद केवळ भाषेचा ॥ १४ ॥ विचारें पाहतां दोहोंत ॥ एकचि असे भावार्थ ॥ सुवर्णपात्रीं कीं मृद्घटांत ॥ एकचि गोडी दुग्धासी ॥ १५ ॥ कीं दोन नेत्र एकचि पाहणें ॥ दोन नासिका एकचि हुंगणें ॥ कीं दोन कान एकचि ऐकणें ॥ भेद नाहीं अणुमात्र ॥ १६ ॥ जैसें गंगेचें भरलें जीवन ॥ दोन्ही पात्रीं गोडी समान ॥ कीं दोन गुटिका एक रसायण ॥ समसमान गुणासी ॥ १७ ॥ कीं जैसें श्री-

टी. १ वाणीरूपी वेल. २ कथारूप कल्पवृक्षावर. ३ संस्कृतभाषेनें रचलेला. ४ मातीच्या घागरींत. ५ उदक. ६ गोळी.

मंतालागुन ॥ सत्कारें वाढिलें पक्वान्न ॥ तेंचि दुर्बळें भक्षितां समान ॥ तृप्ति होय दोघांसी ॥ ॥ १८ ॥ [1]संस्कृतोदककूप खोल ॥ गुणपात्रांविणें न मिळे जळ ॥ पांथिकजनांची तान्ह केवळ ॥ पाहूनि जळ न जाय पैं ॥ १९ ॥ प्राकृत मोकळें [3]प्रवाहनीर ॥ [4]गुणपात्रांवीण साचार ॥ ओंजळेंचि पीतां पोटभर ॥ हर्ष फार होतसे ॥ १२० ॥ ह्मणोनि संस्कृताहूनि न्यूनता ॥ नसेचि जाणा प्राकृतग्रंथा ॥ आणि यालागींच सज्जनीं तत्वता ॥ प्राकृत ग्रंथ रचियेले ॥ २१ ॥ मुख्य तों पाहावें संस्कृत ॥ परी तें मंदबुद्धि नेणत ॥ कमळतंतुनें मदोन्मत्त ॥ गजेंद्र केंवी बांधवे ॥ २२ ॥ पदरीं असेल पूर्वपुण्य ॥ तरी संस्कृताचें होय ज्ञान ॥ परी प्राकृतग्रंथांवांचून ॥ कैसे सामान्य तरतील ॥ २३ ॥ महावस्त्रें श्रीमंत लेतं ॥ तीं दरिद्र्यां प्राप्त नव्हेत ॥ मग ते घोंगडीच कीं घेत ॥ [6]वर्षोष्णशीतवारणासी ॥ २४ ॥ संस्कृत हेंतों चंद्रमंडळ ॥ त्याचीच प्रभा प्राकृत सोज्वळ ॥ दुग्ध मथितां [7]नवनीतगोळ ॥ जैसा निर्मळ उद्भवे ॥ २५ ॥ आणि [8]अर्कीवृक्षीं मधुघट भरे ॥ तरी कां धुंडावीं [9]गिरिकंदरें ॥ [10]सिकतेमाजी सांपडले हिरे ॥ तरी ते चतुरें न घ्यावे कीं ॥ २६ ॥ कामधेनु आली माजघरीं ॥ तरी दवडावी कीं माघारीं ॥ कल्पवृक्ष उदेतां द्वारीं ॥ सर्वथा चतुरीं रक्षिजेच ॥२७॥ सहज लाभतां राज्यपद ॥ तरी कां न पाविजे आनंद ॥ तेंवीच प्राकृतें कथाबोध ॥ लाभ अगाध न घ्यावा कीं ॥ २८ ॥ यास्तव

टी. १ संस्कृतभाषारूपी उदकाचा कूप. २ वाटसरूंची. ३ वाहतें पाणी. ४ दोरी व पोहरा यांवांचून. ५ पांघुरतात. ६ पाऊस, ऊन्ह व थंडी यांच्या निवारणार्थ. ७ लोण्याचा गोळा. ८ रुईच्या झाडावर. ९ महापर्वतांचे कडे. १० रेतीमध्यें.

श्रोतेजनीं सर्वथा ॥ संमानूनियां प्राकृतग्रंथा ॥ भगवद्गुणश्रवणाकरितां ॥ सावधानताराखिजे ॥ २९ ॥ ऐसें श्रोतयांसि प्रार्थून ॥ प्रथमाध्याय करितों पूर्ण ॥ पुढीलप्रसंगीं कथेलागुन ॥ प्रारंभ जाणा होईल ॥ १३० ॥ श्रीरामकथा अति विचित्र ॥ श्रोतेजनां करूनि पवित्र ॥ सदासर्वदा इह[1] परत्र[2] ॥ सुख सर्वत्र देईल पां ॥ ३१ ॥ ह्मणोनि मी सीतांकुमर[3] ॥ परशुराम विनवितों सादर ॥ श्रीरामकथा अद्भुतांतर ॥ भावें समग्र सेविजे ॥ ३२ ॥ स्वस्ति श्रीमदद्भुतरामविजय ॥ वाल्मीकीयाद्भुतोत्तरकांडहृदय[4] ॥ ऐकोत सज्जन होऊनि तन्मय[5] ॥ मंगलाध्याय[6] मधुर हा ॥ १३३ ॥

---

टी. १ यालोकीं (या भूमीवर जिवंत आहे तों पर्यंत). २ परलोकीं (मृत्युपावल्यानंतर स्वर्गादि लोकांमध्यें). ३ सीतेचा पुत्र (सीता हें या ग्रंथकर्त्याच्या मातेचें नांव). ४ वाल्मीकऋषीनें रचलेल्या शतकोटी रामायणांत अद्भुतोत्तरकांड ह्मणून एक भाग आहे त्याचें हें सार. ५ कथेमध्यें तल्लीन. ६ मंगळाचरणरूपी अध्याय.



श्रीगणेशायनमः ॥ ॥ जय जय श्रीनारायणा ॥ जय जय श्रीलक्ष्मीरमणा ॥ जय पुराणपुरुषा निरंजना[1] ॥ जनार्दना करुणाकरा ॥ १ ॥ जय सच्चिदानंदा[2] परात्परा[3] ॥ क्षीराब्धिवासिया सर्वेश्वरा ॥ शेषशयना वेदांतसारा ॥ परमोदारा[4] दीनबंधू ॥२॥ जय जगद्वंद्या जगन्नायका ॥ जगज्जीवना जगद्व्यापका ॥ जगदात्मया जगज्जनका[5] ॥ जगदोद्धारका जगद्गुरू ॥ ३ ॥ तूं निर्विकार निर्विकल्पक[6] ॥ अखिलमायाचक्रचाळक ॥ उत्पत्तिस्थितिप्रलयकारक ॥ निरुपाधिक[7] परब्रह्म ॥४॥ तूं निराकार निर्गुण* निःसीम ॥ जन्मादिरहित पूर्णकाम ॥ परी भक्तांचे पुरवायाकाम[9] ॥ दाशरथी राम झालासी ॥ ५ ॥ तुझे अद्भुत अनंत गुण ॥ वर्णावया समर्थ कवण ॥ चतुर्मुख[10] पंचास्य[11] सहस्रानन[12] ॥ तेही संपूर्ण तटस्थ ॥ ६ ॥ तेथें मी पामर मंदमती ॥ कैसा शकेन सीतापती ॥ परी त्वां कृपा करितां निरुती[13] ॥ कामनापूर्ती होईल ॥ ७ ॥ ऐसें जाणोनियां घननीळा ॥ वंदितों तुझिये पादकमळा ॥ तरी कृपा करूनियां दयाळा ॥ कथा रसाळा बोलवीं ॥ ८ ॥ निर्विघ्नपणें ग्रंथपूर्ती ॥ व्हावया प्रथमाध्यायीं निगुती ॥ गणेशादिवंदनात्मक प्रीतीं ॥ मंगलाचरण संपादिलें ॥ ९ ॥ आतां अद्भुतरामायणकथा ॥ यथामति वर्णितों तत्वता ॥ तरी सकळ श्रोतीं सर्वथा ॥ सावधानता राखिजे ॥ १० ॥ कां कीं रामाची कथा गोड ॥ गगनाहूनिही बहु वाड[14] ॥

---

टी. १ निष्कलंका. २ सत्यज्ञानानंदरूपा. ३ मायातीता, परमश्रेष्ठा. ४ अत्यंत उदारा. ५ जगताच्या पित्या. ६ कल्पनारहित. ७ मायेची उपाधी नाहीं ज्यास. ८ अनंत. ९ मनोरथ. १० चार आहेत मुखें ज्यास तो (ब्रह्मदेव). ११ पांच मुखांचा (शिव). १२ सहस्र मुखांचा (शेष). १३ खरोखर. १४ मोठी. * सत्व रज व तम ह्या तीन्ही गुणांनीं रहित (शुद्धसत्वात्मक परब्रह्म).

सादर ऐकतां पुरे कोड ॥ नकोचि चोंड आणिकांची ॥ ११ ॥ अहो ह्या मायोद्भवविश्वाठायीं ॥ सुखेंमोक्षप्राप्तीविषयीं ॥ रामकथेसम सुलभ कांहीं ॥ साधन नाहीं नाहींच ॥ १२ ॥ पाहा जे राहूनि सावधान ॥ श्रीरामकथा करिती श्रवण ॥ त्यां तो स्वयेंचि भवांब्धींतून ॥ नेत तारून पैलीकडे ॥ १३ ॥ ऐसा रामकथेचा प्रभाव ॥ बहुतां असे याचा अनुभव ॥ ह्मणोनि श्रोतीं सादर भाव ॥ ठेवूनि सदैव ऐकिजे ॥ १४ ॥ आणि जों जों श्रोते कथेसि सादर ॥ तों तों चढे रसाचा पूर ॥ जैसा देखतां शीतकर ॥ सुटे पाझर सोमकांता ॥ ॥ १५ ॥ जरी असला सर्वार्थवेत्ता ॥ निर्जरगुरुसमान वक्ता ॥ तरी अभाविक मिळतां श्रोता ॥ सकळ कथा व्यर्थ जाय ॥ १६ ॥ वनामाजील जैसें रुदन ॥ तयालागीं न पुसे कवण ॥ तैसें अभाविकजनालागुन ॥ करविणें श्रवण व्यर्थ पैं ॥ १७ ॥ अन्नें केलीं बहु स्वादिष्ट ॥ परी जेवणार मिळाले रोगिष्ठ ॥ तरी सुगंरणीचे सर्व कष्ट ॥ व्यर्थचि स्पष्ट होत जैसे ॥१८॥ नानाविध षड्रसअन्नें ॥ रासभ जेवूं काय जाणे ॥ बहिऱ्यापुढें गायन मांडणें ॥ कीं दर्पण दावणें गर्भांधा ॥ १९ ॥ पंकगर्तेत हिरा टाकिला ॥ कीं सुधारस उकिरडां ओतिला ॥ कीं दिवांभीताचिये गळां ॥ सुरत्नमाळा घातली ॥ २० ॥ कीं कांगा दीधलीं अमृतफळें ॥ कीं उंष्ट्रा ओ-

---

टी. १ इच्छा. २ गरज. ३ सुखानें मोक्ष मिळण्यास. ४ जन्ममरणरूप समुद्रांतून. ५ निरंतर. ६ ज्याचे किरण थंड आहेत तो (चंद्र). ७ चंद्रकांतमण्यास. ८ सर्व अर्थ जाणणारा. ९ देवांच्या गुरूसारखा (बृहस्पतीसारखा). १० चांगला स्वयंपाक करणारणीचे. ११ गाढव. १२ आरसा. १३ चिखलयुक्त खाड्यांत. १४ अमृत. १५ घुबडाचे. १६ कावळ्यास. १७ उंटास. + अन्यांची.

पिलें रायकेळें ॥ कीं [1]महिषाचिये अंगीं [2]आगळें ॥ चंदन माखिलें सुगंध ॥ २१ ॥ कीं दिव्य मंचक [3]तेजागळा ॥ [4]चितांभूमीसि नेऊनि घातला ॥ कीं दिव्यकस्तूरीटिळक भला ॥ भाळीं रेखिला [5]सूकराचे ॥ २२ ॥ कीं जीवात्म्याविणें जें प्रेत ॥ तयासि पूजिलें जैसें व्यर्थ ॥ कीं मर्कटाचिये हस्तांत ॥ दीधला व्यर्थ परिस जेंवी ॥ २३ ॥ आणि अभाविकापुढें कथा ॥ बोलतां संतापे वाग्देवता ॥ जैशी पद्मिणी [6]राजदुहिता ॥ [7]षंढासि देतां तळमळे ॥ २४ ॥ हें तुह्मां [8]विदित साचार ॥ तथापि सुचवितों वारंवार ॥ तरी सावध राहूनि सुंदर ॥ कथा सादर परिसा हो ॥ २५ ॥ तमसानदीचें तीर निर्मळ ॥ [9]नानाद्रुमलताशोभित शीतळ ॥ जेथें विशुद्ध [10]नीर विपुळ ॥ सदाकाळ वाहतसे ॥ २६ ॥ तेथें आश्रम करूनि सतत ॥ अत्यानंदें असे जो वसत ॥ जयाची कीर्ति त्रैलोक्यांत ॥ संत*महंत गाताती ॥२७॥ जो [11]निखिलतपांचें मंदिर ॥ +सन्मार्गदर्शक गुरु [12]प्रवर ॥ सकळ[13]वाङ्मयाचें सुंदर ॥ [14]आद्य साचार स्थान पैं ॥२८॥ जयाचे मुखाब्जापासून ॥ छंदो×मयवाणी उत्पन्न ॥ [15]देवर्षींच्या कृपें जयान ॥ रचिलें रामायण शतकोटी ॥ ॥ २९ ॥ ऐसा सर्व कवींचा [16]नायक ॥ जो ऋषिश्रेष्ठ मुनिवाल्मीक ॥ तयाचे विद्वान् शुद्ध भाविक ॥ शिष्य अनेक असती पैं ॥ ३० ॥ तयांमाजी [17]शिरोमणी ॥ जो भारद्वाजनामा महा-

---

टी. १ टोणग्याचे. २ पुष्कळ. ३ तेजस्वी. ४ स्मशानांत. ५ डुकराच्या. ६ राजकन्या. ७ नपुंसकास. ८ ठाऊक. ९ नानाप्रकारचे वृक्ष आणि वेली यांणीं सुशोभित. १० उदक. ११ सर्व तपांचें. १२ श्रेष्ठ. १३ सर्व शब्दांचें. १४ पहिलें, मूळ. १५ नारदाच्या. १६ मुख्य. १७ श्रेष्ठ. * मोठमोठाले सत्पुरुष + चांगला मार्ग दाखविणारा (उपदेशणारा). × श्लोकरूपी.

मुनी ॥ विद्वान् शांत जितेंद्रिय आणी ॥ गुरूलागुनी बहुमान्य ॥ ३१ ॥ तो एकदा बहुविन-
येंसीं ॥ नमूनियां वाल्मीकऋषीसी ॥ जोडूनि उभय कराब्जांसी ॥ प्रश्न करिता जाहला ॥
॥ ३२ ॥ ह्मणे हे मुने श्रीगुरुनाथा ॥ कविनायका महासमर्था ॥ तूं शरणागतज्ञानदाता ॥
संशयछेत्ता साचार ॥ ३३ ॥ आणि केवळ दयासागर ॥ दीनजनोद्धरणतत्पर ॥ स्वशिष्ये-
च्छापूरक सुंदर ॥ प्रत्यक्ष मंदार आहेसी ॥३४॥ यालागीं मी रिघोन शरण ॥ चरणाशीं क-
रितों प्रश्न ॥ तुवां जें शतकोटि विस्तीर्ण ॥ श्रीरामायण रचियेलें ॥ ३५ ॥ तें तों सकळही
साद्यंत ॥ राहिलें असे ब्रह्मलोकांत ॥ ऋषि ब्राह्मण सुर पितर तेथ ॥ प्रेमें सतत ऐकती ॥ ३६॥
आणि त्या शतकोटीचें सार ॥ जें रामायण पंचवीस हजार ॥ तें हें आह्मी ह्या मेदिनीवर ॥
राहोनि समग्र ऐकतसों ॥३७॥ तेणें योगें आमुचें मन ॥ श्रीरामीं होतसे तल्लीन ॥ परी तो जो
श्रीरामायणाभिधान ॥ सागर विस्तीर्ण शतकोटी ॥३८॥ त्यांत वर्णिला असोनि पाहीं ॥ ह्या
पंचवीससहस्रात्मकाठायीं ॥ एकादा विषय कथिला नाहीं ॥ ऐसा कांहीं असेल ॥३९॥ तरी
तो समस्त मजलागुन ॥ सांगें समर्था विवरून ॥ तूं वर्षतां कृपेचा घन ॥ मनोरथ पूर्ण होतील
॥ ४० ॥ ऐशी सादर प्रश्नवाणी ॥ भारद्वाजमुनीची ऐकुनी ॥ तो आदिकवि श्रीवाल्मीकि
मुनी ॥ अत्यंत मनीं संतोषला ॥ ४१ ॥ आणि शतकोटी रामायण ॥ करतळींच्या आमलें-

टी. १ खरा, सत्य. २ कल्पवृक्ष. ३ मुळापासून शेवटपर्यंत. ४ पृथ्वीवर. ५ रामायणनामक. ६ उघड करून. ७ मेघ. ८ ज्याच्या पूर्वी कोणेंही कोणी श्लोकरूपी कविता केलेली नाहीं असा जो तो (पाहिला कवि). ९ तळहातींच्या १० आंवळ्याप्रमाणें.

कासमान अंतरामाजी सर्व स्मरोन ॥ धुंडाळून पाहिलें ॥ ४२ ॥ तों त्यांत वर्णिला असोनिही ॥ ह्या भूस्थरामायणाठायीं ॥ कथिला नसे ऐसा कांहीं ॥ गुह्य विषय सांपडला ॥ ४३ ॥ तैं तो भगवान् वाल्मीकमुनी ॥ बहु बरवें ऐसें ह्मणोनी ॥ त्या भारद्वाजाभिधशिष्यालागुनी ॥ मधुरवाणी बोलत ॥ ४४ ॥ ह्मणे हे भारद्वाजा ह्या भूवरी ॥ सुखें वांच तूं बहुकाळवरी ॥ आजि तुवां आमुच्या अंतरीं ॥ उत्तम निर्धारीं स्मरविलें ॥ ४५ ॥ शतकोटी विस्तीर्ण परिकर ॥ जो रामायणाख्य महासागर ॥ त्यांत रामाचें चरित्र सुंदर ॥ सौश्वर्य समग्र कथिलें असे ॥ ४६ ॥ आणि पंचविंशतिसहस्रात्मक ॥ जें हें नृलोकीं स्थापिलें एक ॥ यांत नरांसदृशमात्र देख ॥ रामचरित्र वर्णियेलें ॥ ४७ ॥ परी विचित्र विशुद्ध मधुर ॥ सीतामाहात्म्याचें जें सार ॥ तेंतों विशेषें या भीतर ॥ नाहीं साचार कथिले म्यां ॥ ४८ ॥ तरी तूं आतां सावधान ॥ राहूनि मुने करीं श्रवण ॥ श्रीरामाचें परम पावन ॥ विचित्र गहन चरित्र ॥ ४९ ॥ आणि विश्वालागीं मूळ भूता ॥ जी कां साक्षात्प्रकृती सीता ॥ तियेचें महाचरित्रही तत्वता ॥ ऐकें समर्था सकळिक ॥ ५० ॥ अरे हें सीतारामांचें चरित ॥ अद्भुताहूनिही अति अद्भुत ॥ ह्मणोनि म्यां ब्रह्मसदनांत ॥ ठेविलें गुप्त आजवरी ॥ ५१ ॥ परी हितकर्ता विशुद्ध आणी ॥ जो गुरुप्रिय शिष्य महाज्ञानी ॥ तयासि गुह्यगुह्यही विवरोनी ॥ प्रेमें गुरुजनीं सांगिजेतें ॥ ५२ ॥ ही सकळ सज्ज-

टी. १ भूमीवरील ( पंचवीससहस्रात्मक ) रामायणांत. २ भारद्वाजनामक शिष्यास. ३ खचित. ४ सुंदर. ५ खरोखर. ६ मोठें. ७ मूळमाया. ८ ब्रह्मदेवाच्या घरीं ( ब्रह्मलोकीं ). ९ अत्यंत गुह्यही. × आश्चर्ययुक्त ( अद्भुत ).

नांची पद्धती ॥ मान्य असे सर्व जगतीं ॥ आणि तूंतों माझा प्रिय हित अती ॥ असोनि निरुती सच्छिष्य ॥ ५३ ॥ त्रिजगामाजी तुजसमान ॥ नसेचि कोणी ज्ञानसंपन्न ॥ ह्मणोनि आतां तें तुजलागून ॥ समस्त विवरून[2] सांगतों ॥ ५४ ॥ अरे श्रीरामाची जी कांता ॥ सीता नामें जनक[3]दुहिता ॥ तीच सकळसृष्टीसि तत्वता[4] ॥ आदिभूता असे पैं ॥ ५५ ॥ प्रधानत[5]-त्वाख्य मूळप्रकृती ॥ तीच असे जाण निश्चिती ॥ जगदुत्पत्तिस्थित्यंतकर्ती[6] ॥ त्रिगुणयुता[7] ती साचार[8] ॥ ५६ ॥ तीच तपाची फलसिद्धी ॥ तीच बोधस्वरूपा बुद्धी ॥ तीच यज्ञाची फलसि-द्धी ॥ स्वर्गप्राप्तिरूप असे ॥ ५७ ॥ ऐश्वर्यवंतांचें ऐश्वर्य ॥ तेंही तीच जाण निश्चय ॥ ब्रह्मज्ञा-नरूपा निःसंशय ॥ विद्याही असे तीच पैं ॥ ५८ ॥ परमेश्वरावरणकारिणी[9] ॥ अविद्या[10] तीच जनक नंदिनी ॥ महती[11] ह्मणोनी ब्रह्मवाद्यांनीं[12] ॥ तीच त्रिभुवनीं गाईजेते ॥ ५९ ॥ तीर्थाटन ध्यान समाधी ॥ यांचीही तीच फलसिद्धी ॥ लज्जा पुष्टि तुष्टि ऋद्धी ॥ शांति क्षांतिही तीच असे ॥ ६० ॥ तीच त्रिगुणात्मिका आणी ॥ त्रिगुणस्वरूपाही असोनी ॥ सर्वदाही त्रिगुणापासुनी ॥ भिन्नपणेंचि वर्तताहे ॥ ६१ ॥ सनातन[13]ब्रह्मापासून ॥ ब्रह्मांडरूपें तीच उत्पन्न ॥ सर्व कारणां-चेंही कारण ॥ तीच जाण मुनिवर्या ॥ ६२ ॥ गुणसाम्यात्मक[14] जी प्रकृती ॥ तीही तीच असे

---

टी. १ खरोखर. २ स्पष्ट करून. ३ जनकाची कन्या. ४ वास्तविकपणानें. ५ प्रधानतत्वनामक. ६ जगाचे उत्पत्ति, पालन व संहार करणारी. ७ सत्व, रज व तम ह्या तीन गुणांनीं युक्त. ८ खरोखर. ९ परमेश्वरास आच्छादित करणारी. १० अज्ञान. ११ मोठी. १२ वैदिकांनीं, वेदांत्यांनीं. १३ नित्य ब्रह्म जें त्यापासून. १४ सत्वादि तीन्हीं गुणांचें जींत समानत्व आहे अशी.

निरुती ॥ गुणवैषम्यात्मक[1] जी विकृती ॥ तीही भगवती तीच पां ॥ ६३ ॥ तैशीच ज्ञानस्व-रूपा आणी ॥ चिद्विलासिनीही[2] तीच जाणीं ॥ योगिजनीं महाकुंडलिनी ॥ बोलिजेते ती तीच ॥ ६४ ॥ सकळ वस्तुमात्राठायीं ॥ तीच प्रविष्ट असे सदाही ॥ तिजव्यतिरिक्त अनुभवा येई ॥ ऐसेंतों नाहीं कांहींच ॥ ६५ ॥ हें सर्व चराचर जगत ॥ तियेचेंचि असे विलसित[3] ॥ इच्छा-मात्रें तीच सतत ॥ सृष्टिस्थित्यंत करिताहे ॥ ६६ ॥ तत्त्वद्रष्टे[4] योगिजन ॥ हृदयीं जियेचें क-रित ध्यान ॥ हृद्ग्रंथीतें[5] निदाळून ॥ होताति पूर्णसुखमूर्ती ॥ ६७ ॥ ऐशी जी कां सर्वादिभूता[6] ॥ मूळप्रकृती ब्रह्मसंज्ञिता[7] ॥ तीच ती साक्षात् जनकदुहिता ॥ श्रीरामकांता साचार ॥ ६८ ॥ परी ती मूळप्रकृति असून ॥ जनन[8] पावली काय ह्मणोन ॥ ऐसें ह्मणशी तरी कारण ॥ सांगतों श्रवण कीजिये ॥ ६९ ॥ अगा सुव्रता[9] ह्या भूमंडळीं ॥ धर्मनाश होऊनि समूळी ॥ अधर्माची दुर्धर उकळी ॥ ज्या ज्या वेळीं उद्भवते ॥ ७० ॥ तेव्हां तेव्हां मूळप्रकृती[10] ॥ साकार उद्भवते जगतीं ॥ मूळप्रकृती तीच ती सती ॥ सीता भगवती साचार ॥ ७१ ॥ आणि जानकीकांत श्रीराम ॥ तोचि परंज्योति[11] परंधाम[12] ॥ परमपुरुष पूर्णकाम ॥ परमब्रह्म साक्षात ॥ ७२ ॥ सीतारामांच्या आकृती ॥ अत्यंत भिन्न भिन्न दिसती ॥ परी त्या दोघांमाजी निरुती[13] ॥ त्रिशुद्धींही[14] भेद नसे

---

टी. १ सत्वादिगुणांचें जींत न्यूनाधिक्य असतें अशी. २ ज्ञानस्वरूपानें शोभणारी. ३ क्रीडा. ४ खरें पाहणारे. ५ अंतःकरणांतील संशयरूपी गांठ. ६ सर्वांची आदी (मूळ). ७ ब्रह्मनामक. ८ जन्म. ९ चांगलें आहे व्रत ज्याचें अशा प्रकारच्या भारद्वाजा. १० आदिमाया. ११ श्रेष्ठतेजोरूपी. १२ श्रेष्ठस्थानरूपी (मोक्षरूपी) १३ खरोखर. १४ त्रिकाळीं (कधींही).

॥ ७३ ॥ ह्मणोनि राम तेचि सीता ॥ आणि सीता तोचि राम तत्वता ॥ अणुमात्रही दोघांत भिन्नता ॥ कदाकाळीं नसेच ॥ ७४ ॥ हें तत्त्व जाणोनि सज्जन ॥ ज्ञानवंतहोत्साते संपूर्ण ॥ मृत्युवक्रांतून सुटोन ॥ भवाब्धि तरून पैं गेले ॥ ७५ ॥ अगा भारद्वाजा मुनिसुता ॥ अंतरामाजी विचार करितां ॥ श्रीरामचंद्रतों तत्त्वता ॥ सामान्य देवता नव्हेची ॥ ७६ ॥ तो सर्व लोकांचा उत्पादक[1] ॥ भर्त्ता[2] हर्ता[3] निरुपाधिक[4] ॥ आब्रह्मस्तंबपर्यंत[5] एक ॥ सर्वव्यापक सर्वसाक्षी ॥ ७७ ॥ आणि सत्यस्वरूप ज्ञानघन[6] ॥ आनंदमूर्ति सनातन[7] ॥ सर्वोपरि श्रेष्ठ असून ॥ अचिंत्यही असे साचार ॥ ७८ ॥ तथापि तयालागीं पाहीं ॥ सीतेचा योग असे सदाही ॥ ह्मणोनि महायोगिजनांहीं ॥ योगें हृदयीं चिंतिजे तो ॥ ७९ ॥ भारद्वाजा तयाची स्थिती ॥ अतिअद्भुत वर्णू किती ॥ अपादही असतां निरुती ॥ वेगें जगतीं फिरतसे ॥ ८० ॥ आणि स्वयें असतां कररहित ॥ सर्वांसि सर्व देत घेत ॥ नयन नसतांही सतत ॥ पाहे समस्त स्थूलसूक्ष्म ॥ ८१ ॥ तैसाचि असतां अकर्ण ॥ शब्दमात्रातें करी श्रवण ॥ तोतों जाणे विश्वालागुन ॥ परी त्या नेणे[10] कोणीही ॥ ८२ ॥ ऐसा अद्भुत प्रभाव विशेष ॥ ह्मणोनि सर्वही योगीश ॥ सर्वश्रेष्ठ पुराणपुरुष ॥ ऐसें तयास ह्मणताती ॥ ८३ ॥ असो जीं दोघें एक आणी ॥ नामरूपातीत[11] असोनी ॥ योग्यकारणास्तव ह्या मेदिनी[12] ॥ मानवदेहें उद्भवलीं ॥ ८४ ॥ त्या सीतारामांचें आज ॥ उत्तम जन्म

---

टी. १ उत्पत्तिकर्ता. २ पाळण करणारा. ३ संहार करणारा. ४ स्वतंत्र. ५ सर्व ब्रह्मांडांत. ६ ज्ञानानें भरलेला. ७ निरंतर असणारा (नाशरहित). ८ पाय नाहीं असा. ९ लहान मोठें. १० न जाणे. ११ नाम व रूप यांच्या पलीकडचीं. १२ पृथ्वीवर.

॥ ४ ॥
॥ ६ ॥

सांगतों तुज ॥ अरूपियांनीं भूवरी मनुज ॥ देहधारण ॥ करणें जें ॥ ८५ ॥ हातों केवळ मानवांप्रत ॥ महानुग्रहचि जाण निश्चित ॥ अरे हें सीतारामांचें चरित ॥ परम पूत असे पैं ॥ ८६ ॥ हें भक्तिभावें करितां पठण ॥ विप्र होतील महाविद्वान ॥ क्षत्रियवंशोद्भव ते पूर्ण ॥ भूपतित्व तूर्ण पावतील ॥ ८७ ॥ वैश्य ते होऊनि धनपाळ ॥ पावतील सर्वपुण्याचें फळ ॥ शूद्रासितों श्रवणेंचि केवळ ॥ महत्त्व निर्मळ लाधेल ॥ ८८ ॥ हें सीतारामांचें चरित्र ॥ विचित्राहूनि अति विचित्र ॥ कर्णी पडतां प्राणिमात्र ॥ तत्काळ पवित्र होतील ॥ ८९ ॥ अंतरामाजी कामना धरून ॥ एक करितां आवर्तन ॥ सकळ विघ्नें नाश पावून ॥ इच्छा संपूर्ण पुरतील ॥ ९० ॥ भारद्वाजा बहु वर्णूं काय ॥ हें शतकोटींचें मुख्य हृदय ॥ सीतारामासि असोनि प्रिय ॥ भवाब्धिभयनाशक असे ॥ ९१ ॥ हें भक्तिभावें नित्य पढतां ॥ कीं यथावकाश भावें ऐकतां ॥ सर्व कामना पुरूनि तत्त्वता ॥ मोक्षही हाता येईल ॥ ९२ ॥ ऐसें वाल्मीकमुनीनें आपण ॥ कथिलें भारद्वाजालागुन ॥ आँदिकविमुनीचे वचन ॥ असत्य कदा नच होय ॥ ९३ ॥ यावरी ठेवूनियां भाव ॥ श्रोतीं ऐकिजे हें सदैव ॥ ह्मणूनि तयां मी सीतोद्भव ॥ जोडूनि हस्त प्रार्थितों ॥९४॥ स्वस्ति श्रीमदद्भुतरामविजय ॥ वाल्मीकीयाद्भुतोत्तरकांडहृदय ॥ ऐकोत सज्जन होऊनि तन्मय ॥ द्वितीयाध्याय मधुर हा ॥ ९५ ॥ ॥छ॥ ॥छ॥

---

टी. १ ज्यांस रूपच नाहीं त्यांणीं. २ मनुष्य. ३ मोठी कृपाच. ४ पवित्र. ५ शीघ्र, सत्वर. ६ श्रीमंत. ७ वाल्मिकाचें. ८ सर्वकाळ. ९ सीतेच्या पोटीं जन्मलेला (सीतेचा पुत्र). × वाल्मीकानें शंभरकोटी रामायण केलें त्याचें.

## अध्याय ३ रा.












श्रीगणेशायनमः ॥ ॥ जयजयाजी जगद्वंद्या ॥ आत्मारामा स्वसंवेद्या[1] ॥ अजा[2] अजिता[3] अव्य[4]-
याद्या ॥ ध्यानसाध्या[5] जगद्गुरू ॥ १ ॥ तूं सत्वादित्रिगुणनायक ॥ गुणातीत[6] मायाचाळक ॥
मायातीत निरुपाधिक ॥ ब्रह्म एक परिपूर्ण ॥ २ ॥ तूं सच्चिदानंद[7] निर्विकार ॥ नामरूपा[8]-
तीत अपार ॥ विरिंचि[9] विष्णु गिरिजावर[10] ॥ पाळिती सादर तव आज्ञा ॥ ३ ॥ ऐसा तुझा अ-
पार महिमा ॥ तयाची पावेल कोण सीमा[11] ॥ ह्मणोनि केवळ त्वत्पादपद्मा[12] ॥ अनन्यभावें वंदितों
॥ ४ ॥ तरी आतां श्रीवनमाळी ॥ स्वकृपेची करूनि साउली ॥ श्रीरामकथा बहु चांगली ॥
माझीये बोलीं वर्णवीं ॥ ५ ॥ पूर्वप्रसंगीं वाल्मिकीनें ॥ भारद्वाजऋषीकारणें ॥ सीतारामाचें अ-
भेदपणें ॥ ब्रह्मत्व पूर्ण कथियेलें ॥ ६ ॥ ऐसें जाहलें कथानक ॥ याहूनि पुढें असे रसिक ॥
पर्वांपर्वीं[13] अधिकाधिक ॥ इक्षुदंड[14] गोड जैसा ॥ ७ ॥ तरी तुह्मी सकळ जन ॥ सावध ठेवूनि
अंतःकरण ॥ आदिकवीनें[15] केलें कथन ॥ तेंचि श्रवण कीजिये ॥ ८ ॥ वाल्मीकि ह्मणे शिष्या-
लागुनी ॥ श्रीराम पुराणपुरुष असोनी ॥ इक्ष्वाकुवंशीं कायह्मणोनी ॥ मनुष्यरूपें जन्मला ॥
॥ ९ ॥ तैशीच सीता मूळप्रकृती[16] ॥ किंकारणें[17] उद्भवली क्षितीं[18] ॥ तेंचि समग्र यथास्थिती ॥
तुझियेप्रती सांगतों ॥ १० ॥ तयामाजी श्रीरामकथा ॥ अंबरीषाख्यानसंयुक्ता ॥ जियेच्या

---

टी. १ ज्ञानस्वरूपा. २ जन्मरहिता. ३ अजिंका. ४ नाशरहिता व सर्व जगाच्या आदिभूता. ५ ध्यानानें मात्र लाभणारा. ६ सत्वादि तीन्ही गुणांनीं रहित. ७ सत्य ज्ञान व आनंद एतद्रूपी. ८ नाम व रूप यांणीं रहित. ९ ब्रह्मदेव. १० शिव. ११ अंत. १२ तुझ्या पादकमळास. १३ प्रत्येक पेरांत. १४ ऊंस. १५ वाल्मीकानें. १६ आदिमाया. १७ काय ह्मणोन. १८ पृथ्वीवर.

श्रवणें सर्व दुरितां ॥ नाश होय तत्काळ ॥ ११ ॥ तीच आदी तुजलागुनी ॥ कथितों सादर होई श्रवणीं ॥ ऐसें बोलोनि वाल्मीकिमुनी ॥ प्रेमें कथनीं प्रवर्तला ॥ १२ ॥ पूर्वी त्रिशंकुराजेश्वर ॥ सूर्यवंशीं प्रतापी थोर ॥ अयोध्येमाजी धर्मतत्पर ॥ निरंतर राहतसे ॥ १३ ॥ तयाची भार्या लावण्यखाणी ॥ पतिव्रतांमाजी शिरोमणी ॥ पद्मावतीनामें सुलक्षणी ॥ शौचाचरणीं तत्पर ॥ १४ ॥ तियेनें श्रीशेषशयन ॥ योगनिद्रिस्थ नारायण ॥ जो त्रिगुणीं त्रिदेवाभिधान ॥ तोचि पूर्ण आराधिला ॥ १५ ॥ अनेकविध पुष्पें आणुनी ॥ सुंदर माळा रची सुगुणी ॥ चंदनघर्षणादि स्वपाणींनीं ॥ करी अनुदिनीं कौतुकें ॥ १६ ॥ वस्त्रालंकारधूपदीपेंसीं ॥ आणि नैवेद्यादिक बहुद्रव्येंसीं ॥ काया वाचा मनोभावेंसीं ॥ श्रीहरीसी पूजित ॥ १७ ॥ आणि गोविंद हरे मुकुंद कृष्ण ॥ अनंत विष्णो श्रीनारायण ॥ एवंरीती मुखें भजन ॥ रात्रंदिन करितसे ॥ ॥ १८ ॥ भगवद्भक्त जे महाभाग ॥ सर्वपापवर्जित चांग ॥ श्रीहरिचरणीं ठेवूनी राग ॥ यथासांग पूजिती ॥ १९ ॥ तयांलागीं बहुसन्मानें ॥ देऊनियां धनरत्नदानें ॥ अर्घ्यपाद्यादि सांगपूजनें ॥ भोजनपानें तोषवी ॥ २० ॥ ऐसें करितां तपाचरण ॥ दशसहस्त्र वर्षें लोटलीं जाण ॥ मग भक्तवत्सल नारायण ॥ सुप्रसन्न जाहला ॥ २१ ॥ द्वादशीदिनीं उपोषित ॥ पद्मावती प्रेमभरित ॥ श्रीविष्णूच्या पुढें व्रतस्थ ॥ पतिसहित निजियेली ॥ २२ ॥ तंव स्वप्नामाजी हृषी-



टी. १ पातकांचा २ शुद्धमार्गानें वागण्याविषयीं. ३ शेषावर निजणारा. ४ सत्वादि गुणांनीं. ५ ब्रह्मा, विष्णु व शिव ह्या तीन नांवांचा. ६ गंध उगाळणें. ७ आपल्या हातांनीं. ८ दररोज. ९ या रीतीनें. १० महाभाग्यवंत. ११ उत्तम. १२ प्रीति.

केशी ॥ स्वदर्शन देऊनि तियेसी ॥ ह्मणे कीं भद्रे[1] सुगुणराशी ॥ काय[2] वरासी इच्छितेस ॥२३॥ सहस्रवर्षेंपर्यंत ॥ मम[3] आराधन केलेंसि सतत ॥ यालागीं मी वैकुंठनाथ ॥ होऊनि प्रीत[4] पातलों ॥ २४ ॥ तरी तूं आतां पद्मावती ॥ इच्छित वर मागें मजप्रती ॥ सर्वभक्तांची कामनापूर्ती ॥ करितों निश्चितीं जाणपां ॥ २५ ॥ ऐसी हरीची वरद वाणी ॥ ऐकतांचि ती राजकामिनी[5] ॥ चरणावरी मस्तक ठेवुनी ॥ हस्त जोडुनी बोलत ॥ २६ ॥ हे भक्तवत्सला पुरुषोत्तमा ॥ भक्तकामनाकल्पद्रुमा[6] ॥ भक्तप्रिया कैवल्यधामा[7] ॥ परब्रह्मा स्वामिया ॥ २७ ॥ तूं निर्विकार सच्चिद्घन[8] ॥ नामरूपातीत निर्गुण ॥ सर्वांतर्यामी नारायण ॥ परिपूर्ण आहेसी ॥२८॥ आब्रह्मस्तंभपर्यंत[9] ॥ ठाव[10] नाहीं तुजरहित ॥ ऐसें असतां सकळां विदित ॥ अति भ्रांत होऊनियां ॥ २९ ॥ त्वद्रूपाची व्हावया प्राप्ती ॥ नानाविध खटपट करिती ॥ तीर्थी क्षेत्रीं दिवसरातीं ॥ फिरतां भोगिती बहु कष्ट ॥ ३० ॥ परी नव्हेचि स्वरूपज्ञान[11] ॥ खटाटोप व्यर्थ संपूर्ण ॥ आत्मप्राप्तीसि मुख्य कारण ॥ असे जाण एक भक्ती ॥ ३१ ॥ योगाभ्यासादि बहु साधनें ॥ त्वत्प्राप्तीसि असती कारणें ॥ परी तीं अनन्यभक्तीविणें ॥ असती जाणें व्यर्थचीं ॥ ३२ ॥ अखिलसाधनांमाजी वरिष्ठ ॥ भक्तियोगचि असे स्पष्ट ॥ ह्मणोनचि तया अतितेजिष्ठ[12] ॥ मुनिश्रेष्ठ आचरती ॥ ३३ ॥ विरिंचि विष्णु कैलासवासी ॥ नारदादिक महाऋषी ॥ तव[13] भक्तियोगा-

टी. १ हे कल्याणस्वरूपिणी. २ कोणत्या. ३ माझें. ४ संतुष्ट. ५ राजाची स्त्री. ६ भक्तांची इच्छा पूर्ण करणारा कल्पवृक्षच. ७ मोक्षाचें स्थान. ८ सत्य व ज्ञान यांणीं परिपूर्ण. ९ सर्व ब्रह्मांडांत १० स्थळ. ११ खऱ्या रूपाचें ज्ञान. १२ अतितेजस्वी. १३ तुझ्या.

चरणेंसीं ॥ पूज्य जगासी जाहले ॥ ३४ ॥ एवंप्रकारें पुरुषोत्तमा ॥ तंव भक्तीचा असे महिमा॥
वर्णन करितां तयाची सीमा ॥ कैसी अधमा मी पावें ॥ ३५ ॥ एवंरीती त्वद्भक्तियोग ॥ सक-
ळसाधनांमाजी चांग ॥ तयासि आचरी जोकां सांग ॥ तोचि निश्चयें प्रिय तूतें ॥ ३६ ॥ असो
आतां करुणाघना ॥ होऊनियां प्रसन्नमना ॥ मजलागीं तूं वरप्रदाना ॥ जरी उद्युक्त झाला-
सी ॥ ३७ ॥ तरी अनंता त्वद्भक्तवर्य ॥ ऐसा मज व्हावा तनय ॥ जयाच्या योगें कुळें उभय ॥
मोक्षालय पावती ॥ ३८ ॥ स्वकर्मतत्पर राहून ॥ सर्वपृथ्वीचें करील पालन ॥ ऐसा देईं मज-
ला नंदन ॥ नको अन्य कांहींच ॥ ३९ ॥ एवंरीती बह्वर्थयुक्त ॥ पद्मावतीचें ऐकूनि भाषित ॥
करुणासागर वैकुंठनाथ ॥ तथास्तु बोलत प्रीतीनें ॥४०॥ एक उत्तम फळ तियेसी ॥ देऊ-
नि आपुल्या हस्तेंसीं ॥ ह्मणे कीं याच्या भक्षणेंसीं ॥ पुत्र तुजसी होईल ॥ ४१ ॥ ऐसें बोलूनि-
यां तत्क्षण ॥ श्रीहरि पावला अंतर्धान ॥ पद्मावतीनें जागृत होऊन ॥ पतीलागुन उठविलें ॥
॥ ४२ ॥ आणि तया सकळ वृत्तांत ॥ सांगूनि ह्मणे हे प्राणनाथ ॥ श्रीहरीनें फळ हें मजप्रत ॥
संतानार्थ दीधलेंसें ॥ ४३ ॥ जरी आज्ञा द्याल आपण ॥ तरीच करीन हें भक्षण ॥ ऐसें स्त्रि-
येचें ऐकूनि वचन ॥ त्रिशंकु पूर्ण आनंदला ॥ ४४ ॥ आणि ह्मणे हे प्रिये पतिव्रते ॥ धन्य-
धन्य तूं गुणसरिते ॥ आपुल्या योगें सव कुळातें ॥ तुवां निश्चयें उद्धरिलें ॥ ४५ ॥ श्रीहरीचें



टी. १ याप्रमाणें. २ तुझ्या. ३ नीच. ४ चांगला. ५ प्रसन्न आहे अंतःकरण ज्याचें असा. ६ वर देण्यास. ७ तयार. ८ तुझ्या भक्तांत श्रेष्ठ. ९ पुत्र. १० दोन्ही (पतीचें व पित्याचें). ११ मोक्षपद. १२ पुष्कळ अर्थांनीं युक्त. १३ वचन. १४ पुत्रप्राप्तीसाठीं.

दर्शन दुर्लभ ॥ परी तें तूतें होऊनि सुलभ ॥ पुत्रद[1] फळाचा झाला लाभ ॥ तरी विलंब करूं नको ॥ ४६ ॥ ऐसी राजेश्वराची भारती[2] ॥ ऐकूनियां ती पद्मावती ॥ अत्यानंदें तत्काळ निगुती ॥ फळ भक्षिती जाहली ॥४७॥ पुढें लोटतां किंचित्काळ ॥ त्रिशंकुपत्नी ती वेल्हाळ[3] ॥ पतिसंयोगें अति तेजाळ ॥ झाली तत्काळ गर्भिणी ॥ ४८ ॥ नवमास होतांचि पूर्ण ॥ प्रसूत झाली ती कामिन ॥ सर्वलक्षणीं सुसंपन्न ॥ पुत्र उत्पन्न जाहला ॥ ४९ ॥ तैं नगरामाजी विशेष ॥ मंगलतुरांचा[4] लागला घोष ॥ ध्वजपताकीं सर्व आकाश ॥ भरोनियां गेलें पैं ॥५० ॥ अति उत्साहें सुवासिनी ॥ हळदीकुंकुमें ताटें भरोनी ॥ महावेगें सूतिकासदनीं[5] ॥ सहस्रशः धांविन्नल्या ॥ ५१ ॥ अत्यानंदें चहूंकडून ॥ धांवोनियां आले ब्राह्मण ॥ क्षीरसागरासि देखून ॥ क्षुधार्त[6] जन जैसे पां ॥५२ ॥ मग त्या त्रिशंकुराजेश्वरें ॥ स्नान सारोनि शीतनीरें[7] ॥ जातकर्मसंस्कार[8] सत्वरें ॥ यथाविधि संपादिला ॥ ५३ ॥ सकळ द्विजश्रेष्ठांकारणें ॥ उत्तम वस्त्रें नाना भूषणें ॥ आणीक सवत्स गोप्रदानें ॥ बहुसन्मानें दीधलीं ॥ ५४ ॥ अपार द्रव्य समर्पून ॥ तोषविले याचकजन[9] ॥ कारागृहस्थ[10] लोक संपूर्ण ॥ तेहि तत्क्षण सोडिले ॥ ५५ ॥ ज्योतिर्विद[11] ब्राह्मणेंसीं ॥ वर्तवूनियां जातकासी[12] ॥ बहुदक्षिणा देऊनि त्यांसी ॥ सन्मानेंसीं तोषविलें ॥ ५६ ॥ नगरामाजी महोत्सव ॥ नित्य चालविला अभिनव[13] ॥ मार्गीं जावया नसे वाव ॥ नगर सर्व शृं-

टी. १ पुत्र देणाऱ्या. २ वाणी. ३ सुंदर. ४ मंगळवाद्यांचा. ५ बाळंतीच्या घरांत (खोलींत). ६ भुकेलेले. ७ थंड पाण्यानें. ८ पुत्रावण. ९ मागणारे लोक. १० तुरुंगांतील. ११ ज्योतिष जाणणारे (जोशी). १२ जन्मपत्रिकेस. १३ नवा नवा.

गारिलें ॥ ५७ ॥ पुढें राव द्वादशदिवसीं ॥ नाम ठेविजे तनयासी ॥ ऐसा विचार करूनि मानसीं ॥ संस्कारासी करितसे ॥ ५८ ॥ द्विजवर्यांसि पाचारून ॥ यथाविधि संस्कार करून ॥ अंबरीष ऐसें अभिधान ॥ पुत्रालागून ठेविलें ॥५९॥ असो पुढें तो राजकुमर ॥ दिवसेंदिवस वाढे सुंदर ॥ शुक्लपक्षींचा रजनीकर ॥ अधिकाधिक जैसा पां ॥ ६० ॥ पक्ष मास ऋतु अयन ॥ जैसें होय कालक्रमण ॥ तैसा तैसा त्रिशंकुनंदन ॥ वर्धमान होतसे ॥ ६१ ॥ बाळक्रीडा अनेकरीती ॥ करोनियां दिवसरातीं ॥ जनकजननींचिये चित्तीं ॥ तोषोत्पत्ती करितसे ॥६२॥ ऐशियेरीती दश संवत्सर ॥ क्षणासारिखे गेले सत्वर ॥ मग तो त्रिशंकुराजेश्वर ॥ चित्तीं विचार करी कीं ॥ ६३ ॥ हा अंबरीष आपुला सुत ॥ योग्य झाला व्रतबंधार्थ ॥ यास्तव आतां याचें त्वरित ॥ उपनयन कीजिये ॥ ६४ ॥ मग विप्रांसि बोलावून ॥ वसिष्ठगुरूसि पाचारून ॥ सुमुहूर्तीं संस्कार करून ॥ मौंजीबंधन संपादिलें ॥ ६५ ॥ मग त्या अंबरीषालागुनी ॥ वसिष्ठगुरूचिये सदनीं ॥ द्वादशवर्षेंपर्यंत ठेवुनी ॥ विद्याभ्यास करविला ॥६६॥ तें गुरुकृपें तो राजेंबाळ ॥ चवदाविद्यांत झाला कुशळ ॥ गीतादिक ज्या कळा सकळ ॥ त्याही तत्काळ आकळी ॥ ६७ ॥ जें जें कलाकौशल्य पाही ॥ तें तें आकळी लवलाहीं ॥ अंबरीषासि विदित नाहीं ॥ ऐसें कांहीं दिसेना ॥ ६८ ॥ शौर्यौदार्यादि अनेक गुण ॥ तया अंगीं वसती पूर्ण ॥ धनुर्धरही



टी. १ पुत्राचें. २ नामकरणनामकसंस्कार. ३ नांव. ४ चंद्र. ५ पंध्रवडा. ६ साहा महिने. ७ त्रिशंकुराजाचा पुत्र. ८ वृद्धिंगत. ९ आनंदाची उत्पत्ति. १० वर्षें. ११ मुंजीला. १२ मुंज. १३ घरीं. १४ राजपुत्र. १५ वेई. १६ सत्वर. १७ शूरत्व व उदारता इत्यादि.

तयासमान ॥ जगीं कोण नाहींच ॥ ६९ ॥ एवं विद्यादिगुणपूरित ॥ अंबरीष झाला जगवि-
ख्यात ॥ ऐसें पाहूनि तयाचा तात ॥ त्रिशंकु अत्यंत आनंदला ॥ ७० ॥ मग पुत्राचें सत्व-
रेंसीं ॥ लग्न करोन महोत्सवेंसीं ॥ पुढें त्रिशंकु कित्येक दिवसीं ॥ परलोकासी पावला ॥७१॥
तयेकाळीं प्रजाप्रधानांनीं ॥ आणि वसिष्ठादि सर्वऋषींनीं ॥ यथाविधि अंबरीषालागुनी ॥ राज्या-
सनीं अभिषेकिलें ॥ ७२ ॥ मग तो त्रिशंकूचा नंदन ॥ सर्वगुणसंपन्न सुजाण ॥ धर्मन्यायें
पित्यासमान ॥ प्रजापालन करितसे ॥ ७३ ॥ ऐसा लोटतां किंचित्काळ ॥ काय करी तो भू-
मिपाळ ॥ तेंचि श्रोतीं मन निश्चळ ॥ करूनियां ऐकिजे ॥ ७४ ॥ मुख्यप्रधानासि पाचारून ॥
राव ह्मणे मी तपस्येलागुन ॥ काननामाजी करितों गमन ॥ सावधान राहीं तूं ॥ ७५ ॥ राज-
नीतीचें सर्व बीज ॥ तुज ठाउकें असे विरंज ॥ तरी हें माझें सकळ राज्य ॥ धर्में सहज सां-
भाळीं ॥७६॥ सर्व प्रजांचें परिपाळण ॥ पित्यापरि करीं अनुदिन ॥ तुजवरी माझा विश्वास पूर्ण ॥
ह्मणोनि जाण सांगताहें ॥ ७७ ॥ ऐसें अंबरीषाचें भाषित ॥ ऐकूनि प्रधान अति हर्षित ॥
ह्मणे कीं भूपा अरण्याप्रत ॥ जरी तपार्थ जातोसी ॥ ७८ ॥ तरी हरीचें पादकमळ ॥ स्वस्थ-
चित्तें सेवीं सोज्वळ ॥ तुझिये आज्ञेप्रमाणें केवळ ॥ राज्य सकळ चालवीन ॥ ७९ ॥ प्रजासंर-
क्षणाची काळजी ॥ वागवूं नको हृदयांभोजीं ॥ श्रीहरीच्या चरणपंकजीं ॥ चित्त सहजीं गुं-

टी. १याप्रमाणें. २ जगप्रसिद्ध. ३ पिता. ४ स्वर्गास (मृत्यूप्रत). ५ राजा (अंबरीष). ६ अरण्यांत. ७ स्पष्ट (स्वच्छ).
८ दररोज. ९ बोलणें. १० राजा. ११ तेजस्वी (सुंदर). १२ हृदयकमळांत. १३ पादपद्माच्या ठायीं. १४ सहजावृत्तीनें.

तवीं ॥ ८० ॥ ऐसी प्रधानाची भारती[1] ॥ ऐकूनियां तो पृथ्वीपती ॥ त्रिशंकु[2]तनय तत्काळ अती ॥ स्वकीयचित्तीं आनंदला ॥ ८१ ॥ सर्वराज्याचा कारभार ॥ टाकूनियां प्रधानावर ॥ तपाचरणासाठीं तत्पर ॥ वनीं सत्वर प्रवेशला ॥ ८२ ॥ अतिभयानक तें विपिनें[3] ॥ व्याघ्र-सिंहादिश्वापदीं पूर्ण ॥ पर्वतांपरी गज महान ॥ चहूंकडून धांवती ॥ ८३ ॥ लांडगे गवे आ-णि सूकर[4] ॥ महाकाय[5] अति भयंकर ॥ तैसेचि अनेक रात्रिंचर[6] ॥ निरंतर फिरती पां ॥ ८४ ॥ नानावृक्षांची दाटी बहुत ॥ ताल[7]द्रुम गगन[8]चुंबित ॥ वट पायरी फणस चूत[9] ॥ निंब अत्यंत साजिरे ॥ ८५ ॥ अर्जुन[10] अशोक पिंपळ ॥ देवदारु बदरी[11] बाभुळ ॥ सुरंगी कांचन आणि ब-कुळ ॥ अति विशाळ शोभती ॥ ८६ ॥ निबिड[12]छायेमाजी जाणा ॥ वाट नसे रविकिरणां ॥ वल्ली[13]निकुंजांतूनि नाना ॥ जीव गर्जना करिती पां ॥ ८७ ॥ ठायींठायीं अति मधुर ॥ वाह-तसे निर्मळ नीरें[14] ॥ गीध उलूक[15] काक मयूर ॥ निरंतर ओरडती ॥ ८८ ॥ ऐशिये अरण्या-माझारी ॥ तो अंबरीष पादचारी[16] ॥ जातां जातां बहुत दूरी ॥ नदीतीरीं पावला ॥ ८९ ॥ तें निरुपद्रव[17] निर्मळ ॥ महानदीचें उत्तम कूळ[18] ॥ शीत सुगंधी मंद अनिळ[19] ॥ वाहे झुळझुळ सर्वदा ॥ ९० ॥ हरिण व्याघ्रादि सर्व प्राणी ॥ प्रीतीं खेळती एके स्थानीं ॥ ऐसें पाहून राजेंद्र

---

टी. १ वाणी. २ त्रिशंकूचा पुत्र (अंबरीष). ३ अरण्य. ४ डुकर. ५ मोठ्या देहांचे. ६ राक्षस. ७ ताडाचे वृक्ष. ८ आकाशांत गेलेले (अत्यंत उंच). ९ आम्रवृक्ष. १० ज्यास अर्जुनसादडा किंवा आंजण ह्मणतात तो. ११ बोरी. १२ दाट छायेमध्यें. १३ वेलींच्या झुडुपांतून (जाळींतून). १४ पाणी. १५ घुबड. १६ पायचालीनें. १७ उपद्रवरहित. १८ तीर. १९ वायु.

सुगुणी ॥ तोषला मनीं अत्यंत ॥ ९१ ॥ मग त्या सुरम्य सरितातटीं ॥ बांधोनियां पर्णकुटी ॥ श्रीहरीची व्हावया भेटी ॥ लावूनि दिठी बैसला ॥ ९२ ॥ जो जगदीश्वर नारायण ॥ कैवल्य-धनी रमारमण ॥ भक्तवत्सल दीनरक्षण ॥ सच्चिद्घन जगद्गुरू ॥९३॥ जो सर्वदा हृत्पुंडरीकीं ॥ वसती करी बहु कौतुकी ॥ शंखचक्रगदापद्में निकीं ॥ चतुर्हस्तकीं धरितसे ॥ ९४ ॥ राहूनि-यां सूर्यमंडळीं ॥ प्रकाश पाडी ब्रह्मांडमेळीं ॥ श्रीवत्स जयाच्या वक्षस्थळीं ॥ सर्वकाळीं शो-भत ॥ ९५ ॥ तप्तजांबूनदासारखें ॥ सर्वत्र जयाचें तेज फांके ॥ ब्रह्मविष्णुशंकरात्मकें ॥ रूपें अनेकें जयाचीं ॥ ९६ ॥ विद्युत्प्राय देदीप्यमान ॥ कटीं शोभे पीत वसन ॥ सर्वाभरणीं शो-भायमान ॥ देह संपूर्ण जयाचा ॥ ९७ ॥ जो अज अव्यय आत्माराम ॥ पुराणपुरुष पुरुषोत्तम ॥ जयाच्या भजनें सकळ कांम ॥ पुरती नेम असे हा ॥ ९८ ॥ ऐसा जो कां श्रीमुरारी ॥ ज-गदुत्पत्तिस्थित्यंतकारी ॥ तयाचें ध्यान स्वकीयांतरीं ॥ नित्य निर्धारीं करूनियां ॥ ९९ ॥ अनंत विष्णो श्रीनारायण ॥ अनाथनाथ दीनरक्षण ॥ एवंप्रकारें रात्रंदिन ॥ प्रेमें भजन करितसे ॥ १०० ॥ तो त्रिशंकुतनय अंबरीष ॥ हरिचरणीं ठेवूनि मानस ॥ ध्यानभजनांवाचून निमेषें ॥ काळलेश घालवीना ॥ १०१ ॥ अंतरीं करून एकाग्रता ॥ सदा चिंती इंदिरांकांता ॥ श्रीह-रिभजनावांचून तत्वता ॥ कांहींच चित्ता नावडे ॥ १०२ ॥ ऐसें करितां तपाचरण ॥ सहस्र

---

टी. १ दृष्टि. २ मोक्षाचा स्वामी. ३ हृदयकमळांत. ४ भृगुपदाचें चिन्ह. ५ तापलेल्या सोन्याप्रमाणें ६ पिंवळें. ७ वस्त्र. ८ उत्पत्ति-रहित (अनादि). ९ नाशरहित. १० इच्छा. ११ जगाची उत्पत्ति, पाळण व संहार. १२ लवमात्र. १३ लक्ष्मीच्या पतीस (विष्णूस).

वर्षें लोटलीं जाण ॥ मग वैकुंठवासी नारायण ॥ अंतरीं प्रसन्न होऊनियां ॥ १०३ ॥ अंबरीष-रायाचें अंतर[1] ॥ कैसें निश्चयी आपुल्यावर ॥ तयाचे परीक्षेसाठीं श्रीधर[2] ॥ करी विचार तो ऐका ॥ १०४ ॥ शंखचक्रगदापद्मधारक ॥ नवनीरदाभ[3] शुद्ध सात्विक ॥ जयाच्या दर्शनें अधिकाधिक होय हरिख[4] ॥ भक्तांसी ॥ १०५ ॥ श्रीवत्सलांछन हृदयावर ॥ आजानु[5] बाहु शोभती चार ॥ ऐसें जें कां अति सुंदर ॥ स्वरूप सौचार[6] आपुलें ॥ १०६ ॥ स्वेच्छें तयासि आच्छादून ॥ इंद्रस्वरूपी झाला आपण ॥ सर्व शरीराठायीं तत्क्षण ॥ सहस्र नयन[7] पसरले ॥ १०७ ॥ जैसा प्रत्यक्ष कुलिशधारी[8] ॥ तैसाचि नटला श्रीमुरारी ॥ तयाची अतर्क्य लीलांकुसरी[9] ॥ कोण वैखरी[10] वर्णील ॥ १०८ ॥ बहु नाटकी तमाळनीळ[11] ॥ इंद्रस्वरूपी होऊनि केवळ ॥ ऐरावताचें रूप सोज्वळ[12] ॥ देई तत्काळ गरुडासी ॥ १०९ ॥ असो ऐसा वैकुंठविहारी[13] ॥ स्वयें होऊनि वज्रधारी ॥ ऐरावतरूपगरुडावरी ॥ बैसोनि सत्वरी चालिला ॥ ११० ॥ अंबरीषराजा प्रतापवंत ॥ जेथें बैसला तपस्या करित ॥ तये स्थळीं तो कमळाकांत[14] ॥ येऊनि त्वरित बोलतसे ॥ १११ ॥ अगा राया गुणनिधाना ॥ शतक्रतु[15] मी त्रैलोक्यराणा[16] ॥ पाहूनि तुझिये तपाचरणा ॥ प्रसन्नमना जाहलों ॥ ११२ ॥ तुझें करावें संरक्षण ॥ ह्मणोन येथें पातलों जाण ॥ तरी आतां सोडूनि

---

टी. १ चित्त. २ विष्णु. ३ नव्या ( पाण्यानें भरलेल्या ) मेघाप्रमाणें श्यामवर्ण. ४ हर्ष. ५ गुडघ्यांपर्यंत लांब. ६ खरें. ७ नेत्र. ८ वज्र धारण करणारा (इंद्र). ९ लीलेचें कौशल्य. १० वाणीनें. ११ तमालपत्राप्रमाणें श्यामवर्ण. १२ सुंदर, स्वच्छ. १३ वैकुंठीं क्रीडा करणारा ( विष्णु ). १४ लक्ष्मीचा पति. १५ शंभर यज्ञ करणारा ( इंद्र ). १६ त्रैलोक्याचा राजा.

ध्यान ॥ उघडीं नयन सत्वरी ॥ ११३ ॥ अंतरामाजी असेल इच्छित ॥ तेंचि तूं राया मागें मजप्रत ॥ सकळ कामना पूर्णार्थ[1] ॥ आहें समर्थ निश्चयें ॥ ११४ ॥ ऐसें ऐकूनियां वचन ॥ राव उघडी आपुले नयन[2] ॥ तंव अग्रभागीं शचीरमण[3] ॥ ऐरावतीं बैसलासे ॥ ११५ ॥ तया पाहतांचि संतप्तमना[4] ॥ नरेंद्र बोले कठोरवचना ॥ पुरेपुरेरे सहस्त्रनयना[5] ॥ न करीं वल्गना[6] उगाची ॥ ११६ ॥ तुवां मातें होवोनि प्रसन्न ॥ उत्तम द्यावें वरप्रदान ॥ ऐसा अंतरीं हेतु धरून ॥ बैसलों जाण नव्हेची ॥ ११७ ॥ जो भक्तवत्सल[7] नारायण ॥ वैकुंठवासी इंदिरारमण[8] ॥ तयाचेंच मी अंतरीं ध्यान ॥ रात्रंदिन करिताहें ॥११८॥ ऐसें असतां तूं किमर्थ[9] ॥ मम सन्निध झालासि प्राप्त ॥ तुवां दीधल्या वरदानाप्रत ॥ नाहीं इच्छित निश्चयें ॥ ११९ ॥ सहस्रवर्षेंपर्यंत अनुदिनीं[10] ॥ जया आराधिलें ध्यानभजनीं ॥ तोचि भगवान् कैवल्यदानी[11] ॥ मज निदानीं रक्षील ॥ १२० ॥ सकळकामना पूरणार्थ ॥ मम[12] प्रभु तो आहे समर्थ ॥ असें असोनि इंद्रा किमर्थ ॥ वटवट व्यर्थ करितोसी ॥ १२१ ॥ तरी तूं आतां पाकशासना[13] ॥ विघ्न न करितां तपाचरणा ॥ आलिया पंथें[14] सुस्वस्थमना ॥ आपुल्या स्थाना जाईं बा ॥ १२२ ॥ ऐसें अंबरीषाचें भाषित ॥ ऐकतांचि हरि अति हर्षित ॥ इंद्रस्वरूप टाकूनि त्वरित ॥ प्रगटला तेथ स्वस्वरूपेंसीं[15] ॥ १२३ ॥ सूर्यबिंब उगवे प्रातःकाळीं ॥ तैसाच प्रगटला

टी. १ पुरविण्याविषयीं. २ नेत्र. ३ इंद्र. ४ ज्याचें मन संतापलें आहे असा. ५ हजार डोळेवाल्या ( इंद्रा ). ६ बडबड. ७ भक्तांविषयीं दयाळु. ८ लक्ष्मीपति. ९ कशाकारितां. १० दररोज ११ मोक्षदाता. १२ माझा. १३ इंद्रा. १४ मार्गानें. १५ विष्णुरूपानें.

वनमाळी[1] ॥ कस्तूरीटिळक विराजे भाळीं ॥ संकटीं पाळी दासांतें ॥ १२४ ॥ रत्नजडित किरीट सुंदर ॥ शोभतसे मस्तकावर ॥ गळां वैजयंती[2] मनोहर ॥ प्रसन्न वक्र[3] पद्म[4] जैसें ॥ १२५ ॥ नवपुंडरीक[5] प्रफुल्लित ॥ तैसेचि नेत्र शोभिवंत ॥ कौस्तुभमण्याची प्रभा सतत ॥ असे फांकत हृदयावरी ॥ १२६ ॥ भृगुपदाचें लांच्छन[6] ॥ वक्षस्थळीं शोभायमान ॥ मकराकार कुंडलीं पूर्ण ॥ दोन्ही कर्ण विराजती ॥ १२७ ॥ वर्षाकाळींची दिव्य चपळा[7] ॥ तैसा कासे पीतांबर कसिला ॥ रत्नखचित सुवर्णमेखळा[8] ॥ वरी शोभा देतसे ॥ १२८ ॥ चतुर्भुजांमाजी सतत ॥ शंखचक्रगदापद्में शोभत ॥ अंगदादि[9] नाना भूषणें दीप्त ॥ अंगीं तळपत साजिरीं ॥ १२९ ॥ वक्र भ्रुकुटी[10] धनुष्याकृती ॥ बैसला असे गरुडावरुती ॥ देव गंधर्व किन्नर भोंवती ॥ स्तुति करिती सादर ॥ १३० ॥ नीरपूरित[11] वर्षर्तुघनें[12] ॥ तैसा विराजे अंगवर्ण ॥ कोट्यानकोटी मीनकेतन[13] ॥ कुरवंडी[14] करून टाकावे ॥ १३१ ॥ ऐसा विश्वात्मा रूपसुंदर ॥ श्रीहरि झाला दृष्टिगोचर[15] ॥ ऐसें पाहूनि राजेश्वर ॥ पावला अपार तोषातें[16] ॥ १३२ ॥ मग मस्तक ठेवूनि चरणीं ॥ पुढें उभा जोडून पाणी[17] ॥ प्रेमभरें गद्गदवाणीं ॥ हरिस्तवनीं प्रवर्तला ॥ १३३ ॥ जय जय विष्णो जगन्नायका ॥ सच्चिदानंदा[18] प्रणवरूपका[19] ॥ त्रिगुणातीता मायाचाळका ॥ सर्वव्यापका जगद्गुरू

---

टी. १ पायांपर्यंत लोंबणारी अशी माळ गळ्यांत आहे ज्याच्या असा. २ वैजयंतीनामक माळ. ३ मुख. ४ कमळ. ५ नवें पांढरें कमळ. ६ चिन्ह (खूण). ७ वीज. ८ सोन्याची दाब (कमरपट्टा). ९ बाहुभूषणादि. १० भोंवया. ११ उदकानें भरलेला. १२ पर्जन्यकाळींचा मेघ. १३ मदन. १४ ओंवाळणी. १५ दृष्टीस प्रत्यक्ष. १६ आनंदातें. १७ हस्त. १८ सत्य, ज्ञान व आनंद एतत्स्वरूपा. १९ ॐकाररूपा.

॥ १३४ ॥ तूं सकळब्रह्मांडजनक ॥ कर्ता अकर्ता तूंचि एक ॥ अप्रमेय[1] विभु[2] निर्विकल्पक[3] ॥ निरुपाधिक जनार्दन ॥ १३५ ॥ आदिमध्यावसानरहित[4] ॥ गोविंदा तूं असदृशी अनंत ॥ अव्ययात्मा अज अच्युत ॥ मायातीत परब्रह्म ॥ १३६ ॥ इच्छामात्रें त्रिगुणगणेंसीं ॥ जगदुत्पत्तिस्थित्यंत करिसी ॥ अनंतकोटी ब्रह्मांडराशी ॥ तुझिये कुशी शोभती ॥ १३७ ॥ विरिंचि[5] विष्णु गिरिजाधव[6] ॥ वसु रुद्रादित्य भैरव ॥ यमाग्नि वरुण वायु वासव[7] ॥ झाले सर्व तुजपासुनी ॥ १३८ ॥ सर्वब्रह्मांडामाजी किंचित ॥ ठाव[8] नसे तुजरहित ॥ स्थिरचर अवघें व्यापूनि सतत ॥ राहसी तटस्थ परिपूर्ण ॥ १३९ ॥ ऐशिया पुराणपुरुषोत्तमा ॥ सर्वव्यापिन् वैकुंठधामा[9] ॥ तव[10] गुणाचा अपार महिमा ॥ निगमागमा[11] अतर्क्य ॥ १४० ॥ तव कृपाकटाक्षें निश्चिती ॥ जन्मांधासिही नयन येती ॥ मागें सांडूनि पवनाप्रती[*] ॥ पंगु[12] लंघिती[13] अचळांत[14] ॥ १४१ ॥ महा मूकजन तत्काळ ॥ देवगुरुसम[15] होती वाचाळ[16] ॥ मूर्खजनही पंडित सुशीळ ॥ होती सकळ निश्चयें ॥ १४२ ॥ तैसेचि पापी दुष्टमती ॥ उद्धरोनियां मोक्षासि जाती ॥ ऐसी तुझ्या कृपेची कीर्ती ॥ असे त्रिजगतीं विख्यात ॥ १४३ ॥ ह्मणोनचि प्रभो श्रीमुरारी ॥ मस्तक ठेवितों चरणावरी ॥ तरी तूं आतां कृपें सत्वरी ॥ रक्षण करीं दासाचें ॥ १४४ ॥ तुजवांचून वैकुंठनाथा ॥

---

टी. १ प्रमाण करितां येत नाहीं ज्याचें असा. २ व्यापक. ३ शंकाविकल्परहित. ४ मूळ, मध्य व अंत ज्यास नाहीं असा. ५ ब्रह्मदेव. ६ पार्वतीचा पति (शिव). ७ इंद्र. ८ स्थळ. ९ वैकुंठ हें आहे स्थान ज्याचें. १० तुझ्या. ११ वेदशास्त्रादिकांस. १२ पांगळे. १३ उलांडिती. १४ पर्वतांस. १५ बृहस्पतीसारखे ( नानाप्रकारच्या नीति सांगणारे ). १६ बोलके. * वायूस.

मज नाहीं अन्य रक्षिता ॥ यास्तव प्रभो तूंतेंचि आतां ॥ शरण तत्वतां असें पैं ॥ १४५ ॥ ऐसी अंबरीषाची वाणी ॥ ऐकूनियां कैवल्यदानी ॥ ह्मणे कीं राया तुजलागुनी ॥ सुप्रसन्न जाहलों ॥ १४६ ॥ तरी तूं आतां सत्वरेंसीं ॥ इच्छित वर मागें मजसी ॥ जें जें ईप्सित राया याचिसी ॥ तेंचि तुजसी देईन ॥१४७॥ तूं माझा निःसीम भक्त ॥ आणि मी भक्तप्रिय रमाकांत ॥ ह्मणोनि त्वत्कामना पूरणार्थ ॥ येथें प्राप्त जाहलों ॥ १४८ ॥ ऐसें हरीचें भाषण ॥ ऐकूनि राव प्रसन्नमन ॥ प्रेमसद्गदवाणीकरून ॥ बोले वचन सादर ॥ १४९ ॥ जय जय प्रभो परमानंदा ॥ जरी प्रसन्न मज गोविंदा ॥ तरी ही माझी मति विशुद्धा ॥ राहो सर्वदा तुझ्या ठायीं॥१५०॥ कायावाचामनेंकरुनी ॥ त्वत्पर व्हावें म्यां अनुदिनीं ॥ माझिये हस्तें सर्व मेदिनी ॥ सुरक्षित असावी पां ॥१५१ ॥ तैसेंचि माझ्या राज्यीं मानव ॥ सकळ होऊनि महावैष्णव ॥ दिवसीं दिवसीं प्रीति अभिनव ॥ वाढो सर्व तव भजनीं ॥ १५२ ॥ मम हस्तें यज्ञहोमार्चनीं ॥ संतृप्त व्हावे सुधापानी ॥ वैष्णवजनांच्या संरक्षणीं ॥ दक्षता मनीं राहावी पां ॥ १५३ ॥ शत्रूंचा व्हावा पराभव ॥ संतुष्ट असावी प्रजा सर्व ॥ आणि द्विजपूजनीं राहो भाव ॥ हेंच मागणें असे बा ॥ १५४ ॥ ऐसें रायाचें भाषण ॥ ऐकूनियां गरुडवाहन ॥ ह्मणे अंबरीषा धन्यधन्य ॥ बहुसुजाण आहेसि तूं ॥१५५॥ जैसें अंतरामाजी इच्छिसी ॥ तैसेंचि होईल निश्चयेंसीं ॥ मी कामें-

टी. १ मोक्षदाता (विष्णु). २ इच्छित. ३ मागसी. ४ सीमा (अंत) नाहीं असा. ५ लक्ष्मीचा पति. ६ प्रेमानें गहिंवरलेल्या वाणीनें. ७ यज्ञ, होम व पूजा यांणीं. ८ अमृत प्राशन करणारे (देव). ९ सावधानता. १० अति सुज्ञ. ११ इच्छा पुरविणारा.

पूरक हृषीकेशी ॥ चिंता मानसीं करूं नको ॥ १५६ ॥ पूर्वी रुद्रप्रभावेंसीं ॥ दुर्लभ चक्र मिळालें मजसी ॥ तेंचि हें आतां राया तुजसी ॥ बहुप्रेमेंसीं अर्पितों ॥ १५७ ॥ याचिये सामर्थ्यें सकळिक ॥ ऋषिशापादि दुःख शोक ॥ तैसेचि शत्रुरोगादिक ॥ तात्काळ देख नष्टतील ॥ ॥ १५८ ॥ ऐसें बोलूनियां वचन ॥ सुदर्शनचक्र तया देऊन ॥ गरुडासहित गरुडवाहन ॥ अंतर्धान पावला ॥ १५९ ॥ मग तो अंबरीष नृपती ॥ सुदर्शनचक्र घेऊनि हातीं ॥ अत्यानंदें सत्वरगती ॥ अयोध्येप्रती पातला ॥ १६० ॥ राज्यासनीं बैसोनि त्वरित ॥ सर्वपृथ्वीतें असे पाळित ॥ क्षितिमंडळस्थ प्रजा समस्त ॥ सद्धर्मी सतत लाविल्या ॥ १६१ ॥ ब्राह्मणादि सकळ वर्ण ॥ स्वस्वकर्मी लाविले जाण ॥ जे विष्णुभक्त परम लीन ॥ तयांलागून पूजित ॥ १६२ ॥ आणि करून दुष्टसंहार ॥ संतांसि पाळी बहुसादर ॥ अश्वमेधादि यज्ञ अपार ॥ निरंतर चालवी ॥ १६३ ॥ श्रीहरीच्या ध्यानभजनीं ॥ सावध असोन रात्रंदिनीं ॥ याचकजनांतें द्रव्य देउनी ॥ करी अनुदिनीं संतृप्त ॥ १६४ ॥ सद्धर्मनीतीं वर्तोनि जाण ॥ सर्वपृथ्वीचें करी पाळण ॥ आप पर कीं दुसमान ॥ नसेचि कोण तयासी ॥ १६५ ॥ जैसा केवळ रोहिणीकांत ॥ सर्वत्र सम प्रकाश पाडित ॥ तेंवीच रीती त्रिशंकुसुत ॥ सम वर्तत सर्वांसी ॥ १६६ ॥ ऐसा तो अंबरीष नृपती ॥ राज्य करित असतां क्षितीं ॥ दुःखशोकतापादि निगुती ॥ देशोधडी जाहले ॥ १६७ ॥ सकळधान्यीं तृणीं जाण ॥ सर्वदा मेदिनी परिपूर्ण ॥ दुर्भिक्ष गेलें मुळीं-

टी. १ याती. २ चंद्र. ३ त्रिशंकुराजाचा पुत्र (अंबरीष). ४ खरोखर. ५ देशापार.

हून ॥ सुवृष्टि घनं करिती पां १६८ ॥ आधि व्याधि महारोग ॥ देशधडी झाले सवेग ॥ सकळप्रजांचें अंतरंग ॥ शुद्ध चांग जाहलें ॥ १६९ ॥ भूतप्रेतादि उपद्रव ॥ समूळ नाहींसे झाले सर्व ॥ दारिद्र्यदशेचें तेंही नांव ॥ गेलें गांव सोडुनी ॥ १७० ॥ गृहीं गृहीं वेदघोष ॥ चालला असे रात्रंदिवस ॥ तैसेचि वषट् स्वाहादि घोष ॥ यज्ञ विशेष चालले ॥ १७१ ॥ केशव विष्णो मुकुंद कृष्ण ॥ ऐसें होतसे हरिभजन ॥ पापवार्ता ती मुळींहून ॥ पृथ्वीवरून पळाली ॥ १७२ ॥ परस्परांसिं प्रजा समस्त ॥ निर्वैरत्वें सदा वर्तत ॥ देशोदेशींचे भूप समस्त ॥ भयें कांपत थरथरां ॥ १७३ ॥ ऐशियेरीती क्षितिमंडळ ॥ सुखपूरित झालें सकळ ॥ अंबरीषा ऐसा सुशीळ ॥ नाहीं नृपाळ कोठेंची ॥१७४॥ सुदर्शनचक्रेंकरून सतत ॥ आपण असोनि सुरक्षित ॥ चतुःसमुद्रवलयांकित ॥ पृथ्वी समस्त पाळितसे ॥ १७५ ॥ आतां श्रोते सावचित्त ॥ पुढें कथा अति अद्भुत ॥ अंबरीषाच्या सदनाप्रत ॥ नारद पर्वत येतील पैं ॥१७६॥ हा अद्भुतरामविजय ॥ केवळ दिव्य रसायण होय ॥ भवरोगियें सेवितां निःसंशय ॥ पूर्ण आरोग्य होतसे ॥ १७७ ॥ महापातकीं ग्रासिलें सहज ॥ त्यां नावडे हा रसराज ॥ जयांचीं सुकृतें तेजःपुंज ॥ तेचि पूर्ण अधिकारी ॥१७८॥ अत्यानंदें रघुनाथसुत ॥ श्रोतेजनालागीं विनवित ॥ श्रीराम कथा अद्भुतामृत ॥ आदरें सतत सेविजे ॥१७९॥ स्वस्तिश्रीमदद्भुतरामविजय ॥ वाल्मीकीयाद्भुतोत्तरकांडहृदय ॥ ऐकोत सज्जन होऊनि तन्मय ॥ तृतीयाध्याय मधुर हा ॥१८०॥ ॥३॥

टी. १ मेघ. २ मनोव्यथा. ३ अंतःकरण. ४ चांगलें. ५ राजे. ६ भूमंडळ. ७ चारी समुद्रांनीं वेढलेली. ८ पर्वतनामक देवर्षि.

# अध्याय ४ था.









श्रीगणेशायनमः ॥ ॥ जयजयाजी श्रीनारायणा ॥ जयजयाजी मनमोहना ॥ जय भक्त[1]पाशनिकृंतना ॥ निरंजना[2] भवहारका[3] ॥ १ ॥ क्षीराब्धिजामाता[4] शार्ङ्गधरा[5] ॥ वैकुंठपते करुणासागरा ॥ पद्मनाभा त्रैलोक्यसुंदरा ॥ लक्ष्मीवरा जगदीशा ॥२॥ विरिंचिजनका[6] कमलेक्षणा[7] ॥ दैत्यांतका गरुडवाहना ॥ तव अपारगुणवर्णना ॥ सहस्रवदना[8] शक्ति नव्हे ॥ ३ ॥ तेथें मी मंदमती अत्यंत ॥ केंवी वर्णना होईन समर्थ ॥ जरी तूं होशील कृपावंत ॥ तरीच सर्वार्थ[9] पुरतील ॥४॥ ह्मणोनचि प्रभो कमळांकांता[10] ॥ चरणावरी ठेवितों माथा ॥ त्वद्गुणपूरित[11] ऐसी कथा ॥ वर्णवीं आतां यथास्थित ॥ ५ ॥ पूर्वाध्यायाचिये अंतीं ॥ अंबरीषराजा सकळ क्षिती ॥ पाळीतसे सद्धर्मनीतीं ॥ ऐसें निगुती वर्णियेलें ॥ ६ ॥ यावरी कथारचना कैसी ॥ श्रोतीं ऐकिजे सावचित्तें[12]सीं ॥ श्रीआदिकवी[13] वाल्मीकिऋषी ॥ भारद्वाजासी सांगत ॥ ७ ॥ तो अंबरीषराजा पुण्यशील ॥ सद्धर्मकर्मी बहुदयाळ ॥ चित्तीं ध्याऊनि तमालनील[14] ॥ राज्य सकळ चालवीतसे ॥८॥ तयाची कन्या नामें श्रीमती ॥ पद्मनयना विख्यात जगतीं ॥ जियेच्या स्वरूपा पाहूनि अती ॥ लज्जित होती देवांगना ॥ ९ ॥ चतुःषष्टिकळामाजी[15] प्रवीण ॥ चातुर्यखाणींचें दिव्य रत्न ॥ जियेचें पाहूनि सुंदर वदन ॥ रोहिणीरमण[16] लज्जित ॥ १० ॥ सरळ नासिका भाल[17] विशाळ ॥ आरक्त

---

टी. १ भक्तांचे पाश तोडणारा. २ निष्कलंका. ३ जन्ममरणरूप संसारातें हरणारा. ४ क्षीरसमुद्राचे जांवया. ५ शार्ङ्गनामक धनुष्य धरणारा. ६ ब्रह्मदेवाचे बापा. ७ कमलनेत्रा. ८ शेषास. ९ सर्वकामना. १० लक्ष्मीच्या पती. ११ तुझ्या गुणांनीं भरलेली. १२ सावधचित्तानें. १३ प्रथमचा कवी. १४ तमालपत्राप्रमाणें श्यामवर्ण. १५ चौसष्टकळांमध्यें. १६ चंद्र. १७ कपाळ.

ओष्ठ गोजिरे गाल ॥ सिंहकटी सर्वांग कोमल ॥ नाभी सखोल र्‍हद जैसा ॥ ११ ॥ जैसे नूतन प्रवाळांकुर ॥ तैसे शोभती उभय कर ॥ कंबुग्रीवा अति सुंदर ॥ भृकुटी वक्र धनुष्यापरी ॥ ॥ १२ ॥ कमळपत्र अति मृदुल ॥ तैसे तळवे बहु कोमल ॥ आकर्ण नेत्र सदा प्रफुल्ल ॥ सहस्रदल ज्यापरी ॥ १३ ॥ पोटर्‍या जैसे रंभास्तंभ ॥ सुंदर जंघा पृथु नितंब ॥ वरी शोभे रत्नांचित दाब ॥ वेणी लांब नागिण जैशी ॥ १४ ॥ बावन्नकसी तप्त सुवर्ण ॥ तैसा झळके अंगवर्ण ॥ मदनकळापरिपूर्ण ॥ हृदयीं स्तन शोभती ॥ १५ ॥ ऐसी अंबरीषराजाची कुमरी ॥ स्वरूपें पावे तियेची सरी ॥ ऐशी त्रैलोक्यामाझारी ॥ कोणी सुंदरी दिसेना ॥ १६ ॥ जियेच्या स्वरूपा पाहूनि रती ॥ रमा सावित्री शची पार्वती ॥ रंभा उर्वशी सरस्वती ॥ मनीं झुरती सर्वदा ॥ १७ ॥ पौर्णिमेचा रोहिणीरमण ॥ आनंददायक आदीच जाण ॥ त्यावरी होतां शरत्काळ पूर्ण ॥ शोभा कोण वर्णील ॥ १८ ॥ तैसी श्रीमती गुणनिधान ॥ सर्वलक्षणीं आदीच पूर्ण ॥ त्यावरी प्राप्त होतां यौवन ॥ रूपलावण्य न वर्णवे ॥ १९ ॥ ऐसी ती राजकन्या सुंदर ॥ कृशोदरी अति मनोहर ॥ तारुण्यपूरित साचार ॥ उपवर जाहली असे पां ॥ २० ॥ तों नारद आणि पर्वत मुनी ॥ अवचित पातले राजसदनीं ॥ जे भगवद्भक्तशिरोमणी ॥ तेजें

टी. १ ओंठ. २ डोह. ३ नवे. ४ पोंवळ्याचे अंकूर (लाल). ५ शंखासारखी सुरेख मान. ६ भोंवया. ७ कानापर्यंत लांब (मोठे). ८ फुललेलें (टवटवीत). ९ कमळ. १० केळींचे खांब. ११ जांघा. १२ मोठा. १३ कटिपश्चाद्भाग. (ढोंगण). १४ बरोबरी. १५ मदनाची स्त्री. १६ लक्ष्मी. १७ इंद्राणी. १८ शरदृतु. १९ गुणांचा ठेवा. २० जिचें पोट बारीक आहे अशी (पातळपोटी). २१ खरोखर. २२ अकस्मात्.

दिनमणी दूसरे ॥ २१ ॥ जितेंद्रिय स्वेच्छाचारी ॥ प्रतिसृष्टिकर्ते ब्रह्मचारी ॥ त्रिकाळज्ञानी परोपकारी ॥ सदा अंतरीं प्रसन्न ॥ २२ ॥ श्रीहरीचें नामस्मरण ॥ जेकां करिती रात्रंदिन ॥ नारायणाच्या भजनावांचुन ॥ न सुचे आन जयांसी ॥ २३ ॥ ऐसे ते देवर्षि दोघेजण ॥ अवचित आले गृहालागुन ॥ ऐसें पाहतांचि अंबरीष जाण ॥ आनंदपूर्ण जाहला ॥ २४ ॥ मग तयां सामोरा जाउनी ॥ आणूनि बैसवी उत्तमासनीं ॥ षोडशोपचारीं पूजा करोनी ॥ कर जोडुनी विनवित ॥ २५ ॥ ह्मणे कीं स्वामी आज यथार्थ ॥ माझें उदेलें पूर्वसुकृत ॥ ह्मणोनचि तुह्मी उभयतां येथ ॥ झालेति प्राप्त निश्चयें ॥ २६ ॥ नानाविध करितां यत्न ॥ कदापि नव्हे तुमचें दर्शन ॥ परी तें आज मजलागुन ॥ आयासेंविण लाधलें ॥ २७ ॥ ह्मणोनचि सर्व त्रैलोक्यांत ॥ धन्यधन्य झालों निश्चित ॥ ऐशिये रीती मुनिवरांप्रत ॥ जोडूनि हस्त विनवीतसे ॥ २८ ॥ तंव ती श्रीमती राजनंदिनी ॥ तेथें देखिली उभयमुनींनीं ॥ जियेच्या अंगतेजेंकरूनी ॥ सौदामिनी लज्जित ॥ २९ ॥ ऐसें तियेचें लावण्य अद्भुत ॥ पाहूनि दोन्ही झाले चकित ॥ मग नारदऋषी भूपाळाप्रत ॥ सर्व वृत्तँ पुसतसे ॥ ३० ॥ ह्मणे गा राया सर्वमान्या ॥ सर्वलक्षणीं सपन्न धन्या ॥ जैशी केवळ सुरसुता+ अन्या ॥ तैशी कन्या कोण ही ॥ ३१ ॥ इयेचें लावण्य पाहुनी ॥ संशय झाला आमुचे मनीं ॥ देवांगना कीं ही नागिणी ॥ तंव सदनीं पातलीसे ॥ ३२ ॥ तरी तूं आतां ही सुंदरा ॥ कोण आहे सांगें सत्वरां ॥ दर्शनमात्रें आमु-

टी. १ सूर्य. २ अन्य. ३ पूर्वीचें पुण्य. ४ प्राप्त झालें. ५ राजकन्या. ६ वीज. ७ वृत्तांत. ८ तुझ्या ९ घरीं. + देवकन्या.

च्या अंतरा ॥ बहु विसुरा झाला असे ॥ ३३ ॥ ऐसी तयाची ऐकूनि वाणी ॥ अंबरीष राजा जोडूनि पाणी ॥ ह्मणे कीं ही श्रीमतीनाम्नी ॥ होय नंदिनी माझीच ॥ ३४ ॥ कन्याप्रदानाचा काळ ॥ प्राप्त जाहला असे जवळ ॥ ह्मणोनि योग्य वर सुशील ॥ सर्वकाळ योजीतसें॥ ३५ ॥ ऐसी भूपाळाची वाणी ॥ ऐकतांचि तो नारदमुनी ॥ श्रीमती मिळावी आपणालागुनी ॥ ऐसें इ-च्छिता जाहला ॥ ३७ ॥ मग एकांतीं अंबरीषासी ॥ नेऊनि ह्मणे ही सुकेशी ॥ तव कन्या सुगुणीं जैसी ॥ संपन्न आहे साचार ॥३८॥ तैसाचि मीही गुणसंपन्न ॥ इयेसि योग्य वर ह्मणोन ॥ यथाविधि कन्याप्रदान ॥ मजसी राया अर्पिजे ॥ ३९ ॥ ऐसें नारद बोले वचन ॥ तों पर्वतमुनी रायालागुन ॥ एकांतस्थळीं पाचारून ॥ ह्मणे ही कन्या मज देई ॥ ४० ॥ तव दुहिता सुगुणराशी ॥ सर्वलक्षणीं संपन्न जैसी ॥ तैसाचि मीही उत्तम ऋषी ॥ आहें मानसीं जाण पां ॥ ४१ ॥ ऐसें त्या देवऋर्षीचें भाषित ॥ ऐकून राव त्रिशंकुसुत ॥ अंतरामाजी अति दुःखित ॥ विचार करित ऐसा कीं ॥ ४२ ॥ हे तपस्वी दोघेजण ॥ सकळलक्षणीं सुसंपन्न ॥ भगवद्भक्त विरक्त असोन ॥ कन्यारत्न मागताती ॥ ४३ ॥ ह्मणोन यांतें कन्याप्रदानें ॥ सन्मानूनि संतुष्ट करणें ॥ ऐसा विचार अंतःकरणें ॥ करितां घडणें अशक्य ॥ ४४ ॥ श्रुति स्मृति पुराणें समस्त ॥ अहर्निशीं असती गर्जत ॥ कीं एक स्त्रियेसि एकचि कांत ॥ दुसरा युक्त नव्हेची ॥

टी. १ अंतःकरणास. २ विस्मय. ३ हस्त. ४ कन्या. ५ चांगले आहेत केश जीचे. ६ खरोखर, सत्य. ७ कन्या. ८ बोलणें. ९ त्रिशंकुराजाचा पुत्र ( अंबरीषराजा ). १० रात्रदिवस. ११ पति. १२ योग्य.

॥ ४५ ॥ ऐसें असोनि ही दुहिता ॥ उभयऋषींसि म्यां अर्पितां ॥ सकळजगामाजी तत्वता ॥ मजनिंद्यता येईल ॥ ४६ ॥ आतां उभयांमाजी जो वरिष्ठ ॥ त्यासि कन्या द्यावी उत्कृष्ट ॥ ऐसा विचार करितां स्पष्ट ॥ दोघेही श्रेष्ठ समसमान ॥ ४७ ॥ आणि जरी एकालागुन ॥ सन्मानिलें कन्या देऊन ॥ तरी दुजाचा महानपमान[1] ॥ होतो ऐसें घडतसे ॥ ४८ ॥ ह्मणोनि जरी या दोघांतुनी ॥ कन्या न द्यावी कोणालागुनि ॥ तरी निश्चयें सर्व त्रिभुवनीं ॥ अकीर्ति तत्क्षणीं पसरेल ॥ ४९ ॥ सूर्यवंशस्थ[2] रायांची रीती ॥ याचकजन[3] जें जें याचिती* ॥ तें तें तयां देऊनि निर्गुती[4] ॥ मनोरथपूर्ती करावी ॥ ५० ॥ आजपर्यंत कोणी याचक ॥ कदापि गेला नाहीं विन्मुख ॥ परी आज हें संकट अधिक ॥ आकस्मिक[5] पातलें ॥ ५१ ॥ तरी आतां करावें काय ॥ कोण योजावा येथें उपाय ॥ कोपाविष्ट होतील उभय[6] ॥ ह्मणोनि भय वाटतें ॥ ५२ ॥ एवंप्रकारें अंबरीष ॥ विचार करी सावकाश ॥ चिंताग्रस्त झालें मानस ॥ उपाय कांहीं सुचेना ॥ ५३ ॥ तैं त्या उभयदेवऋषींसी ॥ नमस्कारूनियां साष्टांगेंसीं ॥ नयनीं सोडीत अश्रुधारांसी ॥ गद्गदवचनेंसीं प्रार्थित ॥ ५४ ॥ ह्मणे हे नारदा हे पर्वता ॥ महामुनिवर्य[7] तुह्मी असतां ॥ आणि सर्ववेत्ते[8] असोनि तत्वतां ॥ कन्या याचिता[9] मजपाशीं ॥ ५५ ॥ तरी एक दुहिता[10] म्यां तुह्मासी ॥ कैसी अर्पावी उभयतांसी ॥ एतदर्थ माझ्या मानसीं ॥ चिंताबुराशी[11] उचंबळतो ॥ ५६ ॥ एकप्रियेसि

टी. १ मोठा अपमान. २ सूर्यवंशांतील. ३ मागणारे लोक. ४ खरोखर. ५ अकस्मात, एकाएकीं. ६ दोन्ही ( नारद व पर्वत हे ). ७ महामुनींमध्यें श्रेष्ठ. ८ सर्व जाणणारे. ९ मागता. १० कन्या. ११ चिंतारूपी समुद्र. * मागतात.

एकचि कांत ॥ सकळशास्त्रीं हेंचि संमत ॥ ऐसें असतां तद्विरुद्धार्थ ॥ कैसा समर्थ होऊं मी ॥ ५७ ॥ ह्मणोनचि आतां तुह्मांप्रती ॥ अनन्यशरण करितों विनंती ॥ म्यां पुरवावी तुमची आर्ती ॥ ऐसें चित्तीं वर्तताहे ॥ ५८ ॥ परी ही मम कन्या सुकुमारी ॥ परबुद्धि नव्हे ऐकणारी ॥ उत्तम कनिष्ठ सकळ परी ॥ स्वयें अंतरीं जाणताहे ॥ ५९ ॥ तरी जो तुह्मा दोघांतून ॥ कन्येसि होईल सुगुणमान्य ॥ तया एकातें कन्याप्रदान ॥ निश्चयें जाणा देईन मी ॥ ६० ॥ कन्यामत जाणिल्यावाचुनी ॥ समर्थ नव्हे मी कन्याप्रदानीं ॥ जो मान्य वाटेल दोघांतुनी ॥ त्यालागुनी ती वरील ॥ ६१ ॥ ऐसें रायाचें ऐकतां वचन ॥ नारद पर्वत दोघेजण ॥ योग्य आहे ऐसें ह्मणोन ॥ अंबरीषासी बोलती ॥ ६२ ॥ अगा राया त्रिशंकुसुता ॥ आह्मी स्वस्थाना जाऊनि आतां ॥ उदयिक प्रातःकाळ होतां ॥ येऊं उभयतां पुनरपी ॥ ६३ ॥ मग तवं कन्येचा अभिप्राय ॥ जाणूनि करीं तूं सर्व कार्य ॥ ऐसें बोलून ते मुनिवर्य ॥ वेगें निघाले तेथुनी ॥ ६४ ॥ स्वस्वांतरीं आनंदभरित ॥ मुखें भगवद्भजन करित ॥ अतिक्रमूनि आकाशपंथ ॥ वैकुंठाप्रत पातले ॥ ६५ ॥ मग नारदमुनी एकला ॥ श्रीविष्णूच्या दर्शना निघाला ॥ लक्ष्मीसहित घनसावळा ॥ जये स्थळा बैसला असे ॥ ६६ ॥ तये स्थानीं वेगें जाउनी ॥ मस्तक ठेवी श्रीहरिचरणीं ॥ पुनरपि उभय हस्त जोडुनी ॥ मधुरवाणी बोलत ॥ ६७ ॥ जयजय हरे लक्ष्मीरमणा ॥ भक्तव-

टी. १ शास्त्रविरुद्ध करण्याविषयीं. २ ज्यास तुह्मावाचून दुसरा रक्षिणारा नाहीं असा मी. ३ इच्छा. ४ प्रकार. ५ चांगल्या गुणांनीं मान्य. ६ उद्यां. ७ तुझ्या. ८ आपापल्या चित्तांत. ९ मेघाप्रमाणें आहे श्यामवर्ण ज्याचा तो ( विष्णु ).

त्सला दीनोद्धरणा ॥ आजि पाहुनि त्वदंघ्रिनलिना ॥ समाधाना पावलों ॥६८॥ परी एक गुह्य तुजसी ॥ कथिजे ऐसें आहे मानसीं ॥ तरी प्रभो त्वां एकांतासी ॥ क्षणमात्र चलावें पां ॥६९॥ तें नारदाचें ऐकतां वचन ॥ लक्ष्मीकांत हांसत उठोन ॥ एकांतीं जाऊनियां तत्क्षण ॥ ह्मणे कथन करी आतां ॥ ७० ॥ संशय न धरीं अंतःकरणीं ॥ गुह्य काय तें सांग विवरुनी ॥ ऐसी हरीची ऐकतां वाणी ॥ नारदमुनी बोलत ॥ ७१ ॥ अहो भगवंता दीननाथा ॥ आम्ही नारद पर्वत उभयतां ॥ स्वेच्छें त्रिजगीं फिरतांफिरतां ॥ मृत्युलोकीं पावलों ॥ ७२ ॥ तेथें जोकां त्वदीयभक्त ॥ अंबरीष राजा अति विरक्त ॥ तयाच्या सदनीं अकस्मात ॥ दोघेही प्राप्त जाहलों ॥ ७३ ॥ तें तो राजा अंबरीष ॥ देवर्षि आले स्वगृहास ॥ ऐसें देखूनियां विशेष ॥ आनंदपूर्ण जाहला ॥७४॥ आणि प्रेमभरें आत्यादरेंसीं ॥ संमुख धांवला सत्वरेंसीं ॥ नमन करूनि साष्टांगेंसीं ॥ धन्य मानसीं मानित ॥ ७५ मग देऊनि उत्तमासनें ॥ वरी बैसवी दोघांकारणें ॥ अर्घ्यपाद्यादि यथाविधानें ॥ पृथक् पूजनें करितसे ॥ ७६ ॥ तंव त्या अंबरीषाची दुहिता ॥ श्रीमतीनामें सर्वविख्याता ॥ उपवर सुंदर तारुण्यभरिता ॥ पातली तातासन्निध ॥ ७७ ॥ तियेचें सौंदर्य आणि यौवन ॥ स्वनयनीं विलोकितां जाण ॥ मम अंतरीं अति दारुण ॥ कामकृशान चेतला ॥ ७८ ॥ ह्मणोनि मी त्या रायापाशीं ॥ मागता झालों श्रीमतीसी ॥ तंव तंव भक्त पर्वतऋषी ॥ तदर्थ

टी. १ तुझ्या पादकमलास. २ तुझा भक्त. ३ निराळीं. ४ कन्या. ५ बापाजवळ, ६ माझ्या. ७ अंतःकरणांत. ८ कामरूप अग्नि. ९ तुझा. १० त्या कन्येविषयीं. + सामोरा. × सर्व जगांत प्रसिद्ध.

आतुर जाहला ॥ ७९ ॥ रायासि एकांतीं पाचारून ॥ ह्मणे गा राया हें कन्यारत्न ॥ यथाविधि लग्नकरून ॥ मजलागुन अर्पीं तूं ॥ ८० ॥ ऐशी दोघांची याचनावाणी ॥ ऐकूनियां तो भूपाळ सुगुणी ॥ दोघे मागती कन्येलागुनी ॥ ह्मणोनि मनीं उद्विग्न ॥ ८१ ॥ विचार करी अंतरांत ॥ दोघेही मुनी परम समर्थ ॥ एकासि कन्या देतां निश्चित ॥ दुजा संतप्त होईल पां ॥ ८२ ॥ तरी आतां करावें काय ॥ न सुचे येथें कांहीं उपाय ॥ एकही कोपतां मुनिवर्य ॥ होईल क्षय कुळाचा ॥ ८३ ॥ ऐसा विचार करितां चित्तीं ॥ तया सुचली एक युक्ती ॥ स्वयंवरा योग्य ही श्रीमती ॥ ह्मणोनि स्वयंवर मांडावें ॥ ८४ ॥ ऐसा निश्चय करूनि मानसीं ॥ भूपें कथिलें पैं आह्मासी ॥ तुह्मी येऊनियां दोघे ऋषी ॥ कन्या मजसी याचिता ॥ ८५ ॥ परी ही श्रीमती मम कुमारी ॥ परबुद्धि नव्हे ऐकणारी ॥ उत्तम कनिष्ठ सकळ परी ॥ स्वयें अंतरीं जाणताहे ॥ ८६ ॥ तरी जो तुह्मा दोघांतून ॥ इयेसि होय सर्वगुणमान्य ॥ तया एकातें वरितां तत्क्षण ॥ कन्यादान देईन मी ॥ ८७ ॥ ती रायाची ऐकतां भारती ॥ उदयिक आह्मी येऊं प्रभातीं ॥ ऐसें सांगोनि सत्वरगती ॥ वैकुंठाप्रती पातलों ॥ ८८ ॥ आतां पुढें करावें काय ॥ कोण योजावा येथें उपाय ॥ निर्विघ्नपणें आपुलें कार्य ॥ सिद्ध होय कैसेंनीं ॥ ८९ ॥ ऐसें मनन करितां अंतरीं ॥ विचार सुचला कीं श्रीहरी ॥ भक्तकामनापूरक मुरारी ॥ आपुला कैवारी आहे पां ॥ ९० ॥ तया शरण जातां निश्चित ॥ आपुलें कार्य साधेल समस्त ॥ ऐसा विश्वास

टी. १ मागता. २ माझी. ३ प्रकार. ४ वाणी. ५ उद्यां. ६ सकाळीं. ७ भक्ताच्या इच्छा परिपूर्ण करणारा.

धरोनि त्वरित ॥ येथें प्राप्त जाहलों ॥ ९१ ॥ अनन्यभावें शरण तुजसी ॥ तरी तूं आतां हृ-
षीकेशी ॥ मम[1] कल्याण करावयासी ॥ योग्य आहेसी निश्चयें ॥ ९२ ॥ उदयिक आह्मी दोघे
मुनी ॥ श्रीमती मिळावी आपणालागुनी ॥ ऐसा अंतरीं हेतु धरूनी ॥ राजसदनीं[2] जाऊं जैं
॥ ९३ ॥ तेव्हां पर्वतऋषीचें वदन ॥ वानराचिये मुखासमान ॥ अति अमंगळ कृष्णवर्ण ॥ श्री-
मतीलागून दिसावें ॥ ९४ ॥ तियेवांचून सकळांप्रत ॥ सुंदर दिसावें यथास्थित ॥ मम क-
ल्याण इच्छिसी सतत ॥ तरी अद्भुत करावें हें ॥ ९५ ॥ ऐसें ऋषीचें वचन ऐकून ॥ हांसो-
नि बोले नारायण ॥ करितों त्वदुक्त[3] कार्यसाधन ॥ सुखें गमन करीं तूं ॥ ९६ ॥ तें ऐकूनि
नारदमुनी ॥ अत्यानंदें हरीसि नमुनी ॥ कृतकृत्य[4] झालों ऐसें मानुनी ॥ चालला तत्क्षणीं अयो-
ध्येस ॥ ९७ ॥ तंव हिकडे पर्वत ऋषी ॥ आनंदें नमूनि श्रीहरीसी ॥ एकांतीं सर्व वृत्तांतासी ॥
कथिता झाला सादर ॥ ९८ ॥ आणि शेवटीं विनयें प्रार्थित ॥ हे भगवन् वैकुंठनाथ ॥ आ-
ह्मी दोघे देवर्षि तव भक्त ॥ राजसदनीं जाऊं जैं ॥ ९९ ॥ तेव्हां नारदाचें वदन ॥ मर्कटाचि[5]-
ये मुखासमान ॥ अतिकुरूप ताम्रवर्ण[6] ॥ श्रीमतीलागुन दिसावें ॥१००॥ आणि इतरांसितों
यथास्थित[7] ॥ दिसणें सुंदर सुशोभित ॥ ऐसें तुवां कीजे अद्भुत ॥ हेंचि प्रभो मागतों ॥१०१॥
ऐसें पर्वतऋषीचें वचन ॥ ऐकूनि बोले नारायण ॥ वत्सा हें त्वदुक्त[8] कार्य संपूर्ण ॥ करितों जाण
निश्चयें ॥ २ ॥ आतां निःशंक ठेवीं अंतर ॥ अयोध्येसि तूं जाई सत्वर ॥ परी नारदासि हा स-

टी. १ माझें. २ राजवाड्यांत ३ तूं सांगितलेलें. ४ कार्य केलें आहे ज्याणें. ५ माकडाच्या. ६ लाल. ७ आहे तसें. ८ तूं सांगितल्याप्रमाणें.

माचार ॥ कळों न देई कदापी॥३॥ तें हरीचें ऐकूनि वचन ॥ पर्वतऋषि बहुबरें ह्मणोन ॥ अत्यानंदें श्रीहरिचरण ॥ वंदूनि तेथून निघाला ॥ ४ ॥ दोघे पातले अयोध्याद्वारीं ॥ उत्कट दारेच्छा असे अंतरीं ॥ तों तदागमनाची वार्ता हेरीं ॥ अंबरीषासी कथियेली ॥ ५ ॥ ती ऐकूनि तो राजेश्वर ॥ तत्काळ शृंगारी सर्व नगर ॥ ध्वज पताका गुढ्या अपार ॥ उंच सुंदर उभविल्या ॥६॥ शतखणीं निर्मळ गोपुरें ॥ शृंगारिलीं अति सुंदरें ॥ नागरिकांचीं महाद्वारें ॥ बहुप्रकारें शोभविलीं ॥ ७ ॥ केशरकस्तूरीचे सडे ॥ मार्गीं घातले चहूंकडे ॥ नानारंगीं विचित्रित हुंडे ॥ केले रोकडे सकळही ॥ ८ ॥ ठायीं ठायीं बांधिलीं तोरणें ॥ सर्वतोभद्रीं अंकिलीं अंगणें ॥ लांजाक्षता गंधसुमनें ॥ विस्तारिलीं सर्वत्र ॥ ९ ॥ दारोदारीं फलदूर्वायुत ॥ कुंभ ठेविले जलपूरित ॥ कर्दळीस्तंभ असंख्यात ॥ ठायीं ठायीं उभविले ॥ १० ॥ अगुरुगुग्गुळादिकांचे धूप ॥ स्थळोस्थळीं लाविले अमूप ॥ जयांच्या सुगंधें सुमनचाप ॥ तल्लीन होऊनि लोळे पैं ॥ ११ ॥ सुषिरादि मंगळतुरें ॥ घरोघर वाजती एकसरें ॥ भेर्यादि वाद्यांच्या गजरें ॥ दिगंतरें भरियेलीं ॥ १२ ॥ ठायींठायीं वारांगना बहुत ॥ योजिल्या नृत्यगायनार्थ ॥ तैसेचि मंगलपाठार्थ ॥ विप्र अमित बैसविले ॥ १३ ॥ बाजारही भरविला मोठा ॥ शृंगारिल्या सकळ पेंठा ॥ कोणा कव-

टी. १ मोठी ( अत्यंत ). २ स्त्रीविषयीं इच्छा. ३ ते ऋषी आल्याची. ४ दूतांनीं. ५ नगरद्वारें. ६ नगरांतील लोकांचीं. ७ बुरुज. ८ कण्हेरांगोळ्यादिकांनीं. ९ चिन्हित केलीं. १० लाह्या. ११ पाण्यानें भरलेले. १२ असंख्य. १३ मदन. १४ सनया, पांवे इत्यादि. १५ मंगळवाद्यें १६ वेश्या, नायकिणी. १७ निर्विघ्नपणें कार्यसिद्धि होण्यासाठीं चंडिपाठादि करण्याकरितां. १८ अगणित.

ण्याही वस्तूचा तोटा ॥ कदा पडों नेदीच ॥ १४ ॥ नानालंकारीं अलंकृत गज ॥ चौ[1]बारां उभे
केले सतेज ॥ जयांच्या गंडस्थळीं सहज ॥ [2]भ्रंभरपुंज [3]गुंजती ॥ १५ ॥ रत्नालंकृत [4]अश्वस्वार ॥
सर्वत्र फिरते ठेविले चतुर ॥ [5]वेत्रकर आणि दूत इतर ॥ मार्गीं अपार स्थापिले ॥ १६ ॥ हरि-
हरादिदेवांचीं मंदिरें ॥ शृंगारिलीं परमादरें ॥ मठ धर्मशाळा [6]श्रोत्रियागारें ॥ तींही [7]येरें भू-
षविलीं ॥ १७ ऐशी पुरीची व्यवस्था करून ॥ शृंगारिलें राजसभास्थान ॥ जयाची रचना पा-
हतां पूर्ण ॥ [8]सुधर्मा हीन भासतसे ॥ १८ ॥ भोंवती [9]शशांकतेजांगळी ॥ काश्मीरपाषाणाची
पोंवळी ॥ [10]तदंतर्भागीं स्फटिकांची [11]पौळी ॥ देई झळाळी रवितुल्य ॥ १९ ॥ [12]नानावर्णोपलां-
च्या खोदिल्या ॥ समचौकटी चक्रजाळ्या ॥ पोंवळीस ठायींठायीं जडिल्या ॥ दिसती भल्या
विचित्र ॥१२०॥ आणि तये पोंवळीच्या उपरी ॥ सिंहादि चित्रें नानापरी ॥ पाषाणांची असो-
नि खरीं ॥ सजीवांपरी भासती ॥ २१ ॥ पाळीवरी स्वर्णकुंड्यांतून ॥ फुलझाडें असती वळी-
न ॥ जेथींच्या [13]पुष्पामोदालागुन ॥ भ्रमरगण झेंपावती ॥ २२ ॥ अनेकरंगी काचबंद ॥ चौफे-
रा अंगण समलांबरुंद ॥ जेथें जळस्थळांचा [14]विशद ॥ नव्हे बोध कोणासी ॥ २३ ॥ ठायींठायीं
[15]रौप्यबैसका ॥ दिव्य शोभती [16]सतूलिका ॥ [17]पद्मयुक्त [18]अमृतोदका ॥ रम्य [19]वापिका विराजती

---

टी. १ चंवाठ्यावर. २ भुंग्याच्या झुंडी. ३ शब्द करिती. ४ घोडेस्वार. ५ भालदार. ६ अग्निहोत्र्यांचीं घरें. ७ त्या राजानें. ८ इंद्राची सभा. ९ चंद्राहून तेजस्वी. १० त्याच्या आंतल्या बाजूस. ११ तटाच्या जोत्याची बाजू. १२ अनेकरंगी दगडांच्या. १३ फुलांच्या सुगंधार्थ. १४ स्पष्ट. १५ चांदीच्या बैठकी. १६ कापसाच्यागाद्यांनीं युक्त. १७ कमळांनीं युक्त. १८ अमृतासारखें उदक ज्यांचें. १९ तळ्या.

॥ २४ ॥ तयांच्या तीरीं औसमास[1] ॥ चंद्रकांती कळसूत्री हंस ॥ मुखीं घेऊनि मुक्तांघोंस[2] ॥ वेगें विशेष नाचती ॥ २५ ॥ नीळमण्यांच्या जोतियांवर ॥ चढते शोभती प्रवालांकुर[3] ॥ वैडूर्यउथा[4]ळ्यांवरी सुंदर ॥ हीरकस्तंभ[5] विलसती ॥ २६ नीळमण्याचे गज घडोन ॥ तोळंबे लाविले स[6]घन ॥ पुष्प[7]रागाच्या सुविस्तीर्ण ॥ शोभायमान महिरपी ॥ २७ ॥ तयांच्या ऊर्ध्व[8]भागावरुती ॥ हिऱ्याच्या शेषफ[9]णाकृती ॥ वळीनें बैसले कीं गभ[10]स्ती ॥ ऐशा भासती साजिऱ्या ॥ २८ ॥ अधोभागीं पाचूचे हिरवे ॥ प्र[11]वांलचंचु जडले रावे ॥ मुखीं माणिकांचे गुच्छ बरवे ॥ डाळिंबबीजांसम ज्यांच्या ॥ २९ ॥ सुवर्णाचीं तुळवटें लांब ॥ गरुडपाचूचे दांडे सुप्र[12]भ ॥ माणिकांच्या किलें[13]च्या स्वयंभ ॥ अरुणं[14]रागाभ विराजती ॥ १३० ॥ रजतं[15]पाटियांसि जडित ॥ पद्म[16]राग पद्में विलसत ॥ गोमेदमुक्ताफलमिश्रित ॥ झालरी लोंबत चौफेरा ॥ ३१ ॥ पाचुबंदी भूमि सकळ ॥ मां[17]जी नानावर्णरत्नांचीं निर्मळ ॥ भं[18]द्रें स्वस्तिकें पद्में वर्तुळ ॥ रेखिलीं सोज्वळ शोभती ॥ ३२ ॥ सूर्यकांताच्या सोपा[19]नपंक्ती ॥ चं[20]तुर्दिग्भागीं विराजती ॥ नीळमण्याचे मं[21]यूर वरती ॥ नृत्य करिती रमणीय ॥ ३३ ॥ खांबं[22]सूत्री रत्नबाहुल्या ॥ सर्वकाळ नाचती भल्या ॥ स्तंभीं

---

टी. १ आसपास, चहूंकडे. २ मोत्यांचे घोंस. ३ पोंवळ्यांचे अंकुर. ४ पाचेच्या उथाळ्यांवर. ५ हिऱ्याचे खांब. ६ मोठे, जाड ७ पुष्परागनामक रत्नाच्या. ८ वरच्या बाजूस. ९ सर्पफणेच्या आकृती. १० सूर्य. ११ पोंवळ्यांच्या चोंची ज्यांच्या असे. १२ दैदीप्यमान. १३ कडीपाटाच्या सांदींत मारलेल्या रिपा. १४ अरुणाप्रमाणें लाल. १५ चांदीच्या तक्तपोशीला. १६ पद्मरागरत्नाचीं कमळें. १७ त्या भूमीमध्यें. १८ सर्वतोभद्रें व लिंगतोभद्रें. १९ पायऱ्या. २० चार दिशांस (चार बाजूंस). २१ मोर. २२ कळसूत्री.

नृसिंहाकृती जडल्या ॥ क्षणक्षणा गुरगुरती ॥ ३४ ॥ रत्ननिर्मित पारावत[1] ॥ सज्यावरी शब्द करित ॥ माजी खपुत्रांचे जोडे बहुत ॥ सोमकांताचे[2] मिरवती ॥३५॥ ऐसें तें राजसभास्थान ॥ आदीच रत्नमय असोन ॥ नानाप्रकारीं शृंगारून ॥ मनोहर पूर्ण पैं केलें ॥ ३६ ॥ नानारंगी जरतारी पताका ॥ प्राकारीं[3] उभविल्या अनेका ॥ ज्या विवाहोत्सवार्थ पथिकां[4] ॥ पाचारिका[5] च वाटती ॥ ३७ ॥ रौप्यस्तंभी हेमांबर[6] ध्वज ॥ चतुर्द्वारीं उभविले सतेज ॥ जे कां रवीसि आँतळोनि[7] सहज ॥ भर्त्सिती[8] ऐसे भासती ॥ ३८ ॥ फलपल्लवमय शोभनें ॥ द्वारीं बांधिलीं मंगलतोरणें ॥ माजी सुगंध नानासुमनें[9] ॥ नानावर्णें भरियेलीं ॥ ३९ ॥ लाजाक्षतादूर्वादि[10] परवडी[11] ॥ मनोहर स्थापिल्या देहुडी[12] ॥ सुवर्णकुंभांच्या उतरंडी ॥ जळपरिपूर्ण ठेविल्या ॥ १४० ॥ मौक्तिकरांगोळीचे देख ॥ अंगणीं कणे घातले सुरेख ॥ सोपानीं धान्यांकुरपूर्ण अनेक ॥ स्वर्ण[13]परळ स्थापिन्नले ॥ ४१ ॥ केशरकस्तूरीचे सडे ॥ सुवासार्थ घातले चहूंकडे ॥ जोतियाभोंवतीं सपुष्पझाडें ॥ बहु सुरवाडें[14] स्थापिलीं ॥ ४२ ॥ वरूनि अर्धस्तंभवरी ॥ पडदे सोडिले भर्जरी ॥ तयांच्या खालीं परोपरी ॥ पुष्पझालरी लाविल्या ॥ ४३ ॥ गजणीचे मृदु गदेले ॥ पाचुबंदीस हांतरिले ॥ भोंवती किनकापी चांगले ॥ लोड ठेविले विशाळ ॥४४॥ माजी अमूल्यास्तरणीं[15]

---

टी. १ पारवे. २ चंद्रकांतमण्याचे. ३ तटावर. ४ मार्गस्थांस. ५ बोलावणाऱ्या. ६ भरजरी. ७ लागून. ८ तुच्छ करिती. ९ पुष्पें. १०लाह्या, अक्षता, दूर्वा इत्यादि. ११ प्रकार. १२ देवडीवर. १३ सोन्याचे परळ. १४ सुंदर. १५ अमोलिक गालिच्छांनीं.

युक्त ॥ भद्रासनें[1] ठेविलीं अमित[2] ॥ कनकाचलाचीं[3] दीप्तिमंत ॥ शृंगें[4] शोभत जैशीं पां॥ ४५ ॥ तयांसंनिध दोनदोन ॥ रत्नतिव्हया स्थापिल्या क्रमान ॥ त्यांतूनि एकेकींवरी सघन[5] ॥ तांबूलतबकें ठेविलीं ॥ ४६ ॥ दुज्यांवरी स्वर्णताटांत ॥ ठेविले पुष्पादि गंधपदार्थ ॥ रौप्यपिकपात्रें दीप्तिमंत ॥ सन्निधभूमीस ठेविलीं ॥४७॥ प्रत्येक भद्रासनापुढती ॥ लघुकारंजे ठेविले उडती ॥ मध्येंमध्यें सुवासिक अती ॥ अगरबत्ती लाविल्या ॥ ४८ ॥ नानालंकारालंकृतपूर्ण ॥ तप्त[6]चामीकराभवसन ॥ स्वर्णवेत्रधारी[7] दोनदोन ॥ स्तंभांसंनिध ठेविले ॥ ४९ ॥ कळसूत्री वालव्यजन[8] ॥ ठायींठायीं बांधिले सघन[9] ॥ तेणें मंद सुगंध पवन[10] ॥ अहर्दिन[11] चालतसे॥ १५० ॥ अति रूपवती वारांगना[12] ॥ बहु योजिल्या नृत्यगायना ॥ वीणाटाळमृदंगादिनाना ॥ सुस्वर वाद्यें लाविलीं ॥ ५१ ॥ नागरिक[13] लोक पाचारिले ॥ योग्यस्थानीं बैसविले ॥ मांडलिक राजेही आगळे[14] ॥ बैसविले अनुक्रमें ॥ १५२ ॥ ऐसी योजना करूनि विशेष ॥ मग तो राजा अंबरीष ॥ सवें घेऊनि दुहितेस[15] ॥ येऊनि सभेस बैसला ॥५३ ॥ ती श्रीमती अंबरीषाचीकन्या ॥ सर्वाभरणसंपन्न धन्या ॥ सिंहकटी[16] स्वरूपमान्या ॥ लक्ष्मीच अन्या जैशीकीं ॥ ५४ ॥ शुभानना बत्तीसलक्षणी ॥ आयतलोचना[17] गजगामिनी ॥ स्वपितयाच्या संनिधानीं ॥ वेष्टित स्त्रि-

---

टी. १ सिंहासनें. २ असंख्य. ३ सुवर्णाच्या पर्वताचीं ( मेरूचीं ). ४ टेंकड्या. ५ मोठीं ६ तापलेल्या सोन्याप्रमाणें तेजस्वी वस्त्रें धारणकेलेले (भरजरीपोषागवाले). ७ सोन्याच्या काठ्या घेतलेले भालदार. ८ वाळ्याचे पंखे. ९ मोठे. १० वायु. ११ रात्रदिवस. १२ नायकिणी. १३ नगरवासी. १४ पुष्कळ. १५कन्येस. १६ सिंहाच्या कंमरेसारखी बारीक कंमर जीची. १७ मोठे आहेत नेत्र जीचे.

यांनीं बैसली ॥ ५५ ॥ ती राजसभा भरली घनदाट ॥ नानारत्नांचा चकचकाट ॥ अनेक भ-
द्रासवें सदट ॥ क्रमें चोखट विराजती ॥ ५६ ॥ नानाजातींचीं पुष्पें असत ॥ सुगंध दाटला
अत्यंत ॥ ऐशा त्या समृद्ध सभेप्रत ॥ देवही बहुत पातले ॥ ५७ ॥ मग ब्राह्मयाचा वरनंदन ॥
महात्मा त्रैविद्यपूर्ण महान ॥ मुनिवर्य पर्वत भगवान ॥ सभेलागुन पातला ॥ ५८ ॥ आणि ब्र
ह्मविच्छ्रेष्ठ महामुनी ॥ नारदही पातला तत्क्षणीं ॥ जयाचें गमन सर्व त्रिभुवनीं ॥ अकुंठित
सर्वदा ॥५९ ॥ अहो सकळ श्रोतेजन ॥ पुढील कथेसि द्यावें मन ॥ श्रीमतीसि श्रीनारायण ॥
नेईल हरून वैकुंठीं ॥ १६० ॥ ती कथा अत्यंत विचित्र ॥ श्रोतयांसि करूनि पवित्र ॥ सदा-
सर्वदा इहपरत्र ॥ सुख स्वतंत्र देईल पैं ॥ १६१ ॥ ह्मणोनचि मी सीताकुमार ॥ श्रोतयांसि
विनवितों सादर ॥ श्रीरामकथा अद्भुतांतर ॥ भावें समग्र सेविजे ॥ १६२ ॥ स्वस्ति श्रीमदद्भुत
रामविजय ॥ वाल्मीकीयाद्भुतोत्तरकांडहृदय ॥ ऐकोत सज्जन होऊनि तन्मय ॥ चतुर्थोध्याय
मधुर हा ॥ १६३ ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥

---

टी. १ सिंहासनें. २ मोठीं. ३ अडथळा नाहीं असें.



श्रीगणेशायनमः ॥ ॥ जयजयाजी सच्चिदानंदा ॥ जयजयाजी श्रीमुकुंदा ॥ जयभक्तवत्सला
स्वछंदा ॥ विज्ञानकंदा जगद्गुरू ॥ १ ॥ लक्ष्मीपते ब्रह्मांडनायका ॥ त्रिगुणातीता ब्रह्मजनका॥
दुःखनाशना निरुपाधिका ॥ भवतारका दयाब्धे ॥ २ ॥ तूं कैवल्यदाता परात्पर ॥ अज अ-
जित सर्वेश्वर ॥ स्वसंवेद्य पूर्ण अगोचर ॥ निर्विकार परब्रह्म ॥ ३ ॥ तुझे अद्भुत अनंत गुण॥
तयां वर्णाया समर्थ कोण ॥ जरी तूं करिसी कृपा पूर्ण ॥ तरीच वर्णन घडेल ॥ ४ ॥ ह्मणूनि
भावें वंदूनि तुजसी ॥ आरंभितों पुढील कथेसी ॥ तरी कृपाभरें श्रीहृषीकेशी ॥ प्रेरणा मान-
सीं करीं चांगें ॥ ५ ॥ पूर्वाध्यायांतीं नारदपर्वत ॥ अंबरीषरायाच्या सभेंत ॥ पातले ऐसी क-
था यथार्थ ॥ वर्णियेली यथामती ॥ ६ ॥ पुढें कैसें कथानक ॥ तेंचि ऐकिजे सकळिक ॥ आ
दिकवि मुनि वाल्मीक ॥ भारद्वाजातें सांगती ॥ ७ ॥ नारद पर्वत दोघेमुनी ॥ सभेसि आले
अवलोकुनी ॥ अंबरीष राजशिरोमणी ॥ मनीं संभ्रांत जाहला ॥ ८ ॥ सर्वेंचि देऊनि दिव्या-
सनें ॥ वरी बैसविलें दोघांकारणें ॥ आणि अर्पूनि पाद्यार्घ्याचमनें ॥ केलीं पूजनें यथाविधी
॥ ९ ॥ ते दोघेही देवर्षि श्रेष्ठ ॥ नित्यज्ञानवंतांमाजी वरिष्ठ ॥ महात्मे दिव्य मुनि गरिष्ठ ॥
कन्यार्थ स्पष्ट बैसले ॥ १० ॥ तयां वंदूनियां तो नृपती ॥ जी पद्मपत्राक्षी स्वसमीपवर्ती ॥

टी. १ सत्यज्ञानानंदस्वरूपा. २ स्वेच्छेनें वागणारा. ३ अनुभवज्ञानाचे मूळा. ४ ब्रह्मदेवाचेबापा. ५ संसारदुःखांतून काढणारा. ६ दये-च्या समुद्रा. ७ मोक्षदाता. ८ मायेच्या पलीकडचा (परमेश्वर). ९ जन्मरहित. १० अजिंक. ११ ज्ञानानेंच जाणला जाणारा. १२ प्रत्यक्ष न होणारा. १३ चांगली. १४ लागलींच (सत्वर). १५ मोठे १६ कमळपत्राप्रमाणें आहेत नेत्र जीचे. १७ आपल्या सन्निध बसलेली.

आपुली कन्या शुभा श्रीमती ॥ तियेप्रती बोलत ॥ ११ ॥ ह्मणे बाळे कल्याणरूपिणी ॥ नारद पर्वत हे देव[1]मुनी ॥ तव इच्छा धरूनि मनीं ॥ बैसले सुगुणी सा[2]चार ॥ १२ ॥ यांतूनि जोकां तव[3] मनासीं ॥ वर आवडेल पैं तयासी ॥ नमस्कारूनियां वि[4]धानेंसीं ॥ माळ त्वरेंसीं अर्पीं तूं ॥ ॥ १३ ॥ ऐसी पित्याची ऐकतां भा[5]रती ॥ सखिजनासह ती श्रीमती ॥ सुवर्णमाळ घेऊनि हा- तीं ॥ उठोनि उभी राहिली ॥१४॥ आणि विलोकी त्या देवर्षींप्रत ॥ तंव ते वा[6]नरानन असत ॥ ऐसें देखतां चिंताक्रांत ॥ होऊनि तटस्थ उभी ठे[7]ली ॥ १५ ॥ तंव तो राव ह्मणे तिजसी ॥ बा- ळे उगाच उभी कां राहसी ॥ ह्या दोघांतूनि तूं एकासी ॥ माळ त्वरेंसीं घालीं पां ॥ १६ ॥ तें वचन ऐकतां श्रीमती ॥ त्रासूनि बोले पितयाप्रती ॥ ताता हे दोघेही निरुती ॥ मज दिसती विपरीत ॥१७॥ दोघांचींही वानरवत ॥ अति कुरूप मुखें आहेत ॥ मुनिश्रेष्ठ नारद पर्वत ॥ नाहीं- च दिसत मज येथें ॥ १८ ॥ परी ह्या दोघांच्या मध्यें देख ॥ महाश्रेष्ठ षो[9]डशवार्षिक ॥ ऐसा पुरुष तिसरा एक ॥ बहुसुरेख बैसलासे ॥ १९ ॥ याचिये स्वरूपावरून ॥ कुं[10]वंडी कीजे मीनें[11]- केतन ॥ सर्वाभरणसंयुक्त पूर्ण ॥ शोभायमान सो[12]जिरा ॥ २० ॥ अं[13]तसीपुष्प नीळ मृदु[14]ल ॥ तैसें अंग श्याम कोमल ॥ दीर्घ बाहु नयन विशाळ ॥ वक्षस्थळ उंच पैं ॥ २१ ॥ चा[15]मीकरा- सि आणिती उणें ॥ ऐशीं शोभती दोन्ही व[16]सनें ॥ रत्नजडित सुवर्णाभरणें ॥ ते[17]जागळीं तळ-



टी. १ देवर्षि. २ खरोखर. ३ तुझ्या. ४ यथाविधि. ५ वाणी. ६ वानरमुख. ७ राहिली. ८ खरोखर. ९ सोळा वर्षांचा. १० ओंवाळणी. ११ मदन. १२ सुंदर. १३ अळशीचें पुष्प. १४ मृदु. १५ सोन्यास. १६ वस्त्रें. १७ तेजस्वी.

पती ॥२२॥ सुंदर सुशोभित विभक्त ॥ ऐशा त्रिवळींनीं[1] नाभि युक्त ॥ सरळ कृश उदर व्यक्त[2] ॥ ओष्ठ आरक्त बिंबापरी[3] ॥ २३ ॥ पद्महस्त पद्मचरण ॥ पद्मनाभि पद्मनयन ॥ पद्महृदय पद्मवदन ॥ पद्मासन सुशोभित ॥२४॥ करचरणनखें सुरंग ॥ सतेज आरक्त दिव्य अपांग[4] ॥ कुंदकीलकांपरी चांगें ॥ शोभे अव्यंग[5] दंतपंक्ती ॥ २५ ॥ कृष्ण स्निग्ध[6] कुरळ केश ॥ मस्तकीं विलसती विशेष ॥ त्रैलोक्यींची शोभा अशेष ॥ एकवटली ह्या अंगीं ॥ २६ ॥ सप्रेमदृष्टीं मज पाहुनी ॥ हास्य करितो क्षणोक्षणीं ॥ पसरोनियां दक्षिणपाणी* ॥ माळेलागुनी यांचितो ॥ २७ ॥ ऐसा दोघांमध्यें बैसलेला ॥ तिसरा पुरुष दिसतो चांगला ॥ एवं तियेच्या ऐकूनि बोला ॥ नारद शंकला मनांत ॥ २८ ॥ आणि तियेसि ह्मणे ग श्रीमती ॥ जो तिसरा दिसतो तुजप्रती ॥ तयासि बाहु आहेत किती ॥ तें मज निरुती सांग पां ॥ २९ ॥ तें ऐकूनि राजतनया[11] ॥ अति विस्मित होऊनियां ॥ ह्मणे हो दोनचि बाहू तया ॥ पुरुषवर्या[12] दिसताती ॥ ३० ॥ तों पर्वत ह्मणे ग सुंदरी ॥ काय दिसतें तयाच्या उरीं ॥ आणि धरिलेंसे काय करीं ॥ तेंही सत्वरी सांग तूं ॥ ३१ ॥ तें ऐकूनि राजबाळा ॥ ह्मणे हो याचीया वक्षस्थळा ॥ विशाळ सुंदर सोज्वळा[13] ॥ एक माळा दिसताहे ॥ ३२ ॥ आणि करांमाजी धनुष्यबाणां ॥ धरिलें असे पैं जाणा ॥ एवं× तियेच्या ऐकूनि वचना ॥ वाटलें मना आश्चर्य ॥ ३३ ॥ आणि ते दोघेही देवमुनी ॥ परस्पर

टी. १ तीनवळ्यांनीं. २ स्पष्ट. ३ पिकलेल्या तोंडल्या सारखे. ४ नेत्रांचे कोपरे. (कटाक्ष) ५ उत्तम. ६ सरळ चांगली. ७ तेजस्वी. ८ सर्व. ९ मागतो. १० खरें. ११ राजकन्या. १२ पुरुषश्रेष्ठाला. १३ तेजस्वी. * उजवा हात. × याप्रमाणें.

शंकले मनीं ॥ त्यांतूनि नारद स्वांतःकरणीं ॥ विचार करूं लागला ॥ ३४ ॥ कवण येथें आला लाघवी ॥ कवण दुष्ट हा मायावी ॥ कवणाची तरी ही ओंघवी ॥ मायाच असावी वाटतें ॥ ३५ ॥ अथवा हा हरीच येथ ॥ स्वयें आला असावा खचित ॥ तो महामायावी अत्यद्भुत ॥ तस्करनाथ असे पैं ॥ ३६ ॥ नातरी येथें अन्य कवण ॥ कैसा बसेल गुप्त येऊन ॥ हा अंबरीषराजा पुण्यवान ॥ नाश तत्क्षण करील ॥ ३७ ॥ आणि म्यां हरीसि विनविलें ॥ तैसेंचि पर्वताचें मुख झालें ॥ परी मम मर्कटवत दिसलें ॥ हें ऐसें कैसें केलें पां ॥ ३८ ॥ तरी हा हरीच असे चोर ॥ दुजाचें कृत्य नव्हे साचार ॥ एवं नारद ऋषीश्वर ॥ करी विचार अंतरीं ॥ ३९ ॥ तैसाच तो पर्वतमुनी ॥ विचार करी अंतःकरणीं ॥ ह्मणे हें वानरत्व मजलागुनी ॥ आज कैशेनीं जाहलें ॥ ४० ॥ जैसें म्यां प्रार्थिलें हरीसी ॥ तैसेंचि तयें केलें नारदासी ॥ परी ही माझी गति ऐशी ॥ कवणें कैशी केली पां ॥ ४१ ॥ एवं दोघेही मुनिवर ॥ स्वस्वांतरीं करिती विचार ॥ तंव तो राव जोडूनि कर ॥ बोले सादर तयांसी ॥ ४२ ॥ अहो देवर्षिवर्य आपण ॥ दोघेही शुभरूप असोन ॥ ऐसें हें बुद्धिविमोहन ॥ किंकारण केलेंती ॥ ४३ ॥ जरी आपण कन्यार्थ येथ ॥ आलेति तरी बैसिजे स्वस्थ ॥ तें ऐकूनि नारद पर्वत ॥ कोपसंतप्त जाहले ॥ ४४ ॥ आणि ह्मणती रे अंबरीषा ॥ तूंच करिसी हा मोह ऐसा ॥ आह्मी दोघेही कोणे दिवसा ॥ मो-

टी. १ आपुल्या चित्तीं. २ सर्व. ३ चोरांचा राजा. ४ माझें. ५ माकडासारखें. ६ खचित. ७ याप्रमाणें. ८ आपापल्या मनांत. ९ कल्याणरूप, सुरेख. १० बुद्धीला भ्रम. ११ कशाकरितां. * मुनींमध्यें श्रेष्ठ. × देवर्षींमध्यें उत्तम.

हपाशा नींतळोंच ॥ ४५ ॥ तरी अन्य गोष्टी न करीं फुका ॥ आतां ही तुझी शुभकन्यका ॥ आज्ञा उभयतांतून एका ॥ वरूं देकां सत्वर ॥ ४६ ॥ तें ऐकूनि अंबरीषराव ॥ मुनिशापाचिये भयास्तव ॥ कन्येसि ह्मणे ग ईश्वरीं सर्व ॥ ठेवूनि भाव वरीं एका ॥ ४७ ॥ ऐशी रायाची झाली आज्ञा ॥ मग ती श्रीमती राजकन्या ॥ पुनरपि इष्टदेवता मान्या ॥ वंदूनि वेगें ऊठली ॥ ४८ ॥ सावधपणें घेऊनि माळा ॥ उभी ठेली ती वेल्हाळा ॥ तों मुनींद्रांमध्यें बैसलेला ॥ पुरुष दिसला पूर्ववत ॥ ४९ ॥ स्वरूपसुंदर मदनाहुनी ॥ ऐसा तो पुरुष पाहुनी ॥ श्रीमतीनें तयालागुनी ॥ माळ तत्क्षणीं दीधली ॥५०॥ नंतर तेथें ती राजबाळी ॥ कवणासिही नाहीं दिसली ॥ विद्युल्लतेपरि तत्काळीं ॥ अदृश्य झाली अवचितां ॥५१॥ तेव्हां तेथींचे सर्व जन ॥ अत्यंत आश्चर्य पावोन ॥ अहो हें काय हें काय ह्मणोन ॥ बोलूं लागले एकसरां ॥ ५२ ॥ त्या नादें ती सभा विशाळ ॥ कोंदाटली असे सकळ ॥ हिकडे श्रीमतीसि घननीळ ॥ घेऊनि स्वस्थळा पातला ॥ ५३ ॥ अगा भारद्वाजमुने पाहीं ॥ श्रीमतीनें पूर्वजन्माठायीं ॥ श्रीविष्णु स्वपति होण्याविषयीं ॥ तपस्या केली सर्वदा ॥ ५४ ॥ त्या पुण्ययोगें ती ही येथ ॥ राजकन्या होऊनि सांप्रत ॥ श्रीविष्णूसि वरूनि यथार्थ ॥ वैकुंठाप्रत पावली ॥ ५५ ॥ तें ते उभयतां देवमुनी ॥ धिक्धिक् तुज ऐसें ह्मणोनी ॥ अत्यंत दुःखें सभेंतूनी ॥ वेगें उठोनी चालले

टी. १ शिवत नाहीं. २ व्यर्थ. ३ राहिली. ४ सुंदर. ५ राजकन्या (श्रीमति). ६ विजेप्रमाणें. ७ एकदम. ८ मेघाप्रमाणें आहे श्यामवर्ण ज्याचा तो (विष्णु). ९ देवर्षि (नारद व पर्वत). १० धिक्कार असो धिक्कार असो.

॥ ५६ ॥ ते हरीतें भेटावयासी ॥ तत्क्षण पावले वैकुंठासी ॥ तों तयां देखूनि हृषीकेशी ॥ श्रीमतीसी बोलत ॥ ५७ ॥ प्रिये नारद आणि पर्वत ॥ उभय मुनी येत आहेत ॥ तरी तूं आतां क्षणमात्र गुप्त ॥ होऊनि येथ राहें पां ॥ ५८ ॥ ती हरीची ऐकतां वाणी ॥ श्रीमती बहुबरें ह्मणोनी ॥ हंसत होत्साती तत्क्षणीं ॥ तेथेंच अदृश्य जाहली ॥ ५९ ॥ तों पुढें येऊनि नारदऋषी ॥ नमस्कारूनियां श्रीहरीसी ॥ ह्मणे बा देवा आज आह्मांसी ॥ काय हें त्वां केलें पां ॥ ६० ॥ आह्मी स्त्रीची इच्छा धरूनी ॥ गेलों अंबरीषाच्या सदनीं[1] ॥ आणि राजकन्याही माळ घेउनी ॥ तिष्ठली येऊनी समोर ॥६१॥ तों पाहतां पाहतां तेच ठायासी ॥ अवचित[2] ती झाली नाहींशी ॥ तरी गोविंदा त्वांचि तियेसी ॥ हरिलें आहेसी निश्चयें ॥६२॥ तें ऐकूनियां नारायण ॥ उभयहस्तीं कर्ण झाकून ॥ ह्मणे हे नारदमुने आपण ॥ काय हें वचन बोलिलेती ॥६३॥ अत्यंत कामासक्तपणें ॥ मना वाटेल तैसें बोलणें ॥ हें मुनिवृत्तीसि[3] लाजिरवाणें ॥ असे जाण निश्चयें ॥ ६४ ॥ ऐसें हरीचें ऐकतां वचन ॥ नारद तयाच्या कर्णीं लागून ॥ ह्मणे माझें मर्कटासमान[4] ॥ कैसें वदन जाहलें ॥ ६५ ॥ तें ऐकूनियां भगवंत ॥ नारदाच्या कर्णीं सांगत ॥ तुवां कथिल्याप्रमाणें पर्वत ॥ वानरमुख म्यां केला ॥ ६६ ॥ परी त्वां जैसें एकांतीं प्रार्थिलें ॥ तैसेंचि पर्वतें मज विनविलें ॥ ह्मणोनि तुझेंही मुख वहिलें ॥ मर्कटवत केलें म्यां ॥६७॥ तुह्मी दोघेही मम[5] भक्त ॥ मी तों भक्तिवश अत्यंत ॥ ह्मणोनि तुमचे प्रार्थितार्थ[6] ॥ तैसे यथार्थ पुर-



टी. १ घरीं. २ अकस्मात. ३ ऋषीच्या वर्तनाला. ४ माकडासारखें. ५ माझे. ६ सांगितलेले मनोरथ.

विले ॥ ६८ ॥ आपुल्या चित्तीं विचारें पाहीं ॥ मीतों स्वेच्छें न केलें कांहीं ॥ तुमचें प्रिय होण्याविषयीं ॥ अन्यथा नाहीं वर्तलों ॥ ६९ ॥ जे मम भक्त जें यांचित ॥ तें मी तयांसि देतों निश्चित ॥ यांत गुण कीं दोष यथार्थ ॥ तुमचा आमुचा नसेची ॥ ७० ॥ ऐसा दोघांचा संवाद झाला ॥ तंव तेथें पर्वत पातला ॥ तेणेंही नारदापरी वहिला ॥ प्रश्न केला हरीसी ॥ ७१ ॥ तें तेणें जैसें नारदासी ॥ कथिलें तैसेंचि निवेदिलें त्यासी ॥ मग श्रीहरि त्या उभयतांसी ॥ उघड बोलता जाहला ॥ ७२ ॥ ह्मणे हो देवर्षि तुह्मी उभयतां ॥ जैसें मागते झालेति तत्वता ॥ तेंसेंचि सत्य केलें सर्वथा ॥ कांहीं अन्यथा नाचरिलें ॥ ७३ ॥ मग नारद ह्मणे गा घननीळा ॥ जो धनुष्मान् द्विभुज रूपागळा ॥ आह्मा दोघांमध्यें बैसला ॥ आणि घेऊनि गेला राजकन्या ॥ ७४ ॥ तो पुरुष असावा कवण ॥ हें तूं सांगें आह्मालागुन ॥ तें ऐकूनियां नारायण ॥ बोले वचन सादर ॥ ७५ ॥ अहो मुनिवर्य ह्या जगतीं ॥ मायावी जन बहुत असती ॥ त्यांतूनि कोणें तरी ती श्रीमती ॥ हरिली निश्चिती जाणिजे ॥ ७६ ॥ मीतों श्रीपति वैकुंठनाथ ॥ चक्र धरूनि हातांत ॥ चतुर्बाहूच असतों सतत ॥ हेंतों जगांत प्रसिद्ध असे ॥ ७७ ॥ तस्मात् श्रीमतीचा अपहर्ता ॥ तो मी नव्हेंचि हो तत्वता ॥ तुह्मीं जाणितलें तें सर्वथा ॥ असे वृथा निश्चयें ॥ ७८ ॥ तें ऐकूनि ते नारदपर्वत ॥ आनंदें वंदूनि श्रीहरीप्रत ॥ ह्मणती हे प्रभो तुझा ह्यांत ॥ दोष काय असे पां ॥ ७९ ॥ दौरात्म्य तेंतों रायाचेंच ॥ माया उद्भविली तेणेंच ॥ ऐसें

टी. १ मागतात. २ तो. ३ मेघश्यामा. ४ धनुर्धारी. ५ रूपानें अधिक. ६ हरण करणारा. ७ दुष्टपण, कपट.

बोलूनि तत्क्षणींच ॥ तेथूनि वेगें निघाले ॥ ८० ॥ ते पावोनि अयोध्यानगरा ॥ प्रवेशले रा-
याचे मंदिरा ॥ रागें डोळे फिरवूनि गरगरां ॥ क्रूरोत्तरा बोलत ॥८१॥ अरे दुष्टा अंबरीषरा
या ॥ महानष्टा अधमा पापिया ॥ तुवां आदीं आम्हा उभयां[1] ॥ सत्कारूनियां पाचारिलें ॥८२॥
ह्मणोनि आह्मी देवमुनी ॥ दारेच्छें[2] येथें आलों असोनी ॥ तुवां ती मायायोगेंकरूनी ॥ दु-
जालागुनी[3] अर्पियेली ॥ ८३ ॥ ऐसा तूं मायावी पापरूप ॥ तरी आतां घे आमुचा शाप ॥
मूर्खा तुज तमोराशि[4] अमूप[5] ॥ आपेंआप आंवरील[6] ॥ ८४ ॥ तेणें तूं आत्म्यालागीं यथार्थ ॥
कदापि न जाणसी निश्चित ॥ ऐसा शाप होतांचि त्वरित ॥ तम[7] अद्भुत उद्भवलें ॥ ८५ ॥
तें अत्यंत लोकभयंकर ॥ वेगें चालले नृपाळावर ॥ तंव विष्णूचें वेगवत्तर ॥ चक्र प्रखर उ-
द्भवलें ॥ ८६ ॥ तेणें त्या तमासि त्रासिलें ॥ तें तें देवर्षींवरीच[8] फिरलें ॥ तया येतां पाहूनि[9] वं-
हिले ॥ पळों लागले मुनिवर्य ॥८७॥ धांवतां त्रासलीं सर्वांगें ॥ दृष्टी मुरडोनि पाहती मागें ॥
तों तमोराशि लागवेगें[10] ॥ आपुल्यावर येतसे ॥ ८८ ॥ आणि तयामागोनि दुर्धर ॥ चक्रही येत
आहे प्रखर ॥ ऐसें पाहूनि ते मुनिवर ॥ परस्पर बोलती ॥८९॥ अहो आह्मा उभयतांसी ॥
ही कन्यासिद्धि लाधली[11] ऐसी ॥ कटकटा म्हणत बहु वेगेंसीं ॥ पळत चालले पुढारां ॥९०॥ लो-
कालोकपर्यंत[12] तांतडी ॥ सतत धांवतां थकली कुडी[13] ॥ परी त्यां ती तमाची पैरवडी[14] ॥ नच

टी १ दोघांस. २ स्त्रीच्या इच्छेनें. ३ दुसऱ्यास. ४ अंधकार ५ अगणित. ६ वेष्टील. ७ अंधकार. ८ नारद व पर्वतयांवर. ९ ते (नारद आणि पर्वत.) १० त्वरेनें. ११ लाभली. १२ लोकालोकपर्वतापर्यंत. १३ देह. १४ पंगत. × प्रारब्धा. (दैवा)

सोडी क्षणमात्र ॥ ९१ ॥ तैं ते अत्यंत भयपीडित ॥ त्राहींत्राहीं गोविंदा त्वरित ॥ ऐसें उच्चस्वरें ओरडत ॥ वैकुंठाप्रत धांवले ॥ ९२ ॥ वेगें जाऊनि विष्णुमंदिरीं ॥ म्हणती हे प्रभो श्रीमुरारी ॥ तूं भक्तवत्सल स्वामी श्रीहरी ॥ दीनकैवारी आहेस ॥ ९३ ॥ तरी दयाळा ये समयीं ॥ आम्हांसि रक्षीं लवलाहीं ॥ तुजवीण ह्या त्रिजगाठायीं ॥ रक्षिता नाहीं कोणीच ॥ ९४ ॥ ऐसें मुनींचें दीन वचन ॥ ऐकतांचि तो नारायण ॥ अचिंत्यप्रभाव भगवान ॥ गहिंवरें पूर्ण जाहला ॥ ९५ ॥ आणि त्या चक्रतमोराशींसी ॥ निवारूनियां वेगेंसीं ॥ मग भक्तानुग्रहकामेंसीं ॥ विचार मानसीं मांडिला ॥ ९६ ॥ अंबरीष जैसा माझा भक्त ॥ तैसेचि हे मुनिही असत ॥ म्हणोनि म्यां तिघांचेंही हित ॥ करावें सतत साक्षेपें ॥ ९७ ॥ ऐसा चित्तीं विचार करुनी ॥ भगवंतें त्या देवर्षीलागुनी ॥ स्वसमीप पैं पाचारुनी ॥ शुभवाणीं बोलों आदरिलें ॥ ९८ ॥ अहो देवर्षिवर्य आपण ॥ ऐका माझें एक वचन ॥ भक्तरक्षार्थ मम चक्रें येऊन ॥ तुम्हांसि पूर्ण त्रासिलें ॥ ९९ ॥ परी तुम्ही दोघेही निर्मळ ॥ महासाधू असा केवळ ॥ आणि साधुजन ते सर्वकाळ ॥ क्षमाशील असती पां ॥ १०० ॥ दुर्जना आणि सज्जनास ॥ जैसा सम प्रकाशे सुधांशु ॥ तैसेचि सदा साधुपुरुष ॥ सम सर्वांस वर्तती ॥ १०१ ॥ ऐशी तुह्मां सर्व संतांची ॥ प्रसिद्ध कीर्ति असे साची ॥ तरी मच्चक्रकृत अपराधाची ॥ क्षमा दयाळीं

टी. १ रक्षींरक्षीं. २ भक्तांविषयीं दयाळु. ३ सत्वर. ४ अतर्क्य आहे सामर्थ्य ज्याचें. ५ सुदर्शनचक्र व अंधकाराचा राशी यांस. ६ भक्तांवर कृपा करावी या इच्छेनें. ७ चंद्र. ८ खरी. ९ माझ्या सुदर्शन चक्रानें केलेल्या. + क्षमा करणें हा आहे स्वभाव ज्यांचा.

कीजिये ॥ १०२ ॥ ऐशी नारायणाची वाणी ॥ ऐकतांचि ते देवमुनी ॥ तयाच्या मायेसि जाणुनी॥ अत्यंत मनीं संतापले ॥१०३॥ नयन झाले अंगारवत ॥ दोन्ही ओष्ठ फुरफुरत ॥ आणि त्या कोपें श्रीविष्णूप्रत ॥ शाप बोलत दारुण ॥ १०४ ॥ म्हणती रे विष्णो मायाविया ॥ आम्हांसि कपट करूनियां ॥ जये स्वरूपें तूं ते ठाया ॥ श्रीमती जायां हरिलीस ॥ १०५ ॥ त्याच रूपें तूं हृषीकेशी ॥ अंबरीषरायाचे वंशीं ॥ दशरथदारेचिये कुशी ॥ पुत्र होसी निश्चयें ॥ १०६ ॥ तैसीच ती पद्माक्षी श्रीमती ॥ पृथ्वीची कन्या होईल निश्चिती ॥ आणि तियेतें विदेहनृपती ॥ बहु प्रीतीं पाळील ॥ १०७ ॥ मग ती तुज दाशरथीसी ॥ स्वयंवरीं वरील प्रेमेंसीं ॥ पुढें कश्चिद्राक्षस पापराशी ॥ त्या तव भार्येसी हरील ॥ १०८ ॥ तुवां राक्षसधर्में सांप्रत ॥ श्रीमती हरिली अवचित ॥ म्हणोनि राक्षसेंचि कपटें तेथ ॥ त्वद्भार्या खचित हरावी ॥ १०९ ॥ आणि जैसे आम्ही उभयतां ॥ दुःख पावलों श्रीमतीकरितां ॥ तैसेंचि तेथें तुवां तें अच्युता ॥ तदर्थ रडत भोगावें ॥ ११० ॥ एवंप्रकारें देवमुनी ॥ हरीसि बोलले शापवाणी ॥ तें तो भगवान् मोक्षदानी ॥ चक्रालागुनी सांगत ॥ १११ ॥ अंबरीषाच्या वंशीं दयाळ ॥ श्रीमान् यशस्वी धर्मशील ॥ दशरथनामें अति निर्मळ ॥ मेदिनीपाळ होईल पां ॥ ॥ ११२ ॥ तयाचा मी ज्येष्ठ तनुज ॥ रामनामा होईन सतेज ॥ आणि हा माझा दक्षिणे भुज ॥

टी. १ नेत्र. २ इंगळ्या प्रमाणें ( लाल ). ३ स्त्री. ४ जनकराजा. ५ कोणीएक राक्षस. ६ तुझी स्त्री. ७ बायकोकरितां. ८ मोक्षदाता. ९ राजा. १० वडील. ११ पुत्र. १२ उजवा. * दशरथराजाचे स्त्रियेच्या ( कौसल्येच्या ).

भरताख्य[1] अनुज[2] होईल तें ॥ ११३ ॥ तैसाचि हा मद्वामबाहू[3] ॥ शत्रुघ्ननामा होईल भाऊ ॥ आणि हा शेष द्विसहस्रजिव्हू[4] ॥ लक्ष्मणाख्य भाऊ होईल ॥ ११४ ॥ अरे ऋषींचें शापवचन ॥ कदापि अन्यथा नव्हे जाण ॥ तरी चक्रा तूं आतां येथून ॥ करीं गमन स्वकार्या[5] ॥ ११५ ॥ ऐसें चक्रासि सांगूनि हरी ॥ तमोराशींसि बोले वैखरी[6] ॥ अगा मी जैं मेदिनीवरी ॥ रामावतारी होईन ॥ ११६ ॥ तये समयीं तूं येऊनि तेथ ॥ यथेच्छ आवरीं[7] मज खचित ॥ राजासि आणि मुनींसि सांप्रत ॥ सोडूनि त्वरित पैं जाईं ॥ ११७ ॥ ऐसें कथितांक्षण तत्वता ॥ तम अदृश्य झालें सर्वथा ॥ हरीनेंचि तें आपुल्या करितां ॥ गुप्त करूनि ठेविलें ॥ ११८ ॥ आणि त्या भक्तरक्षकप्रभूनें ॥ निवारितां चक्राकारणें ॥ तेंही तत्क्षणीं पूर्वीप्रमाणें ॥ शांतपणें राहिन्नलें ॥ ११९ ॥ असो ऐसे ते देवर्षि दोघे ॥ भयनिर्मुक्त होतांचि वेगें ॥ हरीसि वंदूनि साष्टांगें ॥ तेथूनि मागें परतले ॥ १२० ॥ परी श्रीमती नाहीं मिळाली ॥ आणि शापदानें फजिती झाली ॥ म्हणोनि शोकाग्नीच्या ज्वाळीं ॥ संतप्त झालीं तच्चित्तें[8] ॥ १२१ ॥ आणि अविचारयोगें आपण ॥ व्यर्थ शापिला नारायण ॥ ऐसा अनुताप[9] पावोन ॥ परस्परां वचन बोलती ॥ १२२ ॥ आजपासूनि आह्मी जगांत ॥ यावद्देहांतपर्यंत ॥ कन्यापरिग्रह[10] कदाचित ॥ न करूं खचित खचित हें ॥ १२३ ॥ ऐशी प्रतिज्ञा करूनि क्रूर ॥ मग ते दोघेही मुनीश्वर ॥

---

टी. १ भरतनामें. २ धाकटा बंधु. ३ माझा डावा बाहू. ४ दोन हजार आहेत जिव्हा ज्यास. ५ आपल्या कामास (अंबरीषाच्या रक्षणास.) ६ वाणी. ७ वेढ, कोंड. ८ त्यांचीं (नारद पर्वतांचीं) चित्तें. ९ पश्चात्ताप. १० कोणाच्याही कन्येशीं विवाह.

पूर्ववत् शुद्ध ध्यानतत्पर ॥ ऐसे वर्तते जाहले ॥ १२४ ॥ आणि अंबरीषराजेश्वरही ॥ यथान्याय पाळूनि मही ॥ अंतीं ज्ञातिभृत्यांसह पाहीं ॥ वैकुंठीं जाता जाहला ॥ १२५॥ पुढें लोटला काळ बहुत ॥ अंबरीषवंश गेला वाढत ॥ तेव्हां भगवान् वैकुंठनाथ ॥ काय करी ऐकिजे ॥१२६॥ देवर्षींचें शापवचन ॥ सत्य करूनियां आपण ॥ अंबरीषवंशीं उद्भवोन ॥ कीजे सन्मान तयांचा ॥ १२७ ॥ ह्मणोनि तो श्रीहृषीकेशी ॥ अंबरीषरायाचे वंशीं ॥ दशरथापासूनि तेजोराशी ॥ कौसल्यांकुशीं जन्मला ॥ १२८ ॥ तो राम साक्षाद्गरुडध्वज ॥ परी झाला दशरथात्मज ॥ तें तयाचें सुबुद्धिबीज ॥ लोपलें सहज पूर्वतमें ॥ १२९ ॥ तेणें सामान्यपुरुषवत ॥ वर्तत असे तो सतत ॥ कार्यवशेंमात्र कदाचित ॥ आपणा यथार्थ जाणतसे॥१३०॥ वस्तुतः तो पूर्णार्थ असोनी ॥ अपूर्णार्थवत वर्ते जनीं ॥ ऐशी प्रभूनें कराया करणी ॥ काय कारण ह्मणशील ॥ १३१ ॥ तरी भक्तांच्या अनुग्रहार्थ ॥ समर्थांची ऐशीच रीत ॥ स्वयें भोगिती दुःखें बहुत ॥ परी सुख देत भक्तांसी ॥ १३२ ॥ आणि कपट करितां जगाठायीं ॥ दुःख भोगणें लागे सदाही ॥ कपटाचारें ईश्वरासिही ॥ मानवत्व पाहीं पातलें ॥१३३॥ तरी दोर्षदृष्ट्या विद्वज्जनांनीं ॥ कपट कदा न कीजे भुवनीं ॥ हेंचि दावाया तैशी करणी ॥ श्रीहरीनें केली असे ॥ १३४ ॥ असो हें रामजन्मकथायुक्त ॥ अंबरीषाचें माहात्म्य समस्त ॥ आणि



---

टी. १ पृथ्वी २ कौसल्येच्या पोटीं. ३ दशरथाचा पुत्र. ४ चांगल्या बुद्धीचें बीज. ५ पूर्वीच्या (देवर्षींच्या शापापासून उद्भवलेल्या) अंधकारानें. ६ परिपूर्णमनोरथ आहेत ज्याचे असा. ७ इच्छाकरणाराच्या सारखा. ८ दोष पाहणारे. * आप्त व चाकर यांसह.

हरीचें मायावित्व अद्भुत ॥ तुज यथार्थ कथियेलें ॥ १३५ ॥ त्यांतूनि हरीच्या मायावित्वासी ॥ पठती ऐकती भक्तिभावेंसीं ॥ ते पुण्यात्मे सोडूनि मायेसी ॥ विष्णुलोकासी जातात ॥ १३६ ॥ आणि हें रामजन्माचें कारण ॥ जे द्विज करिती श्रवण पठण ॥ किंवा तदर्थ जनालागुन ॥ अनुमोदन देतात्ी ॥ १३७ ॥ ते सकळही सत्वरगती ॥ सुखें पावती मोक्षाप्रती॥ आणि तयांलागीं यमाची भीती ॥ नव्हे कल्पांतीं निश्चयें ॥ १३८ ॥ ऐसें वाल्मीकमुनीनें आपण ॥ कथिलें भारद्वाजालागुन ॥ आतां सीताजन्माचें निदान ॥ पुढिल्या अध्यायीं कथिजेल ॥ १३९ ॥ तें कथानक बहुरसाळ ॥ सुधांसरोवरचि केवळ ॥ श्रोतृजनां करूनि निर्मळ ॥ मोक्ष अढळ ओंपितें ॥ १४० ॥ तरी सकळजनीं सतत ॥ सादर असावें श्रवणार्थ॥ ह्मणोनि मी रघुनाथसुत ॥ जोडूनि हस्त प्रार्थितों ॥ १४१ ॥ ॥ स्वस्ति श्रीमदद्भुतरामविजय ॥ वाल्मीकीयाद्भुतोत्तरकांडहृदय ॥ ऐकोत सज्जन होऊनि तन्मय ॥ पंचमाध्याय मधुर हा ॥ १४२ ॥ ॥ ॥ इति पंचमोध्यायः ॥ ५ ॥ ॥ ॥ ॥

टी. १ श्रवणपठणार्थ. २ आदिकारण. ३ अमृताचें तळें. ४ देतें.



श्रीगणेशायनमः ॥ ॥ जयजयाजी वैकुंठनाथा ॥ जयजयाजी त्रिगुणातीता ॥ जय श्रीविभो षड्भावरहिता[१] ॥ अजा[२] अजिता[३] अव्यया[४] ॥ १ ॥ करुणानिधे शेषशयना ॥ भक्तजनमायानिकृंतना[५] ॥ स्वसंवेद्या[६] आदिनारायणा ॥ निरंजना[७] निरुपाधिका ॥ २ ॥ तूं सच्चिदानंद[८] पूर्णकाम ॥ योगिजनमनविश्राम[९] ॥ परी पुरवाया भक्तकाम[१०] ॥ दाशरथीराम झालासी ॥ ३ ॥ तुझे अद्भुत गुण अनंत ॥ तयां वर्णाया कोण समर्थ ॥ जरी तूं कृपा करिसी यथार्थ ॥ तरीच सर्वार्थ[११] पुरतील ॥ ४ ॥ ह्मणोनि प्रभो तव चरणा ॥ वंदूनियां करितों प्रार्थना ॥ कृपा करूनि सच्चिद्घना[१२] पुढील आख्याना वर्णवीं ॥ ५ ॥ पूर्वाध्यायीं परम पावन ॥ कथिलें रामजन्माचें कारण ॥ आतां सीतोत्पत्तीचें निदान[१३] ॥ वर्णितों संपूर्ण यथामती ॥ ६ ॥ तरी सकळ श्रोतेजनीं ॥ चित्त द्यावें अनुसंधानीं ॥ आदिकवि श्रीवाल्मीकि मुनी ॥ शिष्यालागुनी[१४] सांगत ॥ ७ ॥ अगा शिष्योत्तमा सद्भक्ता ॥ भारद्वाजमुने बुद्धिमंता ॥ सीताजन्मकारणकथा ॥ सांगतों आतां ऐक तूं ॥ ८ ॥ पूर्वी त्रेतायुगामाजी देख ॥ श्रीविष्णुतत्पर अलोलिक[१५] ॥ विशुद्धात्मा कौशिक नामक ॥ द्विजवर एक होता पैं ॥ ९ ॥ तो शयनीं[१६] आसनीं भोजनसमयीं ॥ विष्णुनामेंचि सदागायी ॥ अनन्य-

---

टी. १ उत्पन्न होणें, आहेसें दिसणें, वाढणें, परिणाम पावणें, क्षीण होणें आणि मरणें हे जे साहा भाव यांणीं रहिता. २ जन्मरहिता. ३ अजिंका. ४ नाशरहिता. ५ भक्तजनांची माया तोडणारा. ६ ज्ञानरूप (ज्ञानानेंच जाणलाजाणारा.) ७ निष्कलंक (शुद्धा) ८ सत्यज्ञानानंदरूप. ९ योगिजनांच्या मनास विश्रांति देणारा. १० भक्तांचे मनोरथ. ११ सर्व इच्छा. १२ सत्य व ज्ञान यांणीं भरलेला. १३ मूळकारण. १४ शिष्याला (भारद्वाजाला). १५ अमोलिक, उत्तम. १६ बिछान्यावर (निजलेला असतां).

भावें स्वकीयहृदयीं ॥ विष्णूसि ध्यायी सर्वदा ॥ १० ॥ आणि नित्य विष्णूचींच उदार
चरितें ॥ वारंवार गायी एकचित्तें ॥ विष्णुभजनावीण निरुतें ॥ पळही रितें न दवडीच॥ ११॥
तो कुटुंबासहवर्तमान ॥ जें विष्णूचें आवडतें स्थान॥ हरिक्षेत्र परमपावन ॥ तेथें येऊन रा-
हिला ॥ १२ ॥ भगवत्सान्निध दिवसरात ॥ विष्णुचरितें असे गात ॥ तालस्वरलयसंयुक्त ॥
आलाप बहुत घेतसे ॥ १३ ॥ प्रेमभरें क्रमें करूनी ॥ मंजुळ आळवी रागरागिणी ॥ ग्रामामाजी
भिक्षा याचुनी ॥ नित्य निर्वाह करितसे ॥ १४ ॥ तरी भक्तिश्रद्धायुक्त पूर्ण ॥ सदा करी हरि-
गुणगायन ॥ जयाच्या श्रवणालागीं सज्जन ॥ होती तल्लीन सार्चार॥ १५॥ आदीच गानदुग्ध
मधुर ॥ त्यांत पडतां हरिगुणसाखर ॥ तें श्रवणाननें न पी सादर॥ ऐसा खरं नर कोण॥१६॥
असो ऐसा तो द्विजवर ॥ गात असतां निरंतर ॥ श्रवणालागीं ग्रामस्थ नर ॥ मिळती अपार
ते ठायीं ॥ १७ ॥ तयांमाजी पद्माक्ष नामक ॥ द्विज येतसे महार्धनिक ॥ तयासि तें गायन
रसिक ॥ प्रिय अधिक जाहलें ॥ १८ ॥ ह्मणोनि तो प्रेमें अनुदिन ॥ कौशिका देऊं लागला
अन्न ॥ तेणें तयाचा भिक्षेविण ॥ निर्वाह होऊं लागला ॥ १९॥ तैं तो अधिक आनंदेंसीं ॥
गाऊं लागला हरिगुणांसी ॥ पद्माक्षही नित्य श्रवणासी ॥ भक्तिभावेंसीं बैसत ॥ २० ॥ ऐसे
लोटतां कित्येक दिन ॥ कौशिकाचे शिष्य सुजाण ॥ विप्रक्षत्रियवैश्यकुलोत्पन्न ॥ सातजण

टी. १खरोखर. २ताल व गाण्याच्या सुराची लय यांणीं युक्त. ३मागोन. ४खरोखर. ५गायनरूपदूध. ६कर्णरूपी मुखानें. ७गाढव. ८ मोठा धनवान्. ९ दररोज. १० कौशिक. ११ ब्राह्मण, क्षत्रिय वैश्य ह्या तीन कुळांत जन्मलेले. *श्रीहरीचे गुण हीच साखर.

तेथें पातले ॥ २१ ॥ ते गायनकळाविशारद ॥ विष्णुपदाब्जपरायणमिलिंद ॥ ज्ञानविद्याकुशळ विशुद्ध ॥ सद्गुरुनिष्ठ सर्वही ॥ २२ ॥ तयांसिही पद्माक्ष वहिला ॥ अन्नादिक देऊं लागला ॥ शिष्यागमनें कौशिकाला ॥ आनंद झाला अधिकची ॥ २३ ॥ मग तो त्या शिष्यांसहित ॥ तेच क्षेत्रीं श्रीविष्णूप्रत ॥ यथाविधि नित्य नेमें गात ॥ काळक्रमित आनंदें ॥ २४ ॥ आणि तेथेंच विष्णुभक्त एक ॥ वैद्य होता मालवनामक ॥ तो नित्यनेमें हरीची सुरेख ॥ दीपमाळ उजळीतसे ॥ २५ ॥ आणि तयाची सती सद्गुणी ॥ मालतीनामें असे कामिनी ॥ ती त्या हरिक्षेत्रीं सर्वत्र अनुदिनीं ॥ सारवीतसे गोमयें ॥ २६ ॥ ऐसीं तीं उभयतां दंपती ॥ स्वस्वकार्ये नित्य करिती ॥ आणि कौशिकाचें गायन प्रीतीं ॥ ऐकत बैसती सर्वदा ॥ २७ ॥ गुरुशिष्यांची गायनरीत ॥ मनमोहक अत्यद्भुत ॥ देशोदेशींचे जन बहुत ॥ येऊनि श्रवणार्थ बैसती ॥ २८ ॥ त्यांमाजी कुशस्थलीग्रामस्थ ॥ पन्नास ब्राह्मण संशितव्रत ॥ श्रीहरिकीर्तनश्रवणार्थ ॥ कदाचित तेथ पातले ॥ २९ ॥ ते सर्वही हरिभक्त धन्य ॥ गायनविद्यार्थतत्वज्ञ ॥ ह्मणोनि तयां तें गायन मान्य ॥ होऊनि धन्यत्व वाटलें ॥ ३० ॥ मग ते कौशिकाचीं समस्त ॥ कार्ये करित शिष्यवत ॥ तयाचें तें गायन ऐकत ॥ तेथेंच वसते जाहले ॥ ३१ ॥

टी. १ गायनकळेमध्यें प्रवीण. २ विष्णूच्या पादकमळीं तत्पर असा भ्रमरच. ३ ज्ञान व विद्या यांमध्यें निपुण. ४ तो (पूर्वी सांगितलेला.) ५ शिष्यांच्या येण्यानें. ६ पतिव्रता. ७ स्त्री. ८ गाईच्या शेणानें. ९ नवरा व बायको. १० कुशस्थली (द्वारका) गांवीं राहणारे. ११ तीक्ष्ण आहे व्रत ज्यांचें (कडकडीत व्रतवाले) १२ गायनविद्येचें अर्थासहित सकळ तत्व जाणणारे.

पुढें त्या गायनाची ख्याती ॥ जनमुखें पसरली जगतीं ॥ ती ऐकोनि कालिंग नृपती ॥ कदाचित तेथें पातला ॥ ३२ ॥ ऐकिलें कौशिकाचें गायन ॥ मनालागीं आवडलें पूर्ण ॥ परी तो राव दुष्ट दारुण ॥ बोलला वचन ऐक तें ॥३३॥ कौशिका तूं शिष्यांसहित ॥ आजि मम गुण गाईं येथ ॥ आणि कुशस्थलवासी हो समस्त॥तुह्मी यथार्थ ऐका ते ॥ ३४ ॥ तें ऐकोनियां कौशिक ॥ ह्मणे राया त्वां कथिलें ठीक॥ परी ह्या मम जिव्हाग्रीं देख ॥ वाणी न वसते सर्वदा ॥ ३५ ॥ ती माझिये स्वाधीन नाहीं ॥ आणि तुजला फार सांगूं कायी ॥ श्रीहरिविणें इंद्रासिही ॥ स्तवित नाहीं कदा ती ॥ ३६ ॥ ह्मणोनि मी तुजलागुन॥ स्तवावया अशक्य जाण ॥ एवंरीती कौशिक ब्राह्मण ॥ सुयुक्त वचन बोलला ॥ ३७ ॥ आणि वसिष्ठ, गौतम, सारस्वत ॥ आरुणि, तैसाचि वैश्यसुत ॥ चित्रमाल, शिशु, हे सात ॥ कौशिकाचे शिष्य जे ॥ ३८ ॥ तयींही कौशिकाप्रमाणें ॥ कथियेलें राया कारणें ॥ तदनंतर कुशस्थलिजनें ॥ उत्तर दीधलें ऐसें कीं ॥ ३९ ॥ अगा राजेंद्रा ऐकें वचन ॥ आह्मां सकळांचे हे कर्ण ॥ श्रीहरीवांचून अन्याचे गुण ॥ कदापि न ऐकतीच ॥ ४० ॥ ह्मणोनि तवं कीर्ति कीं स्तुती ॥ आह्मी न ऐकों जाण निश्चिती ॥ तें ऐकोनि कालिंगनृपती ॥ अत्यंत चित्तीं संतापला ॥ ४१ ॥ आणि स्वभृत्यांसि आज्ञापित ॥ अरे तुह्मी मिळोनि समस्त॥ माझे सकळ गुण येथ ॥ गावे त्वरित मम आज्ञें ॥ ४२ ॥ चढूंकडोनि तुह्मीं समस्तीं ॥ उच्चस्वरें गातां मम कीर्ती ॥ हे ब्राह्मण कैसे

टी. १ माझे. २ याप्रमाणें. ३ योग्य. ४ कुशस्थलीवासी ब्राह्मणांनीं. ५ तुझी. ६ आपल्या चाकरांस. *द्वारकेंत राहाणाऱ्यांनो.

न ऐकती ॥ हेंच मी निगुती पाहतों ॥ ४३ ॥ तें ऐकूनियां ते भृत्यगण ॥ गाऊं लागले रायाचे गुण ॥ तैं त्या विप्रीं आपुले कर्ण ॥ रोधिले स्वहस्तांगुलींनी ॥ ४४ ॥ तथापि तो गायनन्द ॥ कर्णांमाजी प्रवेशे विशद ॥ ह्मणोनि ते ब्राह्मण सखेद ॥ साहस करिते जाहले ॥ ४५ ॥ काष्ठशंकु घेऊनि तीक्ष्ण ॥ परस्परांचे भेदिले कर्ण ॥ राजभृत्यांचें गायन श्रवण ॥ न होय ऐसें पैं केलें ॥ ४६ ॥ तंव त्या रायाची मनोवृत्ती ॥ कौशिकादिमुखें आपुली कीर्ती ॥ बलात्कारेंकरूनि निरुती ॥ गावविणें ऐसी जाहली ॥ ४७ ॥ ती जाणूनि कौशिकादिक ॥ हळूच बोलती एकमेक ॥ अहो हा कालिंग नरनायक ॥ कितिक मूर्ख आहे पां ॥ ४८ ॥ आपुले गुण गाववावया ॥ निर्बंध करितो हा कासया ॥ आपण सर्वही ये समया ॥ साहस करूं या सत्वर ॥ ४९ ॥ ऐसें बोलूनियां सर्वांनीं ॥ स्वजिव्हाग्रें छेदिलीं तत्क्षणीं ॥ तें पाहतांचि तो भूप मनीं ॥ क्रोधसंतप्त जाहला ॥ ५० ॥ मग सर्वांचें सर्वस्व हरून ॥ तयां दवडिले स्वदेशांतून ॥ तैं ते बदरिकाश्रमीं जाऊन ॥ सुखें वसते जाहले ॥ ५१ ॥ पुढें ते कालधर्में पंचता ॥ पावोनि गेले यमनिकेता ॥ तैं तयां पाहूनि प्रेतनाथा ॥ महदाश्चर्य वाटलें ॥ ५२ ॥ आणि त्यांसि द्यावी काय गती ॥ ऐसा विचार करी स्वचित्तीं ॥ तंव ब्रह्मा सुरनाथादिकांप्रती ॥ आज्ञापिता जाहला ॥ ५३ ॥ अहो तुह्मी निर्जर सकळ ॥ जरी देवत्व स्थिर इच्छीत असाल ॥



टी. १ खरोखर. २ हाताच्या बोटांनीं. ३ स्पष्ट. ४ दुःखयुक्त. ५ लांकडाचे खुंटे. ६ राजाच्या सेवकांचें. ७ कौशिकाच्या व त्याचे शिष्यांच्या मुखानें. ८ खरोखर. ९ राजा. १० जबरदस्ती. ११ मृत्यु. १२ यमाच्या सदनीं. १३ यमास. १४ इंद्रादिकांप्रत. १५ देव.

तरी श्रीभगवान घननील ॥ वैकुंठपाळ आर्जवावा ॥ ५४ ॥ जे कौशिकादि द्विज समस्त ॥ भगवत्परायण अत्यंत ॥ गायनयोगेंकरूनि सतत ॥ श्रीहरीप्रत अर्चिती ॥ ५५ ॥ आणि पद्माक्ष मालव मालती ॥ तैसेच पन्नास विप्रयाती ॥ श्रीहरिगुणगायन प्रीतीं ॥ सतत ऐकत होते जे ॥ ५६ ॥ ते सांप्रत पंचता पावुनी ॥ गेले असती यमसदनीं ॥ तयांसि तुह्मीं यावें घेउनी ॥ कल्याण झणी होईल ॥ ५७ ॥ तें ऐकोनियां लोकपाळ ॥ हे कौशिक हे पद्माक्ष निर्मळ ॥ इत्यादि हाका मारीत सकळ ॥ पावले तत्काळ यमपुरीं ॥ ५८ ॥ आणि त्या कौशिकादिकांसी ॥ विमानीं घालूनि आदरेंसीं ॥ आकाशमार्गें ब्रह्मलोकासी ॥ परत घटिकेंत पातले॥५९॥तैं त्या कौशिकासि पाहून ॥ सामोरा झाला चतुरानन ॥ आणि यथान्यायें आदरून ॥ स्वांगतपूजन पैं केलें ॥६०॥ तैं तो स्वयंभूकृत आदर ॥ पाहतां हर्षूनि सर्व निर्जर ॥ स्वयेंही तयां स्तवीत अपार ॥ गौरव करिते जाहले ॥६१॥ तो महा कोलाहल वर्तला ॥ सत्यलोक सर्व गजबजला ॥ तैं विधीनें स्पष्ट मधुर बोला ॥ बोलूनि सर्वां निवारिलें ॥६२॥मग मुनिदेवांसह आपण ॥ कौशिकादिकां सर्वें घेऊन ॥ विष्णुलोकाप्रति तत्क्षण ॥ निघूनि जाता जाहला ॥ ६३ ॥ तो विष्णुलोक परम पावन ॥ सकळ शोभांचें आद्य स्थान ॥ कराया तयाचें वर्णन ॥ समर्थ कवण त्रैलोक्यीं ॥ ६४ ॥ तेथें आदिनारायण देव ॥ लक्ष्मीसह विलसे सदैव ॥ विलो-

टी. १ मेघाप्रमाणें आहे नीळवर्ण ज्याचा तो ( विष्णु ), २ भगवंताविषयीं तत्पर. ३ मृत्यु. ४ सत्वर, खचित. ५ ब्रह्मदेवानें केलेला. ६ देव. ७ ब्रह्मदेवानें. ८ बरोबर. ९ मुख्य, पहिलें. * यावें यावें असें जें सन्मानवचन तद्रूप पूजन.

कितां तयाचें वैभव ॥ ब्रह्मादि सर्व दीपावले ॥ ६५ ॥ श्रीविष्णुभक्तिपरायण* ॥ जे श्वेतद्वीप-
निवासी महान ॥ ज्ञानयोगैश्वर्यसंपन्न[1] ॥ देदीप्यमान निष्पाप ॥ ६६ ॥ जे नारायणसमान
दिव्य ॥ चतुर्बाहुधर[2] स्तव्य[3] ॥ विष्णुचिन्हीं संयुक्त भव्य ॥ अठ्यांशी सहस्र सिद्धगण ॥६७॥
ते सकळही जोडूनि कर ॥ सदा सेवेसि असती सादर ॥ नारदादिक देवर्षिवर[4] ॥ स्तविती नि-
रंतर सांक्षेपें[5] ॥ ६८ ॥ आणि सनकादिक योगिजन ॥ ध्यानसेवा करिती जाण ॥ तैसेचि अ-
स्मदादि[6] मुनिगण ॥ अद्भुत गुण वर्णिती ॥६९॥ आणि नानाविध भूतगणही[7] ॥ नाना कामें क-
रिती सदाही ॥ दिव्यस्त्रियांची[×] सेवाधाई[8] ॥ चहूंकडे चालली असे ॥ ७० ॥ मध्यें सहस्र-
द्वारसंयुक्त ॥ सहस्र योजनें सुविस्तृत ॥ शुद्ध विचित्र रत्नखचित ॥ विमान विलसे सांजिरें
॥ ७१ ॥ तयामाजी उंच भद्रासन[10] ॥ बहुशोभाढ्य देदीप्यमान ॥ ब्रह्मांडीं जया उपमेलागुन ॥
नसे अन्नें[11] कांहींच ॥ ७२ ॥ तये भद्रासनीं लक्ष्मीकांत ॥ जे लोक लोककार्यनियुक्त[12] ॥ ते
कैशीं कैशीं कार्यें करित ॥ तेंचि पाहत बैसलासे ॥ ७३ ॥ तैं त्या कौशिकादिकांसहित ॥
चतुरानन[13] पावला तेथ ॥ साष्टांगें नमूनि विष्णूप्रत ॥ पुढें स्तवित उभा ठेला[14] ॥ ७४ ॥ मग
भगवंतें पाहूनि त्यांप्रती ॥ हे कौशिका पद्माक्षा मालती ॥ इत्यादि हांका मारूनि प्रीतीं ॥

टी. १ ज्ञानसंपत्ति व योगसंपत्ति यांणीं युक्त. २ चतुर्भुज. ३ स्तुति करण्यास योग्य. ४ देवर्षीमध्यें श्रेष्ठ. ५ बुद्धिपुरःसर. ६ मी ( वाल्मीकि ) आदीकरून. ७ प्राणी. ८ सेवेविषयीं त्वरा. ९ सुंदर. १० सिंहासन. ११ अन्य. १२ लोकांचीं कामें करण्यास नेमलेले, १३ ब्रह्मदेव. १४ राहिला. * श्रीविष्णूच्या भक्तीविषयीं तत्पर असे. × देवांगनांची.

यथानुक्रमें सत्कारिलें ॥ ७५ ॥ तो सत्कार पाहतां विशेष ॥ आश्चर्य होऊनि सर्वांस ॥ जय-जयकाराचा महाघोष ॥ सर्वत्र पूर्ण पसरला ॥ ७६ ॥ मग भगवान् ह्मणे ब्रह्मयासी ॥ विरिंचा ऐकें मद्वचनासी ॥ जे कां ह्या कौशिकाच्या हितासी ॥ झटत होते सर्वदा ॥ ७७ ॥ आणि तत्कार्यसाधनीं तत्पर ॥ मत्कीर्तिश्रवणीं सादर ॥ गायनतत्वार्थवेत्ते चतुर ॥ अनन्यदेवता-भक्त जे ॥ ७८ ॥ ते हे कुशस्थलीवासी ब्राह्मण ॥ साध्यदेव होवोत जाण ॥ आणि ह्या कौ-शिकासि मत्सन्निधान ॥ देई स्थान सर्वदा ॥ ७९ ॥ ऐसें सांगूनि नारायण ॥ कौशिकाप्रति बोले वचन ॥ अगा भक्तवरा मी भगवान ॥ जये स्थानीं वसताहें ॥ ८० ॥ तेथेंचि तूं स्वशिष्यांस-हित ॥ दिग्बलनामें सर्वविख्यात ॥ गणाधिप होऊनि सतत ॥ वास करीं सुखरूप ॥ ८१ ॥ ऐसें सांगूनि दामोदर ॥ माळवासि ह्मणे गा तूं सादर ॥ मम लोकीं यथेष्ट सुंदर॥ दिव्यरूपधर होऊनियां ॥८२॥ आपुलिया अनुचरांसहित ॥ यथेष्ट मद्गुणगायन ऐकत ॥ अनंतयुगकाल-पर्यंत ॥ वसें सतत आनंदें ॥ ८३ ॥ ऐसें सांगूनि भगवान ॥ पद्माक्षासि ह्मणे गा तूं सुजाण ॥ सर्वदा मद्भक्तिसंपन्न ॥ दाता महान् होतास ॥ ८४ ॥ ह्मणोनि आतां धनद होईं ॥ माझिये

टीं. १ ब्रह्मदेवा. २ त्याचें ( कौशिकाचें ) काम करण्याविषयीं. ३ माझी कीर्ति श्रवण करण्याविषयीं. ४ गाण्याचें तत्व जाणणारे. ५ मजवांचून दुसऱ्या देवाची भक्ति न करणारे. ६ द्वारकावासी. ७ साध्यनांवाचे देव. ८ माझ्या जवळ. ९ भक्तांमध्यें श्रेष्ठा. १० दिग्बळ या नांवानें. ११ गणांचा राजा. १२ यथेच्छ. १३ माझ्या गुणांचें गायन. १४ शाहाणा. १५ कुबेर. * दिव्य ( सुंदर ) रूप धारण करणारा असा. × सेवकां सहवर्तमान. माझ्या भक्तीनें परिपूर्ण असा.

सन्निध सदा राहीं ॥ आणि सर्व धनाचा ईश्वर[1]रही ॥ होऊनि विहरें[2] सुखरूप ॥ ८५ ॥ एवं[3] सर्वांसि सांगून ॥ मग ब्रह्मयासि बोले वचन ॥ विधात्या हा कौशिक ब्राह्मण ॥ गणाधिप पूर्ण जाहला ॥ ८६ ॥ हा माझिये सलोकतेसी ॥ पावला असे पूर्वपुण्येंसीं ॥ आतां सर्वही गण आदरेंसीं ॥ सत्वर यासी स्तवितील ॥ ८७ ॥ आणि जे कां मद्भक्त विप्र ॥ महायशस्वी भक्तितत्पर ॥ मद्गुणगायन निरंतर ॥ ऐकत होते साक्षेपें ॥ ८८ ॥ आणि हरिकीर्तिविणें देख ॥ कदापि नच ऐकों आणिक ॥ ऐसें जयीं महाव्रत एक ॥ अलोलिक धरियेलें ॥ ८९ ॥ आणि या लागींच विरंच्यां ज्यांहीं ॥ कालिंगभृत्यांच्या गायनसमयीं ॥ आपुले कर्ण परस्परांहीं ॥ काष्ठशंकूंहीं भेदिले ॥ ९० ॥ ते हे कुशस्थलवासी ब्राह्मण ॥ उत्तम देवत्वा पावोन ॥ माझिये सान्निध्यालागून ॥ लाधले जाण साचार ॥ ९१ ॥ आणि हा मालव भार्येसहित ॥ हरिक्षेत्रीं राहूनि सतत ॥ दीपोज्ज्वलन[11]लेपनादि बहुत ॥ सेवा करित निर्धारें ॥ ९२ ॥ नित्य नियमें पूजा सारी ॥ सर्वदा वसे देवद्वारीं ॥ स्वयेंही मद्गुणगायन करी ॥ बाह्याभ्यंतरीं[12] निर्मल ॥ ९३ ॥ आणि मत्कीर्तियुक्त गायन ॥ सदा ऐकत होता ह्मणोन ॥ ह्यासि हा माझा सनातन[13] ॥ लोक संपूर्ण लाधला ॥ ९४ ॥ तैसाचि हा पद्माक्ष पाहीं ॥ महाधनाढ्य असूनिही ॥ समूळ गर्व टाकूनि स-

---

टी. १ स्वामी, धनी. २ क्रीडा कर. ३ याप्रमाणें. ४ हे ब्रह्मदेवा. ५ सलोकता नांवाच्या मुक्तीस ( वैकुंठलोकाप्रत ). ६ बुद्धिपुरःसर. ७ अमोलिक. ८ कालिंगराजाचे चाकरांच्या. ९ लांकडांचे खुंट्यांनीं. १० पावले. ११ दीप लावणें, व देऊळ सारविणें इत्यादि, १२ आंत ( मनांत. ) व बाहेर. १३ निरंतर असणारा. १४ मिळाला. × माझ्या गुणांचें गायन.

दाही ॥ ऐकत राही मम गुणां ॥ ९५ ॥ आणि कौशिकादि मम भक्तां ॥ सदा अन्न पुरवीत होता ॥ ह्मणोनि मत्संनिधानीं धनेशता ॥ यासि आतां लाधलीसे॥९६॥ ऐसें प्रजापतीसि सांगून ॥ उगाच राहिला भगवान ॥ परमानंदें सर्व जन ॥ तयासि पूजिते जाहले ॥ ९७ ॥ मग तो भक्त्यैकगम्य भगवान ॥ त्या निजभक्ताच्या अंगावरून ॥ स्वपाणिसरोरुह फिरवून ॥ समाधान करिता जाहला ॥ ९८ ॥ आणि तयां विलोकित प्रीतीं ॥ सुखें बैसला स्वासनावरुती ॥ सर्वकाळ भक्तजनही भोंवती ॥ परम प्रीतीं बैसले ॥ ९९ ॥ एवंप्रकारें वाल्मीकऋषीनें ॥ कथिलें भारद्वाजाकारणें ॥ आतां पूर्वाख्यानप्रसंगानें ॥ हरिमित्राख्यान वर्णिजेल ॥ १०० ॥ ती कथा परम अद्भुत ॥ गायनशास्त्रपरिपूरित ॥ आणि श्रोतृजनांलागीं त्वरित ॥ पवित्र कर्ती असे पां ॥ १०१ ॥ तरी सकळ श्रोतेजनीं ॥ श्रवणीं सावध असावें ह्मणोनी ॥ सीतात्मज मी हस्त जोडुनी ॥ रात्रंदिनीं प्रार्थिताहें॥ १०२॥ ॥स्वस्ति श्रीमदद्भुतरामविजय ॥ वाल्मीकीयाद्भुतोत्तरकांडहृदय ॥ ऐकोत सज्जन होऊनि तन्मय॥ षष्ठाध्याय मधुर हा॥१०३॥

॥ इति षष्ठाध्यायः समाप्तः ॥ छ ॥





टी. १ सर्वद्रव्याचा धनीपणा. २ मिळाली. ३ केवळभक्तीनेंच मिळणारा. ४ आपल्या भक्तांच्या. ५ आपलें करकमळ.

## अध्याय ७ वा












श्रीगणेशायनमः ॥ ॥ जयजय विभो विश्वंभरा[1] ॥ विरिंचिजनका[2] परात्परा[3] ॥ मदनांतकचित्त विहारा[4] ॥ परमोदारा[5] स्वामिया ॥ १ ॥ जय करुणानिधे[6] सच्चिद्घना[7] ॥ भक्तजनमायानिकृंतना[8] ॥ वेदांतवेद्या[9] निरंजना[10] ॥ मनमोहना परमात्मया ॥ २ ॥ तूं अजें[11] अव्ययें[12] पूर्णकामें[13] ॥ गुणत्रयातीत परब्रह्म ॥ परी पुरवावया भक्तकाम[14] ॥ दाशरथीराम झालासी ॥ ३ ॥ तुझ्या अद्भुत लीला अनंत ॥ तयां वर्णावया कोण समर्थ ॥ तूंच करितां कृपा समस्त ॥ मूढही यथार्थ वर्णितील ॥ ४ ॥ ऐसा तुझ्या कृपेचा महिमा ॥ ह्मणोनि वंदितों त्वत्पादपद्मा[15] ॥ तरी कृपा करूनि घनश्यामा ॥ पुढील आख्यान वर्णवीं ॥ ५ ॥ पूर्वाध्यायांतीं वैकुंठपती ॥ कौशिकादिकां घेऊनि भोंवती ॥ सुखें बैसला स्वासनावरुती ॥ ऐशी कथा जाहली ॥ ६ ॥ आतां कथानक अत्यंत अद्भुत ॥ श्रोतीं असावें सावधचित्त ॥ वाल्मीकमुनि श्रीरामभक्त ॥ भारद्वाजाप्रत सांगती ॥ ७ ॥ अगा शिष्योत्तमा तो जगजेठी[16] ॥ सुखें बैसला भद्रपीठीं[17] ॥ तैं त्या कौशिकाचिये प्रीतीसाठीं ॥ महोत्सव तेथें मांडिला ॥ ८ ॥ नानावाद्यविद्याकुशल ॥ विपंचीगुणतत्वज्ञ[18] निर्मळ ॥ अत्यंत मधुराक्षरपेशल[19] ॥ ऐसे विपुळ गायक जे ॥ ९ ॥ ते नानाविध राग रागिणी ॥

---

टी. १ विश्वाचें पोषण करणारा. २ ब्रह्मदेवाच्या पित्या. ३ परम श्रेष्ठा. ४ शंकराच्या चित्तांत क्रीडा करणारा. ५ पराकाष्ठेच्या उदारा. ६ दयासमुद्रा. ७ सत्य व ज्ञान यांणीं भरलेल्या. ८ भक्तांची समूळ माया तोडणारा. ९ वेदांतानें जाणण्यास योग्या. १० शुद्धा. ११ जन्मास न येणारा. १२ नाशरहित. १३ पूर्ण आहेत मनोरथ ज्याचे. १४ भक्तांचे मनोरथ. १५ तुझ्या पादकमळास. १६ जगामध्यें श्रेष्ठ. १७ सिंहासनावर. १८ वीणेच्या गुणांचें तत्त्व जाणणारे. १९ मधुर अक्षरें उच्चारण्याविषयीं निपुण.

आळवीत प्रवर्तले गायनीं ॥ वीणातालमृदंगादिध्वनी ॥ यथायोग्य चालले ॥ १० ॥ तैं वैकुंठलोक भरला ॥ विष्णुकांतेसि[1] वृत्तांत कळला ॥ मग चेटिकोटींचा[2] घेऊनि मेळा ॥ चालली कमळा[3] श्रवणार्थ ॥ ११ ॥ सहस्रकोटी वेत्रहस्त[4] ॥ वायुवेगें पुढें धांवत ॥ असंख्य दासीगण कीर्ति गात ॥ ऐसी सभेंत पातली ॥ १२ ॥ तंव ब्रह्मादिसुरांचा मेळा ॥ तेथें घनदाट होता बैसला ॥ तया पाहूनि चेटीगणांला[5] ॥ कोप पातला अत्यंत ॥ १३ ॥ परिघ भुशुंडी घेऊनि हातीं ॥ ब्रह्मादिसुरासि[6] निर्भत्सिती ॥ तैसेचि सर्वमुनिजनाप्रती ॥ दटाविती महारोषें ॥ १४ ॥ सर्वलोकांसि दूर करून ॥ सभेमाजी बैसले आपण ॥ चतुराननादि देवगण ॥ बाहेर निघून बोलती ॥ १५ ॥ अहो जो असंख्यब्रह्मांडनाथ ॥ तया पुढें आह्मी किं[7] पदार्थ ॥ ह्मणोनि यांनीं केलें हें येथ ॥ युक्तचि[8] असे सर्वही ॥ १६ ॥ ऐसें बोलूनि ते सुरगण ॥ अपमानजन्य[9] कोप टाकून ॥ सभेच्या बाहेर हस्त जोडून ॥ उभेचि संपूर्ण राहिले ॥ १७ ॥ तेव्हां हरीनें तुंबुरूसी ॥ गानार्थ पाचारिलें[10] सन्मानेंसीं ॥ ह्मणोनि तो बहु आनंदेंसीं ॥ वेगें सभेसी प्रवेशला ॥ १८ ॥ लक्ष्मीनारायणांच्या समीप ॥ नम्रतें बैसला सुखरूप ॥ आणि यथायोग्य कालानुरूप[11] ॥ गायन मधुर चालविलें ॥ १९ ॥ स्वहस्तेंचि वीणा वाजवित ॥ स्पष्ट मधुराक्षरसंयुक्त ॥ नानाविध आलाप घेत ॥ आळवी बहुत रागांसी ॥ २० ॥ आणि रागिणीही गाइल्या स्पष्ट ॥

टी. १ लक्ष्मीस. २ कोटिशः दासींचा. ३ लक्ष्मी. ४ हातांत काठ्या घेतलेले ( भालदार ). ५ दासींच्या समुदायास. ६ ब्रह्मदेवादिक. ७ काय. ८ योग्यच. ९ अपमान झाल्यामुळे आलेला. १० बलाविलें. ११ काळास ( वेळेस ) अनुसरून.

अहो तो हरीनें गायक श्रेष्ठ ॥ कौशिकविप्र व्हावया हृष्ट[1] ॥ गायनार्थ तेथें योजिला ॥ २१ ॥
चार घटिका झालें गायन ॥ कौशिक पावला समाधान ॥ तैं हरीनें तुंबुरु आदिकरून ॥
सर्वांलागुन सन्मानिलें ॥ २२ ॥ नानारत्नसमायुक्त ॥ दिव्याभरणें दीप्तिमंत ॥ हार तुरे वस्त्रें
अमित[2] ॥ यथायोग्य दीधलीं ॥२३॥ तैं ते सभास्थ सर्व जन ॥ स्वस्थाना निघाले तेथून ॥ तुं-
बुरु अत्यानंदेंकरून ॥ आपुल्या स्थाना पावला ॥ २४ ॥ आणि चतुर्मुखादि[3] निर्जर[4] ॥
तैसेचि सकळ मुनीश्वर ॥ विष्णूसि वंदूनि जयजयकार ॥ करीत जाते जाहले ॥ २५ ॥ तंव
भारद्वाजमुने तेथ ॥ एक वर्तलें अति अद्भुत ॥ नारदमुनि विरिंचिसुत[5] ॥ वैकुंठीं गेला होता
जो ॥ २६ ॥ तयानें तुंबुरूचा वहिला[6] ॥ हरिकृत[7] सन्मान देखिला ॥ तेणें तयाच्या हृदया-
ला ॥ संताप झाला अत्यंत ॥ २७ ॥ अत्यंत चिंता प्राप्त झाली ॥ नेत्रांमाजी लाली भरली ॥
महाशोकें अंगें सगळीं ॥ विकळ झालीं तत्काळ ॥ २८ ॥ लक्ष्मीच्या दासींनीं तिरस्कारिला ॥
तेणें तो आदींच होता कोपला ॥ त्यावरी तुंबुरूचा वहिला ॥ सन्मान देखिला अत्यंत ॥ २९ ॥
घृतें[8] शिंपावा जैसा अनळ[9] ॥ तैसाचि तो कोपूनि प्रबळ ॥ श्रीविष्णुकांतेसि तत्काळ ॥ शाप
बोलता जाहला ॥ ३० ॥ म्हणे ज्यापेक्षें विष्णुकांतेनें[10][11] ॥ धरूनि राक्षसभावाकारणें[12] ॥ दासी
हस्तीं वेत्राघातानें[13] ॥ ताडूनि मज वारिलें[14] ॥ ३१ ॥ त्यापेक्षें ही लक्ष्मी केवळ ॥ राक्षसीगर्भी

---

टी. १ संतुष्ट. २ असंख्य. ३ ब्रह्मदेवादिक. ४ देव. ५ ब्रह्मदेवाचा पुत्र. ६ तो ( पूर्वीं सांगितलेला. ) ७ विष्णूनें केलेला.
८ तुपानें. ९ अग्नि. १० लक्ष्मीस. ११ लक्ष्मीचें. १२ राक्षसाप्रमाणें दुष्टस्वभावातें १३ काठ्यामारून. १४ निवारिलें (सभेंतून बाहेर लोटलें).

संभवेल ॥ हे मम निःसीम शापबोल ॥ न होतील फोल कदापी ॥ ३२ ॥ आणि चेटिंद्वारें
इयेनें फार ॥ हेळणा करूनियां क्रूर ॥ सभेंतूनि मज बाहेर ॥ लोटूनि दूर घालविलें ॥ ३३ ॥
म्हणोनि माता राक्षसी ॥ बहु हेळणा करूनि इयेसी ॥ गर्भीतूनि काढूनि त्वरेंसीं ॥ भूमीत
लासी टाकील ॥ ३४ ॥ ऐसा नारदें बोलतां शाप ॥ त्रैलोक्यमंडळ झालें सकंप ॥ सुरासुर-
गंधर्वी अमूप ॥ हाहाकार मांडिला ॥ ३५ ॥ मग तो नारद ब्रह्मसुत ॥ दुःखें नाना विलाप
करित ॥ ह्मणे ह्या ब्रह्मांडमंडपांत ॥ धिक्कार असो मजलागीं ॥ ३६ ॥ अहो आजि येथें नि-
रवकाश ॥ महालक्ष्मीसमीप विशेष ॥ नारायणाचा सहवास ॥ तुंबरूस लाधला ॥ ३७ ॥
आणि मजला तों चेटीगणांनीं ॥ हरिसमक्ष वेत्रें ताडुनी ॥ तिरस्कारपूर्वक सभेंतूनी ॥
दूर लोटूनी दवडिलें ॥ ३८ ॥ तस्मात् मी असोनि जिवंत ॥ कोठें जावें ह्या जगांत ॥ तुं-
बुरूनें मजहूनि सुकृत ॥ काय केलें न कळेची ॥ ३९ ॥ मी अत्यंत निकृष्ट पामर ॥ लघू-
हूनिही लघुतर ॥ मम जीवितें व्यर्थ साचार ॥ ह्मणोनि धिक्कार मजलागीं ॥ ४० ॥ ऐशे
रीतीं तो ब्रह्मनंदन ॥ वारंवार करीत रुदन ॥ आतां म्यां काय कीजे ह्मणोन ॥ विचारीं जाण
पडियेला ॥४१॥ तों श्रीभगवान् आदि नारायण ॥ देवर्षीनें शाप दारुण ॥ लक्ष्मीसि दीधला
तो ऐकून ॥ अत्यंत खिन्न जाहला ॥ ४२ ॥ मग सर्वे घेऊनियां रमेसी ॥ वेगें उठिन्नला हृ-

टी. १ उपजेल. २ व्यर्थ. ३ दासींकडून. ४ पुष्कळ. ५ अत्यंत. ६ मिळाला. ७ काठीनें. ८ पुण्य. ९ तुच्छ (कमी)
१० अति हलका. ११ वांचणें. १२ खरोखर. १३ नारदानें. १४ लक्ष्मीस. * ब्रह्मदेवाचा पुत्र (नारदऋषी).

षीकेशी ॥ जेथें होता नारदऋषी ॥ तये स्थानासी पातला ॥ ४३ ॥ लक्ष्मीनें धरिले दृढ चरण ॥ नारद झाला सुप्रसन्न ॥ मग ती कमळा हस्तजोडून ॥ बोले वचन सादर ॥ ४४ ॥ अहो देवर्षिवर्या आपण ॥ जें मज दीधलें शापदान ॥ तेंतों तैसेंचि येईल घडोन ॥ अन्यथा कदा न होईल ॥ ४५ ॥ परी तयामाजी मी किंचित ॥ प्रार्थितें आहें तुम्हाप्रत ॥ दयाळीं कृपा करोनि यथार्थ ॥ मन्मनोरथ पुरविजे ॥ ४६ ॥ अरण्यवासी जे मुनिजन ॥ तयांचें स्वल्पस्वल्प रक्त काढून ॥ कलशामाजी साठवून ॥ ठेविलेलें असेल जें ॥ ४७ ॥ तयालागीं जी राक्षसी ॥ भक्षील पैं सांक्षोपेंसीं ॥ तियेच्या उदरीं त्या रक्तेंसीं ॥ व्हावा मजसी उद्भव ॥ ४८ ॥ हीच माझी मनकामना ॥ दयाळीं कीजे परिपूर्णा ॥ भारद्वाजा लक्ष्मीनें यांचना ॥ ऐसी कां केली म्हणशील ॥ ४९ ॥ तरी तियेचा ऐसा भाव ॥ मी जें याचिलें हें सर्व ॥ अचिंत्यासंभव आहे यास्तव ॥ शापही वाव होईल येणें ॥ ५० ॥ म्हणोनि तियेनें मधुर बोलें ॥ नारदालागीं ऐसें याचिलें ॥ तें ऐकूनि तयासि आंगळें ॥ आश्चर्य झालें साचार ॥ ५१ ॥ आणि इयेचें सर्वही दारुण ॥ ऐसें तो अंतरीं मानून ॥ तियेलागीं बहुबरें म्हणून ॥ उत्तर देता जाहला ॥ ५२ ॥ मग विष्णु म्हणे नारदा ऐक ॥ मी तों प्रसन्न व्हावया देख ॥ दान तप यज्ञ तीर्थादिक ॥ उपाय अनेक असती पैं ॥ ५३ ॥ परी मम नामसंकीर्तनेंसीं ॥ जैसा मी तोषतों हृषीकेशी ॥ तैसा आणिक्या सत्कर्मेंसीं ॥ नव्हें सायासीं प्रसन्न ॥५४॥ मन्नामगुणांच्या गायनेंकरून ॥ मम सायु-

टी. १ लक्ष्मी २ माझा मनोरथ. ३ बुद्धिपुरःसर. ४ उत्पत्ति. ५ मागणें. ६ अधिक. ७ घोर. ८ दुसऱ्या. ९ सायुज्यनामक मुक्ति.

ज्य लाभतें पूर्ण ॥ याविषयीं हा कौशिक ब्राह्मण ॥ पाहें प्रमाण प्रत्यक्ष ॥ ५५ ॥ याणें गायन केलें ह्मणून ॥ हा मम लोक पावला जाण ॥ मूर्छनादियुक्त मन्नामगायन ॥ बहु प्रिय मजलागीं ॥ ५६ ॥ तुंबुरु माझीं नामें सतत ॥ मूर्छनादियुक्त असे गात ॥ ह्मणोनि तुजहूनिही तो अत्यंत ॥ प्रिय मजला जाहला ॥ ५७ ॥ जरी मूर्छनातालयोगेंसीं ॥ मम नामें सर्वदा गासी ॥ तरी तुंबुरूपरीच मजसी ॥ तूंही होसी प्रीतिपात्र ॥ ५८ ॥ आतां तें गायन व्हावें प्राप्त ॥ ऐसें तूं इच्छिसी अंतरांत ॥ तरी मानसोत्तर नामें पर्वत ॥ जगविख्यात आहे जो ॥ ५९ ॥ तयावरी गानबंधुनामक ॥ वसत आहे एक उलूक ॥ जो गानविद्येमाजी अधिक ॥ निपुण विख्यात ब्रह्मांडीं ॥ ६० ॥ ह्मणोनि शीघ्र त्या शैलीं जाईं ॥ गानबंधूलागीं पाहीं ॥ तयाच्या कृपें तूं लवलाहीं ॥ होशील गवई निश्चयें ॥ ६१ ॥ तें ऐकूनियां विरिंचिसुत ॥ होऊनियां अति विस्मित ॥ मानसोत्तरशैलीं त्वरित ॥ उलूकगृहा पावला ॥ ६२ ॥ तों तेथें तो उलूकप्रवर ॥ बैसला असे परिकर ॥ अप्सरा यक्ष गंधर्व किंन्नर ॥ भोंवती अपार बैसले ॥ ६३ ॥ तैसेचि गानशिक्षाशिक्षित ॥ शिष्य सन्निध बैसले अमित ॥ जे स्निग्धमधुरस्वरवंत ॥ मुदान्वित सर्वदा ॥ ६४ ॥ असो ऐसा तो असे बैसला ॥ तंव तेथें नारद पावला ॥ गानबंधु पाहूनि तयाला ॥ सुंमुख झाला तत्काळ ॥ ६५ ॥ साष्टांग नमन केलें आर्धीं ॥ मग



टी. १ आलापादियुक्त. २ आलाप व ताल यांणीं युक्त. ३ घुबड. ४ पर्वतावर. ५ सत्वर. ६ ब्रह्मदेवाचा पुत्र ( नारद ) ७ घुबडांमध्यें श्रेष्ठ. ८ सुशोभित. ९ गायनशिक्षेनें शिकविलेले. १० अगणित. ११ कोमळ मधुरस्वरवाले. १२ हर्षयुक्त.

यथान्याय स्वागतादी ॥ पूजूनियां यथाविधी ॥ बंद्धांजुळी विनवित ॥ ६६ ॥ अहो नारदा देवर्षिवर्या ॥ महाद्युते[2] विरंचितनया ॥ अंतरीं काय योजूनियां ॥ आजि ये ठाया आलेती ॥ ६७ ॥ काय आहे आपुलें कार्य ॥ तें मज सांगा होऊनि सदय[3] ॥ न धरितां अंतरीं संशय ॥ करीन निश्चय जाणिजे ॥ ६८ ॥ तें ऐकूनियां प्रजापतिसुत[4] ॥ गानबंधूसि उत्तर देत॥ घूकेंद्रा मम अद्भुत वृत्त ॥ सांगतों समस्त ऐकिजे ॥६९॥ ब्रह्मदेव शिव सुरेंद्रादि देव ॥ आणि अस्मदादिक मुनिदेव ॥ कौशिकादिभक्तां पोचविण्यास्तव ॥ वैकुंठीं सर्व पावलों ॥ ७० ॥ विष्णुसन्निध पोंचवूनि त्यांसी ॥ आम्ही सर्व बैसलों सभेसी ॥ नारायणें बहु आनंदेंसीं ॥ प्रथम सर्वांसी सत्कारिलें ॥ ७१ ॥ पुढें कौशिकाचे प्रीतीस्तव ॥ तेथें मांडिला गायनोत्सव॥ गायनतत्वज्ञ गायक सर्व ॥ गाऊं लागले सुस्वर प्रां ॥ ७२ ॥ तें गायन ऐकण्यासाठीं ॥ कमळा[6] पातली उठाँउठीं ॥ सवें[7] चेटिगणाच्या[8] कोटी ॥ जाहली दाटी अत्यंत ॥ ७३ ॥ तैं ब्रह्मदेवादिदेव वाहिले[9] ॥ दासीगणीं तिरस्कारिले ॥ सभे बाहेर जाऊनि सगळे ॥ उभे राहिले तटस्थ ॥ ७४ ॥ मीतों हरीच्या संनिधानीं ॥ तद्दृष्टिसंमुख[11] बैसलों असोनीं ॥ चेटीगणें[12] मज तिरस्कारुनी ॥ दूर तथोनी दवडिलें ॥ ७५ ॥ आणि तुंबुरूसितों मानपूर्वक ॥ सन्निध पाचारूनियां देख ॥ लक्ष्मीसह वैकुंठनायक ॥ तद्गान[13] ऐकता जाहला ॥ ७६ ॥ ऐसा तुंबुरूसि मिळाला मान ॥ या-

---

टी. १ हातजोडून. २ महातेजस्व्या. ३ दयायुक्त. ४ ब्रह्मदेवाचा पुत्र ( नारद ). ५ घुबडश्रेष्ठा. ६ लक्ष्मी. ७ सत्वर. ८ बरोबर. ९ दासींच्या १० ते (पूर्वीं सांगितलेले.) ११त्याच्या ( विष्णूच्या ) दृष्टीसमोर. १२ दासींनीं. १३ तूंबुरूचें गायन.

चें ह्मणशील काय कारण ॥ तरी तो गायनामाजी प्रवीण ॥ असे जाण अत्यंतची ॥ ७७ ॥
तैसेंचि दुजें सांगतों ऐक ॥ मुनिजन आणि ब्रह्मदेवादिक ॥ तिरस्कार पावोनि सकळिक ॥
स्थानभ्रष्ट जाहलों ॥ ७८ ॥ परी जे कौशिकादिक सतत ॥ गानयोगें हरीसि आराधित ॥ ते
गणाधिपत्व पावोनि समस्त ॥ हरिसन्निध राहिले ॥ ७९ ॥ कवणेंही नाहीं तिरस्कारिले ॥ सु-
खरूप तेथेंचि बैसले ॥ ऐसें गायनयोगाचें सगळें ॥ माहात्म्य पाहिलें प्रत्यक्ष ॥ ८० ॥ तेणें मी
जाहलों अति दुःखित ॥ पाहीं कीं यज्ञ दान तपो व्रत ॥ श्रवण अध्ययनादिक बहुत ॥ जें जें
यथार्थ म्यां केलें ॥ ८१ ॥ तें गायनाच्या षोडशांशाशीं ॥ योग्य नव्हेचि निश्चयेंसीं ॥ आणि
हरिकीर्त्तियुक्त गायनासी ॥ त्याहूनि विशेषीं योग्यतासे ॥ ८२ ॥ हा तों प्रत्यक्ष अनुभव
आला ॥ ह्मणोनि मजला खेद झाला ॥ तो पाहूनि घनसावळा[1] ॥ कथिता झाला मजलागीं ॥ ८३ ॥
देवर्षिवर्या[2] गानविद्येसी ॥ अंतरामाजी इच्छित असशी ॥ तरी गानबंधु[3]घूकापाशीं ॥ जाई त्वरेंसीं
साक्षेपें ॥ ८४ ॥ तो गायनतत्वज्ञ धर्मशील ॥ परोपकारी परम दयाळ ॥ तुज गायनविद्याकु-
शळ ॥ करील तात्काळ निश्चयें ॥ ८५ ॥ ऐसें सांगूनियां वननीळें ॥ तुह्मापाशीं मज प्रेर्षिलें[4] ॥
ह्मणोनि तयाच्या कृपाबळें ॥ येणें घडलें आजि येथें ॥ ८६ ॥ आतां मी पुढें काय करूं ॥ तो
मज सांगिजे निर्धारू[5] ॥ मी तंव शिष्य तुह्मी गुरू ॥ मम स्वीकारू कीजिये ॥ ८७ ॥ मग तो
धर्मात्मा गानबंधू ॥ नारदासि ह्मणे गा ज्ञानसिंधू ॥ आजि उदेला मद्भाग्यविधू[6] ॥ ह्मणोनि

टी. १ घनश्याम (विष्णु). २ देवर्षीमध्यें श्रेष्ठा (नारदा). ३ गानबंधुनामकघुबडाजवळ. ४ पाठविलें. ५ निश्चय ६ माझाभाग्यरूपचंद्र.

संबंधू घडला हा ॥ ८८ ॥ तरी माझा पूर्ववृत्तांत ॥ सांगतों ऐकें परमाद्भुत ॥ जयाच्या श्रवणमात्रें समस्त ॥ पापपर्वत लोपती ॥ ८९ ॥ पूर्वी भुवनेशनामें प्रसिद्ध एक ॥ राजा होता परम धार्मिक ॥ तेणें अश्वमेधांचीं विधिपूर्वक ॥ सहस्रें अनेक संपादिलीं ॥ ९० ॥ आणि वाजपेय केले अयुत[1] ॥ अन्य यज्ञही सारिले अमित ॥ जयांमाजी दक्षणा बहुत ॥ ब्राह्मणांप्रत अर्पिली ॥ ९१ ॥ कोट्यर्बुद[2] गोप्रदानें ॥ दीधलीं सुपात्रविप्रांकारणें ॥ असंख्य गज रथ वाजि[3] वसनें[4] ॥ यथाविधीनें अर्पिलीं ॥ ९२ ॥ कन्याप्रदानें कोट्यावधी ॥ सत्पात्रां दीधलीं यथाविधी ॥ आप्तजन सुहृत् संबंधी ॥ नानाविधीं तोषविले ॥ ९३ ॥ ऐसें धर्माचरण करूनी ॥ पाळिता झाला सर्व मेदिनी ॥ आणि आपुल्या राज्यीं सर्वांलागुनी ॥ गायनकर्मार्थ निवारिलें ॥ ९४ ॥ श्रीहरीसि किंवा इतरांसी ॥ कोणी गाईल गानयोगेंसीं ॥ तरी मी अति क्रूरपणें त्यांसी ॥ मारीन जीवेंसीं निश्चयें ॥ ९५ ॥ सर्वात्मभावें ब्राह्मणांनीं ॥ वेदींच स्तवावा चक्रपाणी[5] ॥ ह्मणोनि वेदाधिकारिविप्रांनीं ॥ अन्य गीतें गाऊं नये ॥ ९६ ॥ केवळ सर्व स्त्रीजनीं[6] मात्र ॥ मातेंचि गावें सर्वत्र ॥ आणि सूतमागधसंघ[7] विचित्र ॥ गाऊत सदा मजलागीं ॥ ९७ ॥ परी इतरीं इतरांलागुनी ॥ नच गावें कदापि कोणी ॥ ऐसें तो भुवनेश आज्ञापुनी ॥ राज्यालागुनी पाळीतसे ॥ ९८ ॥ पुढें तया रायाच्या नगरासन्निध ॥ विष्णुभक्त निर्द्वंद्व विशुद्ध ॥ हरिमित्रनामें प्रसिद्ध ॥ ब्राह्मण एक वसत होता ॥ ९९ ॥ तयाची भगवद्भक्ति

टी. १ दहा हजार. २ असंख्य. ३ घोडे. ४ वस्त्रें. ५ हातांत चक्र धरणारा (विष्णु). ६ स्त्रियांनीं. ७ स्तुतिपाठक भाट वगैरे.

मोठी ॥ तो जाऊनि नदीच्या वाळुवंटीं ॥ श्रीहरीची प्रतिमा गोमटी ॥ स्थापूनियां साक्षेपें ॥ १०० ॥ यथाशास्त्र केलें पूजन ॥ दध्यांदियुक्त बहुमिष्टान्न ॥ आणि पायसही निवेदून ॥ धूपदीप समर्पिले ॥ १०१ ॥ तांबूल दक्षणा दीधली ॥ महानीराजनाही केली ॥ तैसाचि सुंदर पुष्पांजळी ॥ समर्पिता जाहला ॥ १०२ ॥ मग यथान्याय नमस्कार ॥ करूनियां बैसला समोर ॥ तालवीणालयान्वित सुस्वर ॥ गायन मधुर आरंभिलें ॥ १०३ ॥ अतिप्रेमभरें श्रीहरिचरणीं ॥ तन मन धन समर्पूनी ॥ तल्लीनपणें तद्गुणांलागुनी ॥ प्रेमें गाऊं लागला ॥ १०४ ॥ तों भुवनेशरायाचे दूत ॥ राजाज्ञें पातले तेथ ॥ हरिमित्राचें पूजनादि समस्त ॥ चहूंकडे उडविलें ॥ १०५ ॥ आणि वेगें तयासि घेऊन ॥ रायापाशीं गेले तत्क्षण ॥ अर्चन गायनादि संपूर्ण ॥ तद्वर्तमान कथियेलें ॥ १०६ ॥ तें ऐकतां भुवनेश राणा ॥ अत्यंताचि झाला दुर्मना ॥ मग त्या हरिमित्रब्राह्मणा ॥ भर्त्सिलें नानादुर्वचनीं ॥ १०७ ॥ आणि धनादि सर्वस्व हरून ॥ दवडूनि लाविला स्वराज्यांतून ॥ आप्तसुहृन्मित्रादि कवण ॥ भेटूं नाहींच दीधले ॥ १०८ ॥ ऐशी शिक्षा केली घोर ॥ हरिमित्र पावला देशांतर ॥ विप्र देहांतशिक्षार्ह क्रूर ॥ अपराध केला यद्यपी ॥१०९॥ तरी तयाचा प्रत्यक्ष वध ॥ कदा न कीजे हें श्रुतिसिद्ध ॥ मानखंडन कीजे विविध ॥ हाचि वध ब्राह्मणाचा ॥ ११० ॥ ऐसें शास्त्र आहे ह्मणोनी ॥ भुवनेशें हरिमित्रालागुनी ॥ भर्त्सनापूर्वक सर्वस्व हरूनी ॥ स्वराज्यांतूनी दवडिलें ॥ १११ ॥

टी. १ दहीं दूध इत्यादिकांनीं युक्त. २ क्षीरही. ३ आर्ति. ४ देह. ५ त्याच्या (हरीचे) गुणांला. ६ दुःखित. ७ देहांतशिक्षेला योग्य.

आणि स्वयें जाऊनि नदीतीरा ॥ हरीची प्रतिमा पाहे सुंदरा ॥ परी ती तया राजेश्वरा ॥ यदृच्छें नाहीं दिसलीच ॥ ११२ ॥ पुढें लोटतां बहुत काळ ॥ पंचत्व पावोनि तो नृपाळ ॥ लोकांतरीं अति अमंगळ ॥ उलूक विशाळ जाहला ॥ ११३ ॥ तो सदा सर्वत्र फिरत ॥ परी भक्षार्थ न मिळे किंचित ॥ क्षुधानळें चरफडत ॥ सदा खिन्न अंतरीं ॥ ११४ ॥ ऐसे लोटतां कित्येक दिन ॥ यमधर्माचें झालें दर्शन ॥ तेव्हां तयाचे वंदूनि चरण ॥ दीनवचनें विनवित ॥ ११५ ॥ अहो कृपानिधे यमधर्मा ॥ मीतों राजा भुवनेशनामा ॥ यज्ञयागव्रतदानधर्मा ॥ अनेक सत्कर्मा आचरलों ॥ ११६ ॥ तरीही ऐशी मज दुर्गती ॥ कां लाधली सांगें निश्चिती ॥ क्षुधानल प्रदीप्त अती ॥ दिवसरातीं पीडिताहे ॥ ११७ ॥ कोठें मिळेल भक्ष्य पदार्थ ॥ ह्मणोनि सदा असतों फिरत ॥ परी माझें दैव अद्भुत ॥ न मिळे किंचित कांहींही ॥ ११८ ॥ तरी म्यां ऐसा पापाचारू ॥ कोणता केला गा दंडधरू ॥ आणि पुढें आतां काय करूं ॥ तो मज विचारू सांगिजे ॥११९॥ मग तो धर्माधर्मप्रदर्शक ॥ यमधर्म ह्मणे गा सांगतों ऐक ॥ तुवां अज्ञानयोगें एक ॥ महापातक संपादिलें ॥ १२० ॥ अरे जो वासुदेवपरायण ॥ हरिमित्रनामा सद्ब्राह्मण ॥ तयाविषयीं अति दारुण ॥ कर्माचरण केलेंसी ॥ १२१ ॥ तयें केलेली श्रीहरिपूजा ॥ तुवां विध्वंसिली गा राजा ॥ तेणें पापें ह्या जन्मीं तुझा ॥ क्षुद्बोध सहजां वाढलासे ॥ १२२ ॥ तूंतों पूर्वीं दानयज्ञादिक ॥ स-

टी. १ सहज. २ घुबड. ३ भुकेच्या आगीनें. ४ हस्तांत कालदंड धरणाऱ्या यमा. ५ धर्म व अधर्म दाखविणारा. ६ क्षुधा.

त्कर्मै केलीस अनेक ॥ परी ह्या पापें तीं सकळिक ॥ नष्टलीं तत्काळ जाणिजे ॥ १२३ ॥ अरे हरिमित्रविप्र हरिभक्त ॥ परमस्नेहें श्रीहरीप्रत ॥ गीतनाट्यताललययुक्त ॥ गात होता सर्वदा ॥ १२४ ॥ ह्मणोनि तयातें निग्रहून ॥ धनादिक सर्वस्व हरून ॥ भर्त्सनापूर्वक स्वराज्यांतून ॥ तुवां दवडून लाविलें ॥ १२५ ॥ आणि त्या विप्रें हरिसन्निध ॥ उपहारादि ठेविले विविध ॥ ते तव दूतीं त्वदाज्ञें विशद ॥ हरूनि अगाध पाप केलें ॥ १२६ ॥ वस्तुतः पाहतां ब्राह्मणांहीं ॥ हरिकीर्तिविना अन्य कांहीं ॥ गानयोगें करूनि कदाही ॥ कवणेही ठायीं गाऊं नये ॥ १२७ ॥ ऐसें असोनि त्वां भुवनेशा ॥ विप्रीं वेदमंत्रांविणें रमेशा ॥ गानयोगें न गावें ऐसा ॥ घोर निर्बंध केला जो ॥ १२८ ॥ हें महापापचि आचरलास ॥ ह्मणोनि स्वर्गासि मुकलास ॥ तरी आतां गिरिकोटरास ॥ जाऊनि वास करीं तेथें ॥ १२९ ॥ तुझें पूर्वोत्सृष्ट राजशरीर ॥ भक्षार्थ मिळेल त्या गिरीवर ॥ तयासि तोडूनि निरंतर ॥ क्षुधाशांत्यर्थ भक्षिजे ॥ १३० ॥ तेंही कदाचित् होतां क्षीण ॥ अत्यंत क्षुधातुर होऊन ॥ ह्या आपुल्या घूकदेहालागुन ॥ नित्य तोडून भक्षीं तूं ॥ १३१ ॥ ही महानरकयातना घोर ॥ ह्या समग्र मन्वंतरवर ॥ तुज होणारचि निरंतर ॥ हातों निर्धार असे पां ॥ १३२ ॥ आणि मन्वंतर संपल्यावरी ॥ श्वान होशील भूमीवरी ॥ पुढें कित्येक वर्षांतरीं ॥ मनुष्यजन्म पावशील ॥ १३३ ॥ ऐसें सांगूनि



---

टी. १ गीत नाचणें ताल सुराची लय इत्यादिकांनीं युक्त. २ बांधून. ३ फलाहारादिक. ४ शुद्ध. ५ अपार. ६ विष्णूला. ७ पर्वताच्या कपाटांत. ८ पूर्वीचें टांकलेलें. ९ घुबडाच्या देहाला. १० निश्चय. ११ कुत्रा. * तुझ्या आज्ञेनें.

वैवस्वत ॥ तत्काळ तेथेंचि झाला गुप्त ॥ नारदा भुवनेशनामें ख्यात ॥ जो नरनाथ पूर्वींचा ॥ १३४ ॥ तोच हा मी त्या कर्मदोषाचेनी ॥ सांप्रत पावलों उलूकयोनी ॥ पुढें यमाच्या आज्ञेंकरूनी ॥ ह्या मानस शैलीं वसिन्नलों ॥ १३५ ॥ तों पूर्वजन्मींचें माझें मडें ॥ भक्षार्थ लाभलें मजपुढें ॥ तयास क्षुधातुरपणें रोकडें ॥ खावया उद्युक्त जाहलों ॥ १३६ ॥ तें मम दैवयोगेंकरून ॥ महायशा हरिमित्र ब्राह्मण ॥ विमानामाजी बैसोन ॥ तये मार्गें पातला ॥ १३७ ॥ तो दिव्य तेजस्वी हरिभक्त ॥ भोंवती असती विष्णुदूत ॥ अप्सरा गणगंधर्व बहुत ॥ गात स्तवित आनंदें ॥ १३८ ॥ तों तयाची दृष्टि त्या मार्गांत ॥ मजकडे पोंचली अवचित ॥ आणि भुवनेशरायाचें तें प्रेत ॥ मम संनिध पाहिलें ॥ १३९ ॥ तैं तो दयापरिपूर्ण होउनी ॥ तये प्रेतासन्निध येउनी ॥ यथायोग्य विनीतवचनीं ॥ मज प्रश्निता जाहला ॥ १४० ॥ अरे उलूका हें प्रेत मातें ॥ भुवनेशरायाचें ऐसें दिसतें ॥ तरी तूं यासि भक्षावयातें ॥ कां कोण उद्युक्त झालास ॥१४१॥ तें ऐकूनि त्या हरिमित्रासी ॥ मी अत्यंत खिन्न होऊनि मानसीं ॥ बहुविनयें साष्टांगेंसीं ॥ प्रणाम केला साचार ॥ १४२ ॥ आणि जोडूनियां उभय कर ॥ बहुसंमानपुरःसर ॥ आपुला पूर्ववृत्तांत समग्र ॥ सांगूनि ऐसें बोलिलों ॥१४३॥ हे विप्रवर्या पूर्वजन्माठायीं ॥ जो अपराध केला तुजविषयीं ॥ तयाचेंचि फल हें ये समयीं ॥ उपस्थित झालें असे ॥ १४४ ॥ आतां मन्वंतर होय पूर्ण ॥ तोंवरी हें शव नित्य खाईन ॥ तदनं-

टी. १ यम. २ राजा. ३ घुबडाची योनी. ४ विशेष नीतियुक्त वचनांनीं. ५ घुबडा. ६ नमस्कार. ७ प्राप्त. ८ प्रेत.

तर श्वान होऊन ॥ पुढें पावेन नरजन्मा ॥ १४५ ॥ हा पूर्वपापाचा परिपाक ॥ भोगित आहें सकळिक ॥ याहूनि मी तुज आणिक ॥ काय अधिक सांगू बा ॥ १४६ ॥ ऐसें हें मद्वचन ऐकून ॥ तो महायशा हरिमित्र ब्राह्मण ॥ कृपेनें अत्यंत उचंबळून ॥ बोलला वचन मज-लागीं ॥ १४७ ॥ अगा उलूका जें त्वां कांहीं ॥ पूर्वी अपराधिलें मजविषयीं ॥ तयाची म्यां तुज ये समयीं ॥ क्षमा केली असे पां ॥ १४८ ॥ तरी आतां मम कृपें हें प्रेत ॥ सर्वथा अ-दृश्य होवो येथ ॥ आणि श्वानजन्मही तुजप्रत ॥ होणार नाहीं निश्चयें ॥ १४९ ॥ आणि मत्प्रसादें गानयोग ॥ तुजला प्राप्त होईल संवेग ॥ तेणें योगें तूं शुद्धांतरंग ॥ स्तवीं श्रीरंग सर्वदा ॥ १५० ॥ तुझी जिव्हा ही होईल स्पष्ट ॥ नच पावशी कदापि कष्ट ॥ त्रिजगतींचे सकळ श्रेष्ठ ॥ तुज वरिष्ठ मानतील ॥ १५१ ॥ सुरविद्याधरगंधर्वांचा ॥ तैसाचि सकळ अप्सरादिकांचा ॥ अति श्रेष्ठ गानगुरु सांचा ॥ होशील वाचा ही सत्य ॥ १५२ ॥ नाना-विध भक्ष्य भोज्यादिक ॥ सदा भोग मिळतील अनेक ॥ पुढें लोटतां दिन कित्येक ॥ सर्व कल्याण होईल बा ॥ १५३ ॥ ऐसें हरिमित्र बोलला वचन ॥ विष्णुदूतीं दिलें अनुमोदन ॥ मम नरकयातना संपूर्ण ॥ न लावितां क्षण नाशिल्या ॥ १५४ ॥ नारदा विष्णुभक्तांची करुणा ॥ स्वभावेंच ऐशी असे जाणा ॥ कृतापराध्यांच्याही व्यसना ॥ समूळ नाशिते साचा-र ॥ १५५ ॥ असो तो हरिमित्र मजलागुनी ॥ अमृततुल्य वचन बोलुनी ॥ विष्णुदूतांसह

टी. १ गायनकळा. २ सत्वर. ३ विष्णु. ४ खरा. ५ ज्यांणीं अपराध केला त्यांच्याही. ६ दुःखास.

तत्क्षणीं ॥ वैकुंठभुवनीं पावला ॥ १५६ ॥ नारदा त्रैलोक्यामाजी वर्य ॥ जेणें मी झालों गानाचार्य ॥ तें सकळही तुज साश्चर्य ॥ वर्तमान कथियेलें ॥ १५७ ॥ आतां हरिमित्राच्या प्रसादेंसीं ॥ लाधलेल्या ह्या गानयोगेंसीं ॥ नित्य गाऊनि शेखीं हरीसी ॥ पावेन जाण निश्चयें ॥ १५८ ॥ देवर्षिवरा हें परमाद्भुत ॥ मम पूर्वजन्माचें चरित ॥ मूळापासूनि यथास्थित ॥ म्यां तुजप्रत कथियेलें ॥ १५९ ॥ हें जो हरिपरायण होऊन ॥ भावें करील श्रवण पठण ॥ तो हरीच्या प्रसादेंकरून ॥ वैकुंठभुवन पावेल ॥ १६० ॥ एवंप्रकारें गानबंधूनें ॥ कथियेलें नारदाकारणें ॥ ऐसें वाल्मीक बहु प्रेमानें ॥ शिष्यासि कथिता जाहला ॥ १६१ ॥ आतां विरिंचिनंदनासी ॥ गायनप्राप्ति झाली कैसी ॥ हेंचि सकळ वाल्मीकऋषी ॥ पुढच्या प्रसंगीं वर्णितील ॥ १६२ ॥ तीही कथा परमपावन ॥ आणि अत्यद्भुत असे ह्मणोन ॥ भावें श्रवणार्थ सीतानंदन ॥ श्रोतयांलागुन विनवितों ॥ १६३ ॥ स्वस्ति श्रीमदद्भुतरामविजय ॥ वाल्मीकीयाद्भुतोत्तरकांडहृदय ॥ ऐकोत सज्जन होऊनि तन्मय ॥ सप्तमाध्याय मधुर हा ॥ १६४ ॥

---

टी. १ श्रेष्ठ. २ गायनविद्येविषयीं गुरु. ३ प्राप्त झालेल्या. ४ शेवटीं. ५ ब्रह्मदेवाच्या पुत्रास ( नारदास ).

॥ इति सप्तमाध्यायः समाप्तः ॥ ७ ॥



श्रीगणेशायनमः ॥ ॥ जथजयाजी जगन्निवासा[1] ॥ जयजयाजी मायाविलासा[2] ॥ जय सच्चिदानंदा परात्परेशा[3] ॥ पुराणपुरुषा[4] परब्रह्मा ॥ १ ॥ जय परमात्मया पूर्णकामा[5] ॥ योगिजनमनवि-[6]श्रामा ॥ मन्मथांतकहृदयारामा[7] ॥ आत्मारामा स्वामिया ॥ २ ॥ तूं सकळब्रह्मांडज-[8]निता ॥ अज[9] अव्यय[10] मायेपरता ॥ परी स्वभक्तजनांचिये अर्थी[11] ॥ नित्य समर्था अवतरसी ॥ ३ ॥ तुझ्या अनंत अद्भुत लीला ॥ देवगुरु[12] न शके वर्णायाला ॥ परी तूं कृपा करितां दयाळा ॥ मूकही तयांला वर्णील ॥ ४ ॥ ऐशी तव कृपेची थोरी ॥ ह्मणोनि प्रार्थितों तुज श्रीहरी ॥ तरी कृपा करूनि मजवरी ॥ कथा सांजिरी[13] वर्णवीं पां ॥ ५ ॥ पूर्वाध्यायीं नारदाप्रत ॥ गानबंधूनें स्वपूर्ववृत्त ॥ हरिमित्रोपाख्यानयुक्त ॥ कथिलें ऐसें वर्णियेलें ॥ ६ ॥ आतां कथारचना कैशी ॥ ती ऐकिजे सावधांतरेंसीं ॥ आदिकवि श्रीवाल्मीकिऋषी ॥ भारद्वाजासी सांगत ॥ ७ ॥ अगा भारद्वाजमुने ऐक ॥ पुनरपि तो गानबंधु घूंक[14] ॥ नारदाप्रति बहु सुरेख ॥ वचन बोलता जाहला ॥ ८ ॥ अगा देवर्षिवरा हे किन्नर ॥ गंधर्व आणि विद्याधर ॥ तैसेचि अप्सरागण समग्र ॥ सादर बैसले आहेत जे ॥ ९ ॥

---

टी. १ सर्व जगांत वसणारा किंवा ज्याच्या मध्यें सर्व जग वसतें अशा प्रकारच्या. २ मायेशीं विलास करणारा. ३ परमेश्वरा. ४ जुनाटपुरुषा (आदिनारायणा). ५ पूर्णमनोरथा. ६ योगिजनाच्या मनास विसावा देणारा. ७ शंकराच्या मनास आनंद देणारा. ८ सर्व ब्रह्मांड उत्पन्न करणारा. ९ ज्यास जन्म नाहीं. १० नाशरहित. ११ कार्यासाठीं. १२ बृहस्पति. १३ सुंदर. १४ घुबड.

हेतों मज उलूकालागुनी ॥ गानाचार्य ऐसें मानुनी ॥ गानशिक्षार्थ येथें येउनी ॥ वसिन्नले आहेत पां ॥ १० ॥ अरे गानविद्या ती पूर्णपणें ॥ बहुत श्रम केल्याविणें ॥ केवल तपस्यादिकर्मानें ॥ किंवा शक्तींनें न येच पैं ॥ ११ ॥ यास्तव तपोधना तूं येथ ॥ विपुळ श्रम करूनि सतत ॥ मजपासूनि गायन समस्त ॥ पावें यथार्थ सत्वरी ॥ १२ ॥ तें ऐकतां नारदऋषी ॥ श्रीहरीसि स्मरूनि मानसीं ॥ अनन्यभावें गानबंधूसी ॥ प्रथम वंदिता जाहला ॥१३॥ नंतर शिक्षाक्रमेंकरून ॥ तेथें शिकूं लागला गायन ॥ तैं गानबंधू त्यालागुन ॥प्रथम ऐसें कथिलें कीं ॥१४॥अगा नारदा ब्रह्मसुता ॥ जरी गायन शिकसी आतां ॥ तरी मी कथितों ही तत्वता ॥ नीति सर्वथा राखीं तूं ॥१५॥ स्त्रीसंगम शिक गाणें ॥ धनधान्याचा व्यापार करणें ॥ मेळविणें आणि खर्चिणें ॥ व्याख्यान करणें लोकांत ॥१६॥ ह्या सर्वकर्माविषयीं सतत ॥ लज्जा टाकिजे पैं समस्त ॥ ऐसें सकळ नीतिशास्त्रांत ॥ असे यथार्थ कथियेलें ॥ १७ ॥ ह्मणोन आतां तूं लज्जा टाकीं ॥ दुजेही प्रकार सांगतों ऐकीं ॥ गूढ राहूनि प्रावरणादिकीं ॥ कदापि गायकीं गाऊं नये ॥ १८ ॥ आणि हस्तविक्षेपभाव करून ॥ कीं मुख अत्यंत विदारून ॥ कीं जिव्हा बाहेर काढून ॥ कदापि जाण गाऊं नये ॥ १९ ॥ तैसेंचि स्वांगाकडे पाहात ॥ कीं न विलोकितां पराप्रत ॥ किंवा ऊर्ध्वचि दृष्टि लावित ॥ कदापि कंचित गाऊं नये ॥ २० ॥ तैशाच



टी. १ घुबडास. २ गायनकळेचा गुरु. ३ गाणें शिकण्यासाठीं. ४ गायन शिकण्याच्या क्रमानें. ५ त्या नारदास. ६ गुप्त ( वेष्टिलेला असा ) ७ पांघरुणादिकांनीं. ८ गाणाऱ्यांनीं. ९ कोठेंही. * ब्रह्मदेवाचे पुत्रा. × हात नाचविणें इत्यादि.

बाह्या[1] वरुती करून ॥ कदापि न कीजे गायन ॥ एकहस्तें ताल[2]संघट्टण ॥ कदापि जाण करूं नयें ॥ २१ ॥ हास्य भय तृषा कंप शोक ॥ अन्यविषयस्मृति आणि भूक ॥ हे सप्त प्रकार गा[3]यकदूषक ॥ गायनीं योग्य नव्हेती ॥ २२ ॥ ह्मणोनि नारदा जे क्षुधार्त ॥ कीं भयार्त अथवा तृषार्त ॥ तयीं कदापि गायनार्थ ॥ प्रवर्त्तमान होऊं नये ॥ २३ ॥ तैसेंचि मुने अंधकारांत ॥ कदापि न बैसिजे गात ॥ इत्यादि प्रकार ते बहुत ॥ गायकीं समस्त पाळावे ॥ २४ ॥ ऐसें गान[4]विधिरक्षणार्थ ॥ गानबंधूनें कथितां यथार्थ ॥ विरिंचिनंदन मुनि तदर्थ ॥ सावध अत्यं[5]र्थ राहिला ॥ २५ ॥ आणि त्या गानबंधूपासून ॥ शिकूं लागला तो गायन ॥ दिव्यंस[6]हस्त्रवरुषें जाण ॥ अभ्यास पूर्ण पैं केला ॥ २६ ॥ स[7]र्वगीतप्रस्तावादिकांत ॥ बहु प्रवीण झाला सर्वांत ॥ आणि विपंच्यादिसर्व[8]वाद्यांत ॥ कुशळ अत्यंत नावजला ॥ २७ ॥ सर्वस्वरांचे सर्व विभाग ॥ जाणता झाला सांतरंग ॥ सतालमूर्च्छना रागिणी राग ॥ सर्वही चांगं जाणिलें ॥ २८ ॥ स्वरांच्या भेदयोगांनीं ॥ लक्षशः होती रागरागिणी ॥ तयांचींही स्वरूपें मुनी ॥ जाणता झाला यथार्थ ॥ २९ ॥ तेव्हां तयातें गंधर्व किन्नर ॥ सर्व भेटले हर्षनिर्भर ॥ अत्यंत प्रीतिपुरःसर ॥ संमान थोर दीधला ॥ ३० ॥ असो ऐशी गायनविद्या ॥ सकळ प्राप्त होतां स[9]ह्द्या ॥ देवर्षिवर्यालागीं स[11]द्यः[12] ॥ समाधान जाहलें ॥ ३१ ॥ मग उभय हस्त जोडून ॥

टी. १ बाहू. २ ताल धरणें. ३ गाणाऱ्यास दूषण देणारा. ४ गायनविधीच्या रक्षणाविषयीं. ५ अत्यंत. ६ देवांचीं हजार वर्षे. ७ गाण्याच्या सर्व प्रकारांत. ८ वीणादि सर्व वाद्यांत. ९ मर्मासह. १० चांगला. ११ मर्मासहित. १२ तत्काळ.

गानबंधूसि बोलला वचन ॥ अगा घूकेशा[1] आजि मी धन्य ॥ त्रिलोकीं मान्य जाहलों ॥३२॥ गानविद्याशा[2] धरूनि मानसीं ॥ पातलों तुझ्या चरणापाशीं ॥ तूं केवळ कृपांबुराशी[*] ॥ मज दी-नासी स्वीकारिलें ॥ ३३ ॥ आणि त्वांचि पूर्ण कृपा केली ॥ ह्मणोनि मज ही विद्या लाभली ॥ नातरी सहस्र जन्में घातलीं ॥ तरीही प्राप्त नव्हेच ॥ ३४ ॥ तूं गीतविद्याप्रवीण गुरू ॥ मजवरी केलेसि उपकारू ॥ मीतों शिष्य दीन पामरू ॥ प्रत्युपकारू करूं काय ॥३५॥ ह्मणोनि चिंता उदेली हृदयीं ॥ कैसा जी होऊं उतराई ॥ त्वत्कार्य[3] करूं कैसें कायी ॥ तें लवलाहीं सांग तूं ॥ ३६॥ तें ऐकूनि गानबंधु घूक ॥ ह्मणे नारदा सांगतों ऐक ॥ एके ब्रह्मदिनांत[4] देख ॥ चतुर्दश मनु होताती ॥३७॥ चौदामन्वंतरांनंतर ॥ त्रैलोक्यप्रळय होतो घोर ॥ तरी तोंपर्यंत निरंतर ॥ मम यश जगीं राहवें ॥ ३८ ॥ आणि तावत्कालपर्यंत पूर्ण ॥ मज असावें परम कल्याण ॥ मी तों दाक्षिण्यें[5] मनापासून ॥ तुज गायन शिक्षिलेंसे ॥ ३९ ॥ तयाचें हें फळ समस्त ॥ तुजपासू-नि लाभो यथार्थ ॥ महातपस्वी श्रीहरिभक्त ॥ सर्व समर्थ आहेसि तूं ॥ ४० ॥ हें ऐकूनियां तो नारदू ॥ घूकासि ह्मणे गा गानबंधू ॥ तूं अगाधज्ञानसिंधू[×] ॥ महासाधू आहेसी ॥ ४१ ॥ तुझे सकळ मनोरथ ॥ परिपूर्ण होतील निश्चित ॥ आणि पुढल्या कल्पीं विष्णुरथ[6] ॥ गरुड यथार्थ होशी तूं ॥ ४२ ॥श्रीहरिगुणगायनासी ॥ येथें सर्वदा करितोसी ॥ ह्मणोनि पुढिल्या कल्पीं तुजसी ॥ सायु[7]



टी. १ घुबडांमध्यें श्रेष्ठा. २ गायनविद्येचीआशा. ३ तुझें कार्य. ४ ब्रह्मदेवाच्या दिवसांत. ५ कुशळतेनें. ६ विष्णूचें वाहन. ७ ईश्वराच्या स्वरूपांत मिळून जाणें अशी मुक्ति. * कृपेचा समुद्र. × अनंत ज्ञानाचा समुद्र.

ज्यमुक्ति लाभेल ॥ ४३ ॥ सर्वदा असो तव कल्याण ॥ मजला होईं सुप्रसन्न ॥ आतां निरोप देईं तूर्ण[1] ॥ करितों गमन यथेच्छ ॥ ४४ ॥ ऐसें बोलूनि नारदऋषी ॥ तेथूनि निघाला वेगेंसीं ॥ तुंबरूतें जिकावयासी ॥ तद्गृहोपाशीं[2] पातला ॥ ४५ ॥ तंव तेथें अदृष्टश्रुत[3] ॥ ऐसें देखिलें परमाद्भुत ॥ छिन्नभिन्नांग ऐशीं अगणित ॥ पडलीं असत स्त्रीपुरुषें ॥ ४६ ॥ कित्येकांचीं शिरकमळें ॥ तुटोनि पडलीं जैशीं फळें ॥ कित्येकतों पादयुगळें ॥ मोडोनि पांगुळे लोळती ॥ ४७ ॥ कित्येकांच्या जिव्हा चिरल्या ॥ कित्येकांच्या बाह्या फिरल्या ॥ कित्येकांच्या शिरा सरल्या ॥ चेष्टा[4] विरल्या सर्वही ॥ ४८ ॥ कित्येकींतों मोडल्या मांजा[5] ॥ ह्मणोनि धरिल्या असती बाजा[6] ॥ कित्येकांच्या तुटल्या भुजा ॥ न येत काजा कवण्याही ॥ ४९ ॥ कित्येकांचे तुटले ओष्ठ ॥ एकांचे द्विज* झाले भ्रष्ट ॥ कित्येकांचे मुष्कं[7] नष्ट ॥ होऊनि कष्ट भोगिती ॥ ५० ॥ कित्येकांच्या मोडल्या मांड्या ॥ कित्येकांच्या तुटल्या नाड्या ॥ कित्येक ते दृष्टि कुरड्या ॥ होऊनि बापुड्यांपरी पडले ॥ ५१ ॥ कित्येकांचीं मोडलीं मेटें ॥ कित्येकांचीं तुटलीं बोटें ॥ कित्येक ते फुटलीं पोटें ॥ ह्मणोनि नेटें ओरडती ॥ ५२ ॥ कित्येकांचे तुटले कान ॥ कित्येक झाले नासिकाहीन ॥ कित्येक अर्धांगें जाऊन ॥ ठायींच जाण लोळती ॥ ५३ ॥ कित्येकांचे मोडले स्कंध ॥ कित्येक ते जाहले अंध ॥ कितिएकतां संधिबंध ॥ तुटोनि निर्स्पंद[8] पडियेले ॥ ५४ ॥ कित्येकांचे बसले

टी. १ सत्वर. २ तुंबुरूच्या घराजवळ. ३ कधींपाहिलें व ऐकलें नाहीं. ४ हालचाल. ५ कंबरा. ६ खाटा. ७ वृषण. ८ निश्चेष्ट. * दांत.

ऊर ॥ कित्येकांचे वाढले वर ॥ कित्येकांचे तुटले कर ॥ असती जर्जर कित्येक ॥ ५५ ॥ कित्येकांचे गेले कुले ॥ करचरणीं कित्येक लुले ॥ कितिएक ते मर्मस्थळें ॥ फुटल्यामुळें तळमळती ॥ ५६ ॥ ऐशेप्रकारें ते समस्त ॥ भुमीवरी पडले असत ॥ तयां पाहतां तो विधिसुत[1] ॥ कृपें अत्यंत उचंबळला ॥ ५७ ॥ आणि ह्मणे हो तुह्मी कवण ॥ ऐशी ही गती काय ह्मणोन ॥ अदृष्टपूर्व[2] येथें येऊन ॥ किंकारण पडलेती ॥ ५८ ॥ तें ऐकूनि ते कोपें तत्क्षणीं ॥ ह्मणती बा पुससी काय मुनी ॥ आह्मी सकळ राग रागिणी ॥ तुझीच करणी भोगिताहों ॥ ५९ ॥ तुवांच हे आमुचे सर्व ॥ तोडिले असती अंगावयव ॥ मी गायनविद्याप्रवीण अपूर्व ॥ ऐसा गर्व तुजलासे ॥ ६० परी तुझें सकळही गायन ॥ भिन्नसंधि[3] होतें ह्मणोन ॥ आमुचे अवयव संपूर्ण ॥ छिन्नभिन्न होताती ॥ ६१ ॥ अरे ज्याज्या वेळीं तूं गातोसी ॥ तैंतैं आह्मा गति होय ऐसी ॥ पुनश्च तुंबरूच्या गायनेंसीं ॥ छिन्नभिन्नांगें सांधतात ॥ ६२ ॥ तूं आमुचा घेतोसि जीव ॥ मग हा तुंबरु करितो सजीव ॥ ह्मणोनि येथें आह्मी सर्व ॥ येऊनियां पडलों असों ॥ ६३ ॥ ऐसें तयांचें ऐकिलें भाषित ॥ आणि तें प्रत्यक्ष पाहिलें अद्भुत ॥ तैं तो नारद ब्रह्मसुत ॥ झाला चकित अंतरीं ॥ ६४ ॥ आणि आपणातें धिक्कारुनी ॥ मग वेगें निघाला तेथुनी ॥ श्वेतद्वीपामाजीं तत्क्षणीं ॥ हरीसंनिधानीं पोंचला ॥ ६५ ॥ विष्णूसि करूनि नमस्कार ॥ ह्मणे प्रभो ऐकें समाचार ॥ तव आज्ञा वंदूनि साचार ॥ मानसोत्तरशैलीं पावलों ॥ ६६ ॥ तेथें गानबंधुघूकापा-

टी. १ ब्रह्मदेवाचा पुत्र (नारद). २ पूर्वी कधींच पाहिलेले नाहींत असे. ३ तुटकें.

सून ॥ गायनविद्या शिकलों जाण॥दिव्यसहस्रवर्षें अहोर्दिन ॥ अभ्यास पूर्ण म्यां केला ॥६७॥ मग तयाची आज्ञा घेउनी ॥ आनंदें निघालों तेथुनी ॥ तुंबुरूसि जिंकावें ऐशी म्हणी ॥ कामना मनीं उद्भवली ॥ ६८ ॥ म्हणोनि तयाच्या गृहापाशीं ॥ पावलों बहुअभिमानेंसीं ॥ तंव तेथें छिन्नभिन्नांग ऐशी ॥ असंख्य स्त्रीपुरुषें लोळत ॥ ६९ ॥ तयां पाहूनियां मजला ॥ दया आली-गा घननीळा ॥ मग तुह्मी कोण इत्यादि त्यांला ॥ वृत्तांत पुशिला साद्यंत ॥ ७० ॥ तयीं कथिलें मजलागुनी ॥ आह्मी सकळ रागरागिणी ॥ तुझिया गानयोगेंकरुनी ॥ छिन्नभिन्नांग जाहलों ॥ ७१ ॥ ज्याज्यावेळीं तूं गातोसी ॥ तेंतें आह्मां गति होय ऐशीं ॥ पुनश्च तुंबुरूच्या गानेंसीं ॥ छिन्नभिन्नांगें सांधतात ॥ ७२ ॥ तूं आमुचा घेतोस जीव ॥ पुनश्च तुंबुरू करितो सजीव ॥ ह्मणोनि आह्मी येथें सर्व ॥ येऊनियां पडिलों असों ॥ ७३ ॥ तें ऐकतां झालों दुःखित ॥ आणि आश्चर्यही वाटलें बहुत ॥ तुवां कथिलें ह्मणोनि समस्त ॥ आजपर्यंत श्रम केले ॥ ७४ ॥ परी ते सर्व झाले निष्फळ ॥ ह्मणोनि होते बहु तळमळ ॥ तरी भगवंता यांतील निर्मळ ॥ तथ्यार्थ सकळ सांगें पां ॥ ७५ ॥ तें ऐकूनियां श्रीनारायण ॥ ह्मणे नारदा करीं श्रवण ॥ गानबंधूसि येतें गायन ॥ तें तूं संपूर्ण शिकलासी ॥ ७६ ॥ परी तितुक्यानें तुंबुरू-समान ॥ पारंगत झाला नाहींस जाण ॥ गायनविद्यासागर महान ॥ अपार परिपूर्ण आहे पैं ॥ ७७ ॥ तो व्हावया पारंगत ॥ जरी नारदा इच्छिसी यथार्थ ॥ तरी वैवस्वतमन्वंतरांत ॥ अठ्ठाविसावें महायुग जें ॥ ७८ ॥ त्यांत द्वापाराचे शेवटीं ॥ यदुवंशीं देवकीचे पोटीं ॥

वसुदेवापासूनि जगजेठी[1] ॥ कृष्णनामें मी अवतरेन ॥ ७९ ॥ तैं तूं मम समीप येऊन ॥ एतदर्थ[2] देई स्मरण ॥ तेथें मी तुज गानसंपन्न ॥ तुंबुरूसमान करीन पां ॥ ८० ॥ नारदा फार सांगूं काय ॥ तयाहूनही गानातिशय[3] ॥ तुज लाभेल निःसंशय ॥ ऐसेंचि जाण करीन मी ॥ ८१ ॥ तरी तोंपर्यंत यथास्थित ॥ शिकत राहीं देवगंधर्वादिकांत ॥ ऐसें सांगूनि रमाकांत ॥ तत्काळ गुप्त जाहला ॥ ८२ ॥ मग तो देवर्षि नारदमुनी ॥ अंतरीं श्रीहरीसि वंदुनी ॥ सुस्वर वीणा वाजवीत झणी ॥ हर्षें तेथुनी निघाला ॥ ८३ ॥ तो साक्षान्नारायणतत्पर ॥ केवळ तपस्येचा सागर ॥ सर्वाभरणीं[4] भूषित सुंदर ॥ देवसदृश शोभतसे ॥ ८४ ॥ स्कंधीं घेऊनि विपंची[5] वीणा ॥ फिरत चालला लोक नाना ॥ मुखें श्रीहरिनामकीर्तना ॥ निरंतर बोलत ॥ ८५ ॥ इंद्र अग्नि यम निर्ऋती ॥ वरुण वात धनाधिपती[6] ॥ आणि ईश[*] हे जे अष्ट दिक्पती[×] ॥ यांचया लोकां पावला ॥ ८६ ॥ जेथेंतेथें वीणावादन ॥ आणि करी हरिगुणगायन ॥ गंधर्व अप्सरासंघ संपूर्ण ॥ देती सन्मान पूजूनियां ॥ ८७ ॥ ऐसा सदा सर्वत्र फिरत ॥ अत्यानंदें काळ क्रमित ॥ एकदां ब्रह्मयाच्या दर्शनार्थ ॥ पावला अवचित सत्यलोकीं ॥ ८८ ॥ तों तेथें हाहा हूहू नामक ॥ महादिव्यगंधर्वनायक ॥ ब्रह्मदेवाचे दोघे गायक ॥ नित्य गात असती पैं ॥ ८९ ॥ ते गीतविद्येंत विशारद[7] ॥ तयांसंगें तो मुनि नारद ॥ श्रीहरिगुणांसि सानंद ॥ स्वच्छंद[8] गाता

टी. १ जगामध्ये ज्येष्ठ (श्रेष्ठ) विष्णु. २ ह्यासाठीं (गाण्याविषयीं). ३ गाण्याचा अधिकपणा. ४ सर्वअलंकारांनीं. ५ साततारांची वीणा. ६ सर्व द्रव्याचा धनी (कुबेर). ७ कुशळ (प्रवीण). ८ स्वेच्छेनें. * ईशान्य दिशेचा स्वामी (रुद्र). × दिक्पाळ (दिशांचे स्वामी).

जाहला ॥ ९० ॥ तें ऐकतां चतुरानन ॥ अंतरीं पावला समाधान ॥ देवर्षीतें देऊनि मान ॥
केलें पूजन यथार्ह ॥ ९१ ॥ मग वंदूनियां ब्रह्मयासी ॥ तेथूनि निघाला देवर्षी ॥ सकळलो-
कीं स्वच्छंदेंसीं ॥ संचार करिता जाहला ॥ ९२ ॥ पुढें लोटतां काळ बहुत ॥ गेला तुंबरूच्या
सदनांत ॥ वीणा घेऊनियां हस्तांत ॥ एकांतीं गुप्त प्रवेशला ॥ ९३ ॥ तंव तेथें देवकन्या
अनेक ॥ आणि षड्जमध्यमादिक ॥ सर्व स्वर तुंबरूसंमुख ॥ बैसले असती प्रत्यक्ष ॥ ९४ ॥
तयां पाहतां तो भगवान ॥ देवर्षिवर्य ब्रह्मनंदन ॥ होऊनियां लज्जायमान ॥ सत्वर जाता जा-
हला ॥ ९५ ॥ पुढें कालांतरें द्वापारांतीं ॥ भगवान विष्णु मेदिनीवरुती ॥ वसुदेवापासून
निर्गुती ॥ देवकीठायीं अवतरला ॥ ९६ ॥ तयाचें श्रीकृष्ण अभिधान ॥ तो पूर्णब्रह्मावतार
जाण ॥ तयें सागरीं दैदीप्यमान ॥ द्वारकापत्तन निर्मियेलें ॥ ९७ ॥ तयामाजी तो सपरि-
वार ॥ वसिन्नला देवकीकुमर ॥ अष्टाधिक षोडशसहस्र ॥ स्त्रिया सुंदर पर्णियेल्या ॥ ९८ ॥
तयांमाजी रुक्मिण्यादिक ॥ आठ स्त्रिया असती प्रमुख ॥ असो पुढें तो यदुनायक ॥ क्रीडा
अनेक करितसे ॥ ९९ ॥ एकेसमयीं वनक्रीडार्थ ॥ इच्छा उदेली अंतरांत ॥ ह्मणोनि सर्व
स्त्रियांसहित ॥ रैवताचलीं पावला ॥ १०० ॥ तंव भगवान्नारदमुनी ॥ अवचित पातला ते
स्थानीं ॥ साष्टांगें श्रीकृष्णासि वंदुनी ॥ जोडूनि पाणी विनवित ॥ १०१ ॥ अगा प्रभो तूं

टी. १ नारदास. २ देवर्षींमध्यें श्रेष्ठ. ३ ब्रह्मदेवाचा पुत्र (नारद). ४ खरोखर. ५ आठांनीं अधिक. * यथायोग्य. + नांव.

वासुदेव ॥ सांप्रत दिसतोसि पैं मानव ॥ परी साक्षात् अचिंत्यवैभव ॥ रमाधव आहेसी ॥१०२॥ श्वेतद्वीपस्थ नारायण ॥ तोचि तूं भगवान् श्रीकृष्ण ॥ दुष्टसंहार भक्तरक्षण ॥ कराया पूर्ण अवतरलासी ॥ १०३ ॥ पूर्वी त्वां श्रीनारायणानें ॥ श्वेतद्वीपीं मजकारणें ॥ कथिलें होतें मी कृष्णनामानें ॥ द्वापारांतीं अवतरेन ॥ १०४ ॥ तैं तूं मत्सन्निध येऊन ॥ गानयोगार्थ देईं स्मरण ॥ तेथें मी तुज गानसंपन्न ॥ तुंबरूसमान करीन पैं ॥ १०५ ॥ इत्यादि मज कथिलें होतें ॥ ह्मणोनि आज येऊनि येथें ॥ तदर्थ स्मरण देतों तूतें ॥ सत्वर मातें उद्धरीं ॥१०६॥ तें ऐकूनियां यदुनाथ ॥ परमानंदें हंसत हंसत ॥ समीपवर्ती जांबवतीप्रत ॥ ऐसें आज्ञापिता जाहला ॥ १०७ ॥ मम प्रिये कल्याणरूपिणी ॥ अग हा साक्षान्नारदमुनी ॥ गानशिक्षार्थ येथं येऊनी ॥ विनवणी करिताहे ॥ १०८ ॥ तरी यथाविधि गानयोग ॥ यासि तूं प्रिये शिकवीं चांग ॥ ऐकूनि तिणें सानुराग ॥ बहु चांग ऐसें कथियेलें ॥ १०९ ॥ यथाविधि आनंदानें ॥ मुनीसि शिकविलें गाणें ॥ संवत्सरपर्यंत तयानें ॥ केला श्रमानें अभ्यास ॥ ११० ॥ मग कृष्ण ह्मणे गा देवर्षी ॥ आतां जाई सत्यभामेपाशीं ॥ ती तुज शिक्षील पूर्णपणेंसीं ॥ पुनश्च अभ्यासीं सादर ॥ १११ ॥ तथास्तु ह्मणोनि ब्रह्मसुत ॥ तत्क्षण पावला भामेप्रत ॥ करोनि साष्टांग प्रणिपात ॥ सर्व वृत्तांत कथियेला ॥ ११२ ॥ तैं ती आज्ञा प्रमाण ह्मणोन ॥ मुनीसि

टी. १ अमुक प्रकारचें असावें ह्मणून ज्याविषयीं कल्पना करतां येत नाहीं असें आहे वैभव ज्याचें असा. २ लक्ष्मीचा पति. ३ श्वेतद्वीपीं राहणारा. ४ गायनविद्येविषयीं. ५ जवळ असलेल्या जांबवतीस. ६ गाणें शिकण्यासाठीं. ७चांगला. ८प्रेमानें. ९वर्षपर्यंत. १०नारद.

शिकवूं लागली गायन ॥ एक संवत्सर परिपूर्ण ॥ अभ्यास जाण जाहला ॥ ११३ ॥ मग पुनश्च कृष्णें नारदासी ॥ कथिलें जाईं रुक्मिणीपार्शीं ॥ ती तुज गानविद्या त्वरेंसीं ॥ मना ऐसी शिकवील ॥ ११४ ॥ तें ऐकतां तो देवमुनी ॥ आज्ञा प्रमाण ह्मणोनि तत्क्षणीं ॥ रुक्मिणीमातेचिये सदनीं ॥ अतिविनयें[2] पावला ॥ ११५ ॥ तों तत्रत्य[3] दासी तयाप्रत ॥ ह्मणती मुने तूं ब्रह्मसुत ॥ गात असोनिही सतत ॥ स्वर यथार्थ नेणसी ॥ ११६ ॥ तरी तुज आतां ह्मणावें काय ॥ कांहींच वदाया नाहीं सोय ॥ असो मग ती रुक्मिणीमाय ॥ शिकविती होय तयातें ॥ ११७ ॥ दोनसंवत्सरपर्यंत ॥ तियेनें श्रम घेऊन बहुत ॥ सप्रेम यथाविधि साद्यंत ॥ अभ्यास सतत करविला ॥ ११८ ॥ तेव्हां तो देवर्षिसत्तम ॥ गाऊं लागला अत्युत्तम ॥ परी स्वरांगनाचा[4] आंगम ॥ तंत्रीयोगीं[6] होईना ॥ ११९ ॥ ह्मणोनि नारद बहु दुःखार्त ॥ विचार करी अंतरांत ॥ मग श्रीकृष्णें तयासि त्वरित ॥ स्वसन्निध पाचारिलें ॥ १२० ॥ आणि स्वयेंचि सर्व गानयोग ॥ शिकविला उत्तम यथासांग ॥ तेणें सर्व स्वरांगना चांग ॥ आल्या सवेग तयासी ॥ १२१ ॥ तैं त्या देवमुनीचे अंतरीं ॥ उठल्या ब्रह्मानंदलहरी ॥ द्वेषादि दोष सहपरिवारीं ॥ सर्वही जाण मावळले ॥ १२२ ॥ तुंबरूविषयीं ईर्ष्या होती ॥ तीही तयाची लोपली निरुती ॥ माझें सार्थक झालें जगतीं ॥ ऐसें चित्तीं वाटलें ॥ १२३ ॥ मग वंदूनियां श्रीकृष्णासी ॥ आनंदें नाचला देवर्षी ॥ तैं तो भगवान हृषीकेशी ॥ प्रेमें तयासी बोलत

टी. १घरीं. २अतिनम्रतेनें. ३तेथील (रुक्मिणीच्या घरांतील). ४रागिणीचा. ५प्राप्ति (येणें). ६विण्याच्या तारांत. ७रागिणी. ८खरोखर.

॥ १२४ ॥ अगा नारदा ब्रह्मसुता ॥ तूं सर्वज्ञ आहेस सर्वथा ॥ प्राचीन गानयोगें आतां ॥ मम सन्निध गाई पां ॥ १२५ ॥ पूर्वी त्वां जें प्रार्थिलें होतें ॥ तें सर्वही लाभलें तूतें ॥ आतां तुंबरूसह नित्य मातें ॥ यथास्थित गा मम लोकीं ॥ १२६ ॥ ऐशी ऐकतां श्रीकृष्णवाणी ॥ अतिहर्षला नारदमुनी ॥ आणि यथायोग्य तयेस्थानीं ॥ वर्तन करिता जाहला ॥ १२७ ॥ रुक्मिणी भामा जांबवती ॥ यांसह पूजूनि कृष्णाप्रती ॥ महारुद्र जो तत्स्थानपती ॥ त्यासही प्रीतीं पूजिलें ॥ १२८ ॥ आणि तो गानविशारद ऋषी ॥ राहिला जोडूनि हस्तद्वयासी ॥ तेव्हां कृष्णें श्रीशिवापाशीं ॥ गावया तयासी प्रेरियेलें ॥१२९॥ ह्मणोनि तेथें तो शिवालयांत ॥ रुक्मिणी भामा जांबवतींसहित ॥ आणि श्रीकृष्णनाथासमवेत ॥ यथास्थित गाता जाहला ॥ १३० ॥ असो भारद्वाजा मुनिशार्दूला ॥ ऐसा हा गीतक्रम तुज कथिला ॥ जे कां ब्राह्मण श्रीवासुदेवाला ॥ निरंतर गाताती ॥ १३१ ॥ ते हरीच्या सायुज्या पावत ॥ आणि सर्वयज्ञफलेंही लाभत ॥ अन्यथा अन्य गातां नरकांत ॥ पतन पावत निश्चयें ॥ १३२ ॥ कायावाचामनें करून ॥ होऊनियां हरिपरायण ॥ जो कां स्वयें करितो गायन ॥ किंवा प्रेमें ऐकितो पैं ॥ १३३ ॥ तयालागीं श्रीहरिप्राप्ती ॥ सत्वर होते जाण निश्चिती ॥ आणि श्रीहरीपेक्षें त्रिजगतीं ॥ प्रियंवद श्रेष्ठ बोलिजेतो ॥ १३४ ॥ असो हें सीतोत्पत्तिपूर्वीचें सर्व ॥ कर्णसुखद वृत्त



टी. १ त्या रैवतक पर्वताचा अधिपति (त्या पर्वतीं असलेला). २ गायनविद्येंत प्रवीण झालेला. ३ मुनींमध्यें श्रेष्ठ. ४ प्रिय बोलणाऱ्यांमध्यें श्रेष्ठ. ५ कानास सुख देणारें. ६ वर्तमान. * गाण्याचा अनुक्रम. + स्वरूपांत मिळून राहणें अशा मुक्तीला.

अपूर्व ॥ अति गुह्य[1] असोनि स्नेहास्तव ॥ तुज म्यां सांक्षेपें कथियेलें ॥ १३५ ॥ हें सर्व पुण्य फलदायक ॥ सकळपापकुळनाशक[2] ॥ कल्याणदानाविषयीं अधिक ॥ दक्ष[3] एक हेंचि असे ॥ १३६ ॥ अरे भगवद्भक्तांचें चरित्र ॥ विचित्राहूनि अति विचित्र ॥ सर्व त्रैलोक्यामाजी पवित्र ॥ ईह[4] परत्र[5] सुख देतें ॥ १३७ ॥ जैसी साक्षात् जन्हुपुत्री[6] ॥ महापापियां पावनकर्त्री ॥ कीं वाराणसी ईह परत्रीं ॥ सुखदात्री[7] साचार ॥ १३८ ॥ सकळमृगांमाजी मृगेंद्र[8] ॥ कीं नक्षत्रांमाजी श्रेष्ठ चंद्र ॥ कीं निर्जरांमाजी[9] महेंद्र[10] ॥ किंवा नरेंद्र नरांमाजी ॥ १३९ ॥ कीं पितरांमाजी अर्यमा ॥ गंधर्वांत चित्ररथनामा ॥ कीं सर्व स्त्रियांमाजी रमा[11] ॥ कीं धेनूंत उत्तमा कामधेनू ॥ १४० ॥ कीं वेदांमध्यें सामवेद ॥ कीं देवर्षींमाजी नारद ॥ सकळ छंदांमाजी विशद ॥ गायत्री छंद श्रेष्ठ जेंवी ॥ ४१ ॥ कीं इंद्रियांमाजी मन ॥ झषांमाजी[12] मकर जाण ॥ कीं वर्णांमाजी जैसा ब्राह्मण ॥ श्रेष्ठ पावन साचार ॥ ४२ ॥ सकळ नागांमध्यें अनंत[13] ॥ किंवा वासुकी श्रेष्ठ सर्पांत ॥ कीं सर्व गजेंद्रांमाजी ख्यात ॥ ऐरावत श्रेष्ठ जैसा ॥ ४३ ॥ कीं स्थावरांमाजी हिमालय ॥ कीं सर्व ज्योतींमाजी[14] सूर्य ॥ कीं पक्ष्यांमाजी वैनतेय[15] ॥ कीं हयांत[16] हय उच्चैःश्रवा ॥ ४४ ॥ कीं पुरोहितांमाजी गुरू ॥ शिखरवंतांत महामेरू ॥ यक्षराक्षसांमाजी कुबेरू ॥ किंवा अकारू अक्षरांत ॥ ४५ ॥ कीं आयुधांत श्रेष्ठ कुंशिल[17] ॥ कीं मासांमाजी मार्गशीर्ष ॥ ऋतूंमध्यें वसंत

---

टी. १ बुद्धिपुरःसर. २ सर्व पापांच्या कुळाचा नाश करणारें. ३ कुशल, तयार. ४ या लोकीं. ५ परलोकीं. ६ भागीरथी. ७ सुखदेणारी. ८ सिंह. ९ देवांत. १० इंद्र. ११ लक्ष्मी. १२ जलचरांत. १३ शेषनाग. १४ तेजांत, १५ गरुड. १६ घोड्यांत. १७ वज्र.

विशेष ॥ कीं मुनींत व्यास श्रेष्ठ जैसा ॥ ४६ ॥ कीं वृक्षांमाजी उत्तम ॥ श्रेष्ठ जैसा अश्वत्थद्रुम ॥ कीं शस्त्रधारियांमाजी राम ॥ श्रेष्ठ परम जैसा पैं ॥ ४७ ॥ तैसें भगवद्भक्तचरित्र ॥ सर्वांहूनि श्रेष्ठ पवित्र ॥ श्रवणमात्रें सदासर्वत्र ॥ फल विचित्र देतसे ॥ ४८ ॥ ह्मणोनि नरीं हें सर्वदा वंद्य ॥ आणि देवींही असे अभिनंद्य ॥ तरी सकळीं सदा हें अवद्य ॥ श्रवण पठण कीजिये ॥ ४९ ॥ ऐसें श्रीमद्वाल्मीकिमुनीनें ॥ कथिलें भारद्वाजा कारणें ॥ आतां सीताजन्म बहुप्रेमानें ॥ पुढिल्या प्रसंगीं सांगिजेल ॥ १५० ॥ ती कथा परम पवित्र ॥ आणि अत्यंतचि असे विचित्र ॥ ह्मणोनि मी रघुनाथपुत्र ॥ श्रोतयां श्रवणा प्रार्थितों ॥ १५१ ॥ स्वस्ति श्रीमदद्भुतरामविजय ॥ वाल्मीकीयाद्भुतोत्तरकांडहृदय ॥ ऐकोत सज्जन होऊनि तन्मय ॥ अष्टमाध्याय मधुर हा ॥ १५२ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥

टी. १ पिंपळाचा वृक्ष. २ अनुमोदन देण्यास योग्य. ३ स्तुत्य.

॥ इति अष्टमाध्यायः समाप्तः ॥ ८ ॥



# अध्याय ९ वा















श्रीगणेशायनमः ॥  ॥ जयजय दुष्टरावणाद्यमित्रा[1] ॥ सज्जनमानसारविंदमित्रा[2] ॥ भवसूर्यातपहारिछत्रा[3] ॥ कामारिमित्रा[4] दाशरथे ॥ १ ॥ तूं अज[5] अव्यय[6] चिन्मात्र[7] ॥ मायातीत परम पवित्र ॥ भक्तां सुखवाया इहपरत्र[8] ॥ कौसल्यापुत्र झालासी ॥ २ ॥ तुझीं जगत्पावन चरित्रें ॥ बहु असती परम विचित्रें ॥ तयां वर्णितां द्विसहस्रनेत्रें[9] ॥ सहस्र वक्रें[10] दमविलीं ॥ ३ ॥ तरी तया न लागेच पार ॥ तेथें बापुडे काय इतर ॥ तूंच कृपा करितां समग्र ॥ वर्णील साचार मूकही[11] ॥ ४ ॥ ऐसा तव कृपेचा महिमा ॥ ह्मणोन वंदितों त्वदंघ्रिपद्मा[12] ॥ तरी कृपा करोनि मेघश्यामा ॥ माझिये कामा[13] पुरवीं तूं ॥ ५ ॥ पूर्वाध्यायीं यथास्थित ॥ कृष्णापासूनि नारदाप्रत ॥ गायनविद्या झाली प्राप्त ॥ इत्यादि समस्त वर्णियेलें ॥ ६ ॥ पुढें कथा परमपावन ॥ श्रोतीं असावें सावधान ॥ आदिकवि स्वशिष्यांलागुन[14] ॥ प्रेमें विवरून[15] सांगती ॥ ७ ॥ अगा विप्रोत्तमा भारद्वाजा ॥ जी साक्षात् श्रीहरीची भाजा[16] ॥ महालक्ष्मी अव्यया[17] अजा[18] ॥ मूळप्रकृति केवळ ॥ ८ ॥ ती रक्तापासूनि कैशी उदेली[19] ॥ राक्षसीगर्भीं कैशी जन्मली ॥ भूतलीं कैशी उद्भवली ॥ कैसें पावली जानकीत्व[20] ॥ ९ ॥ आणि सीता हें नामाभिधान ॥ कैसें लाभलें तियेलागुन ॥

---

टी. १ दुष्ट जे रावणादिक त्यांचा शत्रु. २ सज्जनाच्या मनोरूपी कमळास प्रफुल्लित करणाऱ्या सूर्या. ३ जन्ममरणरूपी उन्हास निवारणाऱ्या छत्रा. ४ कामाचे शत्रूचे (शिवाचे) मित्रा. ५ जन्मरहित. ६ नाशरहित. ७ ज्ञानस्वरूप. ८ या लोकीं व परलोकीं. ९ दोन हजार आहेत डोळे ज्यास त्याणें (शेषानें). १० मुखें. ११ मुकाही. १२ तुझ्या पादकमळास. १३ मनोरथास १४ आपल्या शिष्यास (भारद्वाजास). १५ उघड करून. १६ स्त्री. १७ नाशरहित. १८ जन्मरहित १९ उत्पन्न झाली. २० जनकाचें कन्यात्व.

इत्यादि सकळ वर्तमान ॥ सांगतों श्रवण करीं तूं ॥ १० ॥ पुलस्तिनंदना पासून ॥ कैकसी-
पोटीं उत्पन्न ॥ रावणनामा दशवदन ॥ राक्षस दारुण जाहला ॥ ११ ॥ तयें आपणा त्रैलोक्या-
धिपत्य ॥ आणि अजरामरत्व मिळावें स्तुत्य ॥ ह्मणोनि तीक्ष्ण तपस्या नित्य ॥ बहु प्रयत्नें चा-
लविली ॥ १२ ॥ बहुत वर्षेंपर्यंत जाण ॥ आचरला थोर अनुष्ठान ॥ सूर्याकडे दृष्टि लावून ॥
निरंतर बैसला ॥ १३ ॥ ऐशी तपस्या घडतां अमित ॥ ज्वलनार्कवत झाला प्रदीप्त ॥ मग
तयाच्या तेजें सर्व जगत ॥ जळूं लागलें एकसरां ॥ १४ ॥ तैं सर्वदेवांसह विधाता ॥ तयास-
न्निधजाऊनि अवचितां ॥ ह्मणे रावणा मद्वाक्यें आतां ॥ तप सर्वथा पुरे करीं ॥ १५ ॥ अरे
ह्या उग्रतपें केवळ ॥ भस्मवत झाले लोक सकळ ॥ तुझिये मनीं जो कां असेल ॥ तो तुज
अखिल वर देतों ॥ १६ ॥ तूं महातपोधन ह्मणोन ॥ वरद आलों मी चतुराननन ॥ तरी आतां
मजपासून ॥ घेईं मागोन यथेच्छ ॥ १७ ॥ तें ऐकूनियां दशवदन ॥ परमानंदें भरला पूर्ण ॥
सूर्यावलोकनापासून ॥ दृष्टि तत्क्षण फिरविली ॥ १८ ॥ तों संमुख देखिलें ब्रह्मयासी ॥ वंदन
केलें साष्टांगेंसीं ॥ मग जोडूनि करद्वयासी ॥ इच्छितवरासी मागत ॥ १९ ॥ ह्मणे गा पिता-
महा वरदानार्थ ॥ जरी कां असशी तूं समर्थ ॥ तरी कृपा करूनि यथार्थ ॥ अजरामरत्व मज देईं
॥ २० ॥ तें ऐकूनियां कमलयोनी ॥ ह्मणे रे रावणा मजलागुनी ॥ असंभवनीय तें यांचुनी ॥

टी १ पुलस्तीच्या पुत्रापासून ( विश्रव्यापासून ). २ दाहा मुखांचा. ३ असंख्य. ४ अग्नि व सूर्य यांप्रमाणें. ५ ब्रह्मा. ६ सर्व.
७ वर देणारा. ८ चार तोंडांचा. (ब्रह्मदेव). ९ हे ब्रह्मदेवा. १० वृद्धपण व मृत्यु हे नसणें. ११ ब्रह्मदेव. १२ कधींच न होणारें. १३ मागून.

व्यर्थ वाणी शिणविलीस ॥ २१ ॥ अरे सर्वामरत्व कोणासि नाहीं ॥ ह्मणोनि मी तें तुज न देई ॥ इतर पाहिजे तें सर्वही ॥ मागोनि घेई साचार ॥ २२ ॥ ऐसें ब्रह्मयाचें ऐकूनि वचन ॥ तो कूटवादी राक्षस रावण ॥ अंतरीं कपटें विचारून ॥ बोले वचन तयासी ॥ २३ ॥ अगा पितामहा तूं मजसी ॥ जरी कां सर्वामरत्व नच देसी ॥ तरी अन्य याचितों त्या वरासी ॥ देऊनि इच्छेसी पुरवीं पां ॥ २४ ॥ देव दैत्य दानव किन्नर ॥ यक्ष सिद्ध गंधर्व विद्याधर ॥ गुह्यक पिशाच भूत निशाचर ॥ अप्सरा आणि उरगही ॥ २५ ॥ ह्यां पासूनि मज मृत्यु नसावा ॥ हाचि उत्तम वर त्वां द्यावा ॥ तैसेंचि अन्यही ब्रह्मदेवा ॥ याचितों तें ऐक तूं ॥ २६ ॥ प्रत्यक्ष आपुल्या दुहितेसी ॥ अंगसंगें भोगावयासी ॥ मोहें इच्छा होऊनि मानसीं ॥ बहुत तियेसी प्रार्थीन ॥ २७ ॥ आणि जरी ती न होय मद्वश ॥ तरीच मृत्यु व्हावा अवश्य ॥ यावीण इतर कारण विशेष ॥ नसावें मम मरणासी ॥ २८ ॥ तें ऐकतां तथास्तु ह्मणोन ॥ गुप्त झाला चतुरानन ॥ भारद्वाजा तो दशवदन ॥ राक्षस दारुण अत्यंत ॥ २९ ॥ यास्तव तो अभिमानें सतत ॥ नर हे आपुले भक्ष्य पदार्थ ॥ ऐसें मानूनि अंतरांत ॥ तयां तृणवत लेखीतसे ॥ ३० ॥ याचमुळें वरयाचनासमयीं ॥ आपणा मानवांपासूनिही ॥ मृत्यु न होणें एतद्विषयीं ॥ ब्रह्मयासि नाहीं प्रार्थियेलें ॥ ३१ ॥ असो तो दशवदन राक्षस ॥ आदीच बहु बलाढ्य तामस ॥ त्यावरी पावतां तैशा वरास ॥ दर्पें विशेष भरियेला ॥ ३२ ॥ स्वबाहुप्रतापें सकळ ॥ जर्जर केले लो-

टी. १ सर्वथा मृत्यु नसणें हें. २ कपटी. ३ सर्पही. ४ गवता प्रमाणें तुच्छ. ५ वर मागते वेळीं. ६ गर्वानें.

कपाळ ॥ इंद्रादि देवगण अखिल ॥ बंदिखानीं घातले ॥ ३३ ॥ सकळ त्रैलोक्य जिंकिलें ॥
स्वस्वाधीन करूनि घेतलें ॥ दैत्यदानवादिक सगळे ॥ केवळ झाले स्तुतिपाठक[1] ॥ ३४ ॥ वि-
श्वीं जी जी अत्युत्तम वस्त ॥ ती ती केली स्वहस्तगत ॥ बाहुप्रतापानळ प्रदीप्त ॥ सदा अ-
द्भुत विलसे पैं ॥ ३५ ॥ रणामाजी येईल संमुख ॥ ऐसा न ठेविला कोणी एक ॥ त्रैलोक्यवि-
जयी जगन्नायक[2] ॥ स्वयेंचि एक जाहला ॥ ३६ ॥ पुढं एकदां तो लंकाधिनाथ ॥ पावला
दंडकारण्याप्रत ॥ तें तेथें अग्निकल्प[3] बहुत ॥ महर्षि असत बैसले ॥ ३७ ॥ तयां देखोनि तो
रात्रिंचर[4] ॥ स्वांतरामाजी[5] करी विचार ॥ ह्यांसि जिंकिल्याविण साचार ॥ त्रैलोक्यविजयी मी
कैसा ॥ ३८ ॥ परी हे महात्मे तपोधन ॥ प्रलयाग्निपरी जाज्वल्यमान ॥ ह्यांसि वधितां आ-
पणालागुन ॥ कदापि कल्याण नव्हेच ॥ ३९ ॥ तरी आतां करावें काय ॥ ह्मणोनि दुरात्मा
चिंतिता होय ॥ तंव तच्चित्तीं दुष्ट अतिशय ॥ ऐसा उपाय आठवला ॥ ४० ॥ मग हातीं घे-
ऊनियां शर[6] ॥ ऋषीं संनिध गेला सत्वर ॥ ह्मणे हो तुह्मी सर्व मुनीश्वर ॥ तपस्वी थोर असांची
॥ ४१ ॥ परी मी सर्वजगाचा शास्ता ॥ तैसाचि आहें विजयभोक्ता ॥ ह्मणोनि तुह्मापासून
तत्वता ॥ विजय आतां इच्छिताहें ॥ ४२ ॥ तरी तो तुह्मी द्यावा मजसी ॥ ऐसें बोलूनि शरा
ग्रेसीं ॥ सर्व ऋषींच्या शरीरांसी ॥ क्षतें सायासीं केलीं पां ॥ ४३ ॥ आणि बलात्कारें तयां-
तून ॥ किंचित्किंचित् रक्त काढून ॥ तेथील एक कलश घेऊन ॥ तयांत ठेविता जाहला



टी. १ स्तुति करणारे. २ जगाचा धनी. ३ अग्नीप्रमाणें प्रखर तेजस्वी. ४ राक्षस. ५ त्याचे ( रावणाचे ) मनांत. ६ बाण.

॥ ४४ ॥ भारद्वाजा तो कोठील कलश ॥ तयाचा सांगतों इतिहास ॥ अरे भगवदिच्छा ती विशेष ॥ बलवत्तर असे पैं ॥ ४५ ॥ स्वयें चिंतित असोनि एक ॥ ईश्वरेच्छें घडे आणिक ॥ पहा तेथें गृत्समदनामक ॥ द्विजवर एक राहतसे ॥४६॥ तयासि झाले शतनंदन ॥ परी एकही नाहीं कन्यारत्न ॥ आणि स्त्रियांसितों कन्येचीच पूर्ण ॥ आवड असे साचार ॥ ४७ ॥ ह्मणोनि तत्पत्नीनें कन्यार्थ ॥ प्रार्थिलें त्या द्विजवराप्रत ॥ तेणें विचारूनि स्वांतरांत ॥ उपाय अद्भुत योजिला ॥४८॥ लक्ष्मीच स्वकन्या व्हावी ह्मणोन ॥ नित्य गोदुग्ध अभिमंत्रून ॥ दर्भाग्रें बिंदुबिंदुप्रमाण ॥ कलशीं नियमें स्थापितसे ॥ ४९ ॥ तो अभिमंत्रितदुग्धकलश ॥ सुरक्षित असोनि होमशाळेस ॥ गृत्समदऋषि तेदिवस ॥ गेला वनास समिधांसी ॥ ५० ॥ तेच दिनीं दैवयोगें तेथ ॥ रावण येऊनि त्या कलशांत ॥ मुनिजनाचें घालोनि रक्त ॥ घेऊनि स्वगृहा पावला ॥ ५१ ॥ आपुली कांता मंदोदरी ॥ कलश दीधला तियेच्या करीं ॥ आणि तो ह्मणे कीं वो सुंदरी ॥ रक्षण करीं तूं ह्याचें ॥ ५२ ॥ अग ह्या कलशांतील रुधिर ॥ विषाहूनिही आहे प्रखर ॥ भक्षण करितां खरोखर ॥ कल्याण नव्हे त्रिशुद्धीं ॥ ५३ ॥ तरी हें त्वां स्वयें न खावें ॥ आणि दुजासही कदा न द्यावें ॥ महामुनिजनांचें हें आंघवें ॥ शोणित असे दुर्जर ॥ ५४ ॥ तें ऐकोनियां मंदोदरी ॥ कलश घेऊनि गेली मंदिरीं ॥ एकांतीं दृढमंजूषे-

टी. १ दुसरें. २ शंभर पुत्र. ३ त्याच्या ( गृत्समदाच्या ) स्त्रियेनें. ४ आपल्या अंतःकरणांत. ५ गाईचें दूध. ६ खचित, काळत्रयीं ( भूत भविष्य वर्तमानीं ). ७ सर्व. ८ रक्त. ९ जिरण्यास कठिण. १० मजबूत पेटींत. * खरोखर, खचित.

भीतरी ॥ जतन करूनि ठेविला ॥ ५५ ॥ असो ऐसा तो दशवदन ॥ त्रैलोक्यविजयी झाला जाण ॥ पुढें आपुल्या क्रूरत्वें तयान ॥ त्रैलोक्य संपूर्ण त्रासिलें ॥ ५६ ॥ अत्यंतचि झाला मदोन्मत्त ॥ सद्विचार सोडिला समस्त ॥ जैसा कामातुर महिष मस्त ॥ तैसाचि सतत वर्ततसे ॥ ५७ ॥ देव दानव यक्ष किन्नर ॥ नाग सिद्ध गंधर्व विद्याधर ॥ इत्यादिकांच्या कन्यका सुंदर ॥ बलात्कारें हरूनियां ॥ ५८ ॥ तयांसंगें दिवसरजनीं ॥ नाना मादक पदार्थ सेवुनी ॥ अनेकआरामीं अनेक वनीं ॥ तल्लीन होउनी रमतसे ॥ ५९ ॥ तेणें तयासि क्षणमात्रही ॥ अन्य काज न सुचे हृदयीं ॥ राज्यकारभारादिक कांहीं ॥ स्वयें न पाही कदाच ॥ ६० ॥ हिमवान् मेरु विंध्यगिरिवर ॥ सत्य द्रोण सह्य मंदर ॥ इत्यादि महापर्वतांवर ॥ करी विहार सर्वदा ॥ ६१ ॥ एकेक संवत्सराभीतरीं ॥ एकदाही तो नये नगरीं ॥ लक्षावधि पर्णित सुंदरी ॥ सदा घरीं तळमळती ॥ ६२ ॥ त्यांमाजी जी मुख्य पट्टराणी ॥ मंदोदरीनामें सद्गुणखाणी ॥ महासती बत्तीसलक्षणी ॥ सर्व त्रिभुवनीं विख्यात ॥ ६३ ॥ तिला तें पतीचें दुर्वर्तन ॥ पाहूनि होय दुःख दारुण ॥ म्हणोनि नाना उपाय महान ॥ योजिले जाण तियेनें ॥ ६४ ॥ स्वमुखें तया प्रार्थिलें बहुत ॥ परमुखेंही बोधिलें सतत ॥ परी तो दुष्ट लंकानाथ ॥ नेणे मनांत स्वल्पही ॥ ६५ ॥ उखरभूमीसि पेरिलें धान्य ॥ तें कदा न येच उगवोन ॥ कीं गिरिमस्तं-



---

टी. १ रावण. २ चांगला विचार. ३ टोणगा ( रेडा). ४ अहोरात्र. ५ भांग, अफू, मद्य इत्यादि अंमली. ६ अनेक बागांत. ७ क्रीडा. ८ लग्न लाविलेल्या. ९ वाईट ( खडकी ) भूमीस. १० पर्वतावर. * वर्षामध्यें. × वाईट वर्तणूक.

कीं वर्षे घन[1] ॥ परी तेथें जीवन[2] न ठरेच ॥ ६६ ॥ कीं बधिरांसन्निध[3] केलें गाणें ॥ परी तो किंचिन्मात्रही नेणे ॥ कीं जन्मांधापुढें दर्पण[4] ठेवणें ॥ किंवा नाचणें व्यर्थ जेंवी ॥६७॥ कीं हरेंळ शिजवितां बहुकाळ ॥ कदापि न होतीच मवाळ ॥ कीं गुळीं ठेवितां निंबफळ ॥ गोड रसाळ नव्हेची ॥ ६८ ॥ कीं नित्य दुग्धें न्हाणिला वायस[6] ॥ परी तो न होयाचि राजहंस ॥ तैसा बहु बोधिला लंकेश ॥ परी तो मनास नाणी पैं ॥ ६९ ॥ अधिकाधिक नित्य नूतन[7] ॥ देवादिकन्या आणून ॥ नानोपवनीं[8] रात्रंदिन ॥ रममाण होतसे ॥ ७० ॥ मग ती मंदोदरी महासती[9] ॥ आपुल्यावर नाहीं पतीची प्रीती ॥ ऐसें जाणूनि दुःखित अती ॥ आत्म्याप्रती[*] निंदित ॥७१॥ आणि ह्मणे ज्या नारीसि कांत[10] ॥ फसवूनि वर्तंतो विपरीत ॥ तियेचें कुल रूप यौवन[11] जीवित॥ इत्यादि व्यर्थ सर्वही ॥ ७२ ॥ जीवर पतीची प्रीति नाहीं ॥ तियेसि धिक्कार जगाठायीं ॥ पतिप्रेमाविण अन्य कांहीं ॥ स्त्रियांसि नाहीं कारण ॥ ७३ ॥ दीपावांचून जैसें सदन[13] ॥ किंवा नासिकेवीण वदन[14] ॥ कीं बुबुळावीण नयन ॥ जैसे कदा न शोभती ॥ ७४ ॥ तैशी पतीच्या प्रेमावाचुनी ॥ कदापि न शोभे कामिनी ॥ ह्मणोनि मज हा जीव ठेवुनी ॥ काय भुवनीं[15] सार्थक ॥ ७५ ॥ तरी आतां आपण मरावें ॥ हेंचि दिसतें योग्य बरवें ॥ परी कारण काय योजावें ॥ ह्मणोनि अंतरीं चिंतित ॥ ७६ ॥ तंव तियेसि झालें स्मरण ॥ पूर्वीं रावणें कलशांतून ॥

---

टी. १ मेघ. २ पाणी. ३ बहिऱ्याजवळ. ४ आरसा. ५ पाकड, खडा. ६ कावळा. ७ नवीन. ८ नानाप्रकारच्या बगिच्यांत. ९ महापतिव्रता. १० पति. ११ तारुण्य. १२ वांचणें. १३ घर. १४ मुख. १५ जगांत. * आपल्या देहास किंवा जीवास.

विषाहूनिही अधिक दारुण[1] ॥ रक्त आणून दीधलेंसे ॥ ७७ ॥ तेंचि आतां प्यावें समस्त ॥ ह्मणजे जीव जाईल यथार्थ ॥ ऐसें इच्छूनियां त्वरित ॥ तिणें तें रक्त प्राशिलें ॥७८॥ भारद्वाजा ती रावण[2]-कांता ॥ मंदोदरी महापतिव्रता ॥ कर्तव्याकर्तव्यादिक[3] तत्वता ॥ चित्तीं सर्वथा जाणतसे॥७९॥ तथापि पतीचें नसतां प्रेम ॥ स्त्रियांसि दुःसह दुःख परम ॥ ह्मणोनि तियेनें ऐसें कर्म ॥ साहस परम आचरिलें ॥८०॥ परी ईश्वरेच्छा ती अद्भुत ॥ विपरीतही होय सुपरीत ॥ अरे तियेनें जें विप्र[4]-शोणित ॥ मृत्युप्राप्त्यर्थ प्राशिलें ॥ ८१ ॥ तें महालक्ष्म्याश्रितदुग्धानें[5] ॥ मिश्रित होतें या-कारणें ॥ मंदोदरीच्या उदरीं तयानें ॥ अग्निवत् गर्भ राहिला ॥ ८२ ॥ मग ती पतिव्रता सुं-दरी ॥ दशास्यरावणाची अंतुरी[6] ॥ विस्मयाविष्ट[7] होऊनि भारी ॥ विचार करी अंतरांत ॥ ८३ ॥ ह्मणे हें अद्भुत काय वर्तलें ॥ अहा कर्टकटा[8] काय त्वां केलें ॥ विषाहूनि तीक्ष्ण रक्त वाहिलें[9] ॥ ह्मणोनि प्राशिलें मरणार्थ ॥ ८४ ॥ परी यापासूनि अग्निसन्निभ[10] ॥ मम* उदरीं झाला गर्भ ॥ मद्भर्ता[11] तो देशांतरीं लांब ॥ बहुत दिन गेला असे ॥ ८५ ॥ देवादि[12] कन्यकां समवेत ॥ तिकडेचि सदा आहे क्रीडत ॥ ह्या एके वर्षांत त्याची संगत ॥ मज न घडली कदाही ॥ ८६ ॥ आतां मज गर्भिणीसि पाहून ॥ काय तो बोलेल पैं वचन ॥ आणि मीतों परम साध्वी[13] अ-

टी. १ भयंकर ( कठिण ). २ रावणाची स्त्री. ३ करावें काय न करावें काय इत्यादि. ४ ब्राह्मणांचें रक्त. ५ महालक्ष्मीच्या मंत्रानें अभिमंत्रिलेल्या दुग्धानें. ६ स्त्री. ७ आश्चर्ययुक्त. ८ हे प्रारब्धा, ब्रह्मदेवा. ९ तें (रावणानें आणून दिलेलें). १० अग्निसारखा तेजस्वी. ११ माझा पति. १२ देवादिकांच्या मुलींबरोबर. १३ पतिव्रता. * माझ्या.

सोन ॥ काय कीं उत्तर देऊं तया ॥ ८७ ॥ घडलें वर्तमान कथितां ॥ कोणीच न मानील सत्यता ॥ महाकपटी सर्व योषिता[1] ॥ ऐसें सर्वथा प्रसिद्ध ॥८८॥ तरी आतां करावें काय ॥ कवण योजणें येथें उपाय ॥ प्रारब्धयोग हा दुर्निवार्य[2] ॥ रक्षिता होय मज कोण ॥ ८९ ॥ ऐसी चिंताक्रांत अंतरीं ॥ अति शुष्क[3] झाली मंदोदरी ॥ मग तीर्थयात्रेच्या मिषें[4] सत्वरी ॥ निघे देशांतरीं जावया ॥९०॥ सुंदर विमानीं बैसून ॥ कुरुक्षेत्रीं पावली जाण ॥ तेथें पोटींचा गर्भ काढून ॥ भूमींत गाडून टाकिला ॥ ९१ ॥ मग सरस्वतीच्या जळांत ॥ स्नान सारूनि यथास्थित ॥ पुनश्च आली स्वगृहाप्रत ॥ चिंता समस्त निरसली ॥९२॥ ऐसें केलें साहस कर्म ॥ तें कोणासिही न कथिलें वर्म ॥ गोपिजे[5] रहःकृत[6] काम ॥ हाचि धर्म चतुरांचा ॥ ९३ ॥ असो कांहीं लोटतां काळ ॥ विदेहदेशीं मेदिनीपाळ[*] ॥ जनकनामा सद्धर्मशीळ ॥ झाला केवळ राजर्षी[7] ॥ ९४ ॥ तो कुरुक्षेत्रासि जाउनी ॥ तेथें यज्ञ करावा ह्मणोनी ॥ पुरोहिताच्या[8] अनुमतेंकरुनी ॥ पवित्र मेदिनी[9] योजित ॥ ९५ ॥ विशाळस्थळें पाहिलीं बहुत ॥ परी एकही न भरलें मनांत ॥ पूर्वीं मंदोदरीनें जेथ ॥ गर्भ गुप्त गाडियेला ॥ ९६ ॥ तें असोनियां सम सर्वत्र ॥ यज्ञयोग्य योजिलें पवित्र ॥ अहो भगवन्माया विचित्र ॥ जाणील चरित्र कोण तिचें ॥ ९७ ॥ असो मग तो जनकराव ॥ स्वर्णलांगल[10] घेऊनि अभिनव[11] ॥ यज्ञार्थ ती मेदिनी सर्व ॥

---

टी. १ स्त्रिया. २ निवारण्यास कठिण. ३ कृश (क्षीण). ४ कपटानें (निमित्तानें). ५ गुप्त राखावें. ६ एकांतीं केलेलें. ७ राजा. ८ उपाध्यायाच्या. ९ भूमि. १० सोन्याचा नागर. ११ नवा. * पृथ्वीचें पाळण करणारा (राजा).

स्वयें नांगरूं लागला ॥ ९८ ॥ तंव त्या यज्ञभूमींतून ॥ स्वर्णलांगलसीतेसि लागून ॥ प्रदीप्ताग्निवत जाज्वल्यमान ॥ कन्यारत्न प्रगटलें ॥ ९९ ॥ तों गगनांतून तियेवरुती ॥ पुष्पवृष्टि जाहली महती ॥ तें महदाश्चर्य पाहूनि नृपती ॥ विस्मित अती जाहला ॥१००॥ आणि आतां पुढें करावें कायी ॥ मूढता पावला एतद्विषयीं ॥ तों अवचित गगनाठायीं ॥ स्पष्ट वाणी उद्भवली ॥ १०१ ॥ ह्मणे गा सकळराजन्यमान्या ॥ विदेहाधिपते जनका धन्या ॥ ही ज्वलनार्कसम दिव्य कन्या ॥ सत्वर सुज्ञा स्वीकारीं ॥ १०२ ॥ तूं इयेचें पालन करीं ॥ महत्कार्य होईल तव मंदिरीं ॥ इयेच्या योगें जगाचें सत्वरी ॥ कल्याण निर्धारीं होणार ॥ १०३ ॥ तरी शंका न धरीं हृदयीं ॥ यज्ञ संपादीं लवलाहीं ॥ कन्या उदेली यज्ञ भूठायीं ॥ हें तुज कांहीं विघ्न नव्हे ॥ १०४ ॥ हलाँचे फाळा नाम सीता ॥ तियेपासूनि ही उदेली दुहिता ॥ ह्मणोनि इयेचें नाम सीता ॥ ऐसेंच तत्वता होईल ॥ ५ ॥ तरी इयेसि दुहिता मानीं ॥ सर्व ह्मणतील तव नंदिनी ॥ ऐसें बोलोनि गगनवाणी ॥ झाली तत्क्षणीं तिरोहितें ॥ ६ ॥ तें ऐकूनियां जनकभूप ॥ जाहला परम आनंदरूप ॥ सत्वर द्रव्य वेंचूनि अमूप ॥ यज्ञयूप रोंविला ॥ ७ ॥ ज्या ज्या काळीं जें जें उक्त ॥ तें तें केलें सर्व विधियुक्त ॥ न्यूनाधिक न करितां किंचित ॥ यज्ञ समस्त संपादिला ॥ ८ ॥ मग घेऊनियां त्या सीतेसी ॥ जनक गेला स्वस्थळा-

टी. १ सुवर्णनागराचे फाळास. २ मोठी. ३ सर्व क्षत्रियांनीं मानविलेल्या. ४ अग्नि व सूर्य यांच्या सारखी तेजस्वी. ५ खचित. ६ सत्वर. ७ नागराच्या ८ कन्या. ९ खरोखर. १० आकाशवाणी. ११ गुप्त. १२ अगणित. १३ यज्ञस्तंभ.

सी ॥ सकळ राणियांलागीं तियेसी ॥ आनंदें देता जाहला ॥ ९ ॥ ती ज्वलनार्कसम दिव्य क-
न्या ॥ स्वरूपसुंदर सर्वमान्या ॥ पाहूनि सर्व त्या जनकराण्या ॥ परमाल्हाद पावल्या ॥११०॥
ज्यात्या तियेसि घेऊनि सत्वरी ॥ प्रेमें बैसविती स्वांकांवरी ॥ आपुलीच कीं ही औरस कुमा-
री ॥ ऐसें अंतरीं मानित ॥ ११ ॥ तियेवरुती सर्वांचें प्रेम ॥ तत्काळ जडलें अनुपम ॥ दि-
वसेंदिवस शुक्लशशिसम ॥ सीता वाढूं लागली ॥ १२ ॥ तेणें जनक अति हर्षित ॥ असो
भारद्वाजा म्यां तुजप्रत ॥ हें सीताजन्माचें यथास्थित ॥ कारण समस्त कथियेलें ॥ १३ ॥
यासि जे भक्तिभावें ऐकती ॥ ते सर्वपापनिर्मुक्त होती ॥ आणि अखंड संतति संपत्ती ॥ पा-
वती जाण निश्चयें ॥ १४ ॥ हें सीताजन्माचें आख्यान ॥ असे लोकोत्तर पावन ॥ जेकां नर
करिती श्रवण ॥ कीं दुजालागुन ऐकविती ॥ १५ ॥ ते महापुण्यवंत जगतीं ॥ सर्वपापनिर्मु-
क्त होती ॥ श्रीरामकांता तयाच्या निकेतीं ॥ करी वसती सर्वदा ॥ १६ ॥ संतति संपत्ति सर्वै-
श्वर्य ॥ तयांच्या गृहीं अखंडित होय ॥ आध्यात्मिकादि तापत्रय ॥ तत्काळ होय देशधडी
॥ १७ ॥ इह लोकीं सर्वसुखसंपन्न ॥ अंतीं पावती मोक्षसदन ॥ पुनश्च ह्या मृत्युलोकीं जनन ॥
नव्हेचि जाण त्रिशुद्धीं ॥ १८ ॥ ऐसें हें परम पावन ह्मणोन ॥ सर्वदा कीजे श्रवणपठण ॥ ऐ-
सें वाल्मीकिमुनि आपण ॥ शिष्यासि कथिता जाहला ॥ १९ ॥ आतां पुढें श्रीरामचंद्रानें ॥

टी. १ परमानंद. २ आपल्या मांडीवर. ३ पोटची ४ शुक्लपक्षींच्या चंद्राप्रमाणें. ५ अद्भुत. ६ घरीं. ७ मनास दुःख होणें इत्यादि. ८ समूळ नाहींसें. ९ जन्म. १० काळत्रयीं, खचित. + अग्नि व सूर्य यांप्रमाणे तेजस्वी.

विश्वरूप दाविलें भार्गवाकारणें॥ ऐसें श्रीमद्वाल्मीकिमुनीनें॥भारद्वाजासि कथिजेल॥१२०॥ ती कथा परम पावन ॥ ह्मणोनि मी रघुनाथनंदन ॥ सज्जनश्रोत्यांसि हस्त जोडून ॥ ऐकि-ण्यालागुन प्रार्थितों ॥ २१ ॥ स्वति श्रीमदद्भुतरामविजय ॥ वाल्मीकीयाद्भुतोत्तरकांडहृद-य ॥ ऐंकोत सज्जन होऊनि तन्मय ॥ नवमाध्याय मधुर हा ॥ १२२ ॥ ॥छ॥ ॥छ॥



॥ इति नवमाध्यायः समाप्तः ॥ ९ ॥



श्रीगणेशायनमः ॥ ॥ जयजयाजी कैवल्यदायका ॥ जय अनंतब्रह्मांडनायका ॥ जय वेदे-
वेद्या वेदरक्षका ॥ विश्वव्यापका विश्वंभरा ॥ १ ॥ पुराणपुरुषा परात्परा ॥ पद्मनयना पद्मजा-
वरा ॥ शेषशयना क्षीरांब्धिविहारा ॥ परमोदारा जगद्गुरू ॥ २ ॥ तूं अज अव्यय सनातन
एक ॥ निश्चळ निर्गुण निरुपाधिक ॥ परी सज्जना ताराया देख ॥ अवतार अनेक घेसी पैं
॥ ३ ॥ तुझें यथार्थ करावया वर्णन ॥ ब्रह्मांडोदरीं समर्थ कोण ॥ चतुर्मुख पंचास्य षडानन ॥
आणि सहस्रवदन तटस्थ ॥ ४ ॥ बहु भागल्या सकळ श्रुती ॥ शेवटीं ह्मणती नेतिनेती ॥
तेथें मम मंदाची मती ॥ कैशी गती पावेल ॥ ५ ॥ हेंच जाणोनियां भगवंता ॥ विशेषें तुज-
ला न वर्णितां ॥ केवळ चरणीं ठेवोनि माथा ॥ जोडूनि हस्तां विनवितों ॥ ६ ॥ तरी कृ-
पा करीं गा श्रीहरी ॥ पुढिल कथा बोलवीं बरी ॥ रसाळ चालो मम वैखरी ॥ श्रोते अंतरीं
निवोत ॥७॥ तूं वर्षतां करुणाघन ॥ कथामृतौघ चालेल पूर्ण ॥ पूर्वाध्यायीं सीताजन्मनिदान ॥
यथोक्त संपूर्ण कथियेलें ॥ ८ पुढें अत्यद्भुत कथानक ॥ श्रोतीं ऐकिजे सकळिक ॥ आदिक-
वि श्रीवाल्मीक ॥ भारद्वाजासी सांगती ॥ ९ ॥ अगा मुनिवरा ती सीता ॥ पुढें विवाहा योग्य

---

टी. १ मोक्ष देणारा. २ वेदांनींच जाणण्यास योग्य. ३ विश्वाचें पोषण करणारा. ४ लक्ष्मीच्या पति. ५ क्षीरसमुद्रांत क्रीडा करणारा. ६ उत्पत्तिरहित. ७ नाशरहित. ८ निरंतर असणारा. ९ ब्रह्मांडांत. १० चार तोंडाचा (ब्रह्मा). ११ पंचमुख (शिव). १२ साहामुखी ( कार्तिक स्वामी ). १३ सहस्रमुखांचा (शेषसर्प). १४ असा नव्हे असा नव्हे. १५ वाणी. १६ दयेचा मेघ. १७ कथारूप अमृताचा पूर. १८ सीतेचे जन्माचें कारण. * जुनाट पुरुषा (आदिनारायणा).+ परमश्रेष्ठा, मायेच्या पलीकडच्या.

होतां ॥ जनकें स्वयंवर मांडूनि सुतां[1] ॥ श्रीरघुनाथा अर्पिली ॥ १० ॥ मिथुळानगरीं चार दिवस ॥ लग्नसोहळा झाला विशेष ॥ जनकें सर्व वऱ्हाडियांस यथायोग्य पूजिलें ॥ ११ ॥ मग सीतेसह रघुनंदन[2] ॥ सर्व बंधूंसि सवें घेऊन ॥ दशरथादिकांसहवर्तमान ॥ अयोध्ये जावया निघाला ॥ १२ ॥ चतुरंगिणी[3] चालली सेना ॥ गणती नाहीं शिबिकायाना[4] ॥ हेमांबरध्वजपताका[5] नाना ॥ दिव्य नूतना[6] तळपती ॥ १३ ॥ तूर्यादि[7] नाना वाद्यें गर्जत ॥ सकळजनां आनंद बहुत ॥ ऐशारीती श्रीरघुनाथ ॥ मार्गे क्रमित चाललासे ॥ १४ ॥ तों महाप्रतापी भगवान ॥ परशुराम रेणुकानंदन[8] ॥ जेणें स्वबाहुबळेंकरून ॥ क्षत्रिय संपूर्ण निवटिले ॥ १५ ॥ तो कर्णोपकर्णीं[9] श्रीरामाचें ॥ विवाहकौतुक ऐकूनि साचें ॥ वीर्य पाहावें दाशरथीचें ॥ ह्मणोनि सत्वर उठिन्नला ॥ १६ ॥ जें क्षत्रियांतकर[10] प्रचंड ॥ तें हातीं घेतलें दिव्य कोदंड[11] ॥ जैसा कल्पांतकाळींचा मार्तंड[12] ॥ तैसा उदंड धांवला ॥ १७ ॥ आणि ज्या मार्गें श्रीरघुनाथ ॥ जात होता अयोध्येप्रत ॥ त्याच मार्गें रेणुकासुत ॥ अवचित संमुख जाहला ॥ १८ ॥ हातीं घेऊनि शरासन ॥ उभा ठाकला भृगुनंदन[13] ॥ ऐसें पाहतां रामें हंसून ॥ बोलणें मधुर आरंभिलें ॥ १९ ॥ ह्मणे गा मुनिश्रेष्ठा भृगुसुता[14] ॥ तूतें स्वागत[15] असो सर्वथा ॥ साधूं कोणत्या तव कार्यार्था ॥ तें

टी. १ कन्या (सीता). २ रामचंद्र. ३ रथ, हत्तिस्वार, घोडेस्वार आणि पायदळ मिळून चार प्रकारचें सैन्य. ४ पालख्यांला. ५ भरजरी ध्वजपताका. ६ नव्या. ७ सूर सनया वगैरे. ८ रेणुकेचा पुत्र. ९ कानोकानी (ऐकिव बातमी). १० क्षत्रियांचा नाश करणारें. ११ धनुष्य. १२ सूर्य. १३ परशुराम. १४ परशुरामा. १५ चांगलें येणें (यावें यावें असें).

मज आतां आज्ञापिजे ॥२०॥ ऐसें श्रीरामाचें वचन ॥ ऐकूनियां तो भृगुनंदन ॥ ह्मणे राघवा स्वागतेंकरून ॥ मज काय कर्तव्य असे ॥२१॥ अरे मी क्षत्रियकुलांतक[1] ॥ निःक्षत्र[2] केली पृथ्वी सकळिक ॥ युद्धीं ठाकेल मम संमुख ॥ ऐसा एक वीर नसे ॥ २२ ॥ सर्व क्षत्रियकुळाचा काळ ॥ हें मम धनुष्य पाहें सोज्वळ ॥ राघवा तुज शक्ति असेल ॥ तरी यासी गुण[3] चढवीं ॥ २३ ॥ तें ऐकूनियां सीतापती ॥ ह्मणे मुनिवरा तूं आज्ञाप्रती ॥ निंदापात्र कराया जगतीं ॥ योग्य निरुती नव्हेस ॥ २४ ॥ विप्रांविषयीं बाहुवीर्यानें ॥ वाटेल तैसें बडबडणें ॥ हा अधम धर्म आचरणें ॥ क्षत्रियांचें कर्म नव्हे ॥ २५ ॥ त्याहूनिही तें विशेषें पाहीं ॥ इक्ष्वाकूंचें[4] नाहींच नाहीं ॥ तरी विप्रेंद्रा ऐसें कदाही ॥ विपरीत कांहीं न वदावें ॥२६॥ ऐशी रामाची ऐकूनि वैखरी[5] ॥ भार्गव ह्मणे रे पुरे करीं ॥ नको नको उपदेशाची परी[6] ॥ धनुष्य सत्वरी घेईं हें ॥२७॥ ऐसें अति उद्धट वचन ॥ ऐकूनि कोपला सीतारमण ॥ कल्पांतींचा तीक्ष्ण कृशान[7] ॥ तैसे नयन जाहले ॥ २८ ॥ आणि पुढें होऊनि तत्काळ ॥ त्या परशुरामाच्या हस्तांतील ॥ तें क्षत्रियांतकर सोज्वळ ॥ चाप[8] विशाळ घेतलें ॥ २९ ॥ सहज लीलामात्रेंकरून ॥ गुण चढविला त्यालागून ॥ सवेंचि प्रत्यंचा[9] ओढून ॥ शब्द दारुण उठविला ॥३०॥ तो शब्द अत्यंत कठोर ॥ अशनि[10]पातासमान घोर ॥ तेणें नाकीं[11] सकळ निर्जर[12] ॥ सभयांतर जाहले ॥३१॥

---

टी. १ क्षत्रियकुळाचा नाश करणारा. २ क्षत्रियरहित. ३ धनुष्याची दोरी. ४ इक्ष्वाकूच्या वंशजांचें (आमचें). ५ वाणी. ६ प्रकार. ७ अग्नि. ८ धनुष्य ९ धनुष्याची दोरी. १० वज्रपातासारखा, वीज पडावी तसा. ११ स्वर्गांत. १२ देव.

सर्व धरणी थरारली ॥ कूर्मे पृष्ठी सरसावली ॥ दिग्गजांचीं टाळीं बैसलीं ॥ त्रास पावलीं सर्व भूतें ॥ ३२ ॥ पुष्पवृष्टीपरि गगनांतुनी ॥ नक्षत्रें रिचवलीं मेदिनीं ॥ असो मग तो जानकीजानी ॥ भार्गवालागुनी बोलत ॥ ३३ ॥ मुनिवरा हें तव कोदंड ॥ सज्य केलें पाहें प्रचंड ॥ आतां दुसरें त्वत्कार्य उदंड ॥ काय करूं आज्ञापीं ॥ ३४ ॥ तें ऐकतां भार्गवें तत्क्षण ॥ रामासि दीधला दिव्य बाण ॥ आणि कथिलें हा चापालागुन ॥ लावूनि आकर्ण ओढीं तूं ॥ ३५ ॥ तें ऐकूनियां रामचंद्र ॥ पदें ताडिजे उरगद्र ॥ कीं प्रळयकाळींचा महारुद्र ॥ तैसाचि अत्युग्र कोपला ॥ ३६ ॥ आणि ह्मणे रे तूं ऋषिपुत्र ॥ तुजवरी धरावें आह्मीं छत्र ॥ परी तव कर्म अपवित्र ॥ असे सर्वत्र प्रसिद्ध पैं ॥ ३७ ॥ तथापि तूं विप्र ह्मणोन ॥ ऐकोनि घेतों हें दुर्भाषण ॥ आणि न करितां तुज शासन ॥ क्षमाचि पूर्ण करिताहें ॥ ३८ ॥ पितामहाच्या प्रसादेंसीं ॥ सर्व क्षत्रियांहूनि विशेषीं ॥ पावोनि महाप्रतापासी ॥ उग्रदर्पेंसीं भरलास ॥ ३९ ॥ ह्मणोनचि तूं मजलागुन ॥ बोलसी ऐसें हें दुर्भाषण ॥ तव ज्ञानचक्षु गेला फुटोन ॥ अज्ञासमान झालास ॥ ४० ॥ यास्तव मी तो देतों तुजसी ॥ स्वस्वरूपें पाहें मजसी ॥ ऐसें बोलूनि रामें तयासी ॥ दिव्यदृष्टी दीधली ॥ ४१ ॥ मग तो विप्र भृगुनंदन ॥ अंतरीं पावला समाधान ॥ आणि श्रीरामाच्या शरीरांत पूर्ण ॥ त्रिभुवन पाहता जाहला ॥ ४२ ॥ द्वादशादित्य अष्ट वसु रुद्र ॥ साध्यदेव मरुद्गण इंद्र ॥ पितृगण हुताशन खगेंद्र ॥ ग्रहगण चंद्र नक्षत्रें ॥ ४३ गंधर्व अप्सरा



टी. १ कानटाळीं. २ भूमीवर. ३ सीतेचा पति (राम). ४ तुझें कार्य. ५ मोठा सर्प. ६ ब्रह्मदेवाच्या. ७ भयंकर गर्वानें. ८ ज्ञानदृष्टि. ९ अग्नि. १० गरुड. * धनुष्यास. × कानापर्यंत. + भृगुवंशांत उत्पन्न झालेला ( परशुराम ).

यक्ष किन्नर ॥ सिद्ध चारण विद्याधर ॥ गुह्यक पिशाच निशाचर ॥ दैत्य दानव सर्वही ॥४४॥
अठ्यांशीं सहस्र ऋषिगण ॥ सनकादि ब्रह्मभूत[1] ब्राह्मण ॥ नारदादि देवर्षिजन ॥ साठसहस्र वा-
लखिल्य ॥४५॥ सोपनिषद[2] षडंगवेद[3] ॥ यज्ञांसह वषट्कार विशुद्ध ॥ ऋक् यजुः साम धनुर्वेद ॥
वारिदवृंद[4] सौदामिनी[5] ॥ ४६ ॥ लहान थोर नद्या ओहळ ॥ वापी[6] कूप तडाग[7] सजळ ॥ नद
नदीनाथ[8] सकळ ॥ तीर्थें निर्मळ निखिलही ॥४७॥ द्वीपें वर्षें गिरि पाषाण ॥ नगरें गांवें क्षेत्रें पावन ॥
वल्ली औषधी वृक्ष गहन ॥ चौऱ्यांशीं लक्ष जीवयोनी ॥४८॥ इत्यादि सकळ वस्तुजात[+] ॥ भार्गवें
देखिलें रामदेहांत ॥ भारद्वाजमुने मी तुजप्रत ॥ काय बहुत सांगूं पैं ॥४९॥ अरे जें चतुर्दशभुवना-
त्मक ॥ बहुविशाळ विश्व सकळिक ॥ तेंचि रामाच्या आनखशिक[9] ॥ देहीं भार्गवें पाहिलें ॥५०॥
मग श्रीरामें स्वबळेंकरून ॥ तो भार्गवदत्त[10] पूर्वोक्त बाण ॥ तयाचेच चापीं[11] योजून ॥ आकर्ण[12]
ओढून सोडिला ॥ ५१ ॥ तो सायक[13] अति प्रचंड ॥ जैसा प्रत्यक्ष काळदंड ॥ किंवा कल्पां-
तींचा मार्तंड[14] ॥ तैसा चमकत चालला ॥ ५२ ॥ तैं सहस्र विजा कडकडती ॥ तैसे शब्द उ-
देले जगतीं ॥ थरारली सकळ क्षिती[15] ॥ उल्का[16] पडती क्षणक्षणा ॥५३॥ भ्रमू लागलें मेघमं-
डळ ॥ धुरोळा उडतसे विपुळ ॥ दिग्गजही झाले व्याकुळ ॥ दिशा सकळ कोंदाटल्या ॥५४॥

---

टी. ब्रह्मत्वास पावलेले. २ उपनिषदांसहित. ३ शिक्षा, ज्योतिष, कल्प, व्याकरण, छंद आणि निरुक्त या साहा अंगांनीं युक्त वेद. ४ मेघांचा समुदाय. ५ वीज. ६ पुष्करणी ( तळीं). ७ तळें. ८ समुद्र. ९ पायांच्या नखांपासून शेंडीपर्यंत. १० परशुरामानें दिलेला. ११ धनुष्यास. १२ कानापर्यंत. १३ बाण. १४ सूर्य. १५ पृथ्वी. १६ विजा. + सर्व पदार्थमात्र.

प्रचंड सुटला प्रभंजन ॥ वृक्ष पडती उन्मळोन ॥ पक्ष्यांसि पक्षी अडखळून ॥ गगनांतून रिच-वती ॥ ५५ ॥ सैरावैरा पशु धांवती ॥ कडेकपाटीं जाऊनि लपती ॥ नरांची झाली कैशी ग-ती ॥ ती मज निरुती न वर्णवे ॥ ५६ ॥ समीप घेऊनि मुलेंबाळें ॥ ठांयींच बैसले स्त्रियांचे पाळे ॥ ह्मणती आज हें विश्व सगळें ॥ बुडोनि न कळे जातें कीं ॥ ५७ ॥ अकाळप्रळय कीं हा आला ॥ ऐसा संशय सर्वांसि झाला ॥ तंव तो बाण वेगें आंगळा ॥ हृदयीं झोंबला भा-र्गवांचे ॥ ५८ ॥ आणि तयासि विव्हळ करुनी ॥ तेजमात्र हिरूनि घेउनी ॥ पुनश्च दाशरथी-प्रति येउनी ॥ देदीप्यमान राहिला ॥ ५९ ॥ तों हिकडे रेणुकानंदन ॥ विव्हळ पडला हो-ता जाण ॥ तो पुनश्च चेतना पावून ॥ सप्राण होऊनि उठिन्नला ॥ ६० ॥ आणि श्रीरामश-रीरीं जें वहिलें ॥ विश्वरूप होतें पाहिलें ॥ तेणें हा विष्णूच ऐसें चांगलें ॥ ज्ञान जाहलें तया-सी ॥ ६१ ॥ ह्मणोनि तो रेणुकानंदन ॥ त्या रामस्वरूपविष्णूलागुन ॥ अनन्यभावें कर जो-डून ॥ प्रर्णाम करिता जाहला ॥ ६२ ॥ मग श्रीरामचंद्रें तयासी ॥ अनुज्ञा दीधली जावया-सी ॥ तैं तो भार्गव तपोराशी ॥ महेंद्रगिरीसी पावला ॥ ६३ ॥ आणि तेथेंचि भयें वसिन्नला ॥ विनीतपणें वर्तूं लागला ॥ पुढें एकवर्षं लोटतां तेंथे स्थळा ॥ पिता पातला जमदग्नी ॥ ६४ ॥ तंव तो प्रतापी भृगुनंदन ॥ समूळ तेजोहीन होऊन ॥ आणि सकळ मदंही जाऊन ॥ दुःखित



टी. १ वायु. २ खरोखर. ३ जागच्याजागीं. ४ अधिक. ५ परशुरामाच्या. ६ परशुराम. ७ तें ( पूर्वीं सांगितलेलें ). ८ नमस्कार. ९ आज्ञा. १० त्या ( महेंद्र पर्वतीं ). ११ गर्वही. * समुदाय ( थवे ). + नम्रतेनें, न्यायानें.

पूर्ण बैसलासे ॥ ६५ ॥ तया पाहूनियां तो तत्पिता ॥ ह्मणे रे परशुरामा मम सुता ॥ तूं त्या रामरूपी रमानाथा ॥ भेटूनि कृत्य केलेंसि जें ॥ ६६ ॥ तें सर्वथा योग्य नाहीं ॥ पाहा तो राम त्रैलोक्याठायीं ॥ मान्य पूज्य सकळांसिही ॥ सर्वदाही असे पां ॥ ६७ ॥ तरी पुत्रा तुज सांगतों एक ॥ वधूसरकृतालयानामक ॥ पुण्यपावनी अलौलिक ॥ नदी एक आहे जी ॥ ६८ ॥ तियेप्रति तूं जाई सत्वरी ॥ तेथील तीर्थीं स्नानादि करीं ॥ तेणें तुज पुनश्च सांजिरी ॥ तेजःप्राप्ति होईल ॥ ६९ ॥ अरे तव पितामहाचा तात ॥ जो भृगुऋषी सर्व विख्यात ॥ पूर्वकल्पामाजी जेथ ॥ तपस्या बहुत आचरला ॥७०॥ तें दीप्तोदनाम तीर्थ पवित्र ॥ तेजःप्रद तेथें आहे विचित्र ॥ यास्तव पुत्रा जाऊनि तत्र ॥ किंचिन्मात्र वास करीं ॥ ७१ ॥ ऐशी पित्याची ऐकूनि वाणी ॥ परशुराम गेला तये स्थानीं ॥ पितृवचनाप्रमाणें ह्मणी ॥ सत्कर्माचरणीं प्रवर्तला ॥ ७२ ॥ त्या योगें तो रेणुकातनुज ॥ पुनश्च पावोनि पूर्ववत् तेज ॥ जैसा कां विलसे ग्रहराज ॥ तैसा शोभूं लागला ॥७३॥ भारद्वाजा तूं मम छात्र ॥ सर्वांहूनिही प्रीतिपात्र ॥ ह्मणोनि तुज हें परम पवित्र ॥ श्रीराम चरित्र कथिलें म्यां ॥७४॥ यासि ऐकतील जे नर कोणी ॥ ते सर्व पापनिर्मुक्त होउनि ॥ इहलोकीं सर्व सुख भोगुनी ॥ विष्णुसदनीं पावतील॥७५॥ असो सिंहावलोकनन्यायेंसीं ॥ चित्त द्यावें पूर्वकथेसी ॥ भार्गव वंदूनि रामाप्रेसी ॥ महेंद्रगि-

टी. १ त्याचा ( परशुरामाचा ) पिता. २ रामरूप लक्ष्मीपतीस. ३ सुंदर. ४ आजाचा. ५ तेज देणारें. ६ तेथें. ७ परशुराम. ८ सूर्य. ९ शिष्य. १० वैकुंठीं. ११ जसा सिंह पुढें जातो आणि पुनः मागें फिरून पाहतो त्या न्यायानें.

रीसी पावला ॥ ७६ ॥ आणि तो भार्गवाचा अतिशय ॥ रामचंद्रकृतपराजय ॥ पाहतां दशरथादिक क्षत्रिय ॥ सर्व निर्भय जाहले ॥ ७७ ॥ मग तो भगवान् जानकीजानी[1] ॥ जानकीचा धरूनि पाणी[2] ॥ पुनश्च रथारूढ होउनी ॥ हर्षें तेथुनी चालला ॥ ७८ ॥ सूत[3] मागध[4] बंदी[5] स्तवित ॥ निर्जरगण पुष्पें वर्षत ॥ सर्वपरिवारासमवेत ॥ मार्ग क्रमित हळुहळू ॥ ७९ ॥ अयोध्यापट्टणासंनिधानीं ॥ येऊनि पोंचला सीताजानी ॥ वर्तमानकळतां प्रधानांनीं ॥ राजधानी[6] शृंगारिली ॥८०॥ ठायीं ठायीं अत्युच्च गुढ्या ॥ उभारिल्या बहुसुरवाड्या[7] ॥ श्रीफळांच्या[8] सुंदर पेंड्या ॥ बहु बांधिल्या तोरणार्थ ॥८१॥ चंदनकुंकुमांचे[9] सडे ॥ मार्गीं घातले चहूंकडे ॥ अनेकरंगीं रंगित हुडे[10] ॥ सुंदर रोकडे केले पैं ॥ ८२ ॥ राज[11]प्रासाद देवतागारें[12] ॥ सुशोभित केलीं पुरद्वारें[13] ॥ पौर[14]लोकांचीं सुंदर मंदिरें ॥ नानाचित्रीं चित्रविलीं ॥८३॥ महागजेंद्र घोटक[15] रथ ॥ नानानगीं[16] केले भूषित ॥ तैशींच नरयानें[17] समस्त ॥ सुशोभित शृंगारिलीं ॥८४॥ जलपूर्ण कुंभ दारोदारीं ॥ प्रदीप्त दीप ठेविले वरी ॥ दध्यक्षता[18]दूर्वांकुरीं ॥ सुमनहारीं[19] सुशोभित ॥ ८५ ॥ आणि प्रतिद्वारीं ध्वज पताका ॥ चपळां[20]परी शोभादायका ॥ उभारूनियां पुष्पमालिका ॥ सर्वत्र अनेका बांधिल्या ॥ ८६ ॥ रंभावृक्षीं अति सुंदरें ॥ ठायीं ठायीं केलीं द्वारें ॥ पूगीफळें रम्य

टी. १ सीतेचा पति. २ हात. ३ पुराणादि सांगणारे. ४ स्तुति करणारे. ५ भाटलोक. ६ अयोध्या. ७ अत्यंत सुंदर. ८ नारळांच्या. ९ चंदनाचे व केशराचे. १० बुरुज. ११ राजवाडे. १२ देवालयें. १३ वेशीदरवाजे. १४ नगरांतील लोकांचीं. १५ घोडे. १६ नानाअलंकारांनीं. १७ पालख्या, मेणे. १८ दहीं, अक्षता व दूर्वा यांणीं. १९ पुष्पांच्या माळांनीं. २० विजांसारख्या.

परिकरें ॥ तयांमाझारी बांधिलीं ॥ ८७ ॥ वेश्याजनांचीं नृत्यगायनें ॥ सर्वत्र चालविलीं हर्षानें॥ मृदंग तूर्यादि[2] वाद्यवादनें ॥ निरंतर चालविलीं ॥ ८८ ॥ ऐसें नगर शृंगारून ॥ रामासि आणावया गेले प्रधान ॥ सवें चतुरंग[3] सैन्य संपूर्ण ॥ आणि पौरजन[4] असती पां ॥८९॥ मग सुमुहूर्तावर रघुनाथ ॥ आनंदें निघाला नगरांत ॥ गजेंद्रावरी चवरडोलांत ॥ सीतेसहित बैसलासे ॥ ९० ॥ लक्ष्मणादिक भ्राते सदार[6] ॥ तेही बैसले गजेंद्रांवर ॥ सभोंवती सैन्य अपार ॥ पुढती पौरें चालती ॥ ९१ ॥ मार्गीं भीड झाली जना ॥ मंगळतुरें वाजती नाना ॥ नृत्य करिती वारांगना ॥ आनंद मना न समावे ॥ ९२ ॥ वधुवरांचें पाहाया कौतुक ॥ वेगें धांवती नागरिक ॥ नरनारींसि तेथें अधिक ॥ मंडपघसणी जाहली ॥९३॥ चढोनियां माडियां गोपुरीं ॥ पुष्पें वर्षिती नरनारी ॥ तैसेच लाजही[10] वधुवरांवरी[11] ॥ जयजयकारीं उडविती ॥ ९४ ॥ आणिं अति सुंदर पौरबाळी[12] ॥ नानालंकारीं भूषित सकळी ॥ आरती सुवर्णपयेळीं[13] ॥ तयेवेळीं ओंवाळिती ॥ ९५ ॥ आणि बोलती परस्परांसी ॥ विलोकितां ह्या वधुवरांसी ॥ अरोंणुक[14] नाहीं डोळियांसी ॥ आज आह्मांसी धन्यत्व ॥ ९६ ॥ श्रीराम नोवरा सीतेलागीं ॥ सीता नोवरी रामाजोगी ॥ सृष्टि शोभते इहीं दोघीं ॥ न देखों जगीं तीसरें ॥९७॥ आह्मीं केलीं बहुत सुकृतें[15] ॥ ह्मणोनचि आज पाहतों यांतें ॥ जन्मल्याचें सार्थक निरुतें[16] ॥ आमुच्या मतें झालें असे ॥ ९८ ॥ ऐशा महोत्सवें सत्वरां ॥ राम-

---

टी. १ सुंदर. २ सूर सनया इत्यादि. ३ रथ, हत्ती, घोडे व पायदळ मिळून चार प्रकारचें. ४ नगरवासी लोक. ५ अंबारींत. ६ स्त्रियांसहित. ७ कलावंतिणी. ८ गर्दी. ९ वेशीदरवाज्यावरील मजल्यांवर. १० लाह्या. ११ नवरानवरींवर. १२ नगरस्थ लोकांच्या कन्या (कुमारिका). १३ सोन्याच्या ताटांत. १४ तृप्ति. १५ पुण्यें. १६ खरोखर.

चंद्र पावला महाद्वारा ॥ लोण उतरती पैं सुंदरा ॥ आणि मूद ही ओंवाळिती ॥ ९९ ॥ पूर्ण कलशेंसीं आल्या दासी ॥ वस्त्रालंकार दीधले त्यांसी ॥ लहानथोर सर्वजनांसी ॥ आनंद मानसीं जाहला ॥ १०० ॥ मग श्रीराम पावला सभेंत ॥ सीता गेली अंतःपुरांत ॥ दशरथ राजा स्त्रियांसहित ॥ कृतकृतार्थ जाहला ॥ १०१ ॥ आणि यथायोग्य सर्व जनांसी ॥ पूजिलें वस्त्र भूषादिकेंसीं ॥ मग सर्व लोक स्वस्वस्थळासी ॥ आनंदेंसीं पावले ॥ १०२ ॥ एवं सीतेचें पाणिग्रहण ॥ करूनियां रघुनंदन ॥ आयोध्येमाजी येऊन ॥ आनंदें वसता जाहला ॥ १०३ ॥ ऐसें श्रीमद्वाल्मीक ऋषी ॥ कथिते झाले भारद्वाजासी ॥ पुढें राम गेले वनवासासी ॥ इत्यादि वृत्त वर्णिजेल ॥ १०४ ॥ ती कथा परम पूंत ॥ ह्मणोनि तियेच्या श्रवणार्थ ॥ श्रोतयांसि मी रघुनाथसुत ॥ जोडोनि हस्त प्रार्थितों ॥ १०५ ॥ स्वस्ति श्रीमदद्भुतरामविजय ॥ वाल्मीकीयाद्भुतोत्तरकांडहृदय ॥ ऐकोत सज्जन होऊनि तन्मय ॥ दशमाध्याय मधुर हा ॥ १०६ ॥

टी. १ याप्रमाणें. २ विवाह. ३ पवित्र.

॥ इति दशमाध्यायः समाप्तः ॥ १० ॥



# अध्याय ११.


रामलक्ष्मण सीतेचा शोध
करीत अरण्यांत फिरत आ.


मारुती
सुग्रीव.
जांबवान्
नळ
नीळ


ल.
राम
मारुती


शेषशायी
सनकादि
ऋ.
मा.

श्रीगणेशायनमः ॥ ॥ जयजयाजी वेदसारा ॥ जयजयाजी जगदुद्धारा ॥ जय श्रीपते[*] परमोदारा ॥ अगोचरा[1] निरुपाधिका ॥१॥ जय जगद्वंद्या आत्मारामा ॥ आदिपुरुषा वैकुंठधामा[2] ॥ योगिजनमनविश्रामा[3] ॥ सर्वोत्तमा स्वामिया ॥२॥ तूं सच्चिदानंद[4] पूर्णकाम[5] ॥ मायातीत[×] निर्गुण ब्रह्म ॥ तुजला नाहीं धर्म अधर्म ॥ आणि कर्माकर्म साचार ॥३॥ परी धर्मरक्षणालागुनी ॥ आपुल्याच मायेतें आश्रयूनी ॥ नाना अवतार घेऊनि अवनीं[6] ॥ स्वेच्छाविलासें क्रीडतोस ॥४॥ शंखासुरें वेद बुडविले ॥ ते मीनरूपें[7] त्वां उद्धरिले ॥ सद्धर्माचें रक्षण केलें ॥ तया दुष्टा निर्दाळुनी ॥५॥ देवदैत्यीं समुद्र मथितां ॥ मंदराचळ बुडत होता ॥ तैं कूर्मरूपें करूनि साह्यता ॥ सुधा[8] दैवतां दीधलीस ॥ ६ ॥ हिरण्याक्षें जिंकिलें सुरांसी ॥ पृथ्वी नेली रसातळासी ॥ तैं वराहरूपें मारूनि त्यांसी[9] ॥ तुवां क्षितीसी[10] उद्धरिलें ॥ ७ ॥ हिरण्यकशिपू महादारुण ॥ तेणें पीडिले गोब्राह्मण ॥ तैं त्वां नृसिंहरूप धरून ॥ तया मारून टाकिलें ॥ ८ ॥ बळिदैत्य परम मातला ॥ तैं त्वां वामनावतार धरिला ॥ दान मागोनि पाताळीं घातला ॥ स्वर्ग दीधला इंद्रासी ॥ ९ ॥ क्षत्रिय मातले भूतळीं ॥ धर्ममर्यादा सर्व सोडिली ॥ तैं तूं परशुधर[11] होऊनि बळी ॥ निःक्षत्र केली धरा[12] सर्व ॥ १० ॥ रावण दुष्ट निशाचर[13] ॥ तेणें बंदीं घातले निर्जर[14] ॥ गोब्राह्मणां पीडूनि

---

टी. १ प्रत्यक्ष नसणारा. २ वैकुंठ हेंच आहे स्थान ज्याचें. ३ योगिजनांच्या मनास विश्रांति देणारा. ४ सत्यज्ञानानंदस्वरूप. ५ पूर्ण आहेत मनोरथ ज्याचे. ६ पृथ्वीवर. ७ मत्स्यरूपानें. ८ अमृत. ९ हिरण्याक्षास. १० पृथ्वीस. ११ परशुराम. १२ पृथ्वी. १३ राक्षस. १४ देव. * अगा लक्ष्मीच्या पति. × मायेच्या पलीकडचा (मायेस न सांपडणारा).

फार ॥ भूमीसि भार केला जैं ॥ ११ ॥ तैं तूं होऊनि रामावतार ॥ निर्दाळिला रावण असुर ॥ धर्म रक्षूनि देव समग्र ॥ बंदींतून सोडविले ॥ १२ ॥ कंसादि राजे दैत्यांशी ॥ मातले तैं तूं हृषीकेशी ॥ रामकृष्णरूपें मारूनि त्यांसी ॥ भूभारासी हरियेलें ॥ १३ ॥ कलियुगींचे पापिष्ट जन ॥ देखूनियां विटलें मन ॥ ह्मणोनि तूं बौद्ध होऊन ॥ भक्त संपूर्ण रक्षिसी ॥ १४ ॥ पाखंडिजन म्लेंच्छ क्रूर ॥ आणि कालिकुल अत्यंत निष्ठुर ॥ यांसि संहाराया तूं ईश्वर ॥ कल्कि होणार आहेसी ॥ १५ ॥ इत्यादि तुझ्या अवतारमाला ॥ अनंत असती गा घननीळा ॥ वस्तुतः पाहतां तूं एकला ॥ व्यापूनि जगाला उरलास ॥ १६ ॥ तूं परमात्मा निष्कलंक ॥ पूर्णब्रह्म सनातन एक ॥ वेदशास्त्रांसि पडलें ठक ॥ तव स्वरूप वर्णावया ॥ १७ ॥ तूंचि सकळ सृष्टिकर्ता ॥ तूंचि पालक संहर्ता ॥ तूंचि भक्तांचिया आर्ता ॥ पूर्णकर्ता असशी पैं ॥ १८ ॥ तुझे गुण वर्णितां देख ॥ शिणला असे सहस्रमुख ॥ शिव विधि इंद्र गणेशादिक ॥ देव सकळ स्तब्ध होती ॥ १९ ॥ तेथें मी बहुमंदमति नर ॥ कैसा वर्णूं शकेन पामर ॥ परी तूं कृपा करितां मजवर ॥ किंचित सार वर्णीन पां ॥ २० जे तुज होती अनन्यशरण ॥ तयांवरी तूं कृपा करून ॥ सर्व मनोरथ करिसी पूर्ण ॥ ऐसें व्रत तुझें असे ॥ २१ ॥ यास्तव प्रभो तव चरणीं ॥ अनन्यभावें शरण रिघोनी ॥ पुढिल कथानुसंधानवर्णनीं ॥ बुद्धि द्यावया विनवितों ॥ २२ ॥ पूर्वाध्यायांतीं रघुनाथ ॥ सीतेसि पर्णूनि तियेसहित ॥ परत येऊनि अयोध्येंत ॥ राहिला ऐसें व-

टी. १ मेघश्यामा. २ निरंतर असणारा ( आदिमध्यांतहीन ). ३ इच्छा. ४ शेष. ५ ब्रह्मदेव.

णियेलें ॥ २३ ॥ आतां पुढिल कथानक ॥ अत्यद्भुत आणि असे रसिक ॥ तरी सज्जनीं धरूनि बीक[1] ॥ व्हावें भाविक श्रवणासी ॥ २४ ॥ जों जों श्रोते भाव सात्विक ॥ करूनि धरिती श्रवणीं बीक ॥ तों तों वक्ता अधिकाधिक ॥ बोले रसिक आनंदें ॥ २५ ॥ यालागीं मी सज्जनांसी ॥ विनवणी करितों ऐशी ॥ असो श्रीमद्वाल्मीकिऋषी ॥ भारद्वाजासी सांगत ॥ २६ ॥ मुने मग तो श्रीरघुनंदन ॥ अवचित कांहीं कारणेंकरून ॥ सीतालक्ष्मणासहवर्तमान ॥ वनवासा जाता जाहला ॥ २७ ॥ नाना विपिनें[2] नाना पर्वत ॥ नाना तीर्थें चालला हिंडत ॥ कोठें दिवस कोठें रात ॥ कोठें वसत दिन दोन ॥ २८ ॥ कोठें त्रिदिन पंचरात्र ॥ कोठें वसे आठवडा समग्र ॥ कोठें पक्ष कीं महिनाभर ॥ मास चार कोठें वसे ॥ २९ ॥ कोठें ऋतु कोठें अयन[3] ॥ कोठें राहे वर्ष संपूर्ण ॥ ऐसा सर्वत्र करीत भ्रमण ॥ दंडकारण्यीं पावला ॥ ३० ॥ तेथें देखिली महासरिता[4] ॥ गोदावरीनामें विख्याता ॥ जी पावन करावया जगता ॥ ब्रह्माद्रीपासूनि उद्भवली ॥ ३१ ॥ जियेच्या उगमीं त्रिपुरांतक ॥ वसतसे देव त्र्यंबक ॥ गौतमाचें गोहत्यापातक ॥ जिणें सकळिक निरसिलें ॥ ३२ ॥ गंगेहूनिही प्रभावें आगळी[6] ॥ ह्मणोनि वृद्धगंगा नाम पावली ॥ असो ती देखतां बद्धांजुळी[7] ॥ नमस्कारिली श्रीरामें ॥ ३३ ॥ मग त्या गोदावरीचे तटीं ॥ परम रम्य जी पंचवटी ॥ तेथें बांधूनियां पर्णकुटी[8] ॥ वास करिता जाहला ॥ ३४ ॥ प्रभातीं नित्यकर्म सारुनी ॥ स्वयें जाय मृगये लागुनी ॥ लक्ष्मण कंदमूळें

टी. १ प्रीति. २ वनें. ३ सहा महिने. ४ मोठी नदी. ५ शिर. ६ अधिक. ७ हात जोडून. ८ झाडांच्या पानादिकांनीं केलेली झोंपडी.

आणुनी ॥ अर्पी अनुदिनीं सीतेतें ॥ ३५ ॥ अनेक ऋषि भेटाया येती ॥ तयांचें त्रिवर्गें आतिथ्य करिती ॥ सद्धर्मांच्या गोष्टी बोलती ॥ आनंदें वर्तती सर्वदा ॥ ३६ ॥ सीताराम पर्णकुटींत ॥ रात्रौ सुखें शयन करित ॥ तयांच्या रक्षणा सुमित्रासुत ॥ भोंवती फिरत धनुष्पाणी ॥ ३७ ॥ ऐसे लोटतां कित्येक दिन ॥ कदाचित् तेथें आला रावण ॥ अतर्क्य माया उद्भवून ॥ राम लक्ष्मण दूर नेले ॥ ३८ ॥ मागें जानकीसि हिरूनी ॥ लंकेमाजी गेला घेउनी ॥ रामलक्ष्मण येतां फिरोनी ॥ सीता कोठें दिसेना ॥ ३९ ॥ पर्णकुटींत सांदीकोनीं ॥ थट्टे बैसली असेल लपोनी ॥ ह्मणोनि त्या उभयतांनीं ॥ तेथें शोधुनी पाहिली ॥ ४० ॥ परी ती न दिसेचि कोठें ॥ यास्तव दुःख पावोनि मोठें ॥ सीते सीते येऊनि भेटें ॥ ह्मणोनि नेटें ओरडले ॥ ४१ ॥ तथापि ती न देच हाक ॥ ऋषिआश्रम शोधिले अनेक ॥ दिशा शून्य दिसती सकळिक ॥ रघुनायक घाबरला ॥ ४२ ॥ दुःखांसुवें भरलीं नयना ॥ सीता कोठें सांग लक्ष्मणा ॥ ऐसें बोलतां रघुनंदना ॥ आली मूर्च्छना अवचित ॥ ४३ ॥ निश्चेष्ट पडला भूमीवर ॥ सौमित्र पल्लवें घाली समीर ॥ नेत्रांसि लावोनियां नीर ॥ रघुवीर उठविला ॥ ४४ ॥ तों हा सीते हा सीते ह्मणोन ॥ बहु विलाप करी दारुण ॥ जो ऐकतां पशु पक्षि संपूर्ण ॥ गहिंवरून तळमळती ॥ ४५ ॥ मग ते राम लक्ष्मण बंधु दोन्ही ॥ सीतेचिये शोधालागुनी ॥ पंचवटीसि सोडूनि तत्क्षणीं ॥ गहनवनीं प्रवेशले ॥ ४६ ॥ गिरिकंदरीं कडेकपाटीं ॥ शोधीत चालला जगजेठी ॥

टी. १ दररोज. २ तिघेंजणें. ३ सत्कार. ४ लक्ष्मण. ५ दुःखाश्रु. ६ पदरानें. ७ वायु. ८ उदक. ९ घोरअरण्यांत. १० पर्वतांच्या गुहेंत. ११ जगास वडील.

गोदावरीच्या निर्मळतटीं ॥ जाळियाबेटीं शोधिली ॥ ४७ ॥ परी ती कोठें न दिसत ॥ वनोवनीं राम धांवत ॥ सीते सीते आळवित ॥ ह्मणे त्वरित भेटें गे ॥ ४८ ॥ पर्वत नद्या वृक्ष पाषाण ॥ लता झुडपें औषधी संपूर्ण ॥ पशु पक्ष्यादि जेजे कोण ॥ भेटती तयां पुसतसे ॥ ४९ ॥ परी ते सकळ वाचाहीन ॥ उत्तर देऊं न शकती कोण ॥ तैं शोकाकुळ रघुनंदन ॥ करी रुदन आक्रोशें ॥ ५० ॥ नेत्रीं चालल्या अश्रुधारा ॥ त्यांहीं उमळोन सर्व धरा॥ तये कांतारीं वेगवत्तरा ॥ सरिद्वरा उद्भवली ॥ ५१ तियेचें नाम वैतरणी ॥ प्रसिद्ध असे पैं त्रिभुवनीं ॥ ती परम पुण्यपावनी ॥ सर्वजनीं वंदनीय ॥ ५२ ॥ स्नानमात्रें सर्वनरांसी ॥ आणि तर्पणमात्रें पितरांसी ॥ तारित्ये यालागीं तियेसी ॥ वैतरणी नाम जाहलें ॥ ५३ ॥ आणि रामाचिये नेत्रांतील ॥ आश्रुसंगें पडला मळ ॥ तयापासूनियां विशाळ ॥ शैलं विपुळ जाहले ॥ ५४ ॥ असो ऐसा शोक करित ॥ कांतारीं हिंडे रघुनाथ ॥ पुनःपुन्हा हाका मारित ॥ परी सीता कोठें मिळेना ॥ ५५ ॥ मग सुग्रीवाशीं कीजे मैत्री ॥ तयाचे साह्यें शोधिजे धरित्री ॥ ऐशा हेतें सहसौमित्री ॥ ऋष्यमूका चालला ॥ ५६ ॥ वाळीचे भयास्तव सूर्यसुत॥ नळ नीळ मारुती जांबवंत ॥ ह्या सकळ मंत्र्यांसहित॥ सर्वदा जेथ वसतसे॥५७॥त्या ऋष्यमूकाचळाजवळ॥ ते दोघे पोंचले दशरथबाळ ॥ स्वरूपसुंदर बहुतेजाळ॥ सूर्य अनळ जैसें कीं ॥५८॥ कीं शिव आ-



टी. १ पृथ्वी. २ ज्यामध्यें फिरण्यास नीट मार्गही नाहीं अशा अरण्यांत. ३ अत्यंत वेगवती. ४ श्रेष्ठनदी. ५ वंदावयास योग्य. ६ पाषाण. ७ पृथ्वी. ८ सूर्याचा पुत्र ( सुग्रीव ). ९ प्रधानांसहित. १० अग्नि. * सुमित्रेचा पुत्र जो लक्ष्मण त्यासह.

णि रमारमण ॥ कीं दैत्यगुरु आणि धिषण ॥ कीं जयंत आणि षडानन ॥ तैसेचि जाण शोभती ॥ ५९ ॥ क्षत्रिय ह्मणतां वल्कलें दिसती ॥ शिरीं जटाभार विलसती ॥ ऋषि ह्मणतां धनुर्बाण हातीं ॥ स्कंधीं शोभती तुणीर ॥ ६० ॥ वीरश्री विलसे मुखांवर ॥ वाटे कीं हे ग्रासितील अंबर ॥ कीं सर्व ब्रह्मांड क्षणाभीतर ॥ चकाचूर करितील पां ॥ ६१ ॥ ऐसे तयांसि विलोकून ॥ बहु त्रासला सूर्यनंदन ॥ वाळीनें हे मर्द्धालागून ॥ प्रेषिले ऐसें मानिलें ॥ ६२ ॥ मग जाणावया तयांचें चित्त ॥ सुग्रीवें प्रेषिला हनुमंत ॥ तो भिक्षुरूपें जाऊनि त्वरित ॥ तयांप्रत भेटला ॥ ६३ ॥ आणि आपुल्या वानरस्वरूपासी ॥ दावूनियां रामलक्ष्मणांसी ॥ तूं कोण कुठिल कां आलासी ॥ ह्मणोनि रामासी पुशियेलें ॥ ६४ ॥ तो मारुतीचा ऐकूनि प्रश्न ॥ रामें स्वस्वरूप दाविलें तत्क्षण ॥ जें भक्तिज्ञानवैराग्यावांचुन ॥ दृश्यमान न कदापी ॥ ६५ ॥ सच्चिदानंदतनु कोमल ॥ अतसिकुसुमापरी श्यामल ॥ कीं प्रफुल्लित नील कमल ॥ तैसी विमल साजिरी ॥ ६६ ॥ निर्मासुर सुंदर वदन ॥ तेजें भरलें सर्व गगन ॥ जयाचें प्रसन्नत्व पाहून ॥ सुधांशु हीन भासे पैं ॥ ६७ ॥ पादकमळें अत्यंत सुंदर ॥ सुवासा रुंजी घालिती भ्रमर ॥ तळवे अत्यारक्त परिकर ॥ बालार्क अरुण ज्यापरी ॥ ६८ ॥ तेथें वज्र अंकुश ध्वज ॥



टी. १ लक्ष्मीपति (विष्णु). २ शुक्र. ३ बृहस्पती. ४ इंद्राचा पुत्र. ५ कार्तिकस्वामी. ६ बाण ठेवण्याचे भाते. ७ आकाश. ८ मला मारण्याकरितां. ९ पाठविले. १० संन्याशाच्या रूपानें. ११ दिसणारें. १२ सत्यज्ञानानंदरूप देह. १३ अळशीच्या फुलासारखी. १४ सांवळी. १५ शुद्ध. १६ सुरेख. १७ अमृतरूपी आहेत किरण ज्याचे असा जो चंद्र. १८ भुंगे. १९ सुंदर.

उर्ध्वरेखा चक्र पंकज ॥ मीन छत्र गदादि सहज ॥ चिन्हें सतेज विराजती ॥ ६९ ॥ प्रवाळां-
कुर कोंवळे ॥ तैशीं दिसती पादांगुळें ॥ वरी केवळ चंद्राचीं शकलें ॥ तैशीं नखें शोभती
॥ ७० ॥ घोंटीव इंद्रनीळाचे परी ॥ पादाग्रें विलसती साजिरीं ॥ सुंदर गोफियांखालीं बरीं ॥
तोडर नेपुरें शोभत ॥ ७१ ॥ सरळ कर्दळीचे स्तंभ ॥ किंवा गरुडपाचूचे कोंभ ॥ कीं इंद्र-
नीळाचे दांडे सुप्रभ ॥ तैशा पोटऱ्या विराजती ॥ ७२ ॥ धणी न पुरे पाहतां जानू ॥ तयांचें
सौंदर्य काय वानूं ॥ जंघा त्यातों इंद्रनीळाच्याच जणूं ॥ ओतिल्या ऐशा भासती ॥ ७३ ॥
एकत्र झाल्या सहस्र चपळा ॥ तयांहूनिही तेजें आगळा ॥ ऐसा पीतांबर पिंवळा ॥ कांसे क-
सिला विलसत ॥ ७४ ॥ वरी मेखळा रत्नखचित ॥ पंक्तीनें रवी बैसले भासत ॥ क्षुद्रघंटा रु-
णझुणत ॥ श्रुति बोलत जैशा कीं ॥ ७५ ॥ अतिसुंदर कटिप्रदेश ॥ मृगेंद्राचियेहूनिही कृश ॥
मनोवेधक पातळ विशेष ॥ उदरप्रदेश शोभे पैं ॥ ७६ ॥ गंभीरावर्त नाभिस्थान ॥ सखोल
ह्रदकूपांसमान ॥ उदरीं त्रिवळी शोभायमान ॥ जैसे त्रिगुण केवळ ॥ ७७ ॥ उत्तुंग दृढ आ-
णि विशाळ ॥ कपाटवत् शोभे वक्षस्थळ ॥ वरी श्रीवत्सलांछन सोज्वळ ॥ ब्रह्मण्यत्व सुचवी-
तसे ॥ ७८ ॥ जानुपर्यंत अर्गळेपरी ॥ सुंदर शोभती भुजा चारी ॥ शंखचक्रगदापद्में सा-

टी. १ कमळ. २ पोंवळ्याचे अंकूर. ३ इच्छा, तृप्ति. ४ गुडघे. ५ दाब, कमरपट्टा. ६ घागऱ्या, घुंगुर. ७ खोल व वर्तुल भोंवऱ्यासारखें. ८ डोह व कूप यांसारखें. ९ उंच १० कवाडाप्रमाणें. ११ भृगुऋषीच्या पायाचें चिन्ह. १२ ब्राह्मणाविषयीं वत्सलत्व. १३ गुडघ्यांपर्यंत. १४ दरवाजाच्या आडण्यासारखे. + पायांचीं बोटें. * तुकडे. × जांघा.

जिरीं ॥ चाह्नी करीं विलसत ॥ ७९ ॥ क्षणप्रभा[1] गगनीं तळपती ॥ तैशा मुद्रिका अंगुलीं झळकती ॥ द्वादशादित्यांच्या गाळूनि ज्योती ॥ घडलीं भासती कंकणें* ॥ ८० ॥ प्रळयपावकाचे[2] कल्लोळ ॥ तैसे केयूर[3] तळपती सोज्वळ ॥ शकटयुगापरी[4] विशाळ ॥ स्कंधयुगुळ विलसे पैं ॥ ८१ ॥ परम सुरेख कंबुवंत[5] ॥ कंठ विराजे त्रिवळीयुक्त[6] ॥ दिनमणीपरी[7] दीप्तिमंत ॥ कौस्तुभ तेथ झळके पां ॥ ८२ ॥ मंदस्मितयुक्त मुखपंकज[8] ॥ विद्रुमवर्ण[9] ओष्ठ सतेज ॥ माजी वळीनें झळकती द्विज[10] ॥ तेजःपुंज हिरे जैसे ॥ ८३ ॥ करिकटांपरी[11] गोजिरे गाल ॥ अति सुकुमार नासिका सरळ ॥ प्रफुल्ल नेत्र आकर्ण[12] विशाळ ॥ जैशीं केवळ पुंडरीकें[13] ॥८४॥ भ्रुकुटि[14] वक्र धनुष्यांपरी ॥ विशाळभाळीं तिलक केशरी ॥ माजी कस्तूरीची साजिरी ॥ विलसे अक्षत कृष्णवर्ण ॥ ८५ ॥ दोनी कर्ण समसमान ॥ मकरकुंडलीं शोभायमान ॥ माजी कृत्तिकापुंजासमान[15] ॥ मुक्ताघोंस[16] तळपती ॥ ८६ ॥ शिरीं किरीट जाज्वल्य सुंदर ॥ जैसा कल्पांतींचा दिनकर[17] ॥ खालीं जलदमंडळ[18] सनीर[19] ॥ तैसे कुरळ केश दिसती ॥ ८७ ॥ श्यामलांगीं[20] निर्मळ अती ॥ रुळे सुंदर वैजयंती ॥ नभामाजी[21] शक्रचाप[22] निरुती ॥ सुरंग जैसें मिरवत ॥ ८८ ॥ जैसा

---

टी. १ विजा. २ प्रळयाग्नीचे. ३ बाहुभूषणें. ४ गाड्याचे जुंवासारखें. ५ शंखाप्रमाणें. ६ तीन वळ्यांनीं युक्त. ७ सूर्यासारखा. ८ मुखकमळ. ९ पोंवळ्याप्रमाणें लाल. १० दांत. ११ हत्तीच्या गंडस्थळासारखें. १२ कानापर्यंत. १३ पांढरीं कमळें. १४ भोंवया. १५ कृत्तिकेच्या तारांप्रमाणें. १६ मोत्यांचे घोंस. १७ सूर्य. १८ मेघमंडळ. १९ उदकयुक्त. २० सांवळ्या अंगावर. २१ आकाशांत. २२ इंद्राचें धनुष्य (जें एखादे वेळीं आकाशांत नानारंगी धनुष्याकार दिसतें ज्यास रामाचें धनुष्य असेंही कोणी ह्मणतात.). *कडीं.

निष्कलंक निशाकर ॥ तैसें पदक शोभे हृदयावर ॥ सहस्र सूर्यांपरी परिकर ॥ विलसे प्रखर अंगकांती ॥ ८९ ॥ महालक्ष्मी आणि सरस्वती ॥ उभयपार्श्वीं बैसल्या असती ॥ सनंदादि ब्रह्मात्मज भोंवती ॥ बैसले स्तविती प्रेमानें ॥ ९० ॥ देव ऋषि सिद्ध विद्याधर ॥ गंधर्व पितर उरग किन्नर ॥ इत्यादि भोंवती निरंतर ॥ सेवित असती बैसले ॥ ९१ ॥ ऐसा असोनियां आपण ॥ समीपवर्ती जो लक्ष्मण ॥ सहस्रफणायुक्त महान ॥ शेषाकार विलसत ॥ ९२ ॥ तैसेचि अनंत सर्प भोंवती ॥ तया स्तवीत बैसले असती ॥ आणि सहस्रफणीं आपणावरुती ॥ छत्र धरिलें असे तेणें ॥ ९३ ॥ ऐसें दिव्य स्वरूप आपुलें ॥ हनुमंतातें रामें दाविलें ॥ तें पाहूनि तो काय हें दिसलें ॥ ह्मणोनि झाला विस्मित ॥ ९४ ॥ आणि क्षणमात्र नेत्र मिटून ॥ पुनरपि उघडिले तयान ॥ तंव पूर्ववत दोघेचि जाण ॥ दृश्यमान जाहले ॥ ९५ ॥ तें अद्भुत पाहून मारुती ॥ अति विनयें श्रीरामाप्रती ॥ नमूनि स्तवूनि बहुरीती ॥ बोले भारती ऐशी कीं ॥ ९६ ॥ मी सुग्रीवाचा सचिव पाहें ॥ हनुमाननामा वानर आहें ॥ तुह्मी उभयतां कोण असा हें ॥ सर्व लवलाहें जाणिजे ॥ ९७ ॥ यास्तव सुग्रीवें मजला ॥ प्रेरिलें ह्मणोनि आलों ये स्थळा ॥ तैं धनुर्बाणधारी हेळीं ॥ द्विभुज तुह्माला पाहिलें ॥ ९८ ॥ अनंतर पाहिलें अन्यथा ॥ अनुपम दिव्यरूप दिसता ॥ तरी तुह्मी कवण हें आतां ॥ मज तत्वता सांगिजे ॥ ९९ ॥ ऐसें व्याकुळ-

टी. १ चंद्र. २ दोन बाजूंस. ३ ब्रह्मदेवाचे पुत्र. ४ सर्प. ५ जवळ असलेला. ६ शेषसर्पाकृति. ७ सहस्र फडांनीं. ८ वाणी. ९ प्रधान. १० क्षणमात्र. ११ खरें.

पणें बोलत ॥ हें काय कैसें परमाद्भुत ॥ अलौकिक दिसलें अवचित ॥ ह्मणोनि कांपत थरथरां ॥ १०० ॥ मस्तकीं जोडूनियां हस्त ॥ पावला दास्यभावाप्रत ॥ ऐसा जो तो पवनंसुत ॥ वानरजाती हनुमान ॥ १ ॥ तयाचें तें ऐकूनि भाषण ॥ सीताकांत रघुनंदन ॥ मधुरतर उदार वचन ॥ मारुतीसि बोलता जाहला ॥ २ ॥ तें श्रीरामाचें वचन निर्मळ ॥ ज्ञानमोक्षदातें केवळ ॥ पुढिल अध्यायामाजी सकळ ॥ वर्णिजेल यथामती ॥ ३ ॥ तरी सदा व्हाया शुद्धांतर ॥ सर्व सज्जनीं ऐकिजे सादर ॥ यालागीं मी सीताकुमार ॥ जोडूनि कर प्रार्थितों ॥ ४ ॥ स्वस्ति श्रीमदद्भुतरामविजय ॥ वाल्मीकीयाद्भुतोत्तरकांडह्रदय ॥ ऐकोत सज्जन होऊनि तन्मय ॥ एकादशाध्याय मधुर हा ॥ १०५ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥

टी. १ वायूचा पुत्र.

॥ इति एकादशाध्यायः समाप्तः ॥ ११ ॥



श्रीगणेशायनमः ॥ ॥ जयजय श्रीपरमानंदा ॥ भक्त[1]हृदयारविंदमिलिंदा ॥ सच्चि[2]त्स्वरूपा श्रीगोविंदा ॥ जगदादिकंदा परब्रह्मा ॥ १ ॥ जय परंज्योति परंधामा ॥ योगिजनमानसविश्रामा ॥ परात्परतरा पूर्णकामा ॥ आत्मयारामा स्वामिया ॥ २ ॥ क्षरा[3]क्षरपरा अव्यया ॥ निरुपाधिका अ[4]परिमेया ॥ शरणागतकैवारिया ॥ अजा अजेया परिपूर्णा ॥ ३ ॥ आदिमध्यावसानहीना ॥ पुराणपुरुषा विश्वकारणा ॥ विश्वव्यापका विश्वपाळणा ॥ विश्वहरणा वि[5]श्वांतीता ॥ ४ अनंतभोग[6]शयना अनंता ॥ अनंतवेषा कैवल्यनाथा ॥ अनंतावतारधरा अच्युता ॥ शब्[7]दातीता जनार्दना ॥ ५ ॥ अनं[8]गारिहृदयजीवना ॥ त्रिवि[9]धतापदाहशमना ॥ चतुर्दशभुवनपाळणा ॥ माया[10]कृंतना सर्वेश्वरा ॥ ६ ॥ सज्जना[11]वनवज्रपंजरा ॥ दुःखा[12]द्रिभंजनवज्रधरा ॥ दुरि[13]तकाननवैश्वानरा ॥ परमोदारा सर्वात्मका ॥ ७ ॥ अनंतकोटिब्रह्मांडजनका ॥ अज्ञा[14]नगाढांधकारांतका ॥ मोक्षदायका सनातना ॥ ८ ॥ पद्मा[15]लया प्राणजीवना ॥ पद्मनाभा पद्मलोचना ॥ पद्म[16]भूजनका पद्मानना ॥ पद्मभूषणा पद्महस्ता ॥ ९ ॥ षड[17]रिछेदनप्रतापवंता ॥ षड्[18]गुणैश्वर्यसदालंकृता ॥ षड्[19]दर्शनप्रतिपादिता ॥ षडू[20]र्मिवर्जिता

टी. १ भक्तांचे हृदयकमलांत राहणाऱ्या भ्रमरा. २ सत्यज्ञानस्वरूपा. ३ सर्व भूतें व कूटस्थयांहून पर. ४ प्रमाणरहिता. ५ विश्वाच्या पलीकडच्या. ६ शेषशयना. ७ शब्दागोचरा. ८ शिवास सुख देणाऱ्या. ९ तापत्रयनाशका. १० मायाछेदका. ११ सज्जनाच्या पालनाविषयीं वज्राच्या पिंजऱ्या. १२ दुःखपर्वतास फोडणाऱ्या इंद्रा. १३ पातकरूप अरण्यास जाळणारा. १४ अज्ञानरूप अंधकाराचे नाशका. १५ लक्ष्मीपते. १६ ब्रह्मदेवाचे बापा. १७ कामक्रोधादि षड्रिपूंस तोडणारा आहे प्रताप ज्याचा. १८ ज्ञान, वैराग्य, ऐश्वर्य, यश, कीर्ति आणि औदार्य यांणीं शोभणारा. १९ सांख्यादि साहा शास्त्रांनीं प्रतिपादिलेल्या. २० जन्म, मरण, क्षुधा, तृषा, शोक व मोह हे ज्यास नाहींत.

निष्कलंका ॥१०॥ वेदरूपा वेदजनका ॥ वेदप्रिया वेदोद्धारका ॥ वेदस्तव्या वेदस्थापका ॥ वेदरक्षका वेदवंद्या ॥ ११ ॥ वेदमार्गप्रवर्तका आद्या ॥ वेदवेदांगप्रतिपाद्या ॥ वेदशिरोभागसं-वेद्या ॥ अहंरोगवैद्या सुभद्रा ॥ १२ ॥ संसारगजविदारकमृगेंद्रा ॥ विघ्नविनाशनभालचंद्रा ॥ दीनोद्धरणा करुणासमुद्रा ॥ श्रीरामचंद्रा शरण्या ॥ १३ ॥ तूं निराकार निर्गुण असोन ॥ देवांसाठीं झालासि सगुण ॥ तुझें चरित्र अति गहन ॥ समर्थ कवण वर्णावया ॥ १४ ॥ व्यासवाल्मीकादि मुनीश ॥ जेकां साक्षात् ईश्वरांश ॥ जयांचे शुद्धबुद्धीचा प्रकाश ॥ त्रिजगीं विशेष झळकताहे ॥ १५ ॥ तेही वर्णितां वर्णितां सतत ॥ पार न लागे ह्मणोनि कुंठित ॥ मग मी मानव मूढ अत्यंत ॥ कैसा समर्थ होईन ॥ १६ ॥ तरी सांडोनियां अभिमान ॥ य-थामति वर्णितों त्वद्गुण ॥ गंगाप्रवाह न शोषवे ह्मणोन ॥ तृषाक्रांत राहावें कीं ॥१७॥ देखिला अन्नाचा पर्वत ॥ परी यथाशक्ति नर जेवित ॥ कीं गगनाचा न लागे अंत ॥ परी उडत शलभ जेंवी ॥१८॥ असो पूर्वाध्यायीं अनुसंधान ॥ पवनसुतें करितां प्रश्न ॥ तयालागीं श्रीरघुनंदन॥उत्तर द्या-या प्रवर्तला ॥१९॥ आतां रामाची वाग्देवी गोमटी ॥ उघडील आत्मतत्वाची पेटी ॥ त्यांतील शब्दरत्नें कपिजेठीं ॥ हृदयसंपुटीं राखील ॥२०॥ वाल्मीकि सांगत भारद्वाजा ॥ पुढील वृत्त ऐकें द्विजा ॥ श्रीपुरुषोत्तम रामराजा ॥ पवनात्मजा सांगत ॥२१॥ ह्मणे बा वत्सा हनुमंता ॥ पवना-

टी. १ उपनिषदांनीं जाणण्याला योग्य. २ अहंकाररूप रोगाचे वैद्या. ३ कल्याणरूपा. ४ संसाररूप हत्तीस विदारणाऱ्या सिंहा. ५ विघ्नाचा नाश करण्याविषयीं गणपतीच. ६ टोळ. ७ वानरश्रेष्ठ ( मारुति ). ८ हृदयरूप संपुष्टांत. ९ वायुपुत्राला.

त्मजा बुद्धिमंता ॥ तूंतों जात्या वानर असतां ॥ भक्त तत्वता आहेसी ॥२२॥ तस्मात् तूं जें प्रश्निलें मातें ॥ तें सर्व आतां सांगतों तूंतें ॥ तरी टाकूनि जातिचापल्यातें ॥ एकाग्रचित्तें ऐकपां ॥ २३ ॥ अरे आतां मी जें सांगणार ॥ हें सनातन विज्ञान साचार ॥ आत्म्याहूनिही गुह्यतर ॥ आणि स्तुत्य फार असे पैं ॥ २४ ॥ यासि स्वर्गस्थ गीर्वाण ॥ आणि तपोनिष्ठ द्विजातिगण ॥ विविधयत्नही अनुदिन ॥ करित असोन नेणती ॥ २५ ॥ ऐसें अत्यंत दुर्मीळ ॥ आणि अविज्ञेयही असे केवळ ॥ मारुते याचें फळ निर्मळ ॥ कवण सकळ वर्णील पैं ॥ २६ ॥ जे सत्कर्मनिष्ठ ब्राह्मण ॥ जितेंद्रिय विनयसंपन्न ॥ ते ह्या ज्ञानासि आश्रयून ॥ ब्रह्मचि आपण होतात ॥ २७ ॥ आणि जन्ममरणात्मक संसार ॥ कदा न पावती साचार ॥ आणि तयांचे पूर्वजही सत्वर ॥ होती थोर ब्रह्मवादी ॥ २८ ॥ ह्मणजे ब्रह्मवादीयां जी गती ॥ ती त्या पूर्वजां लाभे निश्चिती ॥ कीं ब्रह्मवादी ह्मणोनि जगतीं ॥ पूर्वींचेही प्रसिद्ध जे ॥ २९ ॥ तयांसि तो ब्रह्मवादिभाव ॥ याणेंचि लाभला असे सर्व ॥ आत्मज्ञानार्थ जेकां मानव ॥ भक्तिभाव धरिताती ॥ ३० ॥ तयांच्या पवित्र वंशांत ॥ ब्रह्मवादी उद्भवतात ॥ असो ऐसा सर्वलोकांतीत ॥ प्रभाव अद्भुत ययाचा ॥ ३१ ॥ हें गुह्याहून गुह्यतम असून ॥ तुज सांगतों भक्त ह्मणोन ॥ तरी त्वां नाना प्रयत्न करून ॥ गुप्त संपूर्ण राखावें ॥ ३२ ॥ अगा पवनात्मजा सावध ऐक ॥ जो आत्मा ह्मणजे सर्वव्यापक ॥ केवळ चैतन्यस्वरूप एक ॥ अज्ञानसंबंधशून्य पैं

टी. १ जांतीनें. २ मर्कटजातीच्या चपळपणातें. ३ निरंतर असणारें, ४ देव. ५ जाणण्यास कठिण. ६ अलौकिक. ७ ज्ञानस्वरूप.

॥ ३३ ॥ आणि जीवगतदोषरहित ॥ अणूहूनिही अणु अत्यंत ॥ सनातन ह्मणजे आदिमध्यांत ॥ जया नाहींत तत्वता ॥ ३४ ॥ आणि जो त्रिकालाबाध्य पूर्ण ॥ सर्वांतर्यामी व्यवधानहीन ॥ सर्वदा मायासंबंधशून्य ॥ ज्ञानमात्रस्वरूप जो ॥३५॥ तोचि अंतर्यामी देख ॥ तोचि देहस्थ पुरुष एक ॥ तोचि प्राण सर्वचेष्टक॥सर्वनियामक तोचि पां॥३६॥कालाग्निस्वरूपही तोचि जाण ॥ तोचि सर्वांचें मूळकारण ॥ ऐसें साक्षात् स्ववचनेंकरून ॥ श्रुति संपूर्ण जाणविती ॥३७॥ आणि हें सर्वही विश्व निरुतें ॥ यापासूनचि उत्पन्न होतें ॥ आणि यांतचि प्रवेशूनि मागुतें ॥ विलय पावतें सर्वही ॥ ३८॥ अरे हा मायावी ह्मणोन ॥ स्वयें मायेनें बद्ध होऊन ॥ नानाविध थोरलहान ॥ तनु उत्पन्न करितो पैं ॥ ३९॥ परी हा वस्तुतः स्वयें कदाही ॥ संसृतीतें भोगित नाहीं ॥ आणि दुजासिही संसृतीठायीं ॥ स्वयें नाहीं घालित ॥ ४० ॥ हा सर्वोपरि महासमर्थ ॥ सदासर्वदा असे विलसत ॥ हा पृथ्वी जल तेज कीं मारुत ॥ कीं नभेंही खचित नव्हेची ॥ ४१ ॥ आणि हा नव्हेचि जड प्राण ॥ मन तेंही हा नव्हे जाण ॥ कार्यरूप जें व्यक्त ह्मणोन ॥ तेंही हा नव्हे साचार ॥ ४२ ॥ शब्द स्पर्श रूप रस गंध ॥ ह्या तन्मात्राही हा नव्हे विशदें ॥ आणि अहंकाराश्रय जीवाभिध ॥ तोही हा नव्हे जाण पां ॥ ४३ ॥ हा वाचाही नव्हे खचित ॥ हा नव्हे चरण कीं हस्त ॥ आणि हा पायु किंवा उपस्थें ॥ नव्हे नव्हेचि नि-

टी. १ सूक्ष्माहूनिही. २ अंतररहित. ३ सर्वास वागविणारा. ४ खरोखर. ५ पुनः, नंतर. ६ जन्ममरणातें. ७ सर्वापेक्षां अधिक. ८ वायु. ९ आकाश. १० दृष्टिगोचर ( जग ). ११ पंचभूतांचे विषय. १२ स्पष्ट. १३ गुदद्वार. १४ शिश्न.

श्रयें ॥ ४४ ॥ सर्वकर्तृत्व असे प्रकृतीस ॥ पद्मपलाशवत अलिप्त पुरुष ॥ एवं जे सांख्यमतें विशेष ॥ प्रकृति पुरुष निवडिले ॥ ४५ ॥ तेही हा नव्हे हें खचित ॥ हा असे कर्तृत्वादिरहित ॥ आणि हा भोक्ताही नव्हे निश्चित ॥ हें तूं यथार्थ अवधारीं ॥ ४६ ॥ आणि जी माया सत्वप्रधान ॥ तीही हा नव्हेचि जाण ॥ आणि आधिदैविक जो प्राण ॥ तोही हा नव्हे साचार ॥४७॥ अगा सखया पवनसुता ॥ तुज फार काय सांगूं आतां ॥ अंतरीं विचारें पाहतां तत्वता ॥ हा चैतन्यस्वरूपचि असे ॥४८॥ जैसा प्रकाशा आणि तमा ॥ संबंध नसे गा प्लवंगमा ॥ तैसाचि प्रपंच परमात्मा ॥ यांसि संबंध नसे पैं ॥ ४९ ॥ कीं छाया पादप हे दोन ॥ जैसे परस्पर विलक्षण ॥ तद्वत् प्रपंच पुरुष हे दोन ॥ असती भिन्न साचार ॥ ५० ॥ उभयतांसि संबंध नाहीं ॥ हें तत्वता जाण हृदयीं ॥ जरीकां आत्मा स्वभावें कांहीं ॥ मळिण अस्वस्थ असेल ॥ ५१ ॥ किंवा विकारी असेल पाहीं ॥ तरी जन्मांतरशतांनींही ॥ तयालागीं मुक्ति कदाही ॥ होणार नाहीं निश्चयें ॥ ५२ ॥ अरे मुक्त मुनि ते स्वात्म्यालागुन ॥ वस्तुतः सर्वविकाररहीन ॥ आनंदात्मक निर्दुःख पूर्ण ॥ आणि अव्यय ऐसा पाहती ॥ ५३ ॥ मी कर्ता मी भोक्ता मी सुखी ॥ मी कृश मी स्थूल मी दुःखी ॥ मी चतुर मी श्रेष्ठ मी लौकिकी ॥ कीं मूर्ख मी ऐसी मति जी ॥५४ ॥ तीही केवळ सामान्यजनांहीं ॥ अंतरीं विवेक न करितां कांहीं ॥ अहंकाराचिये संबंधें पाहीं ॥ आत्म्याठायीं आरोपिजेते ॥ ५५ ॥ आणि वेदवेत्ते जे पंडित ॥ ते-

टी. १ उदकांतील कमलपत्राप्रमाणें. २ ज्ञानस्वरूपच. ३ अंधकाराला. ४ अगा वानरा (मारुति). ५ वृक्ष. ६ जीवात्मा. ७ नाशरहित.

तों तैसें न करित ॥ आत्मा साक्षी प्रकृत्यतीत ॥ सर्वत्र सम वसताहे ॥ ५६ ॥ ऐसें अंतरीं जाणती ॥ तथापि आत्मा भोक्ता ह्मणती ॥ आणि तदनुसार वर्तती ॥ ह्मणोन पावती संसार ॥ ५७ ॥ तस्मात् प्राणिमात्राचे ॥ जन्ममरणात्मकसंसाराचें ॥ मुख्य मूळकारण साचें ॥ अज्ञानचि असे पैं ॥ ५८ ॥ आणि जें अज्ञानेंकरून ॥ उत्पन्न होतें अन्यथाज्ञान ॥ तें मायामूलक असे ह्मणून ॥ मायाच कारण तयाची ॥ ५९ ॥ आणि हा पुरुष सर्वगत ॥ स्वयंप्रकाश नित्योदित ॥ कर्तृत्वादिधर्मरहित ॥ ऐसाचि असे साचार ॥ ६० ॥ परी अहंकारापासून ॥ जो अविवेक झाला उत्पन्न ॥ तयाच्या योगें मी कर्ता आपण ॥ आहें ऐसेंचि मानितो ॥ ६१ ॥ आणि ब्रह्मवादी मुनिजन ॥ जें कार्यकारणात्मक नित्य प्रधान ॥ तें तों परिणाम्युपादानकारण ॥ आहे ऐसें जाणूनियां ॥ ६२ ॥ जें मायातीत सनातन ॥ अक्षर ब्रह्म तयालागुन ॥ विवर्तोपादानकारण ॥ आहे ऐशातें पाहतात ॥ ६३ ॥ आणि आत्मा तोतों साचार ॥ निरंजन ब्रह्म अक्षर ॥ ऐसा असतां मायेनें जर ॥ संसारीं संगत जाहला ॥ ६४ ॥ तर मग त्या आत्म्यालागुनी ॥ हा अक्षर ब्रह्म आहे ह्मणोनी ॥ जगामध्यें न जाणती कोणी ॥ हें तूं जाणीं निश्चयें ॥ ६५ ॥ अनात्म्याठायीं आत्मज्ञान ॥ तयापासूनि अनर्थ महान ॥ दुःखें आणि सुखें अनुदिन ॥ प्राप्त होतात बहुतची ॥ ६६ ॥ आणि राग द्वेष

टी. १ प्रकृतीहून निराळा. २ नानाप्रकारचीं यज्ञयागादि कर्में करतात. ३ वस्तुतः जसें आहे तसें न मानतां दुसरेंच आहे असें मानणें. ४ स्वतः- च्या तेजानें प्रकाशणारा. ५ नित्य उदय पावलेला. ६ माया. ७ परिणामीं (कार्यनाश झाला तरी) कारणत्वानें दिसणारा. ८ कूटस्थ. ९ प्रीति.

मोह रोष ॥ इत्यादिक जे अनेक दोष ॥ ते वस्तुतः पाहतां अशेष ॥ भ्रांतिमूलक असती पैं ॥ ६७ ॥ आणि कर्मे केलीं असतां निरुतें ॥ आत्म्यासि पुण्यापुण्य होतें ॥ आणि त्याच्याच योगें सर्वांतें ॥ सर्वदेहोद्भव होय ॥६८॥ मारुते परमात्मा तो सतत ॥ सर्व व्यापक सर्वगत ॥ कूटस्थ शुद्ध दोषवर्जित ॥ आणि एकचि ऐसा असे पां ॥ ६९ ॥ परी मायेच्या उपाधीन ॥ भेद पावतो पैं जाण ॥ स्वभावतःतों त्यालागुन ॥ भेद नसेचि साचार ॥ ७० ॥ ह्मणोनचि मुनिजन समस्त ॥ अद्वैतचि सत्य ह्मणत ॥ मायेच्या स्वभावें दिसतें द्वैत ॥ परी तें सर्व असंतची ॥ ७१ ॥ आणि त्या मायेलागुन ॥ आत्म्याचा आश्रय असे पूर्ण ॥ परी आत्म्यासि मायेचे गुण ॥ लिप्त न होती साचार ॥ ७२ ॥ जैसें धूमाच्या संपर्कें पाहीं ॥ आकाश मलिन होत नाहीं ॥ तैसा अंतःकरणज भावांहीं ॥ आत्माही नाहीं लिप्त होत ॥ ७३ ॥ जैसा आपुल्या तेजें करून ॥ स्वच्छ दिसतो स्फटिकपाषाण ॥ तैसा आत्मा उपाधिहीन ॥ निर्मळ पूर्ण प्रकाशतो ॥ ७४ ॥ जेकां ज्ञानी विचारवंत ॥ ते सर्व हें विश्व समस्त ॥ चित्स्वरूप आहे खचित ॥ ऐसें सतत बोलती ॥ ७५ ॥ आणि जे इतर कुबुद्धिजन ॥ महा अज्ञानी विचारहीन ॥ ते सर्व हें विश्व संपूर्ण ॥ अर्थस्वरूपचि पाहाताती ॥ ७६ ॥ तैसाचि आत्मा तोतों देख ॥ स्वभावेंचि चैतन्यात्मक ॥ कूटस्थ निर्गुण सर्वव्यापक ॥ आणि शांत एक असूनियां ॥ ७७ ॥ भ्रांतिदृष्टि जे पुरुष ॥ ते अर्थरूपें पाहती त्यास ॥ मायाव्यवधान हें भ्रांतीस ॥ कारण असे साचार

टी. १सर्व. २भ्रांतीपासून झालेले. ३खरोखर. ४परमात्म्याला. ५मिथ्याच. ६ अहंकारादिकांनीं. ७ज्ञानस्वरूप. ८वस्तुरूप. ९वस्तुरूपानें.

॥ ७८ ॥ रक्तिकादिकाचें व्यवधान ॥ नसलें ह्मणजे स्फटिकपाषाण ॥ स्वतेजें स्पष्ट प्रकाशमान ॥ जेंवी जनीं पाहिजेतो ॥ ७९ ॥ तेंवीच मायेचें व्यवधान ॥ निरसिलें ह्मणजे आत्मा पूर्ण ॥ चित्स्वरूपें प्रकाशमान ॥ ऐसाचि स्पष्ट देखिजेतो ॥ ८० ॥ तस्मात् सकळ मुमुक्षुजनीं ॥ ऐसेंचि वर्तावें अनुदिनीं ॥ कीं जेणें सर्व भ्रांति जाउनी ॥ स्वस्वरूप लाभेल ॥ ८१ ॥ म्हणजे जो आत्मा अक्षर ॥ अव्यय सर्वग नित्य सुंदर ॥ तोचि श्रवणादिकीं सादर ॥ निरंतर उपासावा ॥ ८२ ॥ आणि तैसा उपासितां सतत ॥ जैं त्या उपासकाच्या मनांत ॥ सदा सर्वग चैतन्य समस्त ॥ अव्यवधानें विलसतें ॥ ८३ ॥ म्हणजे त्या चैतन्यालागुन ॥ मायेचें न राहे व्यवधान ॥ तेव्हां तो उपासक आपण ॥ चैतन्यासी पावतो ॥ ८४ ॥ स्वात्म्याठायीं सर्वभूतांस ॥ आणि सर्वभूतांत स्वात्म्यास ॥ जेव्हां पाहतो तैं तो पुरुष ॥ स्वयें ब्रम्हास पावतो ॥ ८५ ॥ आणि परात्म्याशीं ऐक्य पावला ॥ तेणें भूतेंचि नसती याला ॥ म्हणोनि आत्मा सर्वभूतांला ॥ पाहेनासा होतो जैं ॥ ८६ ॥ म्हणजे जेव्हां आपुल्याविण ॥ सर्वथा नसे कांहींच आन ॥ ऐसें पाहतो तेव्हां आपण ॥ होतो चिन्मात्रस्वरूप ॥ ८७ ॥ आणि जेव्हां ह्याचे हृदयस्थित ॥ सर्वही कामें निरसत ॥ तैं हा ब्रम्हीभूत ऐसा त्वरित ॥ क्षेमाप्रत पावतो ॥ ८८ ॥ आणि जो सर्वभूतांचा पृथग्भाव ॥ तो एकस्थचि आहे सदैव ॥ आणि त्यापासूनच विस्तार सर्व ॥ आहे ऐशातें पाहतो जैं ॥ ८९ ॥ तेव्हां स्वयेंचि ब्रह्मालागुन ॥ पावतो हें तूं निश्चयें जाण ॥



टी. १ गुंज इत्यादिकांचें. २ श्रवण, मनन, निदिध्यास यांणीं. ३ दुसरें. ४ इच्छा. ५ निराळेपण. ६ एके ठिकाणींच राहिलेला.

आणि वस्तुतःजैं आत्म्यालागुन ॥ चिन्मात्र ऐशातें पाहतो ॥ ९० ॥ तैसेंचि सर्वजगातें तों॥ मायामात्र असेसें पाहतो ॥ तेव्हां आनंदस्वरूप होतो ॥ दुःखाब्धि जातो आटूनियां ॥ ९१ ॥ आणि मारुते सांगतों ऐक ॥ जन्म जरा दुःख शोक ॥ तैसेचि आधि व्याधि अनेक ॥ यांला-गीं एक औषधची ॥ ९२ ॥ ऐसें जें केवळ ब्रह्मविज्ञान ॥ तें जैं होतें जीवात्म्यालागुन ॥ तैं हा जीवात्मा स्वानंदघन ॥ शिवचि आपण पैं होतो ॥ ९३ ॥ जैसे कीं येथें व्यवहारांत ॥ नद्या आणि नद समस्त ॥ जाऊनियां सागराप्रत ॥ ऐक्य पावत तयाशीं ॥ ९४ ॥ तैसाचि हा जीवात्माही ॥ विज्ञानयोगें लवलाहीं ॥ अक्षरब्रह्माशीं मिळूनि पाहीं ॥ ऐक्य पावतो सा-चार ॥ ९५ ॥ तस्मात् केवळ ब्रह्मविज्ञान ॥ हेंचि असे मुख्य साधन॥ योगादिकीं जें जन्म कीं मरण ॥ तें तैसें नव्हे साचार ॥ ९६ ॥ परी तेंचि विज्ञान समस्त ॥ जरीकां होय अज्ञानें आ-वृत ॥ तरी तेणें विश्वींच सतत ॥ होतो मोहित निर्धारीं ॥ ९७ ॥ विज्ञान ह्मणजे काय ह्मण-सी ॥ तरी तें सांगतों पैंऐसीं ॥ हें सर्व विश्व निश्चयेंसीं ॥ मृगांबुवत मिथ्या असे ॥ ९८ ॥ ऐसें जें अव्यय विकल्पहीन ॥ शब्दांबोध्य निर्मळ ज्ञान ॥ तेंचि असे विज्ञानाभिधान ॥ ऐसें माझें मत असे ॥ ९९ ॥ असो ऐसें हें संपूर्ण ॥ वेदांताचें सार गहन ॥ परमोत्तम सांख्यज्ञान ॥ तुजलागुन बोधिलेंसे ॥ १०० ॥ आतां योग तोही तत्वता ॥ तुजला सांगतों हनुमंता ॥ आ-त्मस्वरूपीं एक चित्तता ॥ तोचि योग बोलिजेतो ॥ १ ॥ योगापासूनि होतें ज्ञान ॥ आणि

टी. १ मानसिक दुःख. २ ऐक. ३ मृग जळाप्रमाणें. ४ शब्दांनीं बोधितां येत नाहीं असें. ५ ज्यास आज्ञानाचें आवरण नाहीं असें.

ज्ञानापासूनि योग जाण ॥ जो योगज्ञानाभिसंपन्न ॥ तया अप्राप्य न कांहींच ॥ २ ॥ योगसाधनें योगिजन ॥ पावती जये सांख्यालागुन ॥ तेंचि उत्तमज्ञान संपूर्ण ॥ ज्ञानियें तत्क्षण पाविजेतें ॥ ३ ॥ सांख्य योग हीं दोन्हीं सर्वथा ॥ एकचि पाहतो जो तत्वता ॥ तोचि ब्रह्मांडीं तत्ववेत्ता ॥ ऐसें जाण साचार ॥४॥ आणि जे केवळ योगचि साधित ॥ ऐसे इतर योगी ते येथ ॥ आणिमादि सिद्धि ज्याज्या प्राप्त ॥ तेथेंचि आसक्त होताती ॥५॥ ह्मणोनचि त्यात्या ऐश्वर्याठायीं ॥ निमग्न ऐसे राहती सदाही ॥ आणि तत्ववेत्तातों लवलाही ॥ आत्मैक्यचि पावतो ॥ ६ ॥ आणि ज्ञानयोगाभिसंपन्न ॥ तो देहांत झाल्यावरि तत्क्षण ॥ जें सर्वगत दिव्य ऐश्वर्य पूर्ण ॥ तयालागुन पावतो ॥ ७ ॥ असो एवंप्रकारें तुजला ॥ जो परमात्मा म्हणोन कथिला ॥ तोच मी हा घनसावळा ॥ श्रीराम असें प्रत्यक्ष ॥ ८ ॥ अरे मी सर्वग सर्वाकार ॥ अव्यक्त मायावी परमेश्वर ॥ सर्वही वेद निरंतर ॥ मज सादर वर्णिताती ॥ ९ ॥ मी सर्वजाणता सर्वाकृती ॥ मज सर्वत्र पाणि पाद असती ॥ सर्वांतरीं माझी वसती ॥ मजला नसती आदिअंत ॥ ११० ॥ मी सर्वात्मा सर्वतोमुख ॥ सर्वकाम सर्वव्यापक ॥ सर्वरस सर्वगंधात्मक ॥ अजरामर परिपूर्ण ॥ ११ ॥ मजला नसती पैं चरण ॥ परी सर्वाहूनि वेगवान ॥ तैसेचि मज हात नसोन ॥ करितों गृहण सकळिक ॥ १२ ॥ अचक्षु असतांही पाहतों ॥ कर्ण नसतांही ऐकतों ॥ वदन नसोनियां खातों ॥ हुंगितों घ्राण नसतांही ॥ १३ ॥ मी जाणतों जग सकळिक ॥ परी मज नेणे कोणी एक ॥

टी. १ उत्तमज्ञानाला. २ सर्वत्र ज्याचें गमन, सर्वांत प्रवेशून राहणारा. ३ अस्पष्ट ( ब्रह्म ). ४ नेत्रहीन. ५ नाक.

मज महा पुरुष असें एक ॥ ऐसें बोलत तत्त्वद्रष्टे ॥१४॥ वत्सा तुज बहु सांगूं काय ॥ जो मी नि-
र्गुणामलज्ञानमय ॥ ययाचें अत्युत्तम अव्यय ॥ परमदिव्य ऐश्वर्य जें ॥ १५ ॥ तयासि देवही
नेणती ॥ मग इतरांची काय मती ॥ मम मायेनें सर्वही अती ॥ मोहित असती सर्वदा॥१६॥
अरे जो माझा सर्वगत अव्यय ॥ अत्यंत गुह्य चिन्मात्र काय ॥ तयाप्रति जे योगिवर्य ॥ त-
त्वदर्शी प्रवेशले ॥ १७ ॥ ते माझ्या सायुज्यगतीसी ॥ पावती जाण निश्चयेंसीं ॥ मा-
झ्या विश्वरूपमायेनें ज्यांसी ॥ आवरिलें नाहीं साचार ॥ १८ ॥ ते माझ्यासह सत्वरगती ॥
परमशुद्ध निर्वाण पावती ॥ कल्पकोटिशतींही निरुती ॥ पुनरावृत्ती नाहीं तयां ॥ १९ ॥
असो वत्सा हें वेदानुशासन ॥ केवळ निर्वाणाचें साधन ॥ मम प्रसादें तुजलागुन ॥ आजि सं-
पूर्ण लाभलें ॥ १२० ॥ अगा वत्सा पवनसुता ॥ जें सांख्ययोगाश्रित सर्वथा ॥ अत्युत्तम
विज्ञान तत्वता ॥ तुज म्यां आतां कथिलेंसे ॥ २१ ॥ हें सत्पुत्र सच्छिष्य आणी ॥ उत्तम
योगी यांवाचुनी ॥ कदाकाळींही भलत्यालागुनी ॥ न द्यावें जाण साचार ॥ २२ ॥ एवं राघवें
मारुतीला ॥ सांख्ययोग संपूर्ण कथिला ॥ ऐसें वाल्मीकि स्वशिष्याला ॥ कथिता झाला सा-
दर ॥ २३ ॥ आतां पुढें श्रीरघुवीर ॥ सांगेल उपनिषदांचें सार ॥ तेंचि पुढें यथाप्रकार ॥
वर्णिजेल सकळही ॥ २४ ॥ तरी श्रोतीं आपुलें चित्त ॥ सावध ठेविजे श्रवणार्थ ॥ ह्मणोनि मी

टी. १ त्रिगुणरहित व आज्ञानानें अनावृत जें ज्ञान तन्मय. २ नाशरहित. ३ देह. ४ ईश्वरस्वरूपांत मिळणें या गतीला. ५ मोक्ष. ६ पुनरपि जन्मास येणें. ७ वेदानें कथिलेले. ८ मोक्षाचें. ९ भारद्वाजास.

रघुनाथसुत ॥ जोडूनि हात विनवितों ॥ २५ ॥ स्वस्तिश्रीमदद्भुतरामविजय ॥ वाल्मीकी-याद्भुतोत्तरकांडहृदय ॥ ऐकोत सज्जन होऊनि तन्मय ॥ द्वादशाध्याय मधुर हा ॥ १२६ ॥

॥ द्वादशाध्यायः समाप्तः ॥ १२ ॥

श्रीगणेशायनमः ॥ ॥ जयजयाजी रघुनंदना ॥ जय तीक्ष्णे[1]किरणकुलमंडणा ॥ कोसलेंद्रतनया[2]-
गर्भरत्ना ॥ कृपाघना दाशरथे ॥ १ ॥ योगिजन[3]मानसारविंदमित्रा ॥ तमाल[4]नीला सुंदरगात्रा[5] ॥
भरताग्रजा कमलनेत्रा ॥ परमपवित्रा आत्मारामा ॥ २ ॥ रणरंगधीरा अयोध्यानायका ॥ स-
कळप्रजासुखदायका ॥ ताटिकांतका मख[6]पाळका ॥ शरणागतभयनाशना ॥ ३ ॥ कौशिक[7]-
प्रिया अहल्योद्धरणा ॥ महेशचंडकोदंडभंजना ॥ मेदिनीतनया[9]मनमोहना ॥ रेणुकात्मज[10]दर्प-
हरा ॥ ४ ॥ पितृवचनपाळका रघुनाथा ॥ जनक[11]नंदिनीसौमित्रिसमेता ॥ जटाभारमुकुटशो-
भिता ॥ धनुर्बाणहस्ता रघुरंगा ॥५॥ गुहक[12]प्रेमबद्धांतरंगा ॥ सततसेवितमुनिसंघा ॥ कृत[13]कानन-
स्थराक्षसभंगा ॥ माया[14]कुरंगविदलना ॥६॥ जटायु[15]द्विजमोक्षदायका ॥ वातात्मजज्ञानबोधका ॥
भास्करात्म[16]जकामपूरका ॥ शक्रात्म[17]जाविनाशना ॥ ७ ॥ रामेश्वरशिवलिंगस्थापना ॥ अगाध
सिंधुशिळातारणा ॥ शतयोजनसेतुबंधना ॥ सुरा[18]नंदना वीराग्रणी ॥ ८ ॥ निशाचरकुलवनछे-
दका ॥ दशास्यरावणप्राणहारका ॥ सर्वनिर्जरबंधमोचका ॥ बिभीषणपाळका दीननाथा
॥ ९ ॥ सुमित्रात्म[19]जप्राणआधारा ॥ भरततनयनाब्जदिवाकरा ॥ कौसल्याहृदयारविंदभ्रमरा ॥

---

टी. १ सूर्यवंशास शोभविणारा. २ कौसल्येच्या पुत्रा. ३ योगिजनांच्या मनोरूपी कमलास प्रफुल्लित करणारा सूर्यच. ४ तमालपत्राप्रमाणें श्यामवर्णा. ५ सुंदर शरीरा. ६ विश्वामित्राच्या यज्ञाचें रक्षण करणारा. ७ विश्वामित्राचे प्रिया. ८ स्वयंवरांत शिवाचें धनुष्य मोडणारा. ९ सीतेचें मन मोहणारा. १० परशुरामाचा गर्व हरणारा. ११ सीता व लक्ष्मण यांसहिता. १२ गुहकाच्या प्रेमानें बांधलेला. १३ वनांतील राक्षसांचा नाश केला ज्याणें. १४ हरिणरूपी मारीचास मारणारा. १५ जटायु पक्ष्यास मोक्ष देणारा. १६ सुग्रीवाचे मनोरथ पूर्ण करणारा. १७ वाळीस मारणारा. १८ देवांस आनंद देणारा. १९ लक्ष्मणाचे प्राणास आधारा.

परमोदारा अयोध्येशा ॥१०॥ विद्वज्जनमानसमराळा ॥ त्रिभुवनपाळा दीनदयाळा ॥ पतितपावना नवघननीळा ॥ भक्तवत्सला देवदेवा ॥ ११ ॥ अविद्याघोरकाननदहना ॥ विश्वंभरा मुनिजनरंजना ॥ जगदुद्धारा दुर्जनभंजना ॥ जगज्जीवना जगदात्मया ॥ १२ ॥ जगदाधारा स्वयंभुजनका ॥ अनंतकोटिब्रह्मांडनायका ॥ उत्पत्तिस्थितिप्रलयकारका ॥ निरुपाधिका परब्रह्मा ॥ १३ ॥ स्वसंवेद्या पुराणपुरुषा ॥ प्रणवस्वरूपा मायाविलासा ॥ वेदांतसारा जगन्निवासा ॥ अनंतवेषा श्रीरामा ॥ १४ ॥ अनंगदहनाहृदयारामा ॥ योगिजनमनोविश्रामा ॥ भक्तजनकामनाकल्पद्रुमा ॥ सुपूर्णकामा रामचंद्रा ॥ १५ ॥ अनंतकल्याणगुणनिधाना ॥ भावें वंदितों तव चरणा ॥ तरी कृपा करूनि ग्रंथरचना ॥ पुढें बोलवीं रसाळ ॥ १६ ॥ पूर्वाध्यायांत संपूर्ण ॥ झालें सांख्ययोगाचें निरूपण ॥ आतां श्रोतीं उपनिषत्कथन ॥ प्रेमें संपूर्ण ऐकिजे ॥ १७ ॥ वाल्मीकि ह्मणे गा भारद्वाजा ॥ पुढिल वृत्त ऐकें द्विजा ॥ पुनश्च तो श्रीरामराजा ॥ पवनात्मजाप्रति बोले ॥ १८ ॥ ह्मणे गा वत्सा करीं श्रवण ॥ जें मुख्य अव्यक्त त्यापासून ॥ काल प्रधान पुरुष हीं तीन ॥ प्रथम उत्पन्न जाहलीं ॥ १९ ॥ पुढें त्या तिघांपासून ॥ उद्भवलें हें जग संपूर्ण ॥ तस्मात् जगाचें मूलकारण ॥ अव्यक्तचि साचार ॥ २० ॥ कार्यकारणालागुनी ॥ अँन्वयें एकत्व असे आणी ॥ अव्यक्त तोचि मी ह्म-



टी. १ विद्वज्जनाच्या मनोरूप सरोवरीं राहणाऱ्या हंसा. २ नव्या मेघाप्रमाणें श्यामवर्णा. ३ मायारूपी घोर अरण्यास जाळणारा. ४ ब्रह्मदेवाच्या पित्या. ५ मदनास जाळणारा जो शिव त्याच्या मनास सुख देणारा. ६ मूळप्रकृति,परब्रह्म. ७ व्याप्तीनें. ८ राम.

णोनी ॥ विश्व हेंही मीच असें ॥२१॥ अरे तें जें माझें अव्यक्तरूप ॥ तयासि वर्णूं काय अरूप ॥ अंतरीं उजळतां ज्ञानदीप ॥ आपेंआप प्रकाशतें ॥ २२ ॥ तयासि सर्वत्र पाय हात ॥ शिरें डोळे असती बहुत ॥ जिकडे तिकडे कान असत ॥ तैशींच नाकें तोंडेंही ॥ २३ ॥ आणि आब्रह्मस्तंब जगातें ॥ सदा व्यापूनियां राहतें ॥ सर्वेंद्रियांचे गुण निरुते ॥ जयावरुने भासती ॥ २४ ॥ परी सकलेंद्रियांनीं रहित ॥ ऐसेंचि स्वयें असे सतत ॥ आणि जें सर्वांसि आधार-भूत ॥ सुस्थिरानंदें परिपूर्ण ॥ २५ ॥ कदापि न कळे व्यक्त स्थिती ॥ म्हणोनि जया अ-व्यक्त ह्मणती ॥ जयाचे उपमेलागीं जगतीं ॥ कांहींच नसे निर्धारें ॥ २६ ॥ आणि जें द्वैतव-र्जित एक ॥ प्रमाणातीत[3] निरुपाधिक ॥ ज्ञानविषय निर्विकल्पकें[4] ॥ अज अजेय सनातन[5] ॥ २७ ॥ अन्यत्र जयाचा भास नाहीं ॥ सर्व भासती जयाठायीं ॥ जरामरणशून्य सदाही ॥ आणि सर्वत्रही अभिन्न जें ॥ २८ ॥ तैसेंचि जें अवयवहीन ॥ शाश्वत निश्चळ निरंजन ॥ अव्यय परमोत्कृष्ट निर्गुण ॥ अव्याकृताकाशरूप[9] ॥ २९ ॥ तयासचि सकळ पंडित ॥ शुद्ध ज्ञान ऐसें जाणत ॥ आणि तें जें ज्ञानात्मक अव्यक्त ॥ तो आत्मा सर्वभूतांचा ॥ ३० ॥ आणि तो बा-ह्याभ्यंतराहून ॥ परही असे निश्चयें जाण ॥ आणि तोच मी सर्वग शांत महान ॥ ज्ञानात्मा परमेश्वर ॥ ३१ ॥ ज्ञानम्हणजे अव्यक्त ॥ तद्रूप जो मी सीताकांत ॥ तयें म्यां हें विश्व सम-

---

टी. १ पुष्कळ. २ स्पष्ट. ३ प्रत्यक्षादिप्रमाण किंवा इयत्ता हीं ज्याला नाहींत. ४ विशेष्य विशेषणभावरहित. ५ जन्मर-हित. ६ आद्यंतरहित. ७ अविनाशी. ८ निष्कलंक. ९ परिणामशून्य आकाशरूप.

स्त ॥ बाह्याभ्यंतरीं व्यापिलें असे ॥ ३२ ॥ आणि आब्रह्मस्तंबपर्यंत ॥ सर्वभूतें माझ्यांत वसत ॥ ऐसें जो मज जाणे निश्चित ॥ तोचि समस्तवेदवेत्ता ॥३३॥ वत्सा प्रधान पुरुष हीं दोन ॥ जीं तत्वें म्हणून कथिलीं जाण ॥ आणि अनादि काल म्हणोन ॥ तिसरा जो कीं कथियेला ॥ ३४ ॥ तो त्या प्रधानपुरुषांचा ॥ प्रेरक असे पैं साचा ॥ कालप्रेरणें सर्वसृष्टीचा ॥ क्रम तीं दोघें चालविती ॥ ३५ ॥ ऐसें हें तत्वत्रय समस्त ॥ यासि नाहींत आदि अंत ॥ आणि हें सदा अव्यक्तांत ॥ मिळूनियां वसतसे ॥ ३६ ॥ आणि अव्यक्तात्मक जें साचार ॥ आणि त्याहूनिही जें असे इतर ॥ तें सर्वही माझेंचि परिकर ॥ स्वरूप असे निर्धारें ॥ ३७ ॥ आणि सकळ प्राणिमात्रांतें ॥ अहर्निशीं मोहित करिते ॥ ऐशी जी ती प्रकृति मारुने ॥ तुज म्यां येथें कथियेली ॥ ३८ ॥ ती हें महदादिविशेषांत ॥ प्रसवते सकळ जगत ॥ आणि जो पुरुष स्वयें सतत ॥ प्रकृतीमांजीच राहूनियां ॥३९॥ अहंकारजन्य अविवेकेंसीं ॥ प्रकृतीच्या सकळगुणांसी ॥ रात्रंदिवस भोगितो त्यासी ॥ पंचविंशक[2] ह्मणतात ॥ ४० ॥ प्रकृतीचा जो विकार पहिला ॥ महान्*आत्मा ह्मणती तयाला ॥ आणि विज्ञानशक्ति हेंही त्याला ॥ यथार्थ नाम असे पैं ॥ ४१ ॥ ह्मणजे मूळप्रकृतीपासून ॥ विज्ञानशक्तीनें सुसंपन्न ॥ ऐसें महत्तत्व

---

टी. मूळप्रकृति, महत्तत्व, अहंकार, पचंतन्मात्रा ( शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध ), पंचभूतें ( पृथ्वी, आप, तेज, वायु व आकाश ), पंच ज्ञानेंद्रियें ( श्रोत्र, त्वचा, चक्षु, जिव्हा व घ्राण ), पंच कर्मेंद्रियें ( वाचा, पाणि, पाद, गुद व उपस्थ ), मन आणि पुरुष हीं पंचवीस तत्वें. २ पंचवीसावा ( पुरुष, जीव ). * महत्तत्व.

ह्मणोन ॥ प्रथम उत्पन्न जाहलें ॥ ४२ ॥ पुढें त्या महत्तत्वापासून ॥ अहंकार झाला उत्पन्न ॥ तोचि जीव आणि अंतरात्मा ह्मणोन ॥ तत्व चिंतकीं बोलिजेतो ॥ ४३ ॥ आणि तोचि साक्षात् जीवात्मा पाहीं ॥ अनेकविधजन्माठायीं ॥ विविध दुःखें आणि सुखेंही ॥ भोगित असतो सर्वदा ॥ ४४ ॥ आणि विज्ञानकोशात्मकजीवास ॥ सहायभूत ऐसें झालें मानस ॥ तयाच्या अविवेकाचेनि पुरुष ॥ संसारास पावतो ॥ ४५ ॥ आणि जो अविवेक ह्मणोन ॥ तो काळाचे प्रेरणेकरून ॥ प्रकृतीठायीं जडलें मन ॥ तयापासून जाहला ॥ ४६ ॥ सर्वांसि मुख्य कारण काल ॥ सर्वांहूनि तोचि प्रबळ ॥ कालचि सर्जितो भूतें सकळ ॥ आणि वेळोवेळ संहारितो ॥ ४७ ॥ कालाच्या वश असती सर्वही ॥ काल कोणाच्या वश नाहीं ॥ सर्वांतर्यामी राहूनि सदाही ॥ जग सर्वही वागवितो ॥ ४८ ॥ तोचि सनातन भगवान ॥ प्राण ऐसा बोलिजेतो जाण ॥ आणि तोचि सर्वज्ञ पुरुष म्हणोन ॥ श्रेष्ठ ऐसा बोलिजेतो ॥ ४९ ॥ ह्मणजे सकळइंद्रियाहून परम ॥ श्रेष्ठ बोलिजेतें मन ॥ मनाहूनि अहंकार महान ॥ श्रेष्ठ ऐसा बोलिजेतो ॥ ५० ॥ अहंकाराहूनि पर ॥ महत्तत्व असे साचार ॥ महत्तत्वाहूनि पर ॥ प्रधान जाण निर्धारें ॥ ५१ ॥ प्रधानाहूनि पुरुष महान ॥ पुरुषाहूनि भगवान् प्राण ॥ प्राणाचें हें जग संपूर्ण ॥ कार्य जाण असे पैं ॥ ५२ ॥ प्राणाहून व्योमें परतर ॥ व्योमाहूनि अग्नि ईश्वर ॥ तोच मी ज्ञानात्मा परमेश्वर ॥ सर्वग शांत राम असें ॥ ५३ ॥ मजहूनि नाहीं कांहीं श्रेष्ठ ॥ मी सर्वांहूनि वरिष्ठ ॥ ऐसा मजला

---

टी. १ मोठा. २ प्रकृति. ३ काल. ४ अव्याकृत आकाश.

जाणती स्पष्ट॥ते सर्व मुक्त होतात॥५४॥ वत्सा समीरात्मजा पाहीं ॥ ह्या अखिलजगाचे ठायीं ॥ स्थावर आणि जंगमही॥ असंख्य भूतें आहेत॥५५ ॥ परी जो मी रघुनंदन॥ व्योमरूप [1] अव्यक्त [2] भगवान ॥ ह्या मज एकावांचून ॥ नित्य नाहीं कांहींच ॥ ५६ ॥ मी तत्वद्वयात्मक [3] जगन्नाथ॥ कालाशीं होऊनि संगत ॥ उत्पादितों सकळ जगत ॥ तैसेंचि सर्व संहारितों ॥५७॥ अरे मारुते तत्वता पाहीं ॥ कालासि स्वयंकर्तृत्व नाहीं ॥ परी मत्संनिध असतो सदाही ॥ म्हणोन सर्वही जग करितो ॥ ५८ ॥ म्हणजे प्रधानपुरुषांप्रत ॥ सर्वजगाच्या उद्भवार्थ ॥ प्रेरितो तेणें तीं जग समस्त ॥ उत्पादिती साक्षेपें ॥५९॥ ऐशा संबंधें काल आपण ॥ उत्पन्न करितो जग संपूर्ण ॥ हें सर्ववेदांचें अनुशासन ॥ आहे जाण साचार ॥ ६० ॥ एवं प्रकारें श्रीरघुवीरें ॥ मारुतीसि कथिलें आदरें ॥ ऐसें वाल्मीकि प्रेमभरें ॥ कथन करिता जाहला ॥ ६१ ॥ आतां पुढें राजीवनेत्र ॥ सांगेल भक्तियोग पवित्र ॥ जयाच्या श्रवणें इह परत्र ॥ अखंड सुख लाभेल पैं ॥ ६२ ॥ तरी सकळ श्रोतेजनीं ॥ श्रवणा सादर असिजे म्हणोनी ॥ सीतासुत मी जोडूनि पाणी ॥ सदा विनवणी करिताहें ॥६३॥ स्वस्ति श्रीमदद्भुतरामविजय ॥ वाल्मीकीयाद्भुतोत्तरकांडहृदय ॥ ऐकोत सज्जन होऊनि तन्मय ॥ त्रयोदशाध्याय मधुरहा ॥ ६४ ॥ ॥

इति त्रयोदशाध्यायः समाप्तः ॥ १३ ॥



---

टी. १ अव्याकृत आकाशरूप. २ अस्पष्ट. ३ प्रकृति पुरुषात्मक.

श्रीगणेशायनमः ॥   ॥ जयजय सच्चिदानंदघना ॥ त्रिगुणातीता सनातना ॥ पुराणपुरुषा नारायणा ॥ निरंजना निरुपाधिका ॥ १ ॥ अनंतमायाचक्रचाळका ॥ विश्वोत्पत्तिस्थित्यंतकारका ॥ विश्वातीता विश्वव्यापका ॥ विश्वोद्धारका विश्वात्मया ॥ २ ॥ तूं अनाद्यनंत पूर्णकाम ॥ सर्वभावातीत परब्रह्म ॥ तुजला नाहीं गोत्र गुण नाम ॥ आत्माराम आहेसी ॥ ३ ॥ परी स्वजना तारावयासी ॥ नानाविध अवतार घेसी ॥ शरणागतांच्या मनोरथांसी ॥ पुरवूनि करिसी सुखरूप ॥ ४ ॥ ऐशी तुझी प्रसिद्ध कीर्ती ॥ ह्मणोनि शरण आलों तुजप्रती ॥ तरी कृपा करूनियां रघुपती ॥ पुरवीं इच्छा मनींची ॥ ५ ॥ अद्भुतरामविजयग्रंथ ॥ पुढें बोलवीं रसभरित ॥ गताध्यायीं रामें यथार्थ ॥ उपनिषदर्थ कथियेला ॥ ६ आतां पुनश्च श्रीराम ॥ मारुतीसि सांगे सप्रेम ॥ पवनात्मजा तूं भक्त परम ॥ ह्मणोनि वर्म सांगतों ॥ ७ ॥ जेणें पूर्वोक्त स्वात्मरूप ॥ प्राण्यासि लाभतें आपेंआप ॥ आणि जेणें लोपूनि सर्व पाप ॥ ज्ञानप्रदीप उजळतो ॥ ८ ॥ तें मी आतां तुजलागुन ॥ सकळ सांगतों विवरून ॥ तरी तूं सावध ठेवूनि मन ॥ करीं श्रवण कपिवर्या ॥ ९ ॥ अरे मानवीं नित्य नेमानें ॥ नानाविध तपाचरणें ॥ आणि यज्ञ दान देवतार्चनें ॥ यद्यपि विधीनें बहु केलीं ॥ १० ॥ तरी तयीं त्या नरांलागुन ॥ अ-

---

टी. १ सत्य, ज्ञान व आनंद यांणीं भरलेल्या. २ आदि, मध्य व अंत ज्याला नाहींत अशाप्रकारच्या (सर्वकाळ सारखा असणारा). ३ सर्व जगाहून वेगळा. ४ जन्ममरणरहित. ५ सर्वजीवात्म्याहून वेगळा, सर्वस्वभावरहित. ६ पूर्वाध्यायीं सांगितलेलें. ७ उघड करून. ८ वानरश्रेष्ठा (अगा हनुमंत). * कलंकरहिता, निर्मळा. + मायाद्युपाधिरहिता.

त्युत्तम भक्तीवांचून ॥ मत्स्वरूपाचें यथार्थ ज्ञान ॥ कदापि पूर्ण न होय ॥ ११ ॥ माझिये स्वरूपज्ञानार्थ ॥ भक्तीच कारण असे यथार्थ ॥ तपादि साधनें तीं समस्त ॥ असती व्यर्थ भक्तिविणें ॥ १२ ॥ मी सर्वभूतांच्या अंतर्यामी ॥ राहात असोनियां नेहमीं ॥ सर्वदा असें सर्वगामी ॥ ह्मणोनि सर्वद्रष्टाही असें ॥ १३ ॥ परी सर्वसाक्षी ऐशातें ॥ कोणीच लोक न जाणती मातें ॥ इंद्रोपेंद्रादि जैशीं देवतें ॥ तेंवीच मज समजती ॥ १४ ॥ पवनात्मजा हें विश्वसमस्त ॥ जयामाजी असे राहत ॥ आणि जो विश्वीं असोनि सतत ॥ भिन्नही असे सर्वांहूनी ॥ १५ ॥ तो मी सर्वविश्वाचा जनक ॥ तैसाचि विश्वप्रतिपाळक ॥ सर्वविश्वीं विश्वात्मा एक ॥ विश्वतोमुख ऐसा असें ॥ १६ ॥ परी सर्वही मुनि आणि देव ॥ ब्राह्मण मनु आणि वासव ॥ तैसेचि अन्य जे महाप्रभाव ॥ विख्यात सर्वजगामाजी ॥ १७ ॥ तेही मज तैसा न पाहत ॥ ऋगादिवेदमात्र समस्त ॥ मज एक परमेश्वर अच्युत ॥ ऐशातें सतत बोलती ॥ १८ ॥ अगा मारुते ह्या जगाठायीं ॥ कित्येक ब्राह्मण ते पाहीं ॥ नानाविध वैदिककर्मखांहीं ॥ अग्नीसि सदाही यजितात ॥ १९ ॥ आणि ब्रह्मलोकीं सर्वलोक ॥ पितामहासि नमिती देख ॥ भूताधिपति जो देव एक ॥ तया ध्याती महायोगी ॥ २० ॥ इत्यादिरीतीं सकळ जन ॥ करिती नानादेवताराधन ॥ ज्यांचें ज्यावरी जड-

टी. १ माझ्या स्वरूपाचें (आत्म्याचें). २ सर्व प्राणिमात्रांच्या. ३ उत्पन्नकर्ता. ४ इंद्र. ५ विश्वजनकत्वादिगुणांनीं युक्त आहें असा. ६ वेदांत सांगितलेल्या यज्ञांनीं. ७ हवन करतात, पूजितात. ८ ब्रह्मदेवास. ९ पिशाचांचा राजा (महादेव).

लें मन ॥ त्याचेंचि पूजन करितात ॥ २१ ॥ परी सखया पाहें तत्वता ॥ माझ्याच तंनू सर्वदे-
वता ॥ मीच सकळ यज्ञांचा भोक्ता ॥ आणि फळदाताही असें ॥ २२ ॥ मी सर्वात्मा परेश
देव ॥ सकळजनसंस्तुत सदेव ॥ माझें सर्वलोकोत्तर वैभव ॥ आणि प्रभाव विचित्र असे ॥२३॥
म्हणोनि त्यात्या देवतांचीं ॥ रूपें धरूनियां साचीं ॥ यज्ञादिनिखिलसत्कर्माचीं ॥ फळेंही मीच
देतसें ॥ २४ ॥ परी मज तैसा न पाहती जाण ॥ जे वेदवादी विद्वज्जन ॥ वेदोक्तधर्मपरायण ॥
तेमात्र संपूर्ण पाहाताती ॥ २५ ॥ अगा पवनात्मजा जे भक्त ॥ भक्तिभावें मज उपासित ॥
त्यांसन्निध मी राहूनि सतत ॥ करितों समस्त तत्कार्यें ॥ २६ ॥ जे विप्र क्षत्रिय वैश्य कोणी ॥
स्वधर्में भजती मजलागुनी ॥ तयां मी स्थापितों तेस्थानीं ॥ परमानंद सदा जेथें ॥ २७ ॥
आणि इतरही जेकां लोक ॥ शूद्रादि नीचजाति अनेक ॥ जयांलागीं कर्में वैदिक ॥ करण्या-
चा ना अधिकार ॥ २८ ॥ ते यज्ञादि कर्मावांचून ॥ केवळ भक्तिमात्रेंचि जाण ॥ कांहीं काळें
मज पावून ॥ मुक्त होतात निश्चयें ॥ २९ ॥ महापापीही असले तरी ॥ मद्भक्ति तयां पवित्र
करी ॥ सर्वसाधनांत भक्तीपरी ॥ श्रेष्ठ निर्धारीं अन्य नसे ॥३० ॥ माझ्या भक्तीचा महिमा ॥
कोण जाणे वानरोत्तमा ॥ व्यास वाल्मीकि शिव ब्रह्मा ॥ यांसिही सीमा न कळेच ॥ ३१ ॥
नीचजातिही माझे भक्त ॥ कालत्रयीं नाश न पावत ॥ मद्भक्त ते पापनिर्मुक्त ॥ असती निश्चित
जाणिजे ॥ ३२ ॥ आणि एतद्विषयीं पूर्वींच ॥ प्रतिज्ञा बोलिलों असें साच ॥ कीं माझा भक्त

टी. १ अवयव. २ सर्वस्वरूप. ३ मोठा ईश्वर. ४ सर्वजनांनीं स्तविलेला. ५ भक्तांचीं कार्यें.

असला नीच ॥ तरी तो नाश पावेना ॥ ३३ ॥ जो एकादा मूढ कोणी ॥ मद्भक्तासि निंदितो भुवनीं ॥ तो मज देवदेवालागुनी ॥ निंदितो जनीं जाणिजे ॥ ३४ ॥ आणि जो कोणी मम भक्तास ॥ भक्तिभावें पूजितो विशेष ॥ तो सदा मज जगदीशास ॥ पूजितो ऐसें जाणिजे॥३५॥ यज्ञादि विविधकर्मांहीं ॥ मजला आराधिलें तरीही ॥ भक्तीविणें मी वश नाहीं ॥ भक्तीच मज आवडते ॥ ३६ ॥ नानाविध राजोपचार ॥ मजला नकोत साचार ॥ भक्तिभावाविषयींच फार ॥ निरंतर भुकेलोंसें ॥ ३७ ॥ मदाराधना[1] कीजे ह्मणोनी ॥ भक्तिभावें मजलागुनी ॥ पत्र पुष्प फल कीं पाणी ॥ जोकां कोणी अर्पितो ॥३८॥ तो भक्त मज प्रिय मान्य ॥ सर्वब्रह्मांडामाजी धन्य ॥ योगतपोनिष्ठादिक अन्य ॥ तेतों सामान्य साचार ॥ ३९ ॥ मी देवदेवांचा ईश्वर ॥ मजहूनि नाहीं कोणी थोर ॥ माझा प्रभाव लोकोत्तर ॥ अचिंत्याक्षर असे पैं ॥ ४० ॥ मी सकळ जगाच्या आदीं ॥ विश्वस्रष्टा[2] सर्जूनि[3] विधी[4] ॥ मदास्यनिसृत[5] वेदनिधी[6] ॥ अशेष तयासी दीधले ॥ ४१ ॥ मीच सर्वयोग्यांचा गुरू ॥ अजं[7] अव्यय सर्वाधारू ॥ धार्मिकजनांचा अंगिकारू ॥ करूनि रक्षिता मीच असें ॥ ४२ ॥ वेदद्वेष्ट्यांचा निःपात ॥ करणारा तो मीच अच्युत ॥ माझें सामर्थ्य अत्यद्भुत ॥ काय बहुत निवेदूं ॥ ४३ ॥ मी सर्वसंसारापासून ॥ योगियां मुक्त करितों जाण ॥ पुनःपुन्हा जनन मरण ॥ हाचि दारुण संसार ॥ ४४ ॥ आणि संसाराचिये विषयीं ॥ हेतुही मीच असोनि पाहीं ॥ सर्व संसारविवर्जितही ॥ सर्वदा असें साचार ॥ ४५ ॥

टी. १माझी पूजा. २जग उत्पन्न करणारा. ३उत्पन्न करून. ४ब्रह्मदेव. ५माझ्या मुखापासून निघालेले. ६वेद रूप द्रव्याचे ठेवे. ७जन्मरहित.

मीच सकळ जगाचा कर्ता ॥ पाळिता आणि मीच हर्ता ॥ अनंतकोटिब्रह्मांडीं सत्ता ॥ माझीच सर्वथा चालताहे ॥४६॥ स्वसामर्थ्यें सकळ लोकां ॥ सर्वदा मोहित करी जीकां ॥ ती मायानाम्नी अलोलिका ॥ शक्ति एका माझीच ॥४७॥ आणि विद्या ऐसें जियेसि ह्मणती ॥ तीही माझीच दुसरी शक्ती ॥ मी योग्यांच्या हृदयीं वसती ॥ करूनियां साक्षोपें ॥ ४८ ॥ तये विद्याशक्तीनें पाहीं ॥ नाशितों ती माया सर्वही ॥ विद्येपुढें मायेचें कांहीं ॥ सामर्थ्य नाहीं चालत ॥४९॥ मी अनंतब्रह्मांडनायक ॥ परात्पर निरुपाधिक ॥ सर्व शक्तींचा प्रवर्तक ॥ आणि निवर्तक असोनियां ॥ ५० ॥ तयांसि आधारभूतही ॥ मीच असें जाण हृदयीं ॥ तैसेंचि अव्यय मोक्षाचेंही ॥ मीच निधान साचार ॥५१॥ अरे जी माझी राजसिक ॥ विधातृरूपिणी शक्ति एक ॥ ती हें विविध जग सकळिक ॥ यथापूर्व उत्पादिते ॥ ५२ ॥ आणि नारायणात्मिका निरुती ॥ जीकां दुसरी सात्विकी शक्ती ॥ ती विश्वनाथत्वें विश्वाप्रती ॥ दिवसरातीं पाळिते ॥ ५३ ॥ तैशीच तिसरी जी एक ॥ रुद्ररूपिणी कालात्मक ॥ तामसी शक्ति तीतों देख ॥ जग सकळिक संहारिते ॥ ५४ ॥ मी जगदात्मा जगन्मय ॥ जगदाधार निःसंशय ॥ माझिये प्राप्तीलागीं उपाय ॥ नानाविध योजिती ॥५५॥ कित्येक जन ध्यानयोगेंसीं ॥ मज आराधिती अहर्निशीं ॥ अन्य कित्येक ज्ञानयोगेंसीं ॥ सर्वत्र मजसी पूजितात ॥ ५६ ॥ भक्तियोगें कित्येक इतर ॥ सदा अर्चिती मज सादर ॥ एक ते कर्मयोगें परिकर ॥ निरंतर आराधिती ॥ ५७ ॥ आणि

टी. १ अनुपम. २ ज्ञानरूपिणी. ३ स्थान. ४ रजोगुणी. ५ ब्रह्मदेवरूप. ६ पूर्वकल्पांत होतें त्याप्रमाणें. ७ जगन्नाथपणानें.

एवंरीती यथारुची ॥ मदाराधना करित साची ॥ ते सर्वेही माझे भक्तची ॥ असती जाण नि-र्धारें ॥ ५८ ॥ परी त्या सर्वेही भक्तांत ॥ तोचि मज प्रिय अत्यंत ॥ जो अन्य साधनें टाकूनि समस्त ॥ ज्ञानेंचि सतत मज पूजी ॥ ५९ ॥ ध्यानादियोगीं मज जे सतत ॥ सेविती अन्य त्रि-विध भक्त ॥ तेही मातें पावती निश्चित ॥ पुन्हा न पडत संसारीं ॥ ६० ॥ परी जो हें विश्व सगळें ॥ माझेनि असे व्यापिलेलें ॥ ऐसें ज्ञानयोगें वहिलें ॥ सदा अंतरीं जाणतसे ॥ ६१ ॥ तो जीवनमुक्तचि असे जाण ॥ तैसे नव्हेति ते भक्त तीन ॥ ज्ञानी केवळ मदात्माचि ह्मणोन ॥ तिघांहून प्रिय मजसी ॥ ६२ ॥ आतां म्यां जें कथिलें तुजप्रत ॥ कीं माझेनि व्याप्त असे ज-गत ॥ याणें माझा जगाशीं सतत ॥ संबंध आहे ह्मणशील तूं ॥ ६३ ॥ तरी तो नसेचि पैं जाण ॥ पृथकचि असें जगाहून ॥ स्वभावानुवर्ति जग संपूर्ण ॥ वर्तत ऐसें मी पाहतों ॥ ६४ ॥ अरे जो षड्गुणैश्वर्यसंपन्न ॥ सर्वयोगांचा ईश्वर असोन ॥ प्रळयकाळीं योग साधन ॥ करितो आपण साक्षीपें ॥ ६५ ॥ ह्मणोन कवी शास्त्रांठायीं ॥ जयासि योगी ह्मणती पाहीं ॥ आणि नाना माया करितो सदाही ॥ ह्मणोनि मायी ह्मणिजेतो ॥ ६६ ॥ तोचि योगेश्वर भगवान ॥ परमाद्भुत सामर्थ्यवान ॥ आणि सर्वांहूनि महान् ह्मणून ॥ महादेव ऐसा बोलिजेतो ॥ ६७ ॥ आणि तोचि सर्वसत्वांवरुती ॥ पंरत्व चालवी ईशनशक्ती ॥ ह्मणोन परमेश्वर ऐसा जगतीं ॥ सदा समस्तीं बोलिजे तो ॥ ६८ ॥ आणि तोचि साक्षाद्भगवान ॥ ब्रह्ममय असे महान ॥ ह्मणो-

टी: १ पूर्वजन्मांतील वासनेला अनुसरून वागणारें. २ ज्ञान, वैराग्य, ऐश्वर्य, यश, कीर्ति आणि औदार्य ह्या साहा गुणांनीं युक्त. ३ शास्त्रकर्त्ते, पंडित. ४ सर्वप्राणिमात्रांवर. ५ श्रेष्ठपणानें, मोठेपणानें. ६ ईश्वरशक्ति.

न कवी तयालागुन ॥ ब्रह्मा ऐसें ह्मणतात ॥ ६९ ॥ मारुते ऐसा जो लोकोत्तर[1] ॥ महायोगेश्व-
रांचाही ईश्वर ॥ तो मीच असे श्रीरघुवीर ॥ ऐसें साचार जाणे जो ॥ ७० ॥ तो सदा अचल-
योगासी ॥ पावतो जाण निश्चयेंसीं ॥ असो माझा ह्या सर्वजगाशीं ॥ संबंध नसे कांहींच॥७१॥
मी निरुपाधिक[2] निरंजन[3] ॥ सर्वप्रेरक देव महान ॥ परमानंदातें आश्रयून ॥ योगांत निमग्न स-
दा असें ॥ ७२ ॥ हें मुख्य तत्व जाणे मनीं ॥ तोचि वेदवेत्ता महाज्ञानी ॥ आणि यालागींच
मजलागुनी ॥ सर्वांहुनी प्रिय तोच ॥ ७३ ॥ असो ऐसें जें गुह्यतम[4] ज्ञान ॥ सर्ववेदांत निश्चयिं-
लें जाण ॥ तें हें वत्सा म्यां तुजलागुन ॥ प्रेमें संपूर्ण कथिलेंसे ॥७४॥ हें कदा न द्यावें भल-
त्यासी ॥ गुप्त रक्षावें आपुल्यापाशीं ॥ जो प्रसन्नचित्त आहिताग्नि[5] ऋषी ॥ धार्मिक त्यासीच पैं
द्यावें ॥ ७५ ॥ असो ऐसें दाशरथी राम ॥ पवनात्मजासि सप्रेम ॥ अनन्यभक्तियोगाचें वर्म ॥
कथिता झाला साचार ॥ ७६ ॥ ऐसें श्रीमद्वाल्मीकऋषीनें ॥ कथिलें भारद्वाजाकारणं ॥
तेंचि हें येथें देशभाषेनें ॥ यथामती वर्णिलेंसे ॥ ७७ ॥ याचियें श्रवणें स्वांतरंग[6] ॥ विशुद्ध
होऊनियां चांग ॥ अव्यय[7] अनन्यभक्तियोग ॥ यथा सांग लाभतो ॥७८॥ तरी सकळश्रोते-
जनीं[8] ॥ नित्य श्रवण कीजे ह्मणोनि ॥ सीतात्मज मी हस्त जोडुनी ॥ तयांलागुनी प्रार्थितों
॥ ७९ ॥ स्वस्ति श्रीमदद्भुतरामविजय ॥ वाल्मीकीयाद्भुतोत्तरकांडहृदय ॥ ऐकोत सज्जन
होऊनि तन्मय ॥ चतुर्दशाध्याय मधुर हा ॥ ८० ॥ ॥ इति १४ अध्यायः ॥

टी. १ अलौकिक. २ उपाधिरहित. ३ निष्कलंक. ४ अत्यंत गुह्य. ५ अग्निहोत्री. ६ आपलें अंतःकरण. ७ नाशरहित. ८ श्रोत्यांस.

॥ श्रीगणेशायनमः ॥  ॥ जयजय प्रभो विश्वंभरा ॥ सच्चिदानंदा करुणाकरा ॥ अच्युता अव्यक्ता परात्परा ॥ परमोदारा जगद्गुरू ॥ १ ॥ अनंतकोटिब्रह्मांडनाथा ॥ पुराणपुरुषा स्वयंभुताता ॥ अजा अजेया आद्या अनंता ॥ त्रिगुणातीता सनातना ॥ २ ॥ भक्तवत्सला दीनोद्धरणा ॥ शरणागतात्रितापशमना ॥ योगिजनमानसरंजना ॥ भवभंजना जगदीशा ॥ ३ ॥ निरुपाधिका परात्परेशा ॥ शेषशयना पयोनिधिवासा ॥ अमला निःसंगा मायाविलासा ॥ परमहंसा सुपवित्रा ॥ ४ ॥ रविकुळमंडणा राजीवनेत्रा ॥ मनमोहना कमनीयगात्रा ॥ जानकीनयनसरोजमित्रा ॥ कौसल्यापुत्रा घनश्यामा ॥ ५ ॥ राक्षसांतका मंगळधामा ॥ महामुनिजनमनविश्रामा ॥ शंबरारिरिपुहृदयारामा ॥ सर्वगुणग्रामा रामचंद्रा ॥६॥ कृपा करूनि जगज्जीवना ॥ पुढें बोलवीं ग्रंथरचना ॥ तुझी लीला जगन्मोहना ॥ तूंच बोलें यथार्थ ॥ ७ ॥ पूर्वप्रसंगीं भक्तियोग ॥ कथिला असे यथासांग ॥ आतां पुनश्च जानकीरंग ॥ मारुतीप्रती सांगत ॥ ८ ॥ ह्मणे गा सखया पवनसुता ॥ मी सर्वलोकांचा निर्मिता ॥ तैसाचि सर्वप्रतिपाळिता ॥ आणि संहर्ता एकचि असें ॥ ९ ॥ मी सर्वात्मा असोनियांही ॥ काळत्रयीं समान राहीं ॥ सर्व लोपलें तथापि पाहीं ॥ होत नाहीं मम नाश ॥ १० ॥ मी सर्वेही वस्तूंच्या आंत ॥ अंतर्यामित्वें असोनि

---

टी. १ स्पष्ट नसणारा, ब्रह्मस्वरूपा. २ ब्रह्मदेवाच्या पित्या. ३ जन्मरहिता. ४ सदा सम असणारा. ५ शरणागताचें तापत्रय निरसणारा. ६ सुस्वरूपा. ७ जानकीच्या नयनरूपी कमळास प्रफुल्लित करणाऱ्या सूर्या. ८ शंबरासुराच्या शत्रूच्या ( मदनाच्या ) शत्रूचे ( शिवाचे ) मनास सुख देणारा. ९ सर्वगुणांचे स्थाना. १० सीतापति. * कल्याणांचे स्थाना.

वसत ॥ उत्पादकपणें तयांचा तातें ॥ मीच खचित एक असें ॥ ११ ॥ माझ्या ठायींच हें जगत ॥ सर्वही सदा असे वसत ॥ परी मी नसतां पैं त्यांत ॥ असें निर्लिप्त पृथकची ॥१२॥ वत्सा तुवां जेंकां वहिलें ॥ माझें अद्भुत स्वरूप देखिलें ॥ तेंतों म्यांचि मायेनें सगळें ॥ सादृश्य दाविलें माझेंच ॥ १३ ॥ मी सर्वहीभावांच्या आंत ॥ वसत होत्साता सतत ॥ प्रेरितों हें विश्व समस्त ॥ ही सर्व मम क्रियाशक्ती ॥ १४ ॥ आणि क्रियाशक्तीच्या स्वभावातें ॥ अनुलक्षूनि जग वर्ततें ॥ माझ्या योगें सर्वचेष्टांतें ॥ पावतें जाण साचार ॥ १५ ॥ तोचि मी सर्व जगाचा कर्ता ॥ आणि तोच मी होतों संहर्ता ॥ यथायोग्यकाळीं तत्वता ॥ दोन्ही अवस्था माझ्याच ॥ १६ ॥ मज नाहीं आदिमध्यांत ॥ मी मायातत्वप्रवर्तक अच्युत ॥ माझा प्रभाव अति अद्भुत ॥ अतर्क्य अनंत असे पैं ॥ १७ ॥ सर्वसृष्टीच्या आरंभीं नूतन ॥ विश्वोत्पत्ति करावी ह्मणोन ॥ प्रकृति पुरुष यांलागुन ॥ मीच जाण क्षोभवितों ॥१८॥ मग तीं दोघें परस्परांलागुनी ॥ संयुक्त होतां तयांपासुनी ॥ महत्तत्वादिक्रमेंकरुनी ॥ विश्व तत्क्षणीं उद्भवतें॥१९॥ तें सर्व माझ्याच तेजेंकरून ॥ सर्वदा असे प्रकाशमान ॥ मी सर्वात्मा सर्वत्र पूर्ण ॥ सर्वादिकारण साचार॥२०॥ जो काळचक्राचा प्रवर्तक ॥ सकळजगत्साक्षी एक ॥ हिरेण्यगर्भ तोही देख ॥ मजपासुनी उद्भवला ॥२१॥ तयाकारणें म्यां दयाळें ॥ सनातनज्ञानात्मक वहिलें ॥ परम दिव्य ऐश्वर्य आपुलें ॥ प्रेमें दीधलें सर्वही॥२२॥ आणि माझ्या मुखापासून ॥ चार वेद निघाले महान ॥

टी. १ पिता. २ प्राणिमात्रांच्या. ३ सर्वांचा मूळकारण. ४ कार्यब्रह्मा. ५ निरंतर असणारें जें ज्ञान तद्रूप.

तेही सर्व तयालागुन ॥ कल्पारंभीं दीधले ॥ २३ ॥ आतां तो स्वयंभु ब्रह्मदेव ॥ माझ्या नियोगें सुस्वभाव ॥ मदभिप्रायानुसार सदैव ॥ वर्तूनियां साक्षेपें ॥ २४ ॥ माझ्या त्या दिव्य ऐश्वर्यास ॥ स्वयें भोगितो रात्रंदिवस ॥ आणि माझेच आज्ञें सर्वज्ञतेस ॥ पावोनि सृष्टीस उद्भवितो ॥ २५ ॥ तैसेचि उत्पत्ति आणि अंत ॥ जयापासूनि सदा होत ॥ ऐसा जो नारायण अनंत ॥ नित्य शुद्ध सत्वगुणी ॥ २६ ॥ तो माझीच असे मुख्य मूर्ती ॥ यांत संशय नसे निरुती ॥ माझ्याच नियोगें दिवसरातीं ॥ सर्वलोकां प्रतिपाळितो ॥ २७ ॥ आणि सर्वभूतांचा नाशक ॥ जो अति क्रूर कालात्मक ॥ महासमर्थ रुद्रनामक ॥ पुरुष एक प्रसिद्ध पैं ॥ २८ ॥ तोही माझीच तनू[3] जाण ॥ मीच तयासि आदिकारण ॥ माझ्याच आज्ञें तो अनुदिन ॥ जग संपूर्ण संहारितो ॥ २९ ॥ होमिलेलें द्रव्य समस्त ॥ देवांप्रति जो पोंचवित ॥ तैसेंचि कव्यद्रव्यही सतत ॥ नेऊनि देत पितरांसी ॥ ३० ॥ आणि धान्यादिकांचा करी पाक ॥ ऐसा जो वन्हिनामा पावक[*] ॥ तोही माझ्याच शक्तीनें देख ॥ वर्तत असे सर्वदा ॥ ३१ ॥ भक्षिलेल्या पदार्थालागुनी ॥ सदा पचवी जठरीं राहुनी ॥ तोही वैश्वानरनामा अग्नी ॥ माझ्याच निदेशें वर्तताहे ॥ ३२ ॥ सर्वोदकांचें उत्पत्तिस्थान ॥ जो सर्वदेवश्रेष्ठ वरुण ॥ तोही माझ्याच निदेशें करून ॥ जगाचें जीवन चालवितो ॥ ३३ ॥ सर्वभूतांच्या आंत आणी ॥ बाहेरही सदा राहुनी ॥ प्राणिमात्रांच्या देहांलागुनी ॥ सांभाळुनी असे जो ॥ ३४ ॥ तो निष्कलंक देव पवन ॥

टी. १ आज्ञेनें, प्रेरणेनें. २ खरोखर. ३ मूर्ति, देह. ४ पितरांच्या उद्देशानें होमिलेलें द्रव्य. ५ आज्ञेनें. ६ वायु. * अग्नि.

माझ्याच आज्ञेंत वर्ततो जाण ॥ आणि सर्वकाळ ज्यापासुन ॥ चाले जीवन जीवांचें ॥ ३५ ॥ आणि देवांलागीं निरंतर ॥ पोषक होय सुधेचा आकर ॥ तो सोमही ह्या जगाभीतर ॥ माझ्याच नियोगें वर्तताहे ॥ ३६ ॥ आपुल्या तेजें सकळ सृष्टी ॥ प्रकाशित करी जो तीक्ष्णघृष्टी ॥ आणि योग्यकाळीं मेदिनीपृष्ठीं ॥ करूनि वृष्टी सुख देत ॥ ३७ ॥ तो साक्षात् सूर्यनारायणही ॥ मम नियोगेंच वर्ततो पाहीं ॥ मजवर सत्ता कोणाची नाहीं ॥ स्वयंभु असें मी साचार ॥ ३८ ॥ जो अशेषजगाचा शास्ता ॥ आणि सर्वयज्ञांचा फलदाता ॥ निखिलदेवगणाचा गोप्ता ॥ शक्रदेव प्रसिद्ध ॥ ३९ ॥ तोही माझ्याच आज्ञेनें सतत ॥ स्वर्गलोकीं असे वर्तेत ॥ आणि जो देव भास्करसुत ॥ सदा शासित अधर्म्यांसी ॥ ४० ॥ तो स्वयें यमधर्मही ॥ माझिये नियोगेंच पाहीं ॥ सद्धर्मनियमें त्रैलोक्या ठायीं ॥ वर्तत असे साचार ॥ ४१ ॥ आणि सर्वधनसंप्रदायक ॥ जो धनाध्यक्ष कुबेरनामक ॥ तोही मम निदेशेंच देख ॥ वर्तत असे सर्वदा ॥ ४२ ॥ तैसाचि जो राक्षसाधिपती ॥ तापसफलद देव निर्ऋती ॥ तोही माझ्याच आज्ञेनें जगतीं ॥ दिवसरातीं वर्तताहे ॥ ४३ ॥ वेतालभूतप्रेतांचा नायक ॥ भक्तांसि भोगफलदायक ॥ ऐसा जो देव ईशनामक ॥ तोही वर्ततो मदाज्ञेंची ॥ ४४ ॥ आणि जो वामदेवाभिधान ॥ रुद्रगणामाजी प्रधान ॥ अंगिरसाचा शिष्य सुजाण ॥ करितो रक्षण योगियांचें ॥ ४५ ॥ तो-



टी. १ अमृताचा. २ खाण. ३ चंद्रही. ४ तीक्ष्णकिरण ( सूर्य ). ५ पृथ्वीवर. ६ इंद्रनामा देव. ७ सूर्याचा पुत्र. ८ शासन करतो. ९ सर्व द्रव्याचा स्वामी. १० तपस्व्यांस तपाचें फल देणारा. ११ वामदेव नांवाचा. १२ मुख्य. * रक्षण करणारा.

ही माझ्याच आज्ञें सतत ॥ वर्तत आहे जाण निश्चित ॥ आणि त्रिजगत्पूज्य एकदंत ॥ विघ्नकर्ता विनायक जो ॥ ४६ ॥ तोही माझ्याच वचनेंकरून ॥ धर्मनियंता होऊनि जाण ॥ भक्तजनांचीं विघ्नें दारुण ॥ समूळ संपूर्ण नाशितो ॥ ४७ ॥ वेदवेत्त्यांमाजी प्रमुख ॥ जो सर्वदेवसेनेचा नायक ॥ महासमर्थ स्वामीकार्तिक ॥ तोही वागतो मदाज्ञेंची ॥ ४८ ॥ आणि जे महर्षि प्रजापती ॥ मरीच्यादिक समर्थ अती ॥ तेही माझ्याच निदेशें जगतीं ॥ सदा सृजिती सर्वलोकां ॥ ४९ ॥ तैशीच जी श्री हरीची कांता ॥ विपुळ धन दे सर्वभूतां ॥ तीही माझ्याच कृपें सर्वथा ॥ वर्तत आहे जगामाजी ॥ ५० ॥ आणि जी देवी सरस्वती ॥ बहु वाचा दे प्राणियांप्रती ॥ तीही माझ्याच नियोगें जगतीं ॥ तैसे रीतीं वर्तताहे ॥ ५१ ॥ तैशीच जी सर्वपुरुषांतें ॥ घोरनरकांपासून तारिते ॥ ती सावित्री देवीही येथें ॥ आज्ञा पाळिते माझीच ॥ ५२ ॥ आणि जी देवी हिमाचलसुता ॥ शंकरप्रिया त्रिजगन्माता ॥ शुद्धमानसीं विशेषें ध्यातां ॥ ब्रह्मविद्या दे साचार ॥ ५३ ॥ तीही ममवचनानुसार ॥ वर्तत आहे निरंतर ॥ मी देव देवांचाही ईश्वर ॥ ह्मणोनि समग्र मानिती ॥ ५४ ॥ आणि जो स्वयें असोनि अनंत ॥ ज्याचा महिमाही असे अनंत ॥ ऐसा जो देवेश महासमर्थ ॥ सर्वविख्यात शेषनामा ॥ ५५ ॥ तोही माझ्याच नियोगेंसीं ॥ स्वशिरीं धरितो धरित्रीसी ॥ स्थिर चर सर्वप्राणियांसी ॥ अहर्निशीं रक्षिताहे ॥ ५६ ॥ जो संवर्तकनामा अग्नी ॥ नित्य वडवांरूप होउनी ॥ समुद्राचें प्राशितो

टी. १ उत्पन्न करतात. २ लक्ष्मी. ३ गायत्री. ४ हिमाचळाची कन्या (पार्वती). ५ ज्ञान. ६ रात्रंदिवस. ७ घोडीचें रूप.

पाणी ॥ तोही माझ्याच नियोगें[1]से ॥ ५७ ॥ आदित्य[2] वसु[3] रुद्र[4] संपूर्ण ॥ अश्विनीकुमार[5] मरु-
द्गण[6] ॥ आणि अन्यही देवता संपूर्ण ॥ वर्तती जाण मदाज्ञेंची ॥ ५८ ॥ सर्प सिद्ध यक्ष गंध-
र्व ॥ राक्षस चारण साध्यदेव[7] ॥ भूत प्रेत पिशाचादि सर्व ॥ वर्तती सदैव मदाज्ञेंची ॥ ५९ ॥
तैसेचि कळा[8] काष्ठा[9] निमेष ॥ क्षण[10] मुहूर्त[11] आणि दिवस ॥ ऋतु[12] संवत्सर पक्ष मास ॥ हेही वर्तती
मदाज्ञेंची ॥ ६० ॥ युगें मन्वंतरें प्रसिद्ध ॥ कल्प पर आणि परार्ध ॥ तैसेचि अन्यही काळ-
भेद ॥ सर्व वर्तती मदाज्ञेंची ॥ ६१ ॥ चतुर्विध[13] भूतजाति आणी ॥ स्थावर चर सकळ प्राणी ॥
ग्राम पुरें भुवनादिकरोनी ॥ वर्तती सर्व मदाज्ञेंच ॥ ६२ ॥ अरे मी परमात्मा अच्युत ॥ त्रि-
गुणातीत देव अनंत ॥ माझ्याच आज्ञेनें हीं समस्त ॥ ब्रह्मांडें सांप्रत वर्तती ॥ ६३ ॥ सर्व-
वस्तूंसहवर्तमान ॥ पूर्वींही जीं उद्भवून ॥ असंख्य ब्रह्मांडें गेलीं लोपुन ॥ तींही जाण मदा-
ज्ञेंची ॥ ६४ ॥ आणि पुढेंही सर्ववस्तूंसहित ॥ ब्रह्मांडें होतील असंख्यात ॥ तींही माझ्याच
आज्ञेनें सतत ॥ वर्ततील निश्चयें ॥ ६५ ॥ भूमि आप[14] तेज[15] समीर[16] ॥ नभ[17] मन बुद्धि अहंकार॥
आणि मूळप्रकृति हीं सांचार[18] ॥ वर्तती समग्र मदाज्ञेंची ॥ ६६ ॥ सर्वप्राण्यांसह सर्वजगातें ॥
रात्रंदिवस जी मोहिते ॥ ती मायादेवीही मारुते ॥ नित्य वर्तते मदाज्ञेंच ॥६७॥ जियेच्या यो-

टी. १ आज्ञेनें. २ बारा आदित्य. ३ आठ वसु. ४ अकरा रुद्र. ५ दोघे. ६ एकुणपन्नास. ७ बारा साध्यदेव. ८ वीस विपळें म्हणजे कला. ९ अठरा निमेष म्हणजे काष्टा. १० दहा पळें म्हणजे क्षण. ११ दोन घटिका. १२ दोन महिने. १३ जरायुज, अडंज, स्वेदज आणि उद्भिज ह्या चार प्रकारच्या. १४ उदक. १५ अग्नि इत्यादि. १६ वायु. १७ आकाश. १८ खरोखर.

ही माझ्याच आज्ञें सतत ॥ वर्तत आहे जाण निश्चित ॥ आणि त्रिजगत्पूज्य एकदंत ॥ विघ्नकर्ता विनायक जो ॥ ४६ ॥ तोही माझ्याच वचनेंकरून ॥ धर्मनियंता होऊनि जाण ॥ भक्तजनांचीं विघ्नें दारुण ॥ समूळ संपूर्ण नाशितो ॥ ४७ ॥ वेदवेत्त्यांमाजी प्रमुख ॥ जो सर्वदेवसेनेचा नायक ॥ महासमर्थ स्वामीकार्तिक ॥ तोही वागतो मदाज्ञेंची ॥ ४८ ॥ आणि जे महर्षि प्रजापती ॥ मरीच्यादिक समर्थ अती ॥ तेही माझ्याच निदेशें जगतीं ॥ सदा संर्जिती सर्वलोकां ॥ ४९ ॥ तैशीच जी श्री हरीची कांता ॥ विपुळ धन दे सर्वभूतां ॥ तीही माझ्याच कृपें सर्वथा ॥ वर्तत आहे जगामाजी ॥ ५० ॥ आणि जी देवी सरस्वती ॥ बहु वाचा दे प्राणियांप्रती ॥ तीही माझ्याच नियोगें जगतीं ॥ तैसे रीतीं वर्तताहे ॥ ५१ ॥ तैशीच जी सर्वपुरुषांतें ॥ घोरनरकांपासून तारिते ॥ ती सावित्री देवीही येथें ॥ आज्ञा पाळिते माझीच ॥ ५२ ॥ आणि जी देवी हिमाचलसुता ॥ शंकरप्रिया त्रिजगन्माता ॥ शुद्धमानसीं विशेषें ध्यातां ॥ ब्रह्मविद्या दे साचार ॥ ५३ ॥ तीही ममवचनानुसार ॥ वर्तत आहे निरंतर ॥ मी देव देवांचाही ईश्वर ॥ ह्मणोनि समग्र मानिती ॥ ५४ ॥ आणि जो स्वयें असोनि अनंत ॥ ज्याचा महिमाही असे अनंत ॥ ऐसा जो देवेश महासमर्थ ॥ सर्वविख्यात शेषनामा ॥ ५५ ॥ तोही माझ्याच नियोगेंसीं ॥ स्वशिरीं धरितो धरित्रीसी ॥ स्थिर चर सर्वप्राणियांसी ॥ अहर्निशीं रक्षिताहे ॥ ५६ ॥ जो संवर्तकनामा अग्नी ॥ नित्य वडवारूप होउनी ॥ समुद्राचें प्राशितो

टी. १ उत्पन्न करतात. २ लक्ष्मी. ३ गायत्री. ४ हिमाचळाची कन्या (पार्वती). ५ ज्ञान. ६ रात्रंदिवस. ७ घोडीचें रूप.

पाणी ॥ तोही माझ्याच नियोगेंसे ॥ ५७ ॥ आदित्य वसु रुद्र संपूर्ण ॥ अश्विनीकुमार मरुद्गण ॥ आणि अन्यही देवता संपूर्ण ॥ वर्तती जाण मदाज्ञेंची ॥ ५८ ॥ सर्प सिद्ध यक्ष गंधर्व ॥ राक्षस चारण साध्यदेव ॥ भूत प्रेत पिशाचादि सर्व ॥ वर्तती सदैव मदाज्ञेंची ॥ ५९ ॥ तैसेचि कला काष्ठा निमेष ॥ क्षण मुहूर्त आणि दिवस ॥ ऋतु संवत्सर पक्ष मास ॥ हेही वर्तती मदाज्ञेंची ॥ ६० ॥ युगें मन्वंतरें प्रसिद्ध ॥ कल्प पर आणि परार्ध ॥ तैसेचि अन्यही कालभेद ॥ सर्व वर्तती मदाज्ञेंची ॥ ६१ ॥ चतुर्विध भूतजाति आणी ॥ स्थावर चर सकळ प्राणी ॥ ग्राम पुरें भुवनादिकरोनी ॥ वर्तती सर्व मदाज्ञेंच ॥ ६२ ॥ अरे मी परमात्मा अच्युत ॥ त्रिगुणातीत देव अनंत ॥ माझ्याच आज्ञेनें हीं समस्त ॥ ब्रह्मांडें सांप्रत वर्तती ॥ ६३ ॥ सर्ववस्तूंसहवर्तमान ॥ पूर्वीही जीं उद्भवून ॥ असंख्य ब्रह्मांडें गेलीं लोपुन ॥ तींही जाण मदाज्ञेंची ॥ ६४ ॥ आणि पुढेंही सर्ववस्तूंसहित ॥ ब्रह्मांडें होतील असंख्यात ॥ तींही माझ्याच आज्ञेनें सतत ॥ वर्ततील निश्चयें ॥ ६५ ॥ भूमि आप तेज समीर ॥ नभ मन बुद्धि अहंकार ॥ आणि मूळप्रकृति हीं साचार ॥ वर्तती समग्र मदाज्ञेंची ॥ ६६ ॥ सर्वप्राण्यांसह सर्वजगातें ॥ रात्रंदिवस जी मोहिते ॥ ती मायादेवीही मारुते ॥ नित्य वर्तते मदाज्ञेंच ॥६७॥ जियेच्या यो-



टी. १ आज्ञेनें. २ बारा आदित्य. ३ आठ वसु. ४ अकरा रुद्र. ५ दोवे. ६ एकुणपन्नास. ७ बारा साध्यदेव. ८ वीस विपळें ह्मणजे कला. ९ अठरा निमेष ह्मणजे काष्टा. १० दहा पळें ह्मणजे क्षण. ११ दोन घटिका. १२ दोन महिने. १३ जरायुज, अंडंज, स्वेदज आणि उद्भिज ह्या चार प्रकारच्या. १४ उदक. १५ अग्नि इत्यादि. १६ वायु. १७ आकाश. १८ खरोखर.

गें मोहकंलिल ॥ समूळ निरसूनियां सकळ ॥ परब्रह्मपद निर्मळ ॥ मानवीं तत्काळ पाविजेतें ॥ ६८ ॥ ती ब्रह्मविद्योही मानवांतें ॥ माझ्याच नियोगें वश होते ॥ असो मारुते आतां तूतें ॥ काय येथें बहु सांगूं ॥ ६९ ॥ मम शक्त्यात्मक सर्वजगत ॥ आहे ऐसें जाण निश्चित ॥ आणि मीच भरलेला असोनि यांत ॥ हें लय पावत माझ्यांतची ॥७०॥ मी षड्गुणैश्वर्यसंपन्न विशेष ॥ आद्यंतरहित स्वयंप्रकाश ॥ परब्रह्म परमात्मा परेश ॥ ऐसें मुनीश मज ह्मणती ॥ ७१ ॥ आणि ह्या सकळजगाठायीं ॥ मजहूनि अन्य नसे कांहीं ॥ ऐसें हें ब्रह्मज्ञान सर्वही ॥ तुजयेठायीं कथिलेंसे ॥ ७२ ॥ ह्या उत्तमज्ञानालागुन ॥ जाणती ते प्राणी तत्क्षण ॥ जन्मसंसारबंधापासुन ॥ सुटती जाण साचार ॥७३॥ मी स्वयंज्योति कैवल्यदानी ॥ जन्मादिरहितही असोनी ॥ लीलार्थ मायेसि आश्रयूनि ॥ दशरथसदनीं उद्भवलों ॥ ७४ ॥ तोचि मी राम हा लक्ष्मण ॥ तैसाचि भरत आणि शत्रुघ्न ॥ ऐसा चतुर्विधरूपवान ॥ दशरथनंदन जाहलों ॥ ७५ ॥ असो मारुते त्वां जें पुशिलें ॥ तयाचें उत्तर म्यां कथिलें ॥ आतां सांगायाचें जें राहिलें ॥ तेंचि ऐकें साचार ॥ ७६ ॥ अरे म्यां जें कृपा करुनी ॥ स्वरूप कथिलें तुजलागुनी ॥ तें त्वां सतत धरावें मनीं ॥ कदापि नच विसरावें ॥ ७७ ॥ आणीक सांगतों पर्येसीं ॥ ह्या तुझ्या माझ्या संवादासी ॥ जो मानव नित्य नियमेंसीं ॥ भक्तिभावेंसीं पठील ॥ ७८ ॥ तयाचीं पापें लोपूनि समस्त ॥ वाढतील पुण्याचे पर्वत ॥ आणि सकळजगांत विख्यात ॥ जी-

टी. १ मोहरूपी दुर्गम वस्तु. २ ब्रह्मज्ञान. ३ स्वयंप्रकाश ( आपल्याच तेजादिकानें प्रकाशित होणारा ). ४ मोक्ष देणारा.

वन्मुक्त होईल तो ॥ ७९ ॥ आणि ब्रह्मचर्यपरायण ॥ ऐसा शुद्ध द्विजांलागुन ॥ आमुच्या संवादाचें श्रवण ॥ किंवा मनन करवील ॥८०॥ तो पावेल परम गती ॥ जेथूनि नाहीं पुनरावृत्ती ॥ आणि जो भक्तियुक्त दृढव्रती ॥ होऊनि नित्य ऐकेल ॥ ८१ ॥ तो सर्वपापविनिर्मुक्त ॥ ऐसा होत्साता सतत ॥ येथें भोग भोगूनि अनंत ॥ ब्रह्मलोका पावेल पां ॥ ८२ ॥ ऐसा ह्या संवादाचा महिमा ॥ उत्तम असे गा प्लवंगमा॥ यासि ब्रह्मांडामाजी उपमा ॥ द्यावया नसे कांहींच ॥८३॥ ह्मणोनि सर्वबुद्धिमंतांनीं ॥ आणि त्यांहूनि विशेषें ब्राह्मणांनीं ॥ ह्याचें पठण श्रवण आणी ॥ मनन सदा कीजिये ॥८४॥ एवं राघवें मारुतीप्रत ॥ विवरूनियां कथिलें समस्त ॥ तें ऐकतां तो पवनसुत ॥ हर्षें अत्यंत कोंदाटला ॥ ८५ ॥ ऐसें वाल्मीकमुनि प्रीतीं ॥ कथिता झाला स्वशिष्यांप्रती ॥ आतां श्रीरामचंद्राची स्तुती ॥ पुढच्या प्रसंगीं कथिजेल ॥ ८६ ॥ तरी श्रोतीं तच्छ्रवणार्थ ॥ सावध असावें एतदर्थ ॥ तयांसि मी रघुनाथसुत ॥ जोडूनि हस्त प्रार्थितों ॥ ८७ ॥ स्वस्ति श्रीमदद्भुतरामविजय ॥ वाल्मीकीयाद्भुतोत्तरकांडहृदय ॥ ऐकोत सज्जन होऊनि तन्मय ॥ पंचदशाध्याय मधुर हा ॥ ८८ ॥ ॥ १५ ॥

इति पंचदशाध्यायः समाप्तः ॥ ॥ १५ ॥

---

टी. वानरा ( मारुती ). २ भारद्वाजऋषीप्रत.

गें मोहकंलिल ॥ समूळ निरसूनियां सकळ ॥ परब्रह्मपद निर्मळ ॥ मानवीं तत्काळ पाविजेतें ॥ ६८ ॥ ती ब्रह्मविद्याही मानवांतें ॥ माझ्याच नियोगें वश होते ॥ असो मारुते आतां तूतें ॥ काय येथें बहु सांगूं ॥ ६९ ॥ मम शक्त्यात्मक सर्वजगत ॥ आहे ऐसें जाण निश्चित ॥ आणि मीच भरलेला असोनि यांत ॥ हें लय पावत माझ्यांतची ॥७०॥ मी षड्गुणैश्वर्यसंपन्न विशेष ॥ आद्यंतरहित स्वयंप्रकाश ॥ परब्रह्म परमात्मा परेश ॥ ऐसें मुनीश मज ह्मणती ॥ ७१ ॥ आणि ह्या सकळजगाठायीं ॥ मजहूनि अन्य नसे कांहीं ॥ ऐसें हें ब्रह्मज्ञान सर्वही ॥ तुजयेठायीं कथिलेंसे ॥ ७२ ॥ ह्या उत्तमज्ञानालागुन ॥ जाणती ते प्राणी तत्क्षण ॥ जन्मसंसारबंधापासुन ॥ सुटती जाण साचार ॥७३॥ मी स्वयंज्योति कैवल्यदानी ॥ जन्मादिरहितही असोनी ॥ लीलार्थ मायेसि आश्रयूनि ॥ दशरथसदनीं उद्भवलों ॥ ७४ ॥ तोचि मी राम हा लक्ष्मण ॥ तैसाचि भरत आणि शत्रुघ्न ॥ ऐसा चतुर्विधरूपवान ॥ दशरथनंदन जाहलों ॥ ७५ ॥ असो मारुते त्वां जें पुशिलें ॥ तयाचें उत्तर म्यां कथिलें ॥ आतां सांगायाचें जें राहिलें ॥ तेंचि ऐकें साचार ॥ ७६ ॥ अरे म्यां जें कृपा करुनी ॥ स्वरूप कथिलें तुजलागुनी ॥ तें त्वां सतत धरावें मनीं ॥ कदापि नच विसरावें ॥ ७७ ॥ आणीक सांगतों पर्येसीं ॥ ह्या तुझ्या माझ्या संवादासी ॥ जो मानव नित्य नियमेंसीं ॥ भक्तिभावेंसीं पठील ॥ ७८ ॥ तयाचीं पापें लोपूनि समस्त ॥ वाढतील पुण्याचे पर्वत ॥ आणि सकळजगांत विख्यात ॥ जी-

टी. १ मोहरूपी दुर्गम वस्तु. २ ब्रह्मज्ञान. ३ स्वयंप्रकाश ( आपल्याच तेजादिकानें प्रकाशित होणारा ). ४ मोक्ष देणारा.

वन्मुक्त होईल तो ॥ ७९ ॥ आणि ब्रह्मचर्यपरायण ॥ ऐसा शुद्ध द्विजांलागुन ॥ आमुच्या संवादाचें श्रवण ॥ किंवा मनन करवील ॥८०॥ तो पावेल परम गती ॥ जेथूनि नाहीं पुनरावृत्ती ॥ आणि जो भक्तियुक्त दृढव्रती ॥ होऊनि नित्य ऐंकेल ॥ ८१ ॥ तो सर्वपापविनिर्मुक्त ॥ ऐसा होत्साता सतत ॥ येथें भोग भोगूनि अनंत ॥ ब्रह्मलोका पावेल पां ॥ ८२ ॥ ऐसा ह्या संवादाचा महिमा ॥ उत्तम असे गा प्लवंगमा ॥ यासि ब्रह्मांडामाजी उपमा ॥ द्यावया नसे कांहींच ॥८३॥ ह्मणोनि सर्वबुद्धिमंतांनीं ॥ आणि त्यांहूनि विशेषें ब्राह्मणांनीं ॥ ह्याचें पठण श्रवण आणी ॥ मनन सदा कीजिये ॥८४॥ एवं राघवें मारुतीप्रत ॥ विवरूनियां कथिलें समस्त ॥ तें ऐकतां तो पवनसुत ॥ हर्षें अत्यंत कोंदाटला ॥ ८५ ॥ ऐसें वाल्मीकमुनि प्रीतीं ॥ कथिता झाला स्वशिष्याप्रती ॥ आतां श्रीरामचंद्राची स्तुती ॥ पुढच्या प्रसंगीं कथिजेल ॥ ८६ ॥ तरी श्रोतीं तच्छ्रवणार्थ ॥ सावध असावें एतदर्थ ॥ तयांसि मी रघुनाथसुत ॥ जोडूनि हस्त प्रार्थितों ॥ ८७ ॥ स्वस्ति श्रीमदद्भुतरामविजय ॥ वाल्मीकीयाद्भुतोत्तरकांडहृदय ॥ ऐकोत सज्जन होऊनि तन्मय ॥ पंचदशाध्याय मधुर हा ॥ ८८ ॥ ॥ १५ ॥

इति पंचदशाध्यायः समाप्तः ॥ ॥ १५ ॥

---

टी. वानरा ( मारुती ). २ भारद्वाजऋषीप्रत.

॥ श्रीगणेशायनमः ॥ ॥ जयजय श्रीपरमेश्वरा ॥ त्रिगुणातीता दयासागरा ॥ सच्चिदानंदा-त्मका[1] अक्षरा ॥ वेदांतसारा अप्रमेया[2] ॥१॥ जय विश्वांकुरा विश्वात्मया ॥ विश्वजीवना विश्वाश्रया ॥ विश्वमोहना विश्वविलया ॥ अनंतमायाविभंजना ॥ २ ॥ निष्कलब्रह्मविज्ञानांजना[3] ॥ सनंदादिमानसरंजना ॥ सकळब्रह्मानंदभुंजना[4] ॥ निरंजना निरुपाधिका ॥ ३ ॥ सर्वाध्यक्षा सर्वहेतुका ॥ सर्वसाक्षिया सर्वात्मका ॥ सर्वातीता सर्वोद्धारका ॥ सर्वदायका सर्ववंद्या ॥ ४ ॥ सर्वचित्तपरीक्षका आद्या ॥ सर्ववेदांतप्रतिपाद्या[5] ॥ सर्वानंदकंदा स्वसंवेद्या ॥ अहंरोगवैद्या[6] नारायणा ॥ ५ ॥ निर्मला निःसंगा निर्गुणा ॥ निर्द्वंद्वा निष्क्रिया निष्कारणा ॥ निर्मोहा नि-र्लोभा सनातना[7] ॥ निरभिमाना राघवेंद्रा ॥ ६ ॥ सकळकल्याणगुणसमुद्रा ॥ सीतानयन-चकोरचंद्रा[8] ॥ निशाचरमत्तद्विरदमृगेंद्रा[9] ॥ प्रतापरुद्रा परिपूर्णा ॥ ७ ॥ भक्तेच्छापूरका करु-णाघना ॥ भावें वंदितों रघुनंदना ॥ पुढें बोलवूनि ग्रंथरचना ॥ पुरवीं कामना सकळिक ॥८॥ पंचदशाध्यायीं निरूपण ॥ केलें ईश्वरत्वाचें वर्णन ॥ आतां वाल्मीकि प्रेमेंकरून ॥ भारद्वा-जासी सांगत ॥ ९ ॥ ह्मणे गा राहें सावधान ॥ रामाचें तें पूर्वोक्त वचन ॥ ऐकूनियां तो वायु-नंदन ॥ समाधान पावला ॥ १० ॥ मग हृदयस्थातें ध्याऊनि सादर ॥ मस्तकें केला नम-

---

टी. १ सत्य, ज्ञान. व आनंद एतद्रूप. २ परिमाणरहित. ३ पूर्णब्रह्माचें अनुभवज्ञान प्राप्त होण्याविषयीं अंजनरूपा. ४ सर्व ब्रह्मानंद भोगणारा. ५ उपनिषदांनीं प्रतिपादिलेला. ६ अहंकाररूपी रोगाचे वैद्या. ७ आदिमध्यांतरहिता ( निरंतर सा-रखा असणारा ). ८ सीतेच्या नेत्ररूपी चकोरांस आनंदविणारा. ९ राक्षसरूप मदोन्मत्त हत्तींस संहारणाऱ्या सिंहा.

स्कार ॥ सर्वेंचि करूनि प्रणवोच्चार ॥ उभय कर जोडिन्नले ॥११॥ आणि जो सर्वपरिमाणर-
हित ॥ जयाची शक्ति सर्वत्र चालत ॥ सनकादिक मुनि महंत ॥ स्तवित आहेत जयासी
॥ १२ ॥ ऐसा महात्मा रघुनाथ ॥ आपुल्या देहीं हृदयगुहेंत ॥ परमानंदें असे डुल्लत ॥ ऐसें
अंतरीं देखूनियां ॥ १३ ॥ तो महात्मा समीरनंदन ॥ परमानंदित ऐसा तत्क्षण ॥ ब्रह्ममय-
वचनीं रामालागुन ॥ सादर स्तवूं लागला ॥ १४ ॥ ह्मणे जो तूं एक ईश ॥ परम पवित्र पुरा-
ण पुरुष ॥ सर्वांतरीं करूनि निवेश ॥ प्राणाधीश ह्मणविसी ॥ १५ ॥ आणि ज्याच्या योगाचा
नाहीं अंत ॥ जयासि प्रचेता ऐसें ह्मणत ॥ त्या तुज ब्रह्ममयाप्रत ॥ भावें सतत वंदितों मी
॥१६॥ रामा तपःक्लेशांसि साहत ॥ आणि सर्वेंद्रियांसि दमित ॥ आत्मरूपाचें मनन करित ॥
तैसेच शांत मुनींद्र जे ॥ १७ ॥ ते तूं जो आत्मस्थ ब्रह्मयोनी ॥ पराहूनि परम श्रेष्ठ
आणी ॥ दूरदर्शी विमल रुक्मवर्णी ॥ तया तुज मनीं ध्याऊनियां ॥ १८ ॥ आपुल्या शरीरीं
तूं अढळ ॥ वसत आहेसि सर्वकाळ ॥ ऐसें तुज ते मुनींद्र सकळ ॥ पाहतात जाण निर्धारें
॥ १९ ॥ सकळजीवांचा सृष्टिकर्ता ॥ तूं परमाणुभूत भगवंता ॥ तुझ्यापासूनि ही सर्वथा ॥
जगदुत्पत्ति झाली असे ॥ २० ॥ तूं अणूहूनिही अणीयान ॥ आणि महंताहूनि अति महान ॥
तूंच आहेस जग संपूर्ण ॥ ऐसें सज्जन बोलतात ॥ २१ ॥ आणि सर्वजगाचा अंतरात्मा ॥ जो



टी. १ ॐकाराचा उच्चार. २ वायुपुत्र ( मारुति ). ३ वेदोक्तवचनांनीं. ४ जुनाट. ५ वेदांचें उत्पत्तिस्थान. ६ प्रकृति पुरुषादिक जे श्रेष्ठ त्यांहून. ७ सोन्याप्रमाणें तेजस्वी आहे वर्ण ज्याचा. ८ अत्यंत सूक्ष्म. ९ मोठ्याहून.

पुराण पुरुष रामा ॥ हिरण्यगर्भनामक ब्रह्मा ॥ तो तुजपासून उद्भवला ॥ २२ ॥ पुढें तुझ्याच प्रेरणेनें ॥ त्या हिरण्यगर्भब्रह्मयानें ॥ पूर्वीं होतें त्याचप्रमाणें ॥ सकळ जग उद्भविलें ॥ २३ ॥ तुजपासून वेद समस्त ॥ प्रवर्तले सकळ जगांत ॥ आणि प्रळय होतां ते निश्चित ॥ लय पावत तुझ्यांतची ॥ २४ ॥ तूं सर्वजगाचा हेतुभूत ॥ वसूनियां स्वहृदयांत ॥ अत्यानंदें आहेसि नाचत ॥ ऐशा तुजप्रत पाहतों ॥ २५ ॥ तूं सर्वजगाचा धनी एक ॥ तुझ्या आधीन माया देख ॥ त्वांच हें ब्रह्मचक्र सकळिक ॥ भ्रमविजेतें सतत पैं ॥ २६ ॥ तूं सर्वयोगात्मा चित्पती ॥ तुझी परमदिव्य नृत्यगती ॥ अनन्यभावें नमूनि तुजप्रती ॥ चरणीं शरण रिघालोंसें ॥ २७ ॥ तूं परम श्रेष्ठ सनातन ॥ ब्रह्मानंदासि अनुभवून ॥ आकाशीं करित आहेसि नर्तन ॥ ऐसा तुज मी पाहतों ॥ २८ ॥ तूं सर्वात्मा असोनि एक ॥ योगबळें झालासि अनेक ॥ तुझा महिमा अलौकिक ॥ स्मरतों मनीं श्रीरामा ॥ २९ ॥ तुझा वाचक ॐकार ॥ जो मुक्तीचें बीज साचार ॥ आणि जो तूं मूळप्रकृतीभीतर ॥ गुप्तरूपें राहणारा ॥ ३० ॥ आणि ज्याच्या प्रभेनें जगत ॥ प्रकाशत आहे सतत ॥ त्या तुज कूटस्थातेंचि संत ॥ सत्य ऐसा ह्मणताती ॥ ३१ ॥ प्रभो तुज परमात्म्यालागुन ॥ सदा स्तविती सर्व गीर्वाण ॥ आणि निष्पाप ऐसे जे मुनिजन ॥ ते तुज संपूर्ण नमिताात ॥ ३२ ॥ आणि तूं जो सत्यसंध वरिष्ठ ॥ त्या तुजमाजी यतिश्रेष्ठ ॥ सुशांतात्मे ब्रह्मनिष्ठ ॥ सर्वदा स्पष्ट प्रवेशती ॥ ३३ ॥ आणि बहुशाखी वेद अनंत ॥ तूं सर्वें

टी. १ प्रळयाच्या पूर्वी. २ ज्ञानाचा पति. ३ आद्यंतरहित. ४ नृत्य. ५ देव. ६ सत्य आहे प्रतिज्ञा ज्याची. ७ संन्यासी. ८ बहुत आहेत शाखा ज्याच्या.

करूप अच्युत ॥ एकचि संवेद्यं आहेसि निश्चित ॥ ऐसें सतत बोधितो ॥ ३४ ॥ रामा तुज संवेद्यालागुन ॥ वारंवार अनुभवून ॥ शाश्वत शांति लाभते पूर्ण ॥ इतरांसि जाण नाहींच ॥ ३५ ॥ रामा तूंच सर्वेश भगवान ॥ अणिमादिसर्वसिद्धिमान ॥ आणि तेजोराशी देदीप्यमान ॥ तैसेंचि विश्व तूंच पैं ॥ ३६ ॥ तूंच एक परमेष्ठी वरिष्ठ ॥ तूंच ब्रह्मा सकलश्रेष्ठ ॥ ज्योतिर्वाचक तूंच तेजिष्ठ ॥ आणि नित्यमुक्त तूंच असशी ॥३७ ॥ आणि तूं आत्मानंदालागुन ॥ वारंवार अनुभवून ॥ तयामाजीच होऊनि निमग्न ॥ सदा स्वस्थ निजतोस ॥ ३८ ॥ प्रभो तूं मुख्य एक देव ॥ तूंच उत्पादिसी हें विश्व ॥ आणि विश्वरूपेंच तूं हें सर्व ॥ निरंतर प्रतिपाळिसी ॥ ३९ ॥ आणि तुजमाजीच हें अंतीं ॥ लय पावतें ह्मणोनि रघुपती ॥ नमन करूनि अनन्यमती ॥ तुज शरण रिघालोंसें ॥ ४० ॥ रामा तूं परब्रह्म सनातन ॥ निरंजन एकचि असून ॥ विश्वव्यापारालागीं आपण ॥ आश्रयूनियां मायेसी ॥ ४१ ॥ विरिंचिं विष्णु मृत्यु महेश ॥ इंद्र चंद्र अग्नि दिनेश ॥ वरुण पवँन इत्यादि विशेष ॥ अनेकरूप झालासी ॥ ४२ ॥ रामा तूं कूटस्थ भगवान ॥ परमश्रेष्ठ ज्ञेयं ज्ञान ॥ सर्वविश्वाचें मुख्य निधानं ॥ तूंच असशी साचार ॥ ४३ ॥ तूं अव्यय शाश्वंत परम ॥ सद्धर्मरक्षक आत्माराम ॥ तूंच सनातन पूर्णकाम ॥ पुरुषोत्तम आहेसी ॥ ४४ ॥ तूंच विश्वोत्पादक विधाता ॥ तूंच विष्णु पाल-



टी. १ जाणण्यास योग्य. २ निरंतर राहाणारी. ३ ज्योतिनामक. ४ तेजस्वी. ५ ब्रह्मदेव. ६ सूर्य. ७ वायू. ८ जाणण्याला योग्य. ९ स्थान. १० निरंतर असणारें. ११ ब्रह्मदेव.

नकर्ता ॥ तूंचि भगवान् विश्वसंहर्ता ॥ रुद्र तत्वता आहेसी ॥ ४५ ॥ विश्वोत्पत्तीसि कारण॥ प्रकृति तीही तूंच आपण ॥ तूं ईश्वरांचाही ईश्वर ह्मणोन ॥ परमेश्वर बोलिजेसी ॥ ४६ ॥ तूं पुराण[1] पुरुष अविद्यातीत ॥ आदित्यवर्ण चिन्मात्र[2] अव्यक्त[3] ॥ अचिंत्यरूप गुणरहित ॥ ब्रह्म एकचि आहेसी ॥ ४७ ॥ ऐसें बोलती पंडित जन ॥ तव रूपा अन्य नाहीं खुण ॥ तूं केवळ व्योमरूप[4] ह्मणोन ॥ वाचें मात्र बोलिजेसी ॥ ४८ ॥ जयाठायीं हें सर्व जगत ॥ निरंतर आहे भासत ॥ ऐसें जें निर्मल व्ययरहित ॥ किंमपि[5] अचिंत्य एकरूप ॥ ४९ ॥ तेंच तुझें रूप निश्चित ॥ आणि त्या रूपाठायीं भासत ॥ तो तूं साक्षात्कैवल्यनाथ[6] ॥ ऐसें पंडित बोलती ॥५०॥ तूं ब्रह्मतनु पवित्र योगेश्वर ॥ परमश्रेष्ठ स्थान साचार ॥ सकळभूतांचा अधीश्वर[7] ॥ अनंतशक्ति आहेसी ॥ ५१ ॥ हें जाणोनि आम्ही शरणार्थी ॥ नमस्कार करितों तुजप्रती ॥ तरी कृपा करूनियां रघुपती ॥ प्रसन्न होईं सत्वर ॥ ५२ ॥ प्रभो तुझें चरणकमळ ॥ भावें स्मरतां तत्काळ ॥ संसाराचें बीज सकळ ॥ विलयाप्रती पावतें ॥ ५३ ॥ ऐसी प्रख्याति असे म्हणोन ॥ तव चरणीं ठेवूनि मन ॥ भावें घालितों लोटांगण ॥ होईं प्रसन्न दयाळा ॥ ५४ ॥ रामा जो तूं भवोद्भवकर्ता[8] ॥ आणि काळरूपी सर्वसंहर्ता ॥ त्या तुजलागीं रघुनाथा ॥ माझा असो नमस्कार ॥ ५५ ॥ आणि जो ज्योतिरूप ईश्वर ॥ त्या तुज असो नमस्कार ॥ आतां कृपा करूनियां सत्वर ॥ स्वरूप सुंदर मज दावीं ॥ ५६ ॥ ऐसें प्रार्थूनियां सप्रेम ॥ वायुनंदनें केला

टी. १ जुनाट. २ ज्ञानरूप. ३ अस्पष्ट. ४ आकाशरूप. ५ कांहींएक. ६ मोक्षाधिपति. ७ मुख्य स्वामी. ८ संसार किंवा जग उत्पन्न करणारा.

प्रणाम ॥ मग तो भगवान् श्रीराम ॥ लक्ष्मणासहित आनंदला ॥ ५७ ॥ आणि सर्वांचि त्या परमरूपाला ॥ गोपूनियां पूर्ववत् झाला ॥ आणि त्या मारुतिकृतस्तवाला ॥ ऐकूनियां साचार ॥ ५८ ॥ गंभीरवाणीनें श्रीराम ॥ मारुतीसि म्हणे हे प्लवंगम ॥ त्वां जो हा स्तव केला उत्तम ॥ याणेंच मज जे स्तवितील ॥ ५९ ॥ ते पावतील परमगतीसी ॥ संशय नाहीं जाण मानसीं ॥ आतां स्वस्थ राहूनि स्थिरपणेंसीं ॥ पुढिल कार्यासी करीं तूं ॥ ६० ॥ एवंप्रकारें रघुवीरें ॥ मारुतीसि कथिलें आदरें ॥ ऐसें वाल्मीकि प्रेमभरें ॥ शिष्यासि कथिता जाहला ॥ ६१ ॥ आतां पुढें रामलक्ष्मण ॥ ऋष्यमुकाद्रीं करतील गमन ॥ इत्यादिकथा परम पावन ॥ पुढच्या प्रसंगीं वर्णिजेल ॥ ६२ ॥ तरी सकळ श्रोते संत ॥ सावध असावे श्रवणार्थ ॥ यालागीं मी रघुनाथ सुत ॥ जोडूनि हात प्रार्थितों ॥ ६३ ॥ स्वस्ति श्रीमदद्भुतरामविजय ॥ वाल्मीकीयाद्भुतोत्तरकांडहृदय ॥ ऐकोत सज्जन होऊनि तन्मय ॥ षोडशाध्याय मधुर हा ॥ ६४ ॥

॥ इति षोडशाध्यायः ॥ १६ ॥

टी. १ नमस्कार. २ तत्काळ. ३ हे वानरा.



# अध्याय १७











श्रीः ॥ ॥ जयजयाजी सच्चिदानंदा[1] ॥ जयजय परमात्मया गोविंदा ॥ जय भगवन् विश्वां-
कुरकंदा[2] ॥ जय मुकुंदा परब्रह्मा ॥ १ ॥ जयजय विभो आत्मारामा ॥ जय योगिजनमनो-
विश्रामा[3] ॥ वेदांतवेद्या[4] परीपूर्णकामा ॥ मंगलधामा[5] परेशा[6] ॥ २ ॥ परमानंदा परमहंसा ॥
परात्परा[7] पुराणपुरुषा[8] ॥ भक्तजनमानसनिवासा[9] ॥ मायाविलासा[10] नारायणा ॥ ३ ॥ देवाधि-
देवा दीनोद्धरणा ॥ ज्ञानैकगम्या[11] सज्जनरक्षणा ॥ अविद्याध्वांतचंडकिरणा[12] ॥ भवद्रुमभंजना[13] भ-
गवंता ॥ ४ ॥ तूं सकळातीत[14] सर्वश्रेष्ठ ॥ तुजहून कोणी नाहीं वरिष्ठ[15] ॥ तव मायेचा खेळ ते-
जिष्ठ[16] ॥ जगडंबर पसारा ॥ ५ ॥ स्थूळ[17] सूक्ष्म[18] कारण[19] महाकारण[20] ॥ विराट्[21] हिरण्यगर्भ[22] चाळक
महान्[23] ॥ तैसीच माया यांहूनि भिन्न ॥ असे निर्वाण स्वरूप तुझें ॥ ६ ॥ जागृति स्वप्न सुषु-
प्ति[24] तुर्या[25] ॥ सृष्टिस्थित्यंतसर्वसाक्षिणी माया ॥ यांहूनि भिन्नचि देवराया ॥ येत प्रत्यया स्व-
रूप तुझें ॥ ७ ॥ अकार उकार आणि मकार ॥ तीन्ही मिळोनि पूर्ण ॐकार ॥ ह्या सर्वांहूनि
साचार ॥ निर्विकार स्वरूप तुझें ॥ ८ ॥ विश्व तैजस[26] प्राज्ञ[27] प्रत्यगात्मा ॥ ब्रह्मा विष्णु रुद्र पर-

टी. १ सत्य, ज्ञान व आनंद एतदात्मका. २ विश्वरूपी अंकुराचे मूळा. ३ योगिजनाचे मनास विश्रांति देणारा. ४ उपनिषदां-
नीं जाणला जाणारा. ५ कल्याणाचे स्थाना. ६ परमेश्वरा. ७ मयातीता, परमश्रेष्ठा. ८ जुनाट पुरुषा. ९ भक्तजनाच्या मनांत व-
सणारा. १० मायेशीं क्रीडा करणारा. ११ ज्ञानानेंच मात्र प्राप्त होणारा. १२ अज्ञानरूप अंधकारास विध्वंसणाऱ्या सूर्या. १३ ज-
न्ममरणरूप संसारवृक्षास मोडणारा. १४ सर्वांहून पलीकडचा. १५ श्रेष्ठ. १६ तेजस्वी. १७ पंचभूतात्मक हा देह. १८ लिंगदेह
( ज्यास पांगळा असें ह्मणतात ). १९ तिसरा देह. २० पिंडींचा चौथा देह. २१ ब्रह्मांड. २२ ब्रह्मांडींचा सूक्ष्म देह. २३
महत्तत्त्व. २४ निद्रावस्था. २५ समाधिरूप चौथी अवस्था. २६ सुषुप्तिदेह. २७ देहामध्यें व्यापून राहिलेले जें ब्रह्म, कूटस्थ.

मात्मा ॥ यांहूनि वेगळा तूं सर्वात्मा ॥ आत्मानात्मातीत पैं ॥ ९ ॥ तूं क्षराक्षरपर निर्गुण ॥ तूं वाक्चतुष्टयातीत परिपूर्ण ॥ चारीखाणींहूनि भिन्न ॥ निरभिमान निर्मळ ॥ १० ॥ तूं चतुर्वेदांहूनि निराळा ॥ तुझ्या न कळती कोणासि कळा ॥ तूं मुक्तिचतुष्टयावेगळा ॥ तेजागळा अव्यय ॥ ११ ॥ तूं लक्षणात्रयातीत अद्वय ॥ तुज कवणाचेंही नाहीं भय ॥ भेदत्रयातीत निरामय ॥ अज अजेय अभंग तूं ॥ १२ ॥ तुज नाहीं आदिमध्यावसान ॥ तूं पंचमहाभूतांहूनि भिन्न ॥ पंच विषय तुजलागुन ॥ कालत्रयीं न स्पर्शती ॥ १३ ॥ तूं पंचकोशातीत अच्युत ॥ पंचप्रळयांवेगळा अजित ॥ शुद्धबुद्ध षड्भावरहित ॥ सदातृप्त बाह्यांतरीं ॥ १४ ॥ तूं निरुपाधिक निरुपम ॥ अच्छेद्य अभेद्य निःसीम ॥ तुज नाहीं प्रपंचभ्रम ॥ अरूप निष्काम निर्विकल्प ॥ १५ ॥ तूं सच्चिदानंदघन साचार ॥ तुज नाहीं कांहींच विकार ॥ नामवर्णातीत स्वतंत्र ॥ निराकार परब्रह्म तूं ॥ १६ ॥ तुझी यथार्थ स्वरूपस्थिती ॥ वर्णितां पुराणें कुंठलीं अती ॥ वेदशिरेंही नेतिनेती ॥ ह्मणोनि झालीं तटस्थ ॥ १७ ॥ तूं परात्परतर परमे-

---

टी. १ आत्मा अनात्मा याच्या पलीकडचा. २ नाशवंत व अविनाशी यांहून पर. ३ परा, पश्यंती, मध्यमा व वैखरी ह्या चारी वाणींच्या पलीकडचा. ४ जरायुज ( मनुष्यादि ), अंडज ( पक्ष्यादि ), स्वेदज ( ढेंकूण इत्यादि ), व उद्भिज ( गांडोळ, कत्रूढ इत्यादि ) या चार खाणींहून भिन्न. ५ चार मुक्तींहून निराळा. ६ तेजस्वी. ७ नाशरहित. ८ जहत्, अजहत् व जहदजहत् या तीन्ही लक्षणांहून पर. ९ स्वजातीय, विजातीय व स्वगत या तीन्ही भेदांहून पर. १० रोगरहित. ११ जन्मरहित. १२ अजिंक. १३ अन्नमय, प्राणमय, मनोमय, विज्ञानमय, व आनंदमय ह्या पांचकोशांहून भिन्न. १४ उपनिषदें. १५ असें नव्हे असें नव्हे.

श्वर ॥ जन्मादिरहित सर्वागोचर ॥ परी मायायोगें निरंतर ॥ नानावतार घेसी पैं ॥ १८ ॥ त्यां-
माजी रामावतार पावन ॥ तेथींच्या लीला अतिगहन ॥ तयांचें तों साद्यंत वर्णन ॥ कराया
कोण समर्थ ॥ १९ ॥ ब्रह्मांड[2]जनक चतु[3]रानन ॥ कीं कैलासनाथ पंच*वदन ॥ कीं षण्मु[4]ख किं-
वा सहस्र[5]लपन ॥ हेही संपूर्ण असमर्थ ॥ २० ॥ परी तवकृपालव होतां प्राप्त ॥ मूढही वर्णूं श-
के यथार्थ ॥ वाल्मीक महापापी किरा[6]त ॥ झाला विख्यात महाकवी ॥ २१ ॥ शतकोटी स-
विस्तर रामायण ॥ अँवलीळें रचिलें तयान ॥ हेंतों ब्रह्मांडमंडपामाजी पूर्ण ॥ प्रसिद्ध जाण
असे पैं ॥ २२ ॥ ऐसा तव कृपेचा महिमा ॥ ह्मणोनि वंदितों तव पादपद्मा ॥ तरी कृपा करो-
नि घनश्यामा ॥ कथा उत्तमा वर्णवीं तूं ॥ २३ ॥ पूर्वाध्यायांतीं समीरसुतें ॥ भावें स्तविलें
रामचंद्रातें ॥ येरें वर दीधला स्तुतीतें ॥ ऐशी कथा जाहली ॥ २४ ॥ आतां कथानक बहु-
रसिक ॥ श्रोतीं श्रवणीं धरिजे बीकें ॥ श्रीरामभक्त मुनिवाल्मीक ॥ भारद्वाजासी सांगत
॥ २५ ॥ अगा विप्रा तो तेजोराशी ॥ श्रीरामचंद्र अयोध्यानिवासी ॥ पुनरपि त्या समीरसु-
तासी ॥ गहिंवरेंसीं बोलत ॥ २६ ॥ ह्मणे गा वानरोत्तमा सखया ॥ बुद्धिमंता अंज[12]नीतनया ॥
दशमुखराक्षसें म[13]में भा[14]र्या ॥ चोरूनियां नेली असे ॥ २७ ॥ तरी तूं माझें सुग्रीवाशीं ॥

---

टी. १सर्वांस ( कोणासही ) न मिळणारा. २ब्रह्मांड उत्पन्न करणारा. ३ चार मुखांचा (ब्रह्मदेव). ४साहा मुखांचा ( कार्तिकस्वामी ). ५ सहस्र आहेत मुखें ज्यास तो ( शेष ). ६ भिल्ल, कोळी. ७ सहज. ८ वायूच्या पुत्रानें ( मारुतीनें ). ९ त्याणें ( रामानें ). १० प्रीति. ११ मारुतीस. १२ अगा अंजनीचे पुत्रा ( हे मारुते ). १३ माझी. १४ स्त्री. * पांच मुखांचा ( शिव ).

सख्य करूनि देई त्वरेंसीं ॥ सूर्यतनयाच्या साहाय्येंसीं ॥ सीता हातासी येईल ॥ २८ ॥ तुझे अगणित उपकार ॥ मजवरी होतील साचार ॥ प्राणाहूनि तूं माझा प्रियतर ॥ विसरणार नाहीं कदा ॥ २९ ॥ ऐसें रामाचें ऐकतां वचन ॥ किंचित हांसोनि वायुनंदन ॥ मधुर पीयुषधारे-समान ॥ बोले वचन सादर ॥ ३० ॥ अगा भगवंता वैकुंठविहारा ॥ काय म्यां पामरें बोलिजे उत्तरा ॥ रावणराक्षसें तव दारा ॥ हरूनि नेली ऐसें जें ॥ ३१ ॥ हेंतों केवळ गंधर्वनगर ॥ कीं मृगजळाचा दाटला पूर ॥ कीं वोडंबरींचें लेणें परिकर ॥ कीं राज्य साचार स्वप्नींचें ॥ ३२ ॥ कीं स्थिरचर विश्व निरुतें ॥ विवेकें पाहतां जैसें दिसतें ॥ तैसेंचि हें त्वदुक्त मातें ॥ चित्तीं भासतें सर्वथा ॥ ३३ ॥ तथापि प्रभूनें आज्ञापित ॥ किंकरीं अवश्य कीजे समस्त ॥ हाचि सेवकधर्म यथार्थ ॥ ह्मणोनि मान्य भर्वदाज्ञा ॥ ३४ ॥ ऐसें बोलूनि वायुनंदन ॥ अंतरीं झाला आनंदपूर्ण ॥ मग स्कंधावरी रामलक्ष्मण ॥ त्वरें उचलून घेतले ॥ ३५ ॥ आणि चारी मंत्र्यांसमवेत ॥ सुग्रीव बैसला होता जेथ ॥ तयेस्थानीं निराळोद्भवसुत ॥ एके त्रुटींत पावला ॥ ३६ ॥ तया पाहूनि सूर्यतनय ॥ उदयाचळ हा दिनकरद्वय ॥ घेऊनि पातला कीं काय ॥ ऐसा होय तर्किता ॥ ३७ ॥ तों हनुमंतें ते नरकेसरी ॥ श्रीराम सौमित्र धनुर्धारी ॥ स्वस्कंधावरूनि भूमीवरी ॥ सुग्रीवासन्निध उतरिले ॥ ३८ ॥ तैं तयांचें ठाण आणि तेज ॥



---

टी. १ सूर्यपुत्राच्या ( सुग्रीवाच्या. ) २ अमृताच्या धारेसारखें. ३ स्त्री. ४ आकाशांत नगराकार दिसणारें. ५ मिथ्या-जळाचा. ६ गारुडयाच्या खेळांतील. ७ सेवकांनीं. ८ तुमची आज्ञा. ९ वायूचा पुत्र. १० सुग्रीव. ११ दोन सूर्य. १२ नरांमध्यें सिंह (श्रेष्ठ).

पाहातांचि तो दिवाकरतनुज ॥ मानी कीं मीं वाळीसि सहज ॥ निश्चयें आज जिंकिलें ॥३९॥ आणि रुमाभार्या तीही मजप्रत ॥ आजि निश्चयें झालीच प्राप्त ॥ रामचंद्रोदय होतांचि तेथ ॥ सुग्रीवहर्षाब्धि उल्हासला ॥ ४० ॥ तों हनुमंतें आणूनि अनळ ॥ साक्षी ठेविला दोघांजवळ ॥ मग सुग्रीवें रामासि निर्मळ ॥ सख्य तत्काळ पैं केलें ॥४१॥ आणि ह्मणे माझा निःसंशय ॥ आजि जाहालाचि भाग्योदय ॥ ह्मणोनचि हे दिसले पाय ॥ आतां काय मज न्यून ॥ ४२ ॥ ऐसें वारंवार बोलत ॥ भूमीवरी लोटांगण घालित ॥ तों श्रीरामें उचलोनि त्वरित ॥ हृदयीं दृढ आलिंगिला ॥ ४३ ॥ पुढें वाळीसि संहारून ॥ रुमादारेसहवर्तमान ॥ किष्किंधेचें राज्यसिंहासन ॥ सुग्रीवालागून दीधलें ॥ ४४ ॥ मग ते दोघे दाशरथी वीर ॥ सुग्रीवासि आज्ञापूनि सत्वर ॥ नानादेशींचें आणवूनि वानर ॥ लंकागमना सज्जले ॥ ४५ ॥ हनुमंताच्या स्कंधावर ॥ आरूढला भूमिजावर ॥ रामप्रिय सुमित्राकुमर ॥ अंगदस्कंधीं बैसला ॥४६॥ सुग्रीवासह वानरगण ॥ सभोंवती असती वेष्टून ॥ दक्षिणदिशेचा पंथ लक्षून ॥ रघुनंदन चालले ॥ ४७ ॥ वनोपवनें गिरि माळ क्रमित ॥ वेगें पावले सिंधुतीराप्रत ॥ तों तो अगाधजळें परिपूरित ॥ सरितांनाथ पसरलासे ॥ ४८ ॥ तया पाहूनि कोदंडधारी ॥ लक्ष्मणासि ह्मणे गा अर्वधारीं ॥ या क्षारोदधीच्या पैलपारीं ॥ लंकानगरी आहे बा ॥ ४९ ॥ परी या सिंधूचें अगाध

टी. १ सुग्रीव २सुग्रीवाचा हर्षसमुद्र. ३ अग्नि. ४ रुमानामक जी आपली स्त्री तिच्या सह. ५ सीतापति ( राम ). ६ समुद्र. ७ धनुर्धारी ( राम ). ८ ऐक, समज. ९ खाऱ्या समुद्राच्या. १० समुद्राचें. ११ तळ लागत नाहीं असें खोल.

जीवन[1] ॥ तराया न शकती वानरगण ॥ ह्मणोनि बंधुवा माझें मन ॥ चिंताग्नें जाण पोळताहे ॥ ५० ॥ तरी तूं सुविचारघन[2] सत्वरी ॥ वोळोनि[3] मना शांतवीं झडकरी ॥ कपिगण[4] सुखें लंकानगरीं ॥ जातील ऐसें करीं बा ॥ ५१ तूं धीर वीर बहु सुजाण ॥ निर्वाणीं तुजविण मजला कोण ॥ ऐसें रामाचें ऐकतां वचन ॥ बोले लक्ष्मण सागरासी ॥ ५२ ॥ अगा सिंधो तूं समर्थ थोर ॥ परी हा ब्रह्मांडनाथ रघुवीर ॥ वानरांसहित पैलपार ॥ जाया साचार इच्छिताहे॥५३॥ तरी तूं सत्वरी आपुल्या जळा ॥ स्तंभित करीं गा वेल्हाळा ॥ कपींसहित घन[6]सांवळा ॥ खोळंबला न्याहाळीं तूं ॥ ५४ ॥ इत्यादि रीती बहुयुक्तिबोलें ॥ लक्ष्मणप्रभूनें आज्ञापिलें ॥ परी त्या क्षीरोदराशीनें[7] वहिलें ॥ नच मानिलें जेधवां ॥ ५५ ॥ तैं तो लक्ष्मण क्रोधसंदीप्त ॥ होऊनि पडला समुद्रोदकांत ॥ तद्देहवन्हिज्वाळांनीं[8] समस्त ॥ सिंधूचें[*] उदक शोषलें ॥५६॥ जलचरें तीं झालीं स्थलचर[×] ॥ आहाळूं लागले सर्व खेचर[9] ॥ भयाभीत सकळ निर्जर[10] ॥ दशदिशांतरीं पळाले ॥ ५७ ॥ तें पाहूनि महदाश्चर्य ॥ वानर पावले अति विस्मय ॥ चराचरजन व्याकुळहृदय ॥ हायहाय बोलती ॥५८॥ मुनिजन आणि भूतें समस्त ॥ स्वस्ति[11] स्वस्ति ऐसें बोलत ॥ तो आकांत पाहूनि रघुनाथ ॥ सौमित्राप्रत बोलला ॥५९॥ अगा चतुरा सुमित्रासुता॥ हें त्वां अयोग्य केलें तत्वता ॥ स्वकार्याकारणें सकळ भूतां॥ कां बा गुणवंता त्रासवावें॥६०॥

---

टी. १ पाणी. २ चांगल्या विचाररूपी उदकानें भरलेला मेघ. ३ वर्षून. ४ वानरगण. ५ समुद्रा. ६ घनश्याम. ७ खाऱ्या समुद्रानें. ८ लक्ष्मणाच्या देहांतील अग्नीच्या ज्वाळांनीं. ९ पक्षी वगैरे. १० देव. ११ कल्याण कल्याण. * समुद्राचें. × जमिनीवर संचार करणारीं.

तरीं तूं साहस टाकीं येक्षणीं ॥ मी आतां ह्या समुद्रालागुनी ॥ [1]भूमितनयाविरहजाश्रूनीं ॥ पूर्ववत् भरोनी काढितों ॥ ६१ ॥ ऐसें बोलूनि रघुनंदन ॥ करिता झाला शोक दारुण ॥ नयनाश्रुधारांनीं संपूर्ण ॥ सागर भरोन उल्हासला ॥ ६२ ॥ तैं गगनांतूनि रामावरी ॥ पुष्पवर्षाव केला निर्जरीं ॥ चराचर लोक ते अवसरीं ॥ अत्यंत अंतरीं आनंदले ॥ ६३ ॥ पुनःपुन्हा तो रामाचा प्रभाव ॥ चिंतूनि स्वस्थ झाले सर्व ॥ रावणबंधस्त इंद्रादि देव ॥ सानंद सर्व जाहले ॥ ६४ ॥ तों तेथें रामदर्शनार्थ ॥ मूर्तिमंत आला [2]सरितानाथ ॥ सवें गंगादि नद्या बहुत ॥ मूर्तिमंत विराजती ॥ ६५ ॥ भावें वंदूनि रामचरणा ॥ सागरें आरंभिलें स्तवना ॥ जयजय विभो जगज्जीवना ॥ [3]आनंदसदना स्वामिया ॥ ६६ ॥ जयजय अनंतब्रह्मांडनायका ॥ [4]प्रणवात्मया [5]स्वयंभुजनका ॥ जगदुत्पत्तिस्थित्यंतकारका ॥ विश्वव्यापका जगद्गुरू ॥६७॥ [6]अजा [7]अजिता [8]विश्वांकुरकंदा ॥ [9]साधुजनहृदयाब्जमिलिंदा ॥ [10]स्वभक्तजनचातकनीरदा ॥ परमानंदा रघुवीरा ॥६८॥ शेषशयना कमलजावरा ॥ गरुडध्वजा परात्परतरा ॥ मुरमर्दना सुरप्रियकरा ॥ परमोदारा नारायणा ॥ ६९॥ [11]भवगजविदारकपंचानना ॥ [12]दुःखाद्रिभंजन पाकशासना॥ राक्षसारण्यदाहकदहना ॥ जलजनयना राघवेंद्रा ॥७०॥ वेदांतवेद्या वेदपाळका॥

---

टी. १ सीतेच्या विरहानें उद्भवलेल्या नेत्रोदकांनीं. २ समुद्र. ३ आनंदाच्या घरा. ४ ॐकारस्वरूपा. ५ ब्रह्मदेवाचे पित्या. ६ जन्मरहिता. ७ अजिंक्या. ८ विश्वरूप अंकुराच्या मूळा. ९ साधूंच्या हृदयकमळांतील भुंग्या. १० स्वभक्तरूपी चातकास तृप्त करणाऱ्या मेघा. ११ संसाररूपी हत्तिस विदारणाऱ्या सिंहा. १२ दुःखरूपी पर्वतांस फोडणाऱ्या इंद्रा.

त्रिनेत्रमित्रा कैवल्यदायका ॥ कृपासागरा वैकुंठनायका ॥ वेदस्थापका वेदवंद्या ॥ ७१ ॥ तूं सच्चिदानंदघन निर्गुण ॥ षड्भावरहित निरंजन ॥ नामरूपातीत परिपूर्ण ॥ सनातन ब्रह्म एक ॥ ७२ ॥ तथापि स्वेच्छाविहारार्थ ॥ सगुणरूपें धरिसी अनंत ॥ दुष्टसंहारालागीं सांप्रत ॥ दशरथसुत झालासी ॥ ७३ ॥ रावणें हरिली तव दारा ॥ ह्मणोनि जातोसी लंकानगरा ॥ हें तों विवेकें पाहतां सांवरा ॥ गंधर्वनगरासम सर्व ॥ ७४ ॥ कीं वंध्यापुत्रें जाऊनि सवेग ॥ मोडूनि आणिलें शशशृंग ॥ कीं शुक्तिकारजताचें पात्र अभंग ॥ शोभलें चांग मीनहस्तीं ॥ ७५ ॥ कीं पंगू धांवला अंतराळीं ॥आकाशाचीं पुष्पें काढिलीं ॥ चपळे माजी बांधूनि आणिलीं ॥ शिरीं वाहिलीं समीराचे ॥७६॥ कीं सर्पाच्या कर्णींचीं कुंडलें ॥ मीनें चोरिलीं ह्मणोनि बिडालें ॥ कथितां मूषकें मीनाचीं पाउलें ॥ सिकताशृंखलें बांधिलीं ॥७७॥ कीं दर्पणांमाजील दिव्य हार ॥ गर्भांध चोरूनि पळाला दूर ॥ कीं दीपाचा रंग काढोनि सुंदर ॥ पतंगें स्वगृह रंगविलें ॥ ७८ ॥ हें सकळही जैसें मिथ्याभूत ॥ तैसेंचि हें त्वत्कृत्य समस्त ॥ तूं तों आब्रह्मस्तंबपर्यंत ॥ बाह्यांतर्व्याप्त आहेसी ॥ ७९ ॥ आणि सर्वशोकांतक असोन ॥ मायायोगें झालास सगुण ॥ ह्मणोनि शोकाचें विडंबन ॥ करूनि पूर्ण दावितोसी ॥ ८० ॥ आणि जनकदुहिता तव

---

टी. १ असणें, उत्पन्न होणें, वाढणें, परिणाम पावणें, क्षीण होणें व नष्ट होणें या साहा प्रकारांनीं रहित. २ स्वेच्छेनें क्रीडा करण्याकरितां. ३ आकाशांत नगराकृती अनेक ढग दिसतात त्यांप्रमाणें. ४ वांझेच्या मुलानें. ५ सशाचें शिंग. ६ शिंपीवर रुप्याचा भास होतो त्याचें. ७ पांगळा. ८ वायूचें. ९ माजरानें. १० वाळूच्या सांखळीनें. ११ आर्शांतील.

चिच्छक्ति[1] ॥ तुजहूनि ती नसे परती ॥ तुजमाजीच सर्वदा निरुती॥समरसोनी[2] वर्तताहे ॥८१॥परी जगत्पावन स्वचरित्र॥जगीं विस्तारिजे विचित्र॥ ह्मणोनि सीतामिषें हा सर्वत्र॥अहोरात्र फिरतोसी ॥ ८२ ॥ रामा तूं दयासागर असून ॥ मज पामराविषयीं निष्कारण ॥ क्रूरतेची लहरी दारुण ॥ कां आजि उत्पन्न जाहली ॥ ८३ ॥ तूं अतर्क्यशक्तिमान समर्थ ॥ मजवरी शिळीं बांधितां सेंत[3] ॥ तेणें मार्गें वानर समस्त ॥ सुखें लंकेंत जातील पैं ॥८४॥ ऐसें समुद्रें स्तुतिपूर्वक॥अति विनयें सुचवितां देख ॥ सागरीं शिळा घालूनि अनेक ॥ सेतु सुरेख बांधिला ॥ ८५ ॥ तेणें मार्गें वानरांसहित ॥ रघुवीर गेले लंकेप्रत ॥ सर्वसैन्यासह लंकानाथ ॥ वेगें युद्धार्थ उठावला[4] ॥ ८६ ॥ महाप्रतापी रघुनंदन ॥ युद्ध केलें परम दारुण॥ सर्वपरिवारासहवर्तमान ॥ दशमुख रावण संहारिला ॥८७॥ मग तयाचा कनिष्ठ बंधू ॥ जो भगवद्भक्त ज्ञानसिंधू॥बिभीषणनामा साधू॥ तयासि लंका दीधली॥८८॥ राक्षसाधिपत्याचा अभिषेक॥बिभीषणावरी केला देख ॥ मग कामगमनी[5] पुष्पकनामक ॥ विमान सुरेख आणविलें ॥ ८९ ॥ तयांत सीतेसि बैसवून ॥ बिभीषणातें सवें घेऊन ॥ सुमित्रासुतासहवर्तमान[6] ॥ सीताजीवन आरूढला॥९०॥ सुग्रीवमारुतिजांबवंतादिक ॥ वानरही त्यांत चढले सकळिक ॥ मग रामाज्ञा होतांचि तात्काळिक ॥ आकाशीं पुष्पक उडालें ॥ ९१ ॥ निराळंपंथें[7] वायुवेगेंसीं ॥ येऊनि उतरलें अयोध्येसी ॥ श्रीराम सीतालक्ष्मणादिकेंसीं ॥ वंदूनि भूमीसी उतरला॥९२॥ विमान गेलें स्वस्थानाप्रत ॥ मग सीतारामसुमित्रासुत ॥ बिभीषणवानरांसमवेत ॥ मंदिराप्रत

टी. १ ज्ञानशक्ति. २ ऐक्य पावोन. ३ पूल. ४ धाकटा. ५ इच्छा करावी तिकडे जाणारं. ६ लक्ष्मणासह. ७ आकाशमार्गानें.

पातले ॥ ९३ ॥ तये काळीं भरतशत्रुघ्न ॥ परमानंदीं झाले निमग्न ॥ कौसल्यादि माता संपूर्ण ॥ आनंदडोहीं बुडाल्या ॥ ९४ ॥ गुरु वसिष्ठ मंत्री सुमंत॥ सुहृद मित्र बांधव आप्त ॥ ऋषिजन ब्राह्मण साधु संत ॥ आनंदपूरित जाहले ॥ ९५ ॥ एवं आपुल्या आगमनाचेनीं ॥ सकळ जनांसि आनंदवोनी ॥ परंपरागत स्वराज्यासनीं ॥ कैवल्यदानी आरूढला ॥ ९६ ॥ सर्वही आले नागरिक लोक ॥ बहुत मिळाले मांडलिक ॥ महोत्सवें यथाविधि देख ॥ राज्याभिषेक जाहला ॥ ९७ ॥ एवंप्रकारें रघुनंदन ॥ राजाधिराज झाला आपण ॥ सद्धर्में सर्वांसि वर्तवून ॥ राज्य संपूर्ण चालवित ॥ ९८ ॥ प्राणिमात्रावरी ठेवूनि प्रेम ॥ नित्य पुरवी सर्वांचे काम ॥ ऐसा तो लाभतां राजा राम ॥ प्रजा परम आनंदल्या ॥ ९९ ॥ आणि सर्व तिर्यग्जातिही वहिल्या ॥ बहुताचि पैं आनंदल्या ॥ देवदुंदुभी आकाशीं भल्या ॥ वाजूं लागल्या सर्वकाळ॥१००॥वारंवार पुष्पवृष्टि होत ॥ यथाकाळीं मेघ वर्षत ॥ दुःख दारिद्र्य रोग उत्पात ॥ ठायींच समस्त लोपले ॥ १ ॥ ऐसा होतां श्रीराम राजा ॥ सुखी झाल्या सकळ प्रजा ॥ ऐसें वाल्मीक भारद्वाजा ॥ कथन करिते जाहले ॥ २ ॥ आतां सीता मुनिजनांप्रत ॥ सहस्रमुखरावणाचें वृत्त ॥ सांगेल ती कथा परमाद्भुत ॥ पुढच्या प्रसंगीं वर्णिजेल ॥ ३ ॥ तरी श्रोतीं तच्छ्रवणार्थ ॥ सावध ठेविजे आपुलें चित्त ॥ ह्मणोनि मी रघुनाथसुत ॥ जोडूनि हस्त विनवितों ॥ ४ ॥ स्वस्ति श्रीमदद्भुतरामविजय ॥ वाल्मीकीयाद्भुतोत्तरकांडहृदय ॥ ऐकोत सज्जन होऊनि तन्मय ॥ सप्तदशाध्याय मधुर हा ॥ १०५ ॥ अध्याय ॥ १७ ॥ ॥ छ ॥

टी. १ प्रधान. २ याप्रमाणें. ३ मोक्षदाता ( राम ). ४ नगरवासी. ५ मनोरथ. ६ पशुपक्ष्यादिक. ७ देवांचे नगारे.

श्रीः ॥ ॥ जयजयाजी पुराणपुरुषा[१] ॥ जयजयाजी मायाविलासा[२] ॥ जय अनंतब्रह्मांडेशा ॥ हृषीकेशा स्वामिया ॥ १ ॥ जय परात्परा[३] सच्चिदानंदा[*] ॥ त्रिगुणातीता[४] निजसुखकंदा[५] ॥ स्व[६]-जनचित्तारविंदमिलिंदा ॥ सदास्वच्छंदा[७] नारायणा ॥ २॥ तूं जगन्नायक जगत्कारण ॥ जग-व्यापक जगज्जीवन ॥ जगन्मोहक जगद्भंजन[८] ॥ जगत्पावन जगद्गुरू ॥३ ॥ तूं भक्तकामनाक[९]-ल्पतरू ॥ अनंतभवाब्धितारक[१०] तारूं ॥ दुःखाद्रिभंजनवज्रधरू[११] ॥ कृपासागरू असंभाव्य ॥ ४ ॥ तूं अनाथजनांची माउली ॥ दीनावरी करिसी साउली ॥ शरणागतांचीं दुःखें समू-ळीं ॥ निरसूनि इच्छा पुरविसी ॥ ५ ॥ ऐशी तुझी विशुद्ध कीर्ती ॥ प्रसिद्ध असे सर्व जगतीं ॥ ह्मणोनि शरण रिघोनि तुजप्रती ॥ करितों नती[१२] साष्टांग ॥ ६ ॥ तरी दयाळा कृपा करून ॥ मम सर्व दोष निवटून ॥ पुढिल आख्यानामाजी पूर्ण ॥ रस भरून वर्णवीं ॥७॥ पूर्वाध्यायांतीं सीतापती ॥ राज्यारूढ झाला दाशरथी ॥ आनंदली सर्व जगती[१३] ॥ ऐशी कथा वर्तली ॥८॥ पुढें कथा परम पावन ॥ श्रोतीं असावें सावधान ॥ वाल्मीक ह्मणे भारद्वाजालागुन ॥ करीं श्रवण सादर ॥ ९ ॥ रावणादि सर्व निशाचर[१४]॥ संहारूनि जैं रघुवीर ॥ अयोध्येमाजी

---

टी. १ जुनाट पुरुषा ( आदिनारायणा ). २ मायेशीं विलास करणारा. ३ परम श्रेष्ठा. परमेश्वरा. ४ सत्व रज व तम ह्या तीन गुणांच्या पलीकडच्या. ५ आत्मसुखाचे मूळा- ६ आपल्या भक्तजनाच्या चित्तरूपीकमलांत राहणाऱ्या भुंग्या. ७ सर्वकाळ स्वेच्छेनें वर्तणारा ८ जगाचा संहार करणारा. ९ भक्तांचे मनोरथ पूर्ण करणारा कल्पवृक्ष. १० अगाध संसारसमुद्रांतून तार-ण्याविषयीं तारूं. ११ दुःखरूप पर्वतास फोडणारा इंद्र. १२ नमस्कार. १३ पृथ्वी. १४ राक्षस. * सत्यज्ञानानंदस्वरूपा.

येऊनि सत्वर ॥ स्वराज्यारूढ जाहला ॥ १० ॥ तैं तेथें श्रीरामालागुनी ॥ भेटावया सकळ मुनी ॥ एकेंसमयावच्छेदेंकरुनी ॥ चहूंकडोनी पातले ॥ ११ ॥ रैभ्य विश्वामित्र यवक्रीत ॥ च्यवन आणि कण्व विख्यात ॥ इत्यादिक जे तपःप्रदीप्त ॥ वसती सतत पूर्वेसी ॥ १२ ॥ नमुचमुनि आत्रेय स्वस्ती ॥ अरिमुच आणि मुनि अगस्ती ॥ इत्यादिक जे तपोगभस्ती ॥ सदा वसती दक्षिणेसी ॥ १३ ॥ तैसेचि उपगु धूम्र कामठ ॥ आणि रौद्राश्वनामा मुनिश्रेष्ठ ॥ इत्यादिक जे तपस्तेजिष्ठ ॥ वसती स्पष्ट पश्चिमेसी ॥ १४ ॥ आणि वसिष्ठप्रमुख बहुत ॥ जे महर्षि उत्तरेसे वसत ॥ ते स्वस्वशिष्योपशिष्यांसहित ॥ आले समस्त अयोध्येसी ॥ १५ ॥ ते सकळही पावकासमान ॥ तपस्तेजें दैदीप्यमान ॥ फळें मूळें हस्तीं घेऊन ॥ श्रीरामसदन प्रवेशले ॥ १६ ॥ जयघोषपूर्वक प्रेमेंसीं ॥ फळमूळें अर्पिलीं राघवासी ॥ श्रीरामदर्शित आसनांसी ॥ आनंदेंसीं बैसले ॥ १७ ॥ तों सीतेसहित रघुनंदन ॥ सकळ भ्राते मंत्री प्रधान ॥ आणि महाजनासहवर्तमान ॥ पूजेलागुन ऊठला ॥ १८ ॥ बहुविनयें जाऊनि जवळ ॥ भावें पूजिलें ऋषिमंडळ ॥ पुढती जोडूनि करकमळ ॥ तमाळनीळ बैसला ॥ १९ ॥ तों ते अगस्त्यादि ऋषि समस्त ॥ आजि ह्या सकळ त्रैलोक्यांत ॥ धन्यधन्य आह्मी भाग्यवं-

---

टी. १ आपल्या राज्यपदीं राहाणें. २ एकदम. ३ तपस्येचे केवळ सूर्य (तपानें तेजस्वी). ४ तपाचरणानें तेजस्वी. ५ वसिष्ठादिक. ६ आपले शिष्य व शिष्यांचे शिष्य यांसह. ७ अग्नीसारखे. ८ तपश्चर्येच्या तेजानें. ९ रामानें दाखविलेल्या. १० मोठ्यालोकांसह. ११ नंतर. १२ तमालपत्राप्रमाणें श्यामवर्ण.

त ॥ ऐसें बोलत आनंदें ॥२०॥ श्लक्ष्ण[1] मधुर सुयुक्त[2] वचनीं ॥ प्रशंसूं लागले रामालागुनी ॥ ह्मणती हे रामा कोदंडपाणी[3] ॥ जगाचा धनी तूं होसी[4] ॥ २१ ॥ आणि सकळ विश्वावरुती ॥ उपकारकर्ता देव तूं निरुती ॥ सर्वपरिवारासह लंकापती ॥ रावण संप्रती वधिलासि जो॥२२ तेणें रामा हें जग सकळिक ॥ पुनर्जातवत[5] झालें देख ॥ रावणासम किंवा अधिक ॥ दुष्ट आ-णिक नसे कोणी ॥ २३ ॥ आणि त्याहूनि लोकभयंकर ॥ कवणही नसेचि साचार ॥ दशदि-शांचा कारभार ॥ दशमुखांनीं चालवी ॥ २४ ॥ ऐसा तो दशमुख यातुधान[6] ॥ मारिलासि हा भाग्योदय महान ॥ ह्या सकळ जगाचा पूर्ण ॥ उद्धार जाण केलासी ॥ २५ ॥ रामा तूं अयो-ध्याधिप[7] सांप्रत ॥ परी निश्चयें आहेस भगवंत ॥ पूर्वीं ब्रह्मयानें तुजप्रत ॥ भूभारहरणार्थ प्रा-र्थिलें ॥ २६ ॥ ह्मणोनि तूं अयोध्येसि पवित्र ॥ पुंडरीकसमविशालनेत्र[8] ॥ आजानुबाहु[9] घन-श्यामगात्र[10] ॥ कौसल्यापुत्र झालासी ॥ २७ ॥ प्रभो तूं इक्ष्वाकुकुलनंदन[11] ॥ शेषशायी आ-दिनारायण ॥ आजि तुझिया दर्शनेंकरून ॥ सुखसंपन्न जाहालों ॥ २८ ॥ आतां तुझिये प्रसा-देंसीं ॥ निर्बाध ऐसे आह्मी ऋषी ॥ वनोवनीं राहूनि आनंदेंसीं ॥ तपश्चर्येसी आचरूं ॥ २९ ॥ परी प्रभो अयोध्याधिनाथा ॥ ही महादेवी जनक[12]दुहिता ॥ दुष्टरावणें हरिली असतां ॥ परम

---

टी. १ हळू. २ योग्य. ३ सर्वदा हातांत धनुष्य धरणारा. ४ आहेस. ५ पुनःउत्पन्न झाल्याप्रमाणें. ६ राक्षस. ७ अयोध्येचा राजा. ८ कमळासारखे सुंदर व मोठे असे आहेत नेत्र ज्याचे. ९ गुडघ्यांपर्यंत लांब आहेत बाहु ज्याचे. १० मेघाप्रमाणें श्यामवर्ण आहे शरीर ज्याचें. ११ इक्ष्वाकुराजाच्या वंशांत उत्पन्न झालेला. १२ जनकाची कन्या (सीता ).

दुःख पावली जें ॥ ३० ॥ तेंचि मात्र निरंतर ॥ स्मरोनि स्मरोनि वारंवार ॥ अमुच्या चित्तासि साचार ॥ उद्विग्न फार करील पैं ॥ ३१ ॥ ऐसें अनुक्रोशयुक्त तत्वता ॥ सर्व मुनिजन बोलले असतां ॥ ती जनकनंदिनी सती सीता ॥ व्यक्त मधुर हासिन्नली ॥ ३२ ॥ आणि त्या मुनिजनालागुन ॥ स्मितमुखें बोलली वचन ॥ ह्मणे हो तुह्मी ऋषि संपूर्ण ॥ ज्ञाते महान आहांत ॥ ३३ ॥ परी रावणाच्या वधाविषयीं ॥ जी जी प्रशंसा केलीत कांहीं ॥ ती ती सकळ माझिये हृदयीं ॥ थट्टेसमान भासते ॥३४॥ अहो तो दशमुख रावण ॥ दुराचारी दुष्ट दारुण ॥ हें तों सत्यसत्यचि संपूर्ण ॥ संशय नसे अणुमात्र ॥ ३५ ॥ आणि तो महावीर निशाचर ॥ स्वदशवदनीं निरंतर ॥ जगासि दुःख देतसे फार ॥ हें ही सांचार सत्यची ॥ ३६ ॥ तथापि विप्र हो त्या दशास्याचा ॥ वध हा ऐशिये प्रशंसेच्या ॥ योग्य नव्हे नव्हेचि साचा ॥ हें तों सकळीं जाणिजे ॥ ३७ ॥ ऐसी जगन्मातेची वाणी ॥ केवळ शब्दरत्नांची खाणी ॥ ऐकूनियां ते सकळ मुनी ॥ विस्मय मनीं पावले ॥ ३८ ॥ आणि परस्परांच्या मुखांप्रत ॥ चकितदृष्टीं विलोकित ॥ ह्मणती कीं हें काय अवचित ॥ आश्चर्य महंत उद्भवलें ॥ ३९ ॥ अहो ही अयोनिसंभव सीता ॥ काकुत्स्थकुलाश्रित असतां ॥ आणि आह्मी इयेच्या कांता ॥ स्तवित असतां सादर ॥ ४० ॥ या महाराजसभेचे ठायीं ॥ आह्मा सर्व मुनिजनासिही ॥ स्पष्टपणें हासिन्न-

टी. १ करुणायुक्त. २ स्पष्ट. ३ हास्ययुक्तमुखानें. ४ रात्रीं संचार करणारा. ( राक्षस). ५ खरोखर. ६ सीतेची. ७ मोठें. ८ गर्भवासावांचून उत्पन्न झालेली. ९ काकुत्स्थराजाच्या वंशस्थाची ( रामाची ) आश्रित. * पतिव्रता.

ली ही ॥ हें काय कांहीं नेणोंच ॥ ४१ ॥ ऐसें त्या मुनींचें भाषित ॥ ऐकूनि सीता भ्याली बहुत ॥ मग भावें वंदूनि तयांप्रत ॥ जोडूनि हस्त बोलत पैं ॥ ४२ ॥ अहो विप्रोत्तम शांत व्हा अंतरीं ॥ मी तों पामरजनांचे परी ॥ अनृत भाषण वदणारी ॥ नव्हे निर्धारीं जाणिजे ॥ ४३ ॥ जरी तुह्मी होऊनि दयाळ ॥ बोलावया मज आज्ञा द्याल ॥ तरी मी साद्यंत वृत्त निर्मळ ॥ तुह्मां सकळ सांगेन ॥ ४४ ॥ ऐसी सीतेची सविनय वाणी ॥ ऐकूनि ते अगस्त्यादि मुनी ॥ संतुष्ट होत्साते तत्क्षणीं ॥ तियेलागुनी बोलत ॥४५॥ अहो कल्याणरूपिणी सीते ॥ जनकतनये त्रिजगन्माते ॥ तूं काय ह्मणशी पूर्ववृत्त त ॥ शीघ्र आह्मांतें निवेदीं ॥ ४६ ॥ तुझे ऐकाया विचित्र बोल ॥ मनें आमुचीं उतावेळ ॥ तरी तूं आतां उगाचि पोळ ॥ नको काळ घालवूं ॥ ४७ ॥ तें ऐकूनि जनकनंदिनी ॥ भयनिर्मुक्त झाली तत्क्षणीं ॥ मग पति मुनि मंत्री दीर आणी ॥ महाजन तेथें होते जे ॥ ४८ ॥ तयांलागीं अतिविनयेंसीं ॥ अनुज्ञा मागूनि आदरेंसीं ॥ पूर्ववृत्तांत सांगावयासी ॥ उपक्रम करिती जाहली ॥ ४९ ॥ सीता ह्मणे हो समर्थ मुनी ॥ चित्त द्यावें श्रवणालागुनी ॥ लग्नापूर्वी मी लहानपणीं ॥ पितृसदनीं होत्यें जैं ॥ ५० ॥ तैं तेथें अतिथिरूपेंसीं ॥ एक पातला विप्र तापसी ॥ जो केवळ वैराग्यराशी ॥ कैलासवासी दूसरा ॥ ५१ ॥ तयासि मर्म जनकें जनकें ॥ आसनपाद्यअर्घ्यादिकें ॥ यथाविधि पूजितां कौतुकें ॥ विप्र हरिखें उचंबळला ॥ ५२ ॥ आणि बोलला मम पित्यास ॥ राया तूं आहेस देवस-

टी. १ सारखें. २ नम्रतायुक्त. ३ व्यर्थ. ४ आज्ञा. ५ प्रारंभ. ६ बापाच्या घरीं. ७ शंकर. ८ माझ्या. ९ पित्यानें.

हश ॥ ह्मणोनि तव गृहीं चतुर्मास ॥ राहाया अंस[1] उद्धवली ॥ ५३ ॥ परी तूं सर्व टाकूनि हेवा ॥ नित्य करिसील मम सेवा ॥ तरी ह्या चतुर्मासीं नरदेवा[2] ॥ वसेन बरवा तव गृहीं ॥ ॥ ५४ ॥ तें तयाचें ऐकूनि वचन ॥ मम जनक[3] जनकाभिधान[4] ॥ देवद्विजभक्तिपरायण ॥ असे ह्मणोन आनंदला ॥ ५५ ॥ आणि ह्मणे हे ब्राह्मणोत्तमा ॥ आजि मद्भाग्या नाहीं सीमा ॥ जें आपण येऊनि मम धामा[5] ॥ स्वपादपद्मा[6] दाविलेंती ॥ ५६ ॥ तुह्मी केवळ सनकासमान ॥ योगी ज्ञानी विरक्त महान ॥ दीनजनोद्धारणालागुन ॥ पर्याटण[7] करितसा ॥ ५७ ॥ अनाथ दीन कृपण पामर ॥ तयांवरी कीजिये उपकार ॥ हेंचि तुमचें स्वभावसुंदर ॥ ब्रीद साचार असे जें ॥ ५८ ॥ तेणें स्वसंगतीनें सत्वरी ॥ मज लावावें भवाब्धिपारीं[8] ॥ ह्मणोनि राहाया मम मंदिरीं ॥ समर्थी अंतरीं धरियेलें ॥ ५९ ॥ तरी हें कैशापरी जाहलें ॥ पूरीं बुडतां तारूं पातलें ॥ कीं ऋणें गांजितां आगळें ॥ निधान[9] मिळालें घरांत ॥ ६० ॥ कीं हिमें[10] पीडितां आला कृशानू[11] ॥ कीं क्षुधिता भेटली कामधेनू ॥ कीं अंधकूपीं पडतां जणूं ॥ स्वयेंचि भानू[12] पातला ॥ ६१ ॥ कीं वणव्यांत जळतां घन[13] वर्षला ॥ कीं गजीं कोंडितां सिंह पावला ॥ कीं विखार[14] पाठी लागतां भला ॥ त्वरें पातला वैनतेय[15] ॥ ६२ ॥ कीं आळशावरी गंगा लोटली ॥ कीं दरिद्र्याघरीं लक्ष्मी पातली ॥ तैशीच येथें परी[16] जाहली ॥ पृथ्वीमंडळीं मी धन्य ॥ ६३ ॥

टी. १ इच्छा. २ राजा. ३ पिता. ४ जनकनामक. ५ गृहास. ६ आपलें पादकमल. ७ फिरणें. ८ संसारसमुद्राच्या पलीकडच्या तडीस. ९ द्रव्याची ठेव. १० थंडीनें. ११ अग्नि. १२ सूर्य. १३ मेघ. १४ सर्प. १५ गरुड. १६ प्रकार.

तरी स्वामी आतां आपण ॥ येथें बसावें आनंदेंकरून ॥ यथाशक्ति मी अनुदिन ॥ सेवा करीन चरणाची ॥ ६४ ॥ ऐसें बोलूनि तो मम जनिता ॥ विप्रासि झाला राहविता ॥ भक्ष्यभोज्यादिकांची सर्वथा ॥ समृद्धता ठेविली ॥ ६५ ॥ सेवकांचा विश्वास न धरी ॥ विप्रसेवा व्हाया सांजिरी ॥ लहान थोर कार्यें सारीं ॥ स्वयेंच करी निरंतर ॥ ६६ ॥ तथापि त्यांत कदाचित ॥ कांहीं न्यूनता पडतां किंचित ॥ धर्महानि होईल निश्चित ॥ ऐतदर्थ भिऊनियां ॥ ६७ ॥ मजही तयाच्या सेवेलागुन ॥ योजिलें असे पितयान ॥ अनन्यचित्तें मी रात्रंदिन ॥ सावधान राहिल्यें ॥ ६८ ॥ तो परमार्थवेत्ता महाद्विज ॥ जें जें जैसें अज्ञापी मज ॥ तें तें तैसेंचि सर्व काज ॥ टाकूनि नीज करितसें ॥ ६९ ॥ आणि सदा वसें तयासन्निध ॥ तो महाविरक्त सत्वशुद्ध ॥ तेणें सर्वत्र फिरूनि विविध ॥ तीर्थें पाहिलीं होतीं जीं ॥ ७० ॥ तेथींच्या नाना कथा अद्भुत ॥ मज ऐकवी तो सतत ॥ मम सेवागांभीर्यादि समस्त ॥ पाहूनि अत्यंत तोषला ॥ ७१ ॥ पुढें कदाचित तो प्रियभाषी ॥ द्विजश्रेष्ठ बोलला मजसी ॥ तेंचि हो समस्त महर्षी ॥ सांगत्यें तुह्मांसी ऐकिजे ॥ ७२ ॥ एकदां तो प्रभातीं उठोन ॥ सर्व नित्यकर्म सारून ॥ मजला प्रीतीं हाक मारून ॥ सांगावया लागला ॥ ७३ ॥ ह्मणे हे कमलानने सीते ॥ म्यां एक आश्चर्य पाहिलें तें ॥ आजि साद्यंत सांगतों तूतें ॥ एकाग्रचित्तें ऐकिजे ॥ ७४ ॥ दधिमंडोदधीचे पैलपा-

टी. १ दररोज. २ पिता. ३ चांगली. ४ याकरितां. ५ ब्रह्मज्ञानी. ६ नानाप्रकारचीं. ७ सेवा करणें व गंभीरपण इत्यादि. ८ प्रिय बोलणारा. ९ कमलाप्रमाणें आहे मुख जिचें अशाप्रकारचे. १० दधिमंडोदनामक समुद्राचे.

र ॥ स्वादूदक महासागर ॥ पुष्करद्वीपा वेष्टूनि परिकरें ॥ वलयाकार वर्तताहे ॥ ७५ ॥ तेथें पुष्करद्वीपीं सोज्वळ ॥ पावकशिखेपरि तेजाळ ॥ अयुतायुतपत्रीं युक्त विशाळ ॥ एक कमळ आहे पैं ॥ ७६ ॥ तें ब्रह्मयाचें मुख्य आसन ॥ त्यावरी बैसे चतुरानन ॥ कमळासि पुष्कर अभिधान ॥ आणि तेंचि प्रधान त्या द्वीपीं ॥ ७७ ॥ ह्मणोनि त्या द्वीपाचें पुष्कर ॥ अभिधान झालें साचार ॥ तेथें वर्षमर्यादेचा गिरिवर ॥ मानसोत्तरनामा असे ॥ ७८ ॥ तो अयुत योजनें सविस्तर ॥ तयाचे चारी दिशांसि चार ॥ इंद्रादिलोकपालांचीं सुंदर ॥ नगरें थोर असतीं पैं ॥ ७९ ॥ तीं लोकपालांच्या क्रीडार्थ ॥ विश्वकर्म्यानें निर्मिलीं असत ॥ सकळ शिल्पकौशल्य त्यांत ॥ ओतप्रोत भरलें असे ॥ ८० ॥ ब्रह्मांडींचें ऐश्वर्य सगळें ॥ जेथें दिसे एकवटलें ॥ रत्नगृहांच्या तेजकल्लोळें ॥ ग्रहमंडळें दीपावती ॥ ८१ ॥ लंका अलंका अमरावती ॥ इत्यादि सुंदर पुऱ्या असती ॥ परी त्या सर्व जयांपुढती ॥ अत्यंत दिसती हळुवट ॥ ८२ ॥ ऐशा त्या लोकपालांच्या नगरी ॥ जगीं विलसती सर्वोपरी ॥ परी तयांची कैशी परी ॥ झाली ऐकें जानकीये ॥ ८३ ॥ निशाचरांमाजी वरिष्ठ ॥ महाकपटी अति गर्विष्ठ ॥ सुमालीनामें महाबलिष्ठ ॥ राक्षस दुष्ट होता पैं ॥ ८४ ॥ तयाची कन्या नामें कैकसी ॥ दीधली असे विश्रव्याऋषीसी ॥ ती प्रथम एकसमयेंसीं ॥ पुत्रद्वयासी प्रसवली ॥ ८५ ॥

टी. १ गोड्या पाण्याचा. २ सुंदर. ३ कड्यासारखा ( सभोंवती). ४ दाहा हजार ह्मणजे एक अयुत अशा अयुत अयुतें पाकळयांनीं. ५ नाम ६ मुख्य. ७ वर्षाचे सीमेचा. ८ पर्वत. ९ दाहा हजार. १० कुबेराची नगरी. ११ लहान. १२ सर्वांवर. १३ राक्षसांत.

वडिल पुत्र सहस्रानन ॥ कनिष्ठ असे दशवदन ॥ दोघेही महाक्रूर दारुण ॥ भयानक अत्यंत ॥ ८६ ॥ तयांचे जन्मकाळीं सुरांनीं ॥ गगनोदरामाजी राहुनी ॥ अहो हे रावण असती दोन्ही ॥ ऐसी वाणी उच्चारिली ॥ ८७ ॥ त्रिभुवनाच्या सर्वजनांसी ॥ रडवितील पैं स्वदोष्टयें सीं ॥ ह्मणूनि रावण ऐसें त्यांसी ॥ नाम दोघांसी बोलले ॥ ८८ ॥ पुढें त्या दोघांतूनि कनिष्ठ ॥ जो हा रावण दशकंठ ॥ याणें तपस्या करूनि सुभट ॥ शितिकंठ आराधिला ॥ ८९ ॥ तैं तो प्रसन्न झाला शंकर ॥ यासि दीधलें लंकानगर ॥ ह्मणोनि तेथें हा सपरिवार ॥ निरंतर वसताहे ॥ ९० ॥ आणि ब्रह्मयाचें वरप्रदान ॥ प्राप्त झालें यालागुन ॥ महाभिमानें उचंबळोन ॥ त्रैलोक्या जाण अवमानितो ॥ ९१ ॥ ऐसा हा दशानन कनिष्ठ ॥ परांश्रयें जैसा झाला बलिष्ठ ॥ तैसा तो सहस्रानन ज्येष्ठ ॥ परांश्रयपुष्ट नव्हेची ॥ ९२ ॥ तेणें आपुल्या स्वाभाविकबळें ॥ पुष्करद्वीप समाश्रयिलें ॥ तयापुढें दशास्यादि सगळे ॥ केवळ पुतळे भासती ॥ ९३ ॥ सूर्यचंद्रांसि घेऊनि हातीं ॥ कंदुकर्ळीळें क्रीडतो तेथीं ॥ कुलाचल उपटूनि निरुती ॥ गगनपंथीं फेंकितो ॥ ९४ ॥ चेंडूफळींत चेंडू झेलित ॥ तैसेचि झेलितो कुलपर्वत ॥ मल्लयुद्धार्थ भिडे त्याप्रत ॥ ऐसा जगांत नसे कोणी ॥ ९५ ॥ मानसोत्तरशैलवर ॥ तयाचे चार दिशांसि

---

टी. १ सहस्रमुखांचा. २ देवांनीं. ३ सर्वांस रडविणारे. ४ दशमुख. ५ चांगली. ६ काळा आहे कंठ ज्याचा ( शंकर ). ७ यासाठीं. ८ दुसऱ्याच्या आश्रयानें. ९ वडील. १० दुसऱ्याच्या आश्रयानें मातलेला. ११ घेतलें, बळकावलें. १२ बाहुले. १३ चेंडुफळीनें. १४ कुलपर्वत ( सह्य, विंध्य, हिमालय, द्रोणाचळ इत्यादि ). १५ मानसोत्तरनामक श्रेष्ठ पर्वत. मोठेमोठे पर्वत. * धाकटा.

चार ॥ इंद्रादिदिक्पालांचीं सुंदर ॥ क्रीडानगरें कथिलीं जीं ॥ ९६ ॥ तीं त्या इंद्रादिकांपासून ॥ सहस्रमुखें घेतलीं हिरोन ॥ सकळ राक्षसांसहवर्तमान ॥ तेथेंचि आपण रमताहे ॥ ९७ ॥ त्या दिगीशपुर्‍यांमाझारी ॥ जी अत्युत्तम इंद्राची नगरी ॥ तियेमाजी तो दुराचारी ॥ स्वयें देवारी वसताहे ॥ ९८ ॥ आणि इतर नगरें तीन ॥ तीं दीधलीं प्रधानांलागुन ॥ सर्वराक्षसांचा राजा आपण ॥ सहस्रवदन जाहला ॥ ९९ ॥ सीते ती सहस्रमुखाची पुरी ॥ सर्वालंकृत विशेषें साजिरी ॥ ब्रह्मांडीं पावे तियेची सरी ॥ ऐसी दुसरी नाहींच ॥ १०० ॥ ती अत्यंत दुर्लभ त्रिभुवनीं ॥ अनंतजगांचें सार काढुनी ॥ विश्वकर्म्यानें यथास्थानीं ॥ सुमंडित रचिलीसे ॥ १ ॥ गगनचुंबित उंच सुभट ॥ वज्रापरी परम पट्ट ॥ सप्तधातूंचे सप्त तट ॥ भोंवते सघट साजिरे ॥ २ ॥ मेर्वादिशैलांचे टेंकडे ॥ तैसे शोभती अनंत हुंडे ॥ वरी उल्हाटयंत्रांचे जुंबाडे ॥ चहूंकडे तळपती ॥ ३ ॥ माजी सेनांनिवेशाकारणें ॥ रचिलीं असती गुह्य स्थानें ॥ जयांच्या मार्गशोधार्थ जनें ॥ लागतां जिणें दुर्लभ ॥ ४ ॥ नाना शस्त्रेंनिवेशार्थ ॥ गुप्त विवरें असती अनंत ॥ परस्परतटप्रवेशार्थ ॥ गुह्य पंथें बहुतची ॥ ५ ॥ प्रत्येकतटाभोंवती देख ॥ सखोल विस्तृत सप्त खंदक ॥ सागरांपरी अति भयानक ॥ हेलावे उदक जयांत ॥ ६ ॥ माजी नक्रादि जलजंत ॥ पर्वताकार फिरती अनंत ॥ सहस्रदळादि पद्में सतत ॥ फुललीं डुलत शोभती ॥ ७ ॥

टी. १ इंद्रादि लोकपाळांच्या पुर्‍यांत. २ देवांचा शत्रु. ३ बरोबरी. ४ सोनें, रुपें, तांबें इत्यादि सात धातूंचे. ५ मोठे. ६ मेरु, हिमाचल इत्यादि पर्वतांचे. ७ बुरूज. ८ तोफांचे. ९ सैन्य राहण्यास. १० शस्त्रें ठेवण्यास. ११ मार्ग. १२ मगरादि.

वेशिदरवाजे अति प्रचंड ॥ तीक्ष्णधातूमय अखंड ॥ वज्रासमान दृढ वितंड ॥ तेजें चंडकिर-
णची ॥ ८ ॥ लहान थोर सकळ बिंदी ॥ श्वेत निर्मळ स्फटिकबंदी ॥ चंद्रकांतमण्याच्या वेदी॥
दोंहीं बाजू विलसत ॥ ९ ॥ अमृततुल्योदकाचे पाट ॥ ठायींठायीं वाहती नीट ॥ प्रत्येक मा-
र्गीं महाहाट ॥ वर्णील थाट कोण त्यांचा ॥ ११० ॥ सप्तरंगीपाषाणीं साजिरे ॥ निर्मिले असती
चौबारे ॥ सन्निध सुरेख स्फटिकागारें ॥ रम्य मनोहरें विलसती ॥ ११ ॥ वनें उपवनें आराम ॥
ठायींठायीं असती उत्तम ॥ जयांमाजी सर्वर्तुकुसुम ॥ शोभत परम तरुवल्ली ॥ १२ ॥ साल
ताल तमाल हिंताल ॥ निंब शिंशप कदंब केळ ॥ वट पायरी बाभुळी चलदळ ॥ आइन किनळ
पारिभद्र ॥ १३ ॥ पिंपरी नाद्रुकी सांतविण ॥ बिभीतक भल्लांत अर्जुन ॥ तिंत्रिणी औदुंबर
हसाण ॥ खदिर कांचन करंज ॥ १४ ॥ पाटल चंदन कृष्णागरू ॥ पुन्नाग प्रियक देवदारू ॥
रक्तचंदन लोध्र केशरू ॥ मोह मंदारू कोविदार ॥ १५ ॥ जाई जुई शेवंती चमेली ॥ मोगरे
बटमोगरे सायली ॥ गुलाब करवीर सदाफुली ॥ धत्तूर अबोली सुरेख ॥ १६ ॥ नागचंपक सु-
वर्णचंपक ॥ देवचंपक भुंयचंपक ॥ श्वेतपीतादि कुरंटक ॥ कुंद अशोक केतकी ॥ १७ ॥ मु-
चुकुंद कांटेशेवंती अनंत ॥ तगरी सुरंगी पारिजात ॥ स्वर्णपुष्पी जपा सूर्यकांत ॥ बकुळी

---

टी. १ तिल्याचे. २ सूर्यच. ३ गल्ल्या. ४ मोठे बाजार. ५ चव्हांठे. ३ सर्वकाळ फुलणाऱ्या. ७ वृक्ष व वेली. ८ साग.
९ ताड. १० सुरमाड. ११ शिसम. १२ कळंब. १३ पिंपळ. १४ कडुनिंब किंवा पांगारे. १५ बेहडे ( हेळे ). १६ बिबे. १७
अर्जुन सादडा ( आंजण ). १८ चिंच. १९ उंबर. २० कणेर. २१ कोरंटे. २२ जासवंद. * स्फटिकमण्याचीं घरें. + धुतरा.

आणि कर्दळी ॥ १८ ॥ कपित्थ[1] रसाळ[2] जांबळी ॥ फणस डाळिंबी आंवळी ॥ तोरणी करवंदी रामफळी ॥ सीताफळी खिरणिया ॥ १९ ॥ खर्जूरी बदरी[3] पपनसी ॥ रायकेळी लिंबिणी बहुरसी ॥ रातांजन जांब अननसी ॥ बदामी द्राक्षी माहुळंगी ॥ १२० ॥ एला लवंगी जायफळी ॥ बिल्व काजी रायआवळी ॥ अंजीर अक्रोड पोफळी ॥ नारळी कदळी जंबीर ॥ २१ ॥ इत्यादि नाना लता अंघ्रिपें[4] ॥ ठायीं ठायीं असती अमूप[*] ॥ तैसेचि उत्तम कल्पपादप[+] ॥ दिव्यस्वरूप विराजती ॥ २२ ॥ आणि दिव्यगंधरसोपेत[5] ॥ तैसेचि सर्वर्तुफलसंयुक्त[6] ॥ ऐसेही लतावृक्ष बहुत ॥ सुविस्तृत विराजती ॥२३॥ गगनचुंबित कित्येक असती ॥ मंडपाकार कित्येक दिसती ॥ कित्येक ठायीं ठायीं विलसती ॥ छत्राकृती स्वयंभ ॥ २४॥ कित्येक दिव्य कांचनप्रभ[7] ॥ कितिएक अग्निशिखाभ[8] ॥ कित्येक ते नीलांजननिभ[9] ॥ रजतप्रभ[10] कितिएक ॥ २५ ॥ ऐशिया दिव्य नानातरुवरीं ॥ सर्वत्र मंडित शोभे पुरी ॥ मकरंद[11]लोभें मधुपें[12]हारी ॥ पुष्पांवरी गुंजत ॥ २६॥ शुक[13] सारिका पारावत[14] ॥ मयूर तित्तिरें[15] पिकें[16] कपोत[17] ॥ इत्यादि नानारंगी बहुत ॥ पक्षी उडत त्यांमाजी॥२७॥दाडिंबादिफळें मधुर ॥ भक्षून तल्लीन होती कीर ॥ पिकें[16] आम्रांचे पाहूनि मोहर ॥ पंचमस्वर आळविती ॥२८ ॥ कित्येकठायीं वृक्ष संघट[18] ॥ छाया पसरली अ-

---

टी. १ कंवठी. २आम्र. ३बोरी. ४ वृक्ष. ५उत्तम सुगंध व रस यांणीं युक्त. ६सर्वकाल फलयुक्त असणारे. ७ सुवर्णासारखे. ८अग्नीच्या ज्वाळेसारखे. ९काजळासारखे. १०रुप्याप्रमाणें तेजस्वी. ११पुष्पांतील मधाच्या लोभानें. १२भुंग्यांच्या पंक्ती. १३ कीर. १४पारवे. १५टिटवे. १६कोकिळ. १७कबडे. १८मोठे. *अगणित. +कल्पवृक्ष (ज्या पदार्थाची इच्छा करावी तो पदार्थ देणारे वृक्ष.)

से दाट ॥ माजी जलदांग[1]मभ्रमें उद्धट ॥ नीलकंठ[2] नाचती ॥ २९ ॥ कोठें मृगयूथें[3] क्रीडती ॥
कोठें पारावत[4] घुमती ॥ कोठें श्वेतखपुत्रांच्या पंक्ती ॥ आनंदें असती बैसल्या॥१३०॥स्पटि-
कशिळाबद्ध सुरेख ॥ वापिंका तेथें असती अनेक ॥ अमूल्यरत्नमय अलोलिक[6] ॥ सोपानें सु-
रेख जयांचीं॥३१॥ अमृतासम अत्यंत मधुर ॥ तुडुंब भरलें असे नीर[7] ॥ नानारंगी मीन परि-
कर ॥ नित्य भीतर तळपती॥३२॥अनेकविधपद्मांच्या जाती॥माजी सदा फुलल्या असती ॥
मकरंद[8]लोभें षट्पंद वरुती॥ बैसले असती तल्लीन॥३३॥पवनें उधळे पद्मपराग[11] ॥ तेणें उदक
पीतरंग ॥ सुवर्णरेखाकार सुरंग ॥ सूक्ष्म तरंगें[12] चालती ॥ ३४ ॥ तटीं चक्रवाकें वर्तत ॥ तयां-
ची शोभा अपरिमित ॥ कोकिळांचे स्वर बहुत॥सदा घुमत चौफेरा ॥ ३५ ॥ राजहंसरुतें[13] त्या
वापिका[14] ॥ सदा नादित असती सकळिका ॥ आणि तेथें सुखार्थ जे कां ॥ निर्मिले असती भू-
भाग ॥ ३६ ॥ ते सर्वर्तुसुखद[15] रम्य सकळ ॥ वैडूर्यमण्यासम तेजाळ ॥ तयांवरुती सिंह शा-
र्दूळ ॥ सदाकाळ खेळती ॥३७॥ नंदनवनीं[16] आणि चैत्ररथीं[17] ॥ तैसेचि मंदरादि शैलांवरुती ॥जे
जे अत्युत्तम वृक्ष असती ॥ ते सर्व तेथें आहेत ॥ ३८ ॥ नानामणिमय तेजागळी ॥ सर्वत्र
विलसे भूमि चांगली॥ मध्येंमध्यें मौक्तिकजाळी ॥ देत झळाळी अनुपम्य ॥ ३९ ॥ सर्वत्र वि-

टी. १ ढग उचलले आहेत अशा भ्रांतीनें. २ मोर. ३ मृगांचे कळप. ४ पारवे. ५ तळ्या, पुष्करणी. ६ सुशोभित. ७ उदक. ८ सुंदर. ९ पुष्परसाच्या लोभानें. १० भुंगे. ११ कमळांतील बुका. १२ लाटा. १३ राजहंसांचे शब्द. १४ पुष्करणी, तळ्या. १५ सर्वकाळ सुख देणारे. १६ इंद्राच्या बागेंत १७ कुबेराच्या बागेंत.

चित्रसोपानयुक्त ॥ महाप्रासाद शोभती अनंत ॥ शतखणी गोपुरें दीप्तिमंत ॥ रत्नखचित झळकती ॥१४०॥ ठायीं ठायीं हेमांबरपताका ॥ चपळांपरी तळपती अनेका ॥ महाध्वज ते सुरवर्त्मका ॥ भेदूनि नाका स्पर्शले ॥ ४१ ॥ महाप्रासादांचे कळस ॥ हिणाविती चंद्रसूर्यास ॥ नक्षत्रांसम मुक्तांचे घोंस ॥ भोंवती विशेष झळकती ॥ ४२ ॥ एवंप्रकारें सर्वत्र साजिरी ॥ विचित्र विलसे ती पुरी ॥ आतां तत्रस्थ राजसौधाची परी ॥ सांगतों अवधारीं जानकीये॥४३॥ स्फटिकशिळा शुभ्रवर्ण ॥ तयांचा भोंवती प्राकार महान ॥ सप्तरंगीशिळांचीं मधून ॥ चक्रें पूर्ण झळकती ॥ १४४ ॥ अंगणाभोंवती प्राकाराजवळी ॥ विद्रुमशिळांची शोभे पोंळी ॥ जियेवरुती स्थळोस्थळीं ॥ द्विजावळी क्रीडत ॥ १४५ ॥ चौफेर काचबंदी आंगण ॥ माजी झळकती नाना वर्ण ॥ ठायींठायीं कारंजे महान ॥ शुद्ध जीवन वर्षती ॥ १४६ ॥ कोटिशः वाजिरोहांच्या पंक्ती ॥ तेथें सर्वदा विराजती ॥ लक्षावधि मदोन्मत्त हस्ती ॥ डुलत असती अहोरात्र ॥ १४७ ॥ रत्नजडित बैसका अनेक ॥ ठायींठायीं विलसती देख ॥ अंगणामाजी फांके बीकें ॥ पाहतां लोक विस्मित ॥ १४८ ॥ पर्वतांसम कृष्णशिळा ॥ तयीं तळपाया दृढ खचिला ॥ अष्टपेलू आकार साधिला ॥ काश्मीरशिळा त्या उपरी ॥ १४९ ॥ त्यां-

टी. १ मोठे बंगले. २ वेशिदरवाजे. ३ भरजरी पताका. ४ आकाशास. ५ स्वर्गास. ३ राजवाड्याची. ७ प्रकार. ८ तट, कोट. ९ तटाजवळ. १० पोंवळयासारख्या आरक्त शिळांची. ११ बसण्यास योग्य असा तटास लागून असणारा ओंटा. १२ पक्ष्यांच्या पंक्ती. १३ उदक. १४ घोडेस्वारांच्या. १५ तेज. * शेंकडो खण किंवा मजले आहेत ज्यांस अशीं. × विजांप्रमाणें.

वरी उरंगफणाकृती ॥ सूर्यकांताचे चिरे झळकती ॥ जेंवी अनंत उगवोनि गभस्ती ॥ बैसले पंक्ती एकसरां ॥ १५० ॥ इंद्रनीळाचे महावारण ॥ वरी बैसविले वळीन ॥ हिऱ्यांचे द्विज वदनांतून ॥ झळकती पूर्ण जयांचे ॥ १५१ ॥ ऐसा विचित्र चौथरा सबळ ॥ वरी पद्मरागाचे तोळंबे सुढाळ ॥ शुद्ध हिऱ्यांचे स्तंभ विशाळ ॥ तेजकल्लोळ फांकती ॥ १५२ ॥ नीळमण्याच्या सऱ्या वरुती ॥ हेमतुळवटें अखंड असती ॥ माणिकांचे दांडे चमकती ॥ किलच्या शोभती पाचूच्या ॥ १५३ ॥ पद्मरागपद्मीं जडित ॥ रजतपाटियां सुविस्तृत ॥ तींच वितानें दीप्तिमंत ॥ झालरी लोंबत मौक्तिकांच्या ॥ १५४ ॥ रत्नखचित महिरपी विशाळ ॥ तयांच्या विचित्र फांकती किळ ॥ हीरकांच्या मदलसा सरळ ॥ वरी मराळ मोतियांचे ॥ १५५ ॥ माडियांवरी माड्या क्रमेंसीं ॥ चडत्या उतरत्या शोभती विशेषीं ॥ स्वर्गीं जावया आकाशासी ॥ सोपानेंसीं भासत ॥ १५६ ॥ कीं सानुयुक्त मेरुशिखरें ॥ उंच झळकती तेजभरें ॥ कीं कुलाचळेंचि एकसरें ॥ सौधाकारें उंचावले ॥ १५७ ॥ भोंवती चौफेर गवाक्षद्वारें ॥ भासती जैशीं गिरिगव्हरें ॥ सज्जींचे पंजर साजिरे ॥ मोहळें सुंदरें वाटती ॥ १५८ ॥ उपरितन हिऱ्यांचे कळस ॥ भासती उदेले बहु दिनेश ॥ आगाशा स्पर्शूनि आकाशास ॥ स्वनामसार्थक्य दा-

---

टी. १ सर्पांच्या फडांसारखे. २ सूर्य. ३ मोठे हत्ती. ४ दांत. ५ पुष्करराजाचे. ६ सोन्याचीं बाहालें. ७ बरगे. ८ पुष्कर-राजनामक रत्नाच्या कमळांनीं. ९ चांदीचे तक्ते. १० मजल्याच्या आरंभीं भिंतीस लागून कोर असते ती. ११ हंस. १२ सपाट जागांनीं युक्त. १३ महापर्वत. १४ बंगल्याच्या आकारानें. १५ पर्वतांच्या गुहा. १६ पक्ष्यांचे पिंजरे. १७ वरचे. १८ आपल्या नांवाचे सार्थक.

विती ॥ १५९ ॥ ठायींठायीं वेगवेगळीं ॥ अनेक स्थळें असती साधिलीं ॥ कित्येक समचतुरस्त्र चांगलीं ॥ वर्तुळ आगळीं अष्टपेलू ॥ १६० ॥ कित्येक असती त्रिकोण ॥ कित्येक तीं पद्मासमान ॥ स्वस्तिकाकार दैदीप्यमान ॥ सुरम्य षट्कोण कित्येक ॥ १६१ ॥ तये एकेकस्थळाभोंवती ॥ एकेकरत्नांच्या भिंती वर्तती ॥ कोठें कांचनमयचि असती ॥ कोठें चमकती रौप्यमय ॥ १६२ ॥ प्रत्येक दरवाजाची देख ॥ भिन्नभिन्न रचना सुरेख ॥ नवरत्नखचित कितिएक ॥ एक ते एकरत्नाचे ॥ १६३ ॥ जये भिंतीसि ज्या रत्नांचें ॥ जडित दिसेल विचित्र साचें ॥ तियेसि त्यात्याचि रत्नाचे ॥ दरवाजे असती लावियेले ॥ १६४ ॥ प्रत्येकस्थळीं भिन्नभिन्ना ॥ पाषाणबंदी भूमिरचना ॥ मांजी वैडूर्यादिकांचीं नाना ॥ यंत्रें जाणा झळकती ॥ १६५ ॥ कोठें सारींचे पट दिसती ॥ कोठें बुद्धिबळाचें विलसती ॥ कोठें स्वस्तिकाकार असती ॥ कोठें आकृती कमळांच्या ॥ ६६ ॥ कोठें जळासम भासे भूमी ॥ बुधेंही चकित अंतर्यामी ॥ पृथक् पृथक प्रत्येकधामीं ॥ कौशल्य नामी साधिलें असे ॥ १६७ ॥ इंद्रनीळांचे विचित्र मयूर ॥ ठायींठायीं नाचती सुंदर ॥ गरुडपाचूचे रावे परिकर ॥ बोलती मयुर आनंदें ॥ १६८ ॥ खांबसूत्री रत्नपुतळिया ॥ नाचती गिरक्या घेऊनियां ॥ सदना कोणी जन आलिया ॥ रत्नबाहुले सत्कारिती ॥ १६९ ॥ एक पुतळे आनंदें गाती ॥ पुरे ह्मणतां उगे राहती ॥ मृदंगादिवाद्यें नानारीती ॥ चित्रें वाजविती कित्येक ॥ १७० ॥ रत्नपुतळे

टी. १ सुवर्णमय. २ मध्यें (भूमीच्या रचनेंत). ३ हिरे माणिकादि रत्नांचीं. ४ पंडितही. ५ प्रत्येक मांदिरांत. ६ घरास.

वेत्रहस्त ॥ स्तभांसन्निध उभे असत ॥ आलोकशब्द उच्चारित ॥ तेणें भासत सजीवांपरी ॥ ॥ १७१ ॥ भिंतीठायीं वृक्षरेखिले ॥ त्यांवरी नाचती गोलांगुळें ॥ ठायींठायीं पक्ष्यांचीं पिलें॥ अति सोज्वळें तळपती ॥ १७२ ॥ चतुर्दश भुवनें स्वामीसहित ॥ कुड्यीं रेखिलीं रत्नजडित ॥ ज्यांच्या जैशा आकृति असत ॥ तैशाचि समस्त दाविल्या ॥ १७३ ॥ सौधीमाजील उघडे चौक ॥ बहु जे असती पाचुबद्धादिक ॥ तयांठायीं वापिका सुरेख ॥ शीतळोदकें परिपूर्ण ॥ १७४ ॥ कित्येकींमाजी उष्ण पाणी ॥ तेथें स्नान करितां जनीं ॥ अंगीं राजकळा ये तत्क्षणीं ॥ नवल करणी कर्तयाची ॥ १७५ ॥ अंतःपुरें दैदीप्यमान ॥ वर्णावया समर्थ कवण ॥ दिन कीं रजनी हें ज्ञान ॥ जेथें जाण नव्हेची ॥ ७६ ॥ अष्ट दिग्द्वारीं सोपानपंक्ती ॥ रत्नखचित विचित्र शोभती ॥ दोंबाजूंसिही जयांवरुती॥सदा तिष्ठती वेत्रकर ॥७७॥ स्वर्ग भू पाताळ शोधितां ॥ ऐसा सौध नाहींच तत्वता॥ धन्य तो विश्वकर्मा निर्मिता॥ शिल्पनिपुणता ओतिली ॥ ७८ ॥ असो ऐशी त्या सौधाची रचना ॥ तेणें ती नगरी दिसे शोभना॥ तियेच्या सर्व स्थितीचे वर्णना ॥ सामर्थ्य कवणा असे पैं ॥ १७९ ॥ ती सकळ ब्रह्मांडोदरीं ॥ सर्वोपरी असे साजिरी ॥ त्रिदिव लंका अलकादिपुरी ॥ तुच्छ निर्धारी तिजपुढें ॥ १८० ॥ सर्व देवोपदेवांलागुन ॥ ती परम दुष्प्राप्य जाण ॥ तेथें वसाया मिळावें ह्मणोन ॥ तप सज्जन आचर-

---

टी. १ नजर रख्खो हा शब्द. २ माकडें, वानर. ३ भिंतीवर. ४ राजवाड्यांतील. ५ रात्र. ६ हातांत काठ्या घेऊन राहणारे (भालदार). ७ राजवाडा. ८ सर्वांहून अधिक. ९ स्वर्ग. १० कुबेराच्या नगरादिक. ११ इंद्रादि देवांस व गंधर्वादि उपदेवांस.

ती ॥ १८१ ॥ ऐशी ती परम दुर्लभ असोन ॥ तेथें तो सहस्रमुख रावण ॥ सकळ राक्षसांसह-
वर्तमान ॥ स्वसामर्थ्यें जाण वसताहे ॥ ८२ ॥ तेणें आपल्या बाहुबळेंसीं ॥ हेळांमात्रें जिंकिलें
जगासी ॥ स्वर्गमृत्युपाताळवासी ॥ वश तयासी जाहले ॥ १८३ ॥ पुरंदरादिक सर्व निर्जर ॥
गंधर्व यक्ष सिद्ध किन्नर ॥ गुह्यक चारण विद्याधर ॥ आणि भयंकर दानब जे ॥ ८४ ॥ तयां-
सि कंठीं बांधूनि वेगें ॥ सदा फिरवी आपुल्या मागें ॥ ठायींठायीं क्रीडानुरागें ॥ नाचवी
बहुत आनंदें ॥ १८५ ॥ रीसासि जेंवीं वेसन घालुन ॥ दारोदारीं नाचविती जाण ॥ कीं
शृंखळें मर्कट बांधून ॥ स्वेच्छानुरूप नाचविती ॥ १८६ ॥ कीं सरोजा पांगुळबैला ॥ जैसा
नाचवी अँवलीळा ॥ कीं श्वानपालक स्वश्वानाला ॥ नाचवूनि लीळा करी पैं ॥ १८७ ॥ कीं
बाहुलेभोरपी लाघवी ॥ खांबसूत्री पुतळ्या नाचवी ॥ कीं गोपाळ गोवत्सें आघवीं ॥ स्वेच्छें
वागवी जैसीं कां ॥ ८८ ॥ तैसाचि सर्वलोकांलागुन ॥ वागवीतसे तो रावण ॥ बालक्रीडें क्रीडतां
आपण ॥ मेरूसि राई भावित ॥ ८९ ॥ महासागर गोष्पद मानित ॥ सर्व लोकां तृणसम देखत ॥
ढेंकुळासम द्वीपें समस्त ॥ भावी सतत स्वबळेंसीं ॥ १९० ॥ तो महाप्रतापी वीर सृष्टीं ॥ कदा कांहीं-
च न गणी दृष्टीं ॥ सर्व लोकां त्रासवूनि कष्टी ॥ कराया उद्युक्त झाला जें ॥ ९१ ॥ तेव्हां स्वयें
कमलयोनी ॥ पुलस्त्य आणि विश्रवा मुनी ॥ हे तिघेही तयासन्निधानीं ॥ वेगें तत्क्षणीं पा-
वले ॥ ९२ ॥ आणि अत्यादरें तयालागुन ॥ बोलते झाले सुयुक्त वचन ॥ ह्मणती वत्सा तुज-

॥ ९ ॥

टी. १ क्षणांत. २ इंद्रादिक. ३ देव. ४ सहज. ५ जमिनीवर उमटलेलें गाईचें पाऊल. ६ ब्रह्मदेव. ७ योग्य.

समान ॥ जगीं धन्य कोण असे ॥ ९३ ॥ इंद्रादिक सर्व निर्जर ॥ तुजपुढें असती बा पामर ॥
गंधर्व यक्ष असुर नर ॥ मशक साचार सर्वही ॥ ९४ ॥ वत्सा तूं सर्वब्रह्मांडाठायीं ॥ महाप्र-
तापी वज्रदेही ॥ सर्व विद्यांचा राशी पाहीं ॥ तुजसम नाहीं कोणीच ॥ ९५ ॥ सजणा तूं वि-
वेकी चतुर ॥ शूर धीर वीर गंभीर ॥ शांत दांत परम उदार ॥ सद्गुण²आकर साजिरा ॥९६॥
बा तूं प्रतापचंड³किरण ॥ देवादिक हे ख⁴द्योत दीन ॥ तुवां उघडलिया एक नयन ॥ काज-
वे संपूर्ण लोपती ॥ ९७ ॥ कीं तव प्रतापानळ प्रखर ॥ सर्व लोक श⁵लभ साचार ॥ अग्निस्प-
र्शें तू⁶लभार ॥ तैसे समग्र जळतील पैं ॥ ९८ ॥ ख⁷गेंद्रापुढें मशक निका ॥ कीं गजेंद्रापुढें
पिपीलिका ॥ कीं उ⁸रगेंद्रापुढें अळिका ॥ जैशी क्षुल्लका साचार ॥ ९९ ॥ तैसेचि
जगींचे सर्व लोक ॥ तुजपुढें असती क्षुल्लक ॥ महामृगेंद्र आणि जंबुक ॥ कीं रायरंक-
सम केंवी ॥ २०० ॥ तूं सर्व जगामाजी बलिष्ठ ॥ त्रैलोक्याचा धनी वरिष्ठ ॥ देवादिक हे तु-
जला श्रेष्ठ ॥ मानिती स्पष्ट जाणिजे ॥ १ ॥ तव कृपा व्हावी ह्मणोन ॥ सर्व करिती नाना प्र-
यत्न ॥ स्वामिभृत्यन्यायें पूर्ण ॥ तुजलागुन आश्रयती ॥ २ ॥ ऐसें असतां तूं तयांसी ॥ आ-
रंभिल त्रासावयासी ॥ तरी वेल्हाळा अविचारेंसीं ॥ नको साहसी होऊं पां ॥ ३ ॥ प्रजांसि
संहारील नृपाळ ॥ पक्ष्यांवरी कोपेल निराळ ॥ जळजंतवांलागीं जळ ॥ जरी कां त्यागील
बाहेरी ॥ ४ ॥ तरी तिहीं सांगावें कोणा ॥ विचारें पाहीं सहस्रवदना ॥ बा तूं विवेकी चतुर

टी. १ धुंगुर्डे. २ चांगल्या गुणांची खाण. ३ प्रतापरूप सूर्य. ४ काजवे. ५ टोळ, पतंग. ६ कापूस. ७ गरुडापुढें. ८ मुंगी. ९ शेषापुढें.

शाहाणा ॥ मान्य त्रिभुवना आहेसी ॥ ५ ॥ सौंदामिनी पडतां मशेंकीं ॥ तयाची उरी उरेल कीं ॥ वज्र पडतां लोष्टमस्तकीं ॥ उरी कैसी कीं राहील ॥ ६ ॥ यालागीं सर्वलोकांवरुती ॥ दयाळा दया करीं निरुती ॥ आह्मी तुज वदांन्याप्रती ॥ याचक संप्रती पातलों ॥ ७ ॥ तरी आमुची सर्व कामना ॥ पुरवूनि घेईं आशीर्वचना ॥ त्रास देऊं नको ह्या त्रिभुवना ॥ सदा कल्याणा अनुभवीं ॥ ८ ॥ इत्यादिरीतीं सादरवचनीं ॥ समजाविलें त्या तिघांनीं ॥ ह्मणोनि तो तेव्हांपासुनी ॥ निवांत आजुनी राहिला ॥ ९ ॥ सीते ऐसा तो सहस्रानन ॥ रावण महाबलवान ॥ पुष्करद्वीपालागीं पावुन ॥ सुखरूप पूर्ण वर्तताहे ॥ २१० ॥ आणि तयाचा कनिष्ठ सहोदर ॥ हा दशास्य रावण साचार ॥ लंकेमाजी सहपरिवार ॥ राहिला जाण जानकीये ॥ ११ ॥ मुनिवर्य हो इत्यादि अद्भुतें ॥ नित्य त्या विप्रें सांगोनि मातें ॥ मत्तांतगृहीं सानंदचित्तें ॥ चार मास दवडिले ॥ १२ ॥ पुढें जनका आणि मजसी ॥ आशीर्वाद देऊनि विशेषीं ॥ एकाकीच तो तीर्थयात्रेसी ॥ तेथूनि जाता जाहला ॥ १३ ॥ एवंप्रकारें श्रीरामभाजा ॥ कथिती झाली मुनिसमाजा ॥ ऐसें वाल्मीकें त्या द्विजराजा ॥ भारद्वाजा कथियेलें ॥ १४ ॥ आतां सीतेच्या वचनेंसीं ॥ ईर्षा उद्भवोनि रामासी ॥ सहस्रास्यासि मारावयासी ॥ जाईल ऐसें वर्णिजेल ॥ १५ ॥ ती कथा परम अद्भुत ॥ श्रोतीं ऐकिजे देउनि चित्त ॥ ह्मणोनि मी रघुनाथसुत ॥ जोडूनि हस्त विनवितों ॥ १६ ॥ स्वस्ति श्रीमदद्भुतरामविजय ॥ वाल्मीकीयाद्भुतोत्तरकांडहृदय ॥ ऐकोत सज्जन होऊनि तन्मय ॥ अष्टादशाध्याय मधुर हा ॥ २१७ ॥ अध्याय १८

टी. १ वीज. २ घुंगुर्ड्यांवर. ३ मातीच्या ढिपळावर. ४ दात्याप्रत. ५ माझ्या बापाच्या घरीं.

॥ श्रीगणेशायनमः ॥ ॥ जयजयाजी पुरुषोत्तमा ॥ जयजयाजी वैकुंठधामा ॥ जय श्रीहरे परब्रह्मा ॥ आत्मारामा जगद्गुरू ॥ १ ॥ तूं सकळब्रह्मांडव्यापक ॥ कर्ता अकर्ता तूंचि एक ॥ मायातीत निरुपाधिक ॥ जगन्नायक जगदात्मा ॥ २ ॥ तूं स्वयंप्रकाश स्वयंज्योती ॥ मायासूत्र तुझिये हातीं ॥ विरिंचि विष्णु गिरिजापती ॥ सदा पाळिती तव आज्ञा ॥ ३ ॥ इच्छामात्रें गुणेंयेंसीं ॥ जगदुत्पत्तिस्थित्यंत करिसी ॥ अनंतकोटीब्रह्मांडराशी ॥ तुझिये कुशी शोभती ॥ ४ ॥ तूं सच्चिदानंद निर्विकार ॥ तुजला शरण जे कां नर ॥ तयांलागीं मोक्षदातार ॥ होसी सत्वर निश्चयें ॥ ५ ॥ ऐसी तुझी अपार कीर्ती ॥ वर्णितां भागल्या सकळ श्रुती ॥ ह्मणोनि केवळ अनन्यमती ॥ करितों नती साष्टांग ॥ ६ ॥ तरी आतां करुणाघना ॥ होऊनियां प्रसन्नमना ॥ पुरवीं माझी मनकामना ॥ विज्ञापना हीच असे ॥ ७ ॥ पूर्वाध्यायीं जनकजेनें ॥ जया रावणा सहस्र वदनें ॥ तयाचें महत्त्व पूर्णपणें ॥ ऋषींकारणें कथियेलें ॥ ८ ॥ ऐसें जाहलें कथानक ॥ पुढें असे गोड अधिक ॥ तरी श्रोतीं धरूनि बीक ॥ श्रवणा भाविक होईजे ॥ ९ ॥ सीता ह्मणे हो ऋषिजन ॥ पूर्वीं विप्रें मजलागून ॥ ऐसा रावण सहस्रवदन ॥ महाबलवान कथिला जो ॥ १० ॥ तयाचें महत्त्व ऐकुनी ॥ बहु आश्चर्य झालें मनीं ॥ तेंचि अद्यापि मजलागुनी ॥ रात्रंदिनीं आठवतें ॥ ११ ॥ माझिये साठीं श्रीरघुवीरें ॥ सुग्रीवादि बहुवानरें ॥ मि-

टी. १ आपल्याच प्रकाशानें प्रकाशित होणारा. २ तेजोरूपी. ३ ब्रह्मदेव. ४ सत्व, रज व तम ह्या तीन गुणांनीं. ५ मोक्ष देणारा. ६ वेद. ७ एकाग्रचित्तानें. ८ नमस्कार. ९ जनकाच्या कन्येनें (सीतेनें). १० मुखें. ११ प्रीति. × सत्यज्ञानानंदस्वरूपी.

ळवूनियां थोरथोरें ॥ कर्में दुस्तरें केलीं पैं ॥ १२ ॥ सागराचिये अगाध[1]नीरीं ॥ शिळा तारू-
नि थोरथोरी ॥ शतयोजनेंपर्यंत दूरी ॥ सेतु निर्धारीं बांधिला ॥ १३ ॥ आणि मारुतिहस्तें
जाळूनि लंका ॥ स्वबाहुवीर्यें त्यादशमुखा ॥ कुळासहित मारूनि देखा ॥ दीधलें लोकां मह-
त्सुख ॥ १४ ॥ हेंही लोकोत्तर[2] कर्म ॥ करिता झाला श्रीराम ॥ परी तेणें आश्चर्य परम ॥ न-
व्हेचि मम अंतरीं ॥ १५ ॥ ऐसें व्हावया काय कारण ॥ एवं[3] शंकेल तुमचें मन ॥ तरी तो
रावण दशवदन[4] ॥ स्वयें बलवान नव्हेची ॥ १६ ॥ पूर्वी तेणें शंकराराधन[5] ॥ केलें होतें मनापासून ॥
ह्मणोनि शिवें होऊनि प्रसन्न ॥ लंकास्थान दीधलें ॥ १७ ॥ आणि ब्रह्मयाच्या वरदानेंसीं ॥ दुर्धर झाला
सर्वजनांसी ॥ ह्मणोन काय प्रतापराशी[6] ॥ ऐसें तयासी बोलावें ॥ १८ ॥ स्वस्वामीच्या[7] आश्रयें श्वानें[8] ॥
गजेंद्रावरी जाय भुंकोन ॥ परी तयासि पंचानन[9] ॥ बोलेल कोण सांगा पा ॥ १९ ॥ आणि
मृगेंद्रें मारिला जंबूक[10] ॥ ह्मणोनि काय प्रताप अधिक ॥ कीं शरभें[11] मारितां काक ॥ नव्हे
कौतुक निश्चयें ॥ २० ॥ ऐसें असतां तुह्मी सकळ ॥ वर्णितां रामप्रताप बहुळ[12] ॥ परी तो रा-
वण लंकापाळ ॥ हीनबळ जाणा पैं ॥ २१ ॥ जरी तो असता प्रतापयुक्त ॥ तरी बळीच्या
अश्वशाळेंत[13] ॥ पडिले चणे वेचूनि खात ॥ सांगा किमर्थ राहिला ॥ २२ ॥ आणि वाळीनें
धरितां काखेमधीं ॥ तेथेंचि भोगी बहु दुर्गंधी ॥ परी पळाया एकही संधी ॥ पाहतां कधीं

---

टी. १ तळ लागत नाहीं अशा खोल पाण्यांत. २ अलौकिक. ३ याप्रमाणें. ४ दहा मुखांचा. ५ शिवाची आराधना. ६ परा-
क्रमी. ७ आपल्या धन्याच्या. ८ कुत्रें. ९ सिंह. १० कोल्हा. ११ सिंहासही उचलून नेणारा पक्षी. १२ पुष्कळ. १३ घोडशाळेंत.

सांपडेना ॥ २३ ॥ ऐसा दुर्बळ जेंवी रावण ॥ तैसा नव्हे सहस्रवदन ॥ जयाचे प्रतापें जग संपूर्ण ॥ रात्रंदिन पोळतें ॥ २४ ॥ आतां जरी त्या सहस्रवदना ॥ स्वबळें मारील अयोध्याराणा ॥ तरीच स्वास्थ्य होऊनि भुवना ॥ कीर्तिही जाणा पसरेल ॥ २५ ॥ तो महाबलिष्ठ अति दारुण ॥ ब्रह्मांडविजयी आहे ह्मणोन ॥ तयासि जिंकिल्यावांचून ॥ रघुनंदन धन्य नव्हे ॥ २६ ॥ ऐसें असतां तुह्मी समस्त ॥ वर्णिता रामप्रताप बहुत ॥ ह्मणोनचि हें माझें चित्त ॥ अति विस्मित जाहलें ॥ २७ ॥ तुह्मी करितां श्रीरामवर्णन ॥ ऐकोनि मी हांसल्यें ह्मणोन ॥ कोप न धरितां मजलागुन ॥ क्षमा पूर्ण कीजिये ॥२८॥ ऐसी सीतेची मधुर वाणी ॥ ऐकूनियां ते समस्त मुनी ॥ साधुसाधु ऐसें ह्मणोनी ॥ तियेच्या स्तवनीं प्रवर्तले ॥ २९ ॥ तंव तो राम प्रतापराशी ॥ ऐकूनि सीतेच्या वचनासी ॥ उच्चस्वरें महाबळेंसीं ॥ सिंहनाद करूनियां ॥ ३० ॥ ह्मणे हो ऐका समस्त ऋषी ॥ आतांचि पुष्करद्वीपासी ॥ जाऊनियां त्या सहस्रमुखासी ॥ निश्चयेंसीं जिंकितों ॥३१॥ हीच माझी सत्य प्रतिज्ञा ॥ कदापि मिथ्या नव्हे जाणा ॥ ऐसें वदोनि अयोध्याराणा ॥ धनुष्यबाणां उचली पैं ॥३२॥ आणि भरतशत्रुघ्नलक्ष्मणांसी ॥ ह्मणे कीं तुह्मी सर्व त्वरेंसीं ॥ मारावया सहस्रमुखासी ॥ मज संगेंसीं चलावें ॥ ३३ ॥ तैसाचि हनुमान् वायुकुमर ॥ आणि सुग्रीवादि सर्व वानर ॥ मजसंगें येवोत सत्वर ॥ प्रधान वीर

टी. १ हजार मुखांचा रावण. २ अयोध्येचा राजा ( राम ). ३ स्वस्थपण. ४ चांगलें आहे चांगलें आहे. ५ वायूचा पुत्र.

सर्वही ॥ ३४ ॥ ऐसें आज्ञापूनि सत्वरी ॥ ठोकविल्या युद्धसंकेतभेरी ॥ चातुरंगिणी सेना साजिरी ॥ सज्ज सारी जाहली ॥३५॥ तिये पाहूनि रामें तत्क्षण ॥ चित्तीं स्मरिलें पुष्पकविमान ॥ तंव तें विचित्र शोभायमान ॥ पुढें येऊन ठाकलें ॥ ३६ ॥ चंद्राहूनि तेजाळ जयांत ॥ मुख्य सिंहासन विराजत ॥ हीरकादि नवरत्नमंडित ॥ झालरी लोंबत मोतियांच्या ॥ ३७ ॥ जें जो पृथ्वी सांठवेल सकळ ॥ ऐसें क्षणांत होय विशाळ ॥ इच्छा होतांचि तत्काळ ॥ होय संकीर्ण धाकुटें ॥३८॥ आज्ञा कीजिये जेथें जाया ॥ तेथेंचि जाय लवलाह्यां ॥ कर्मळभवांडीं कवणेही ठाया ॥ नव्हे जाया कुंठित जें ॥ ३९ ॥ तया पाहतांचि रघुनायक ॥ धनुष्य घेऊनि उठला देख ॥ भरत शत्रुघ्न इंद्रजितांतक पावोनि हरिख ऊठले ॥ ४० ॥ बाहात्तरकोटी रीसगण ॥ त्यांसह उठला जांबवान ॥ वीसकोटी वानर महान ॥ घेऊनि सुषेण उठिन्नला ॥ ४१ ॥ छपन्नकोटी गोलांगुळ ॥ संगें घेऊन उठला नळ ॥ महाप्रतापी अमित नीळ ॥ घेऊनि नीळ उठला पैं ॥ ४२ ॥ जयाचे प्रतापा नाहीं मिती ॥ आणि सर्व असुर जयासि भिती ॥ तो वज्रदेही वीर मारुती ॥ सर्वांपुढती ऊठला ॥४३॥ आणि सुग्रीवादिक जे इतर ॥ काळाशींही झुंजणार ॥ महाप्रतापी वीर वानर ॥ तेही सत्वर उठिन्नले ॥ ४४ ॥ पुण्यशील सत्वस्वरूप ॥ महाबाहु अतुलप्रताप ॥ सबाह्याभ्यंतरीं निष्पाप ॥ लंकाधिप बिभीषण जो ॥ ४५ ॥ तोही राक्षसांसह-

टी. १ युद्धाची तयारी करण्याचे संकेताच्या नौबती. २ रथ, हत्तीस्वार, घोडेस्वार व पायदळ मिळून चार प्रकारची. ३हिरे इत्यादि. ४ आंत. ५ संकुचित. ६ ब्रह्मांडांत. ७ लक्ष्मण. ८ आस्वलांचा कळप. ९ माकडें. १०सीमा, मर्यादा. ११ महापराक्रमी.

वर्तमान ॥रामासंगें निघाला तत्क्षण ॥ भारद्वाजा तो सहस्रवदन ॥ आणि बिभीषण हे सखे बंधू ॥ ४६ ॥ परी बिभीषणें तो पहिला ॥ कधींच नाहीं देखिला ऐकिला ॥ आणि मातापितरांनींही तयाला ॥ नव्हता कथिला कदापी ॥ ४७ ॥ ह्मणोनि तयाविषयीं ज्ञान ॥ बिभीषणासि नव्हतें जाण ॥ आतां सीतेच्या वचनेंकरून ॥ यद्यपि संपूर्ण समजलें ॥४८॥ तथापि तो श्रीरामभक्त ॥ रामकार्यार्थ सदोद्युक्त ॥ यालागींच श्रीरामाज्ञें त्वरित ॥ राक्षसांसहित ऊठला ॥ ४९॥ सुमंत्रादि सकळ प्रधान ॥ अत्यावेशें उठले तत्क्षण ॥ आणि तेथील ते ते मुनिजन ॥ संगेंचि संपूर्ण चालले ॥५०॥ मुनिवर्या ते वीर सकळ ॥ महाप्रतापी अतिप्रबळ ॥ नाना शस्त्रास्त्रप्रहरणीं कुशळ॥ शत्रूंसि केवळ काळ जैसे ॥५१॥ तिहीं शस्त्रें घेऊनि विविध ॥ भयंकर केला सिंहनाद ॥ तेणें कोंदोनि विष्णुपद[२] ॥ सकळ बुधं[३] गडबडले ॥५२॥ आणि अठरापद्में सर्व वानर॥ एकदांचि करूनि भुभुःकार ॥ जयजय श्रीराम रघुवीर ॥ ह्मणूनि लागले नाचावया ॥५३॥तों रामें पिटूनि दोर्दंडें[४] ॥ टणत्कारिलें स्वंकोदंड[५] ॥ सर्वेचि सिंहनाद प्रचंड ॥ केला उदंडकाळवरी ॥५४॥ तैं दिग्गजांचीं बैसलीं टाळीं[६] ॥ सकळ धरा डळमळली ॥ कमठँपृष्ठी[७] थरारली ॥ ग्रीवा सरकली शेषाची ॥५५॥ तळीं आदिवराह गाढा ॥ सरसावून देत दाढा ॥ मर्यादा सांडूनि समुद्रवेढा ॥ चालला पुढां वाढत ॥५६॥ मेरुमंदरादिक शैल ॥ थरथरां कांपले बहुसाल ॥ लहानथोर सरिता सकळ॥ शुष्क तत्काळ जाहल्या ॥ ५७ ॥ गगनांतूनि भगणांसहित ॥ भडभडां बहु तारे रिचवत ॥ ब्र-

टी. १ निरंतर तयार. २ आकाश. ३ देव. ४ बाहुदंड. ५ आपलें धनुष्य. ६ कानटाळे. ७ कूर्माची पाठ. ८मान. ९नक्षत्रांसह.

ह्मांडींचे जीव समस्त ॥ झाले चकित बहुतची ॥५८॥ असो मग तो कोदंडधारी[1] ॥ सीताकांत अयोध्याविहारी[2] ॥ तये कामगविमानांतरीं[3] ॥ सीतेसहित आरूढला ॥ ५९ ॥ सर्वेंचि रामाचे आज्ञेंकरूनी ॥ सर्व वीरही चढले विमानीं ॥ नर वानर कीं राक्षस कोणी ॥ नाहींच स्थानीं राहिला ॥ ६० ॥ ते सर्वही महाबळवंत ॥ नानावचनीं राघवाप्रत ॥ सीता आणि बंधुवांसहित ॥ प्रोत्सोहवीत साक्षोपें[4] ॥ ६१ ॥ तया भोंवती यथामान[5] ॥ विमानीं बैसले संपूर्ण ॥ सुधर्मेंत[6] शक्रासि[7] वेष्टून ॥ जैसे गीर्वाण[8] तिष्ठती ॥ ६२ ॥ मग रामें चलाया पुष्करासी ॥ आज्ञापितां त्या पुष्पकासी ॥ तत्काळ तें सोडूनि भूसी ॥ वेगें आकाशीं चाललें ॥ ६३ ॥ लागला वाद्यांचा गजर ॥ राघवकीर्ति गाती समग्र ॥ दोन सहस्र योजनांवर ॥ विमान सत्वर उंचावलें॥६४॥जैसा राकेचा[9] रोहिणीकांत[10]॥ पश्चिमादिशेसि जाय त्वरित ॥ कीं समीरबळें[11] सागरांत ॥ जहाज लोटत वेगेंसीं ॥ ६५ ॥ कीं क्षीरसागरा लक्षून॥वेगें जाय गरुत्मान[12] ॥ तैसेंचि तें जाय विमान ॥ घंटा घणघण वाजती ॥६६॥ मनोमारुतवेगगती ॥ क्षणें पावलें पुष्कराप्रती ॥ सर्वेंचि मानसोत्तरपर्वतीं ॥ जाऊनियां उतरलें ॥६७॥ तैं ते सर्व नरासुरवानर[13] ॥ रघूत्तमाचे प्रबळ वीर॥अंतरीं आश्चर्य पावोनि फार॥बोलती साचार परस्परां ॥६८॥ अहो अहो हें काय चित्र[14] ॥ कायकीं हें वर्तलें विचित्र ॥ कोण हा उत्तम विशाळ गोत्र[15]॥ शोभा सर्वत्र पसरलीसे ॥ ६९ ॥ शोधितां सकळ भूमंडळ ॥ ऐसा दुजा नसेचि अचल ॥ आणि ह्या



टी. १ धनुर्धारी. २ राम. ३ इच्छानुसार जाणाऱ्या विमानांत. ४ ईर्षेला चढवीत. ५ मानाप्रमाणें. ६ इंद्राच्या सभेंत. ७ इंद्रास. ८ देव. ९ पूर्णिमेचा. १० चंद्र. ११ वायूनें. १२ गरुड. १३ मनुष्य, राक्षस व वानर. १४ आश्चर्य. १५ पर्वत.

विमानापरि चपळ ॥ नसेचि त्रिकाळ निर्धारें ॥ ७० ॥ एवंप्रकारें वीर सगळे ॥ परस्परांलागीं बोल-
ले ॥ मग राघवेंद्रें तयेवेळे ॥ काय केलें ऐकिजे ॥ ७१ ॥ सर्व वीरांसहवर्तमान ॥ सिंहनाद केला म-
हान ॥ सर्वेंचि कोदंड[1] आकर्षून ॥ टणत्कारिलें साक्षोपें ॥७२ ॥ तो शब्द अत्यंत तुंबळ ॥ सप्तसिं-
धूंसह भूमंडळ ॥ नभ[2] आणि पाताळें सकळ ॥ व्यापूनि सर्वत्र पसरला ॥ ७३ ॥ तैं तो सह-
स्रमुखरावण ॥ अंतरीं बहु चकित होऊन ॥ हें काय हें काय ऐसें वचन ॥ बोलत तत्क्षण उ-
ठिन्नला ॥ ७४ ॥ आणि सर्वेंचि तेथील असुर ॥ सकळही उठले क्रोधातुर ॥ हस्तीं
जयांचे नानाप्रकार ॥ शस्त्रें प्रखर चमकती ॥ ७५ ॥ तयांसि तो रावण बोलत ॥ अहो
हा शब्द कोठोनि येत ॥ एताद्विषयीं तुह्मीं यथार्थ ॥ द्यावें चित्त सकळिकीं ॥ ७६ ॥ ऐसें बो-
लूनियां तत्क्षण॥ पुराबाहेर चालला आपण॥ सवें असंख्य राक्षसगण ॥महाबळवान घेतले॥७७॥
तो ब्रह्मांडीं अतुळबलिष्ठ[3] ॥ मेरुमंदरांसमान पुष्ट ॥ सहस्रवदनें अत्यंत विकट ॥ रगडित ओंठ द्वि-
जपंक्तीं[4] ॥ ७८ ॥ महागिरीचीं[5] उंच शिखर ॥ तैशीं दिसती सहस्र शिरें ॥ अतिभयानक नासाद्वारें[6] ॥
जैशीं गव्हरें[7] केवळ ॥ ७९ ॥ विंध्याचळावरी तरुवर[8] ॥ आडवे पसरले आपर॥ तैसे दोनसहस्र कर॥
सविस्तर असती पैं ॥८० ॥ पर्वतसानूवरी[9] वळीन ॥ ठायींठायीं प्रदीप्त दावाग्नि[10] ॥ तैसे कोपें आरक्त
नयन ॥ द्विसहस्र जाण झळकती ॥८१॥ महामेघाचा घडघडाट॥तैसा तयाचा शब्द उत्कट ॥ च-

---

टी. १ धनुष्य. २ आकाश. ३ ज्याच्या बळास तुलना नाहीं असा. ४ दांतांनीं. ५ मोठ्या पर्वताचीं. ६ नाकपुड्या. ७ गुहा.
८ मोठे वृक्ष. ९ पर्वतावर टेंकड्यांच्या खालच्या बाजूनें ज्या सपाट भूमि असतात त्यांवर. १० वणवा.

पळेहूनि सहस्रपट ॥ तेजस्वी मुकुट तळपती ॥८२॥ दिनमणीपरि प्रभाघन ॥ शतयोजनें रथ वि-
स्तीर्ण ॥ वरी विविध शस्त्रें दारुण ॥ जाज्वल्यमान भरियेलीं ॥८३ ॥ अनेकविध पाशांच्या पर्व-
डी ॥ परश अंकुश परिघ भुशुंडी ॥ शतघ्नी प्रास कुंत लहुडी ॥ गदा शक्ति भिंडिमाला ॥८४॥
करवालें मुसळें मुद्गर ॥शूल चर्में चक्रें तोमर॥लोहार्गळा पट्टिश प्रखर॥तीक्ष्णकुठार यमदंष्ट्रा ॥८५
शक्रधनूपरि प्रचंडें ॥ असंख्य नानाविध कोदंडें ॥ सौदामिनीसमान खांडे ॥ खड्ग जुंबाडे बहुतची
॥८६॥ आणि नानाविध असंख्य बाण॥ कित्येक ते क्षुरधारासमान ॥ अर्धचंद्राकार कित्येक आ-
न॥ विषदिग्धानन कितिएक ॥८७ ॥ असो इत्यादि नानाप्रकार ॥ अगणित शस्त्रें घेऊनि प्रखर॥
रथारूढ तो सहस्रवक्र ॥ नगराबाहेर चालला ॥ ८८ ॥ महाक्रोधें जाज्वल्यमान ॥ उल्कांपरी जा-
हले नयन ॥ सवें असंख्य राक्षसगण ॥ महाबळवान धांवती ॥ ८९ ॥ सकळवीरांसमवेत ॥ राम पा-
तला असे जेथ ॥ तये स्थानीं तो राक्षसनाथ ॥ पावला क्षणांत मनोवेगें ॥ ९० ॥ उल्कांपरि क्रोध-
संदीत ॥ ऐशा नयनीं विलोकित ॥ मुखें क्रोधाग्नीच कीं वमित ॥ ऐसा बोलत आक्रोशें ॥ ९१ ॥ह्मणे
अहो हा पुरुष कवण ॥ अवचित येथें प्राप्त होऊन ॥ माझिये पुढें शत्रुत्वें करून ॥ सिंहनाद करिताहे
॥ ९२ ॥ मम प्रतापशोचिष्केशें ॥ ब्रह्मांड पोळत असोनि विशेषें ॥ मजलाही शत्रु आहे ऐसें ॥ दु-
र्धंश आज उद्भवलें ॥९३॥ माझा प्रभाव लोकातीत॥ इंद्रादि अष्टौ दिशानाथ ॥ स्वप्राणाचिये र-

---

टी. १ विजेहून. २ सूर्याप्रमाणें. ३ तेजस्वी. ४ राशी. ५ तोफा. ६ कधींकधीं आकाशांत धनुष्याकृति नानारंगी रेषा दिसतात तें. ७ विजेप्रमाणें. ८ वस्तऱ्याच्या धारेसारखे. ९ विषमुखी. १० ओरडून. ११ प्रतापाग्नीनें. १२ अलौकिक.

क्षणार्थ ॥ भृत्य[1] समस्त जाहले ॥ ९४ ॥ मी पाताळीं करीन नाक[2] ॥ नाकीं करीन पाताळलोक ॥
कीं पाताळमृत्युस्वर्गलोक॥करीन एक क्षणामाजी ॥ ९५ ॥ आणि मृत्युलोकींच्या नरांसी ॥ स्व-
यें पाठवीन स्वर्गासी ॥ स्वर्गींच्या सकळ निर्जरांसी[3] ॥ भूलोकवासी करीन ॥ ९६ ॥ मेरु[4]प्रभृति
शैलें संपूर्ण ॥ फोडूनि करीन अणुप्रमाण ॥ नखाग्रीं मेदिनी उचलून॥ भेदूनि चूर्ण करीन मी॥९७॥
ऐसें माझें सामर्थ्य अद्भुत ॥ मजसम बळी कोण जगांत ॥ पूर्वीं मी ब्रह्मांडपीडनार्थ ॥ झालों उद्युक्त
जेधवां ॥९८॥ तैं विरिंचें[5] मजलागुनी॥ नाना सुयुक्ति[6]प्रियवचनीं ॥ शांतवोनि वारिलें म्हणोनी॥
निवांत अझुनी राहिलों ॥ ९९ ॥ नातरी राक्षसांवीण कवण॥जगामाजी नुरवितों जाणा ॥ आतां
मारूनि ह्या शत्रुगणा ॥ पीडितों त्रिभुवना साचार ॥१००॥ सकळांचे अधिकार घेउनी ॥ ब्रह्मांडा-
चा होईन धनी ॥ सूर्य चंद्र मीच होउनी ॥ तिथिक्रम चालवीन ॥ १ ॥ मेघत्व आणि इंद्रता ॥
स्वयेंचि स्वीकारूनि सर्वथा ॥ पर्जन्यादि क्रिया समस्ता ॥ करीन तत्वता मीच पैं ॥ १०२ ॥ यम-
त्व स्वीकारूनि साचार ॥ मीच होईन दंडधर॥ अग्नित्वें सर्वब्रह्मांडाभीतर ॥ तत्क्रिया[7] समग्र
चालवीन ॥ ३ ॥ आणि वरुणत्वही स्वीकारून ॥ सर्व रस स्वाधीन ठेवीन ॥ आणि कुबेरत्वें
धन संपूर्ण ॥ मीच घेईन साक्षेपें ॥ ४ ॥ इत्यादिरीती नानाप्रकारें ॥ गर्जत महाभयानकस्वरें॥
तो सहस्रमुख रावण त्वरें ॥ रामाजवळ पावला ॥ ५ ॥ तयासंगें सेनानायक ॥ राक्षसेंद्र पाव-
ले अनेक ॥ जे चतुर्विधसैन्यांत देख ॥ पृथक्पृथक् नांवाजले ॥ १०६ ॥ जिहीं क्रोधें स्वह-

टी. १ सेवक. २ स्वर्ग. ३ देवांस. ४ मेरुपर्वतादिक. ५ ब्रह्मदेवानें. ६ नानाप्रकारच्या युक्तियुक्त प्रिय बोलण्यानें. ७अग्नीचीं कर्मे.

स्तांत ॥ नानाशस्त्रें धरिलीं असत ॥ आणि जयांचे आक्रोशें समस्त ॥ दिग्गज कांपत थरथरां ॥ ७ ॥ भारद्वाजा तयांची ख्याती ॥ एकमुखें मी वर्णू किती ॥ एकेकाच्याही बळापुरती ॥ नसे जगती वाटतें ॥ ८ ॥ ऐसे जे सेनाध्यक्ष समर्थ ॥ रावणासंगें पावले अनंत ॥ त्यांतूनि एकांचीं नामें तुजप्रत ॥ सांगतों ऐकें मुनिवर्या ॥ ९ ॥ कोटीश पूर्ण शल बाहुक ॥ मनस शरण पाल उच्छिख ॥ कृश दक्ष पिच्छल पूर्णमुख ॥ कालदंतक पुर्णांग ॥ ११० ॥ शिली कुशली सहतापन ॥ अरुणि वेणी प्ररेषण ॥ हरिण सुषेण विरोहण ॥ वेगवान पुच्छांडक ॥ १११ ॥ पाराशर कौणप वासक ॥ प्रकाल कक्षक मंडलक ॥ रभेणक मूक कुमारक ॥ मुखसेचक शशरोमा ॥ ११२ ॥ प्रभास मानस पारियात्र ॥ भद्र हरी सुकुमार सुचित्र ॥ पात पारावत हलीवक्र ॥ पांडुर चक्र रक्तांग ॥ ११३॥ विश्वजेता करभ विहंग ॥ शरभ सुरोमा पाट पिशंग ॥ प्रमोद भैरव सर्वसारंग ॥ मुंडदेवांग माहिष ॥ १४॥ महाहनू कालवेग मुद्गर ॥ हिरण्यबाहु शंखवेग कुंडर ॥ ऋषभ वेणीस्कंध शलकर॥ क्रकर कुटीर पिंडारक ॥ १५ ॥ धूर्तक पातक चित्रवेगिक ॥ मणिस्कंध कामठ रावणक ॥ पिठर वराह उडपालक ॥ अव्यय तरुणिक समृद्ध ॥ १६ ॥ पिंडसक्त आणि शंकुकर्ण ॥ हे सर्व सेनाध्यक्ष महान ॥ ऐसेचि दुजेही कीर्तिमान ॥ बहुतचि असती मुनिवर्या ॥ ११७॥ परी म्यां तों विस्तारभयेंची ॥ नामें न कथितां तयांचीं ॥ हीं केवळ मुख्यमुख्यांचीं ॥ तुजलागीं कथियेलीं ॥१८॥ आणि रावणासंगें रामाप्रत ॥ जे अन्यही पातले युद्धार्थ ॥ तयांचें तों कराया गणित ॥ नसे समर्थ कवणही ॥१९॥ ते सर्वही महाबळ वीर ॥ पर्वतांसमान शरीरें थोर ॥ नी-

लरक्तादिवर्णी घोर ॥ स्वभावें क्रूर अत्यंतची ॥ १२० ॥ प्रत्येकाचे आकार भिन्न ॥ सप्तशीर्ष द्वि[2]शीर्ष महान ॥ पंचशीर्ष त्रिशिरे आन ॥ चतुरानन कितिएक ॥ १२१ ॥ कालानळासमान घोर ॥ हुताशां[3]परि प्रदीप्तशरीर ॥ महा[4]काय कुब्जें पीवर[6] ॥ गग्रनोदर तालजंघी ॥ १२२ ॥ अनेक कर अनेक चरण ॥ अनेक जिव्हा अनेक नयन ॥ वक्रदंष्ट्र कराळानन ॥ दीर्घदशन लंबोष्ठ ॥ २३ ॥ महाशैलवरांचीं शृंगें ॥ तैशींच दिसती उत्तमांगें[9] ॥ चरणगतीच्या महावेगें ॥ स[10]मीरा मागें सांडिती ॥ २४ ॥ योजनें[11]ायाम देह विस्तीर्ण ॥ द्विद्वियोजनें उंच जाण ॥ मेघ[12]नि-र्घोषासम दारुण ॥ मुखांतून शब्द निघती ॥ २५ ॥ वृक्षांपरि भुजा स्थूळ ॥ बाबरझोटी मोक-ळ्या विशाळ ॥ कामरूप[13]धारक सकळ ॥ महाबळ काळ जैसे ॥ २६ ॥ आणि यांहूनिही इतर शूर ॥ असंख्य असती निशाचर ॥ जे कां शूलें[14]पट्टिशकर ॥ महाक्रूर जगामाजी ॥२७॥ तैसे-चि नानाप्रहरणयुक्त॥आणि नानासुवेषीं सुभूषित॥ऐसेही वीर सर्वविख्यात॥असंख्यात असती पैं॥२८॥आतां रावणाचिये सांगातीं॥जे मुख्यमुख्य सेनापती॥तयांचीं नामें तुजप्रती ॥ सांगतों ऐकें मुनिवर्या ॥२९॥ शंकुकर्ण अक्षसंतर्दन ॥ क्षितिकंपन प्रियदर्शन॥ प्रियमाल्यानुलेपन बाण॥ मारुताशन पुण्यनामा ॥ १३० ॥ शतलोचन गायन कुमुद ॥ वरद कपिस्कंध कोकनद ॥ एकनंद मेघनाद आनंद ॥ नंद प्रमोद वीर्यवान ॥३१॥ प्रतापवान दमन निकुंभ ॥ समुद्रोन्मादन

---

टी. १सात शिरांचे. २दोन शिरांचे. ३अग्नीप्रमाणें. ४स्थूळदेही. ५कुबडे. ६पुष्ट. ७लांब दांतवाले. ८मोठ्या पर्वतांचीं. ९शिरें. १०वायूस. ११एक योजनपर्यंत. १२मेघाच्या शब्दाप्रमाणें. १३इच्छेस येईल तसें स्वरूप घेणारे. १४ज्यांनीं त्रिशूळ व पट्टे हातीं घेतले आहेत.

वज्रनाभ ॥ श्वेत सिद्ध पत्र वसुप्रभ ॥ जलंधम जटी अतुनामा ॥ ३२ ॥ अनंत तमोभ्रकृत कृष्णक॥ उपकृष्णक कुनदीक ध्रुवक ॥ नंदक उपनंदक प्रियक ॥ स्वस्तिक वातिक एकजरा ॥३३॥ वैताळी गतिताली सहज ॥ व्याघ्र बहुवीर्य गोव्रज॥ शैलकंपी द्वादशभुज ॥ सहस्रबाहू द्वादशशिरा ॥३४॥क्षेमबाहु सुबाहु प्राणश्रवा॥ वृषमेषप्रवाह पृथुश्रवा ॥ विकट कराल उष्ट्रजिव्हा ॥ ज्वालाजिव्ह रणोत्कट ॥ ॥ ३५ ॥ कनकापीड कांचनाक्ष ॥ प्रहास रथाक्ष उदराक्ष ॥ एकाक्ष कनकाक्ष द्वादशाक्ष ॥ विकृताक्ष चतुर्दंष्ट्र ॥३६॥ सितकेश हरि सुवक्र ॥ परिश्रित सुव्रत सिद्धपात्र ॥ अजोदर जाठर धनुर्वक्र ॥ धूम्रश्वेत सिद्धार्थ ॥ ३७ ॥ महापरिषदेश्वर खड्ग ॥ तैसाचि महासमुद्रवेग ॥ कलिंग आणि पंकदिग्धांग ॥ ऐसीं नामें तयांचीं ॥ ३८ ॥ भारद्वाजमुने ते क्रूर ॥ रावणाचे सैन्यपाळ वीर ॥ रणीं नानायुधांचे मार ॥ शत्रूसि देणारे असती पैं ॥ ३९ ॥ ते नाना आयुधें घेऊनि करीं ॥ हंसमेषवृषादिकांवरी ॥ आरूढोनियां आनंदें सत्वरी ॥ रावणासंगें चालले ॥ १४० ॥ आणि सर्वेचि सिंहनाद करित ॥ रामाप्रति चालले धांवत ॥ ऐसें वाल्मीकिमुनि अद्भुत ॥ कथन करिता जाहला ॥ ४१ ॥ आतां रामरावणयुद्ध ॥ पुढें वर्णिजेल पैं विशुद्ध ॥ जयाच्या श्रवणपठणें त्रिविध ॥ ताप समूळ लोपती ॥ ४२ ॥ तरी श्रोतीं श्रवणालागुनी ॥ सदा सावध असावें ह्मणोनी ॥ सीतासुत मी हस्त जोडुनी ॥ करितों विनवणी साक्षेपें ॥४३॥ स्वस्ति श्रीमदद्भुतरामविजय ॥ वाल्मीकीयाद्भुतोतरकांडहृदय ॥ ऐकोत सज्जन होऊनि तन्मय॥ एकोनविंशाध्याय मधुर हा ॥ १४४ ॥ ॥ इति एकोनविंशाध्यायः समाप्तः ॥ १९ ॥ छ ॥

श्रीगणेशायनमः ॥ ॥ जयजयाजी जगत्कारणा ॥ जयजयाजी जगन्मोहना ॥ जय जगद्वंद्या जगत्पालना ॥ जगज्जीवना जगद्गुरू ॥ १ ॥ जय जगदीशा जगदालया ॥ जगद्व्यापका जगदात्मया ॥ जगदोद्धारका जगन्मया ॥ जगज्जेठिया दीनबंधू ॥ २ ॥ तूं सच्चिदानंद परिपूर्ण ॥ आदिमध्यावसानहीन ॥ तुज नाहीं रूपाभिधान ॥ ब्रह्म निर्गुण साचार ॥ ३ ॥ परी स्वजनां तारावयासी ॥ स्वेच्छें सगुणता पैं धरिसी ॥ तुझे अत्यद्भुत गुणराशी ॥ कोण समर्थ वर्णावया ॥ ४ ॥ चारमुखांचा ब्रह्मदेव ॥ पंचमुखी गिरिजाधव ॥ सहस्रमुखी उरगराव ॥ हेही सर्व तटस्थ पैं ॥ ५ ॥ तेथें अन्याची काय कथा ॥ हेंतों मी जाणतों तत्वता ॥ परी प्रभो त्वां कृपा करितां ॥ कोण वर्णिता न होय ॥ ६ ॥ वाल्मीकमुनी हा पहिला ॥ द्विजकुळीं असोनि जन्मला ॥ किरातसंगें किरात झाला ॥ स्वाचार त्यजिला सर्वही ॥ ७ ॥ अरण्यामाजी राहूनि सतत ॥ पाळती राखोनि वाट पाडित ॥ ब्रह्महत्या केल्या अगणित ॥ तपस्वी बहुत मारिले ॥ ८ ॥ नानाविध जीव वधून ॥ तयांचें मांस भक्षी अनुदिन ॥ स्त्रीभ्रूणगोहत्या दारुण॥ रात्रंदिन आचरे ॥ ९ ॥ ऐसा तो पतित पापराशी ॥ परी नारदाचिये उपदेशेंसीं ॥ अनन्यभावें तव चरणासी ॥ शरण पूर्ण जाहला ॥ १० ॥ तेव्हां तुवां कृपा केली ॥ तेणें तयाचीं पापें जळालीं ॥ अहंममता समूळ गळाली ॥ बुद्धि झाली सोज्वळ ॥ ११ ॥ शतकोटी श्रीरामायण ॥ वर्णियेलें पैं तयान ॥ पतित दुष्टबुद्धि असोन ॥ कवि महान जाहला ॥ १२ ॥ ऐसी

टी. १ जगच आहे गृह ज्याचें. २ जगाहून मोठा. ३ आदिमध्यांतरहित. ४ शिव. ५ शेष. ६ भिल्लांच्या संगतीनें. ७ दररोज.

तुझी कृपा अद्भुत ॥ विख्यात असे त्रिभुवनांत ॥ ह्मणोनि तदिच्छें त्वदंघ्रीप्रत ॥ जोडूनि हस्त वंदिताहें ॥ १३ ॥ तरी दयाळा जानकीनाथा ॥ कृपा करीं श्रीभगवंता ॥ पुढें अद्भुत त्वद्गुणकथा ॥ रसपूरिता बोलवीं ॥ १४ ॥ एकोनविंशाध्यायाचे अंतीं ॥ रावणसैनिक रामाप्रती ॥ युद्धा निघाले सर्वांपुढती ॥ ऐसें निरुती वर्णियेलें ॥ १५ ॥ आतां महामुनि श्रीवाल्मीक ॥ भारद्वाजासि ह्मणे गा ऐक ॥ सहस्रमुखरावणाचे अनेक ॥ औरस पुत्र असती पैं ॥ १६ ॥ ते नाना प्रहरणें घेऊन ॥ महाराक्षसांसहवर्तमान ॥ राघवाप्रति रणालागुन ॥ रोषें तत्क्षण धांवले ॥ १७ ॥ तयांचीं नामें पृथक्‌पृथक ॥ सांगतों शिष्योत्तमा ऐक ॥ कालकंठ प्रभाष कुंभांडक ॥ शितकुंभक देवयाजी ॥ १८ ॥ कालकक्षक बालेश यज्ञबाहू ॥ कालकाक्ष मज्जाल प्रबाहू ॥ सामप अचल दंडबाहू ॥ रज सुबाहू चित्रदेव ॥ १९ ॥ भूतलोन्मथन कोकिलक ॥ क्रथ क्राथ बालभक्षक ॥ वसुव्रत जवन संचानक ॥ तुहार जंबुक महातेजा ॥ २० ॥ सुप्रसाद धर्मद सुवक्र ॥ कोकनद कुंजर कुंभवक्र ॥ मुंडग्रीव पाडुर श्वेतवक्र ॥ लोहाजवक्र कृष्णौजा ॥ २१ ॥ हंसवक्र गृध्रपत्र मधुर ॥ सूचीवक्र चारुवक्र तुहर ॥ वसन किरीट मन्मथकर ॥ कलशोदर वीर्यवान ॥ २२ ॥ महाबल आणि मधुवर्ण ॥ हे सहस्रास्याचे नंदन ॥ महावीर्य पराक्रमपूर्ण ॥ क्रूर दारुण अत्यंत ॥ २३ ॥ आवेशें पिटीत बाहुदंड ॥ सिंहनाद करित प्रचंड ॥ तेणें नादें वेळ उदंड ॥ सर्व ब्रह्मांड कोंदलें ॥ २४ ॥ तयांचे प्रचंड दळभार ॥ सहस्रांचीं सहस्रें अपार ॥ बहु अर्बुदें महावीर ॥ गणित साचार नव्हे-

टी. १ तुझी कृपा व्हावी ह्या इच्छेनें. २ तुझ्या गुणांची कथा. ३ आयुधें. ४ युद्धासाठीं.

ची ॥ २५ ॥ तयांच्या नानाविध आकृती ॥ वर्ये रूपें विविध दिसती ॥ अनेकविध आयुधें हातीं ॥ धरिलीं असती तेजाळ ॥२६॥ कित्येक ते कूर्मवदन ॥ कित्येक असती कुक्कुटानन॥ सर्प आणि जृंभकांसमान ॥ मुखें दारुण एकांची ॥२७॥ कित्येक असती गोधामुख ॥ खरा- स्य उष्ट्रास्य कित्येक ॥ शशास्य उलूकानन आणिक ॥ वराहमुख तैसेची ॥२८॥ मनुष्यमुख शृंगालानन ॥ मेषवक्र दीर्घवदन ॥ मार्जारवक्र नकुलानन ॥ तैसेचि आन काकतुंड ॥ २९ ॥ बभ्रुकवक्र मूषकमुख ॥ मयूरवदन कितिएक ॥ मत्स्यानन आणि अजामुख ॥ तैसेचि देख म- हिषानन ॥ ३० ॥ एक ते असती ऋक्षानन ॥ कित्येक असती व्याघ्रवदन ॥ कित्येकांचीं सिं- हासमान ॥ मुखें दारुण साचार ॥ ३१ ॥ एकांचीं नक्रासमान तुंडें ॥ कित्येकां असती गजमुं- डें ॥ गरुडचंचूसमान प्रचंडें ॥ दीर्घ तुंडें एकांचीं ॥ ३२ ॥ तैसेचि गोमुख वृषभानन ॥ पारा- वतास्य दंशवदन ॥ तित्तिरमुख पिकलपन ॥ श्येनानन कित्येक ॥ ३३ ॥ शुकसमवदनाचे एक ॥ भीमास्य चंडास्य वक्रास्य आणिक ॥ कृकलासमुख कित्येक ॥ शोभनमुख तैसेची ॥ ३४ ॥ कित्येकांचीं विचित्र वदनें ॥ एकांत दोन आकृति दिसणें ॥ कूर्मकुक्कुटास्यां ऐक्य होणें ॥ तैसींच आननें एकांचीं ॥ ३५ ॥ नरास्याकृतिमिश्रमेषानन ॥ कित्येक दिसती खरो- ष्ट्रवदन ॥ नकुलोलूकमुख आन ॥ शशोलूकमुख एक ॥ ३६ ॥ मार्जारशशवक्र आणिक ॥

---

टी. १ कांसवाप्रमाणें मुखें ज्यांचीं. २ कोंबड्याप्रमाणें मुखें ज्यांचीं. ३ घोर्पडमुखी. ४ गाढवतोंडे. ५ उंटमुखी. ६ कोल्ह्यांचीं तोंडें आहेत ज्यांस. ७ आस्वलमुखी. ८ चिलटासारखीं मुखें ज्यांचीं. ९ कोकिळमुखी. १० घारीप्रमाणें तोंडाचे. ११ सरडतोंडे.

अजाविमहिषास्य कित्येक ॥ आखुबभ्रुकमुख एक ॥ तैसाचि मेषमत्स्यानन ॥ ३७ ॥ ऋक्षा-
स्ययुक्तशार्दूलवदन ॥ व्याघ्रमुखयुक्तसिंहानन ॥ कित्येक गोखरोष्ट्रवदन ॥ वृषदंशानन कित्ये-
क ॥३८॥ एक तित्तिरश्येनवक्र ॥ एक महाजठरांघ्रिगात्र ॥ कितिएक ते स्तबकनेत्र[1] ॥ एक
विचित्र दुर्मुख पैं ॥ ३९ ॥ कित्येक विषदंष्ट्रवदन[2] ॥ एक गोनसीं[3] वेष्टित जाण ॥ एकीं विरजां-
बर[4]धारण ॥ केलें असे साक्षेपें ॥ ४० ॥ कोणी कृशांग स्थूलजठर ॥ कित्येक स्थलांग कृशो-
दर ॥ कित्येक ऱ्हस्वग्रीवाशिर ॥ आखुड कर एकांचे ॥४१॥ एकांच्या कर्णनासिका महान ॥
गिरिगव्हरें[5] तैशा जाण ॥ कित्येक गजचर्म[6]वसन ॥ व्यालभूषण[7] कित्येक ॥४२ ॥ एक कृष्णा-
जिनांबरधर[8] ॥ एकांचीं नीलांबरें परिकर ॥ एकीं पंचास्यचर्में[9] घोर ॥ निरंतर धरियेलीं ॥४३॥
स्कंधदेशीं एकांचीं मुखें ॥ उदरमुख असती निके ॥ पृष्ठभागीं अतिभयानकें ॥ दरीवंत[10] मुखें
एकांचीं ॥ ४४ ॥ हनुमुख आणि जंघाननें[11] ॥ तैसेचि एक पार्श्ववदन[12] ॥ नानादेशास्य बहुत
आन ॥ कीटकमुख पतंगास्य ॥४५॥ नानाव्यालवदन[13] घोर ॥ कित्येक भुजंगानन थोर ॥ ख-
ङ्गास्य[14] वृकास्य[15] श्वानास्य क्रूर ॥ वानरवक्र तैसेची ॥ ४६ ॥ बहुबाहु बहुशिरें आणी ॥ नाना-
कृति घोराधर कोणी ॥ विविधाकार वक्ष[16] भुज पाणी ॥ पृष्ठोदर पाद एकांचे ॥ ४७ ॥ कि-

टी. १ गुच्छासारखे नेत्रवाले. २ विषदाढायुक्त मुखवाले. ३ घणसांनीं. ४ पांढरीं वस्त्रें नेसणारे. ५ पर्वताच्या गुहा. ६ हत्तीचें चामडें नेसलेले. ७ सर्पभूषण. ८ हरिणाचीं चर्में नेसणारे. ९ सिंहाचीं कातडीं. १० गुहेप्रमाणें. ११ जांघेला तोंडें ज्यांच्या. १२ ज्यांचीं तोंडें कुशीस असे. १३ सर्पमुखी. १४ गेंड्याचें तोंड ज्याला. १५ लांडग्याच्या मुखाचे. १६ हृदय.

त्येक वल्कलेवेष्टितगात्र ॥ कित्येक नानाचर्मवस्त्र ॥ एक नानावेषधर विचित्र ॥ नट स्वतंत्र जैसे कां ॥ ४८ ॥ नानामाल्यमंडित एक ॥ नानागंधीं लेपित अनेक ॥ नानावस्त्रें धर्तें आणिक ॥ नेसले देख चर्मवस्त्रें ॥ ४९ ॥ कित्येकांचे शिरीं मुगुट ॥ कित्येकांचे असती किरीट ॥ कित्येकीं ते उर्ष्णीषपट ॥ विचित्र सघटै धरियेले ॥५०॥ कित्येकांच्या ग्रीवा देख ॥ शंखासमान शोभती सुरेख ॥ सुरम्य तेजस्वी कितिएक ॥ फांके बीर्के दिगंतीं ॥ ५१ ॥ लोहतंतीसमान पूर्ण ॥ कित्येकांचे केश कठिण ॥ द्विशिख त्रिशिख पंचशिख आन ॥ सप्तशिख जाण कित्येक ॥ ५२ ॥ कोणाएकांची पुढें शेंडी ॥ तैसेचि असती कोणी शिखंडी ॥ कोणी जटिल कोणी मुंडी ॥ शिरें उघडीं एकांचीं ॥ ५३ ॥ जैसे केवळ क्षपणिक ॥ तैसेचि दिसती कित्येक ॥ चित्रविचित्र माला अनेक ॥ धरिल्या असती आणिकीं ॥ ५४ ॥ रोमयुक्त करालवदन ॥ एक दिसती काळासमान ॥ दाढ्या मिशा आरक्तवर्ण ॥ लंबायमान एकांच्या ॥५५॥ रात्रंदिन युद्धाविषयीं ॥ उत्साहयुक्त असती पाहीं ॥ सुरवरांसिही रणाठायीं ॥ अजिंक कांहीं असती पां॥५६॥ एक कृष्ण निर्मांसवदन॥दीर्घपृष्ठ निपोटे आन॥दीर्घपृष्ठ स्थूल कठिण॥लंबाशिश्न लंबोदर॥५७॥ ऱ्हस्वशरीर महाभुज॥ऱ्हस्वजंघ ऱ्हस्वभुज॥ लंबजंघ वामन कुब्ज॥हस्तिकर्ण हस्तिशिर॥५८॥ शंकुकर्ण वक्रनास॥ गजेंद्रनास कूर्मनास॥ गजेंद्रकाय वृकनास॥ मार्जारनास पिंगाक्ष॥ ५९ ॥ रविकृशानसम दीप्तिमंत ॥ नानालंकारीं अलंकृत ॥ पृथुदंष्ट्र महाद्विजवंत ॥ तैसेचि अत्यंत र-

टी. १ पागोटीं. २ मोठे. ३ माना. ४ तेज. ५ जैनाचे यती. ६ खुजे. ७ आंखुड जांघावाले. ८.कुबडे. ९ लांडग्यासारख्या नाकाचे.

क्तवर्ण ॥ ६० ॥ नानाविधाकारचरण ॥ नानाकृतिदंष्ट्रायुक्तवदन ॥ नानाकृति ओष्ठ रदन ॥ रक्त नयन एकांचे ॥ ६१ ॥ एक नानाकृतिकरवाले ॥ एक नानाचर्मे पांघुरले ॥ एक नानावस्त्रें नेसले ॥ एक आगळे विशाळ ॥ ६२ ॥ दीर्घग्रीव दीर्घनख ॥ दीर्घपाद दीर्घमस्तक ॥ दीर्घभुज दीर्घनासिक ॥ निर्नासिक तैसेची ॥ ६३ ॥ एक असती नीलकंठ ॥ कित्येकांचे तुटके ओंठ ॥ उष्ट्रासम एकांची पाठ ॥ केश पिंगट एकांचे ॥ ६४॥ आणिकांचे हरितवर्ण ॥ एकांचे जैसे रविकिरण ॥ कित्येकांचे स्वर्णासमान ॥ श्वेत कृष्ण आरक्तही ॥६५॥ कोणी असती वृकोदरनिभ ॥ कोणी दिसती अंजनसंनिभ ॥ कित्येक ते तुहिनप्रभ ॥ जैसे स्वयंभ हिमाद्री ॥ ६६ ॥ लोहितग्रीव श्वेतनयन ॥ कोणी रक्ताक्ष सुवर्णकर्ण ॥ कल्मर्षपाद पिंगांगवर्ण ॥ विचित्र वर्ण एकांचे ॥ ६७॥ एक चामरांसम दिसती॥ एकांची फांके आरक्त दीप्ती ॥ नाना वर्ण नाना आकृती॥ सुवर्णकांती कित्येक॥ ६८ ॥ कोणी दिसती मयूरसदृश ॥ रत्नासम एकांचा प्रकाश ॥ एक प्रत्यक्ष आश्रयाश ॥ तैसे विशेष झळकती ॥ ६९ ॥ एक पादपा शाखा बहुत ॥ तैसे नानाकृति विस्तृत ॥ त्रि चतुः पंच षट् सात ॥ इत्यादि बहुत हात एकां ॥७०॥ आणि नानाकृति पृथक्‌ पृथक ॥ कित्येकां मुखें असती अनेक ॥ द्वित्रिचतुःपंचषण्मुख ॥ सप्ताष्टशीर्षक ऐसेही ॥७१॥ दश द्वादश षोडश वीस ॥ ऐशींही असती कित्येकांस ॥ एकीं हस्तीं धरिले पाश ॥ मुखें विशेष पसरलीं ॥ ७२ ॥ कोणी शतघ्नी घेऊनि हातीं ॥ मीमी ह्मणोनि पुढें सरती ॥ मुसळपाणी ए-



टी. १ हिरवे. २ लांडग्यासारखीं पोटें ज्यांचीं. ३ बर्फासारखे सफेत. ४ काळेपाय ज्यांचे. ५ पिंगळे. ६ चंवऱ्यांसारखे. ७ अग्नि.

कांपुढती ॥ एक धांवती आवेशें ॥ ७३ ॥ कोणी खड्गें चमकावित ॥ याणें शत्रूंसि हाणूं ह्मणत॥ कित्येक महापरिघहस्त ॥ नाचत उडत धांवती ॥ ७४ ॥ कित्येकांच्या हातीं मुद्गर ॥ कोणीं घेतले महातोमर ॥ कालदंडासम दंड घोर ॥ एकीं थोर धरियेले ॥ ७५ ॥ कोणी हातीं तोलूनि गदा ॥ ह्मणती शत्रूंचा करूं चेंदा ॥ आह्मां राक्षसांलागीं आपदा ॥ नव्हे विबुधांहातींही ॥ ७६ ॥ कोणी हातीं धरूनि भुशुंडी ॥ पुढें चालले लवंडसवडी ॥ कोणी मुसळें तोलूनि तांतडी ॥ चालती उडी मारित ॥ ७७ ॥ चपळेपरी असिलता देख ॥ घेऊनियां धांवती अनेक ॥ शूलपाणी पट्टिशहस्तक ॥ चक्रकर एक तैसेची ॥७८॥ कोणीं घेतलीं कर्वालें ॥ कित्येकांच्या हातीं भाले ॥ एकीं परशु तीक्ष्ण आगळे ॥ करीं धरिले असती पां ॥ ७९ ॥ कोणीं घेतल्या भिंडिमाळा ॥ एक तोलिती लोहार्गळा ॥ कित्येकांचे हातीं विशाळा ॥ असती शिळा गिरिप्राय ॥८०॥ कित्येक घेऊनियां कुऱ्हाडे ॥ अहंपूर्विकें धांवती पुढें ॥ ह्मणती आह्मी वीर गाढे ॥ फोडूं हाडें शत्रूंचीं ॥८१॥ एक ते यमदंष्ट्रापाणी ॥ महाच्छुरिका घेतल्या कोणीं ॥ कित्येकीं महाद्रुम उपटुनी ॥ हातीं तोलुनी धरियेले ॥ ८२ ॥ ऐसे नानाप्रहरणहस्त ॥ राक्षसवीर अत्यंत मस्त ॥ विचारशून्य जैसे बस्त ॥ तैसे समस्त धांवती ॥ ८३ ॥ कोणी रथारूढ असती ॥ कोणी बैसले अश्वांवरुती ॥ एक ते उष्ट्रीं बैसोनि जाती ॥ एक धांवती गजारूढ॥८४॥

टी. १ लगबगीनें. २ तलवार. ३ हातांत पट्टे घेतले आहेत ज्यांणीं असे. ४ मोठ्या तलवारी. ५ गोफणी. ६ पर्वतासारखे. ७ हातांत कर्बती घेतल्या आहेत ज्यांणीं. ७ मोठ्या सुऱ्या. ९ अनेक प्रकारचीं आयुधें हातांत घेऊन. १० बोकड. * मीपणानें.

कित्येक असती व्याघ्रांवरी ॥ एक गर्दभीं एक सूकरीं ॥ एक महिषीं एक खेचरीं ॥ वृषभचारी तैसेची ॥ ८५ ॥ आणि गृध्रचारी असती एक ॥ तैसेचि सिंहारूढही देख ॥ नक्रश्येनगवयादिक ॥ वाहनीं आणिक असती पां ॥ ८६ ॥ असो ऐसे ते राक्षसवीर ॥ नानावर्ण नानाकृति घोर ॥ नानावाहनारूढ शूर ॥ बलवत्तर अनुपम्य ॥ ८७ ॥ एकवटले कीं हे पर्वत ॥ ऐसे महाकाय जे दिसत ॥ अंगीं घंटांचीं जाळीं बहुत ॥ बांधिलीं असत जयांनीं ॥ ८८ ॥ ऐसे ते असंख्य वीर वेगें ॥ गेले रावणपुत्रांसंगें ॥ आणि रणांगणीं रणानुरागें ॥ नाचाया स्वांगें लागले ॥ ८९ ॥ तों अतिरूक्षभाषी भयानक ॥ यातुधानगणसैन्यनायक ॥ घोर शस्त्रास्त्रें घेऊनि अनेक ॥ कोटिशः देख उठूनियां ॥ ९० ॥ धांवधांव घेघे धरधर ॥ हांणहाण फोड बांध मार ॥ ऐसे रोषें आक्रोशत क्रूर ॥ राघवावर धांविन्नले ॥ ९१ ॥ ऐसें वाल्मीकमुनीनें प्रीतीं ॥ कथिलें भारद्वाजाप्रती ॥ आतां युद्धकथा पवित्र अती ॥ पुढच्या प्रसंगीं वर्णिजेल ॥९२॥ तरी श्रोतीं तच्छ्रवणार्थ ॥ सादर असावें एतदर्थ ॥ तयांसि मी रघुनाथसुत ॥ जोडूनि हस्त प्रार्थितों ॥९३॥ स्वस्ति श्रीमदद्भुतरामविजय ॥ वाल्मीकीयाद्भुतोत्तरकांडहृदय ॥ ऐकोत सज्जन होऊनि तन्मय ॥ विंशतितमाध्याय मधुर हा ॥ ९४ ॥ ॥ अध्यायः समाप्तः ॥ २० ॥

टी. १ बैलावर बसून जाणारे. २ अन्य. ३ युद्धाच्या आवडीनें. ४ कठोर भाषण करणारे. ५ राक्षसांचे सेनापती.



श्रीगणेशायनमः ॥ ॥ जयजय श्रीलक्ष्मीरमणा ॥ जयजय श्रीजगज्जीवना ॥ जयजय सच्चिदानंदघना ॥ नारायणा जगदीशा ॥१॥ जय अच्युता परात्परेशा ॥ त्रिगुणातीता मायाविलासा ॥ योगिजनमानसनिवासा ॥ जगत्प्रकाशा जगद्गुरू ॥२॥ तूं निरंजन आत्माराम ॥ नीलकंठमनोविश्राम ॥ तुज ना गोत्र रूप नाम ॥ पूर्णब्रह्म आहेसी ॥३॥ तुझी यथार्थ स्वरूपस्थिती ॥ वर्णील कोण ह्या जगतीं ॥ श्रुतिशिरेंही नेतिनेती ॥ ह्मणोनि होती तटस्थ ॥ ४ ॥ भक्तजना तारावयासी ॥ सगुणरूपें नाना धरिसी ॥ लोकोत्तर कर्मे करिसी ॥ सदा रक्षिसी सद्धर्म ॥ ५ ॥ तुझ्या अद्भुत नामगुणलीला ॥ अनंत असती घननीळा ॥ जयांच्या श्रवणादिकें नरांला ॥ परमार्थ भला लाभतो ॥ ६ ॥ वाल्मीकमुनि आदिकरोनी ॥ पूर्वी महापातित असोनी ॥ त्वन्नामगुणकीर्तनादिकांनीं ॥ धन्य त्रिभुवनीं जाहले ॥ ७ ॥ ऐसा तुझा महिमा अद्भुत ॥ ब्रह्मांडोदरीं सर्वविख्यात ॥ ह्मणोनि त्वद्गुणवर्णनार्थ ॥ अंतरीं हेत धरियेला ॥ ८ ॥ परी मी पामर मतिहीन ॥ तूं सुबुद्धिदाता नारायण ॥ तुवां कृपा केल्याविण ॥ कैसें वर्णन घडेल ॥ ९ ॥ यालागीं श्रीरघुनाथा ॥ तव चरणीं ठेवितों माथा ॥ कृपा करोनि पुढिल कथा ॥ रसभरिता बोलवीं ॥ १० ॥ पूर्वाध्यायाचे अंतीं समस्त ॥ यातुधानगणसैन्यनाथ ॥ युद्धार्थ धांवले रामाप्रत ॥ ऐसी कथा जाहली ॥ ११ ॥ आतां सकळश्रोतेजनीं ॥ चित्त द्यावें श्रवणालागुनी ॥

---

टी. १ परमेश्वरा. २ तीन्ही गुणांहून पलीकडचा. ३ मायेशीं विलास करणारा. ४ योगिजनांच्या मनांत वसणाऱ्या. ५ निष्कलंक. ६ शंकराचे मनास विश्रांति देणारा. ७ उपनिषदें. ८ अशी नव्हे अशी नव्हे. ९ अलौकिक. १० मोक्ष. ११ राक्षसांचे सेनापति.

श्रीरामभक्त वाल्मीकमुनी ॥ भारद्वाजासी सांगत ॥ १२ ॥ अगा विप्रा मग तो रावण ॥ रोषें झाला अति दारुण ॥ सहस्र धनें[1] सज्य करून ॥ वेगें संपूर्ण टणत्कारिलीं ॥ १३ ॥ आणि हा कोण कोठूनि किमर्थ ॥ अवचित येथें झाला प्राप्त ॥ ऐसा अंतरीं विचार करित ॥ पाहे चकित चहूंकडे ॥ १४ ॥ तों एकाएकीं गगनांतुनी ॥ उद्भवली ऐसी विदेहवाणी ॥ हे महावीर्या रावणा आजुनी ॥ काय कीं मनीं चिंतितोस ॥ १५ ॥ अरे आतां न दिसे तुझें भद्र[2] ॥ हा धर्मस्वरूपी गुणसमुद्र ॥ अयोध्याधीश राघवेंद्र ॥ श्रीरामचंद्र आला असे ॥ १६ ॥ याचिये संमुख टिकेल रणीं ॥ ऐसा ब्रह्मांडीं नाहींच कोणी ॥ पुरंदर[3] विधि[4] कीं पिनाकपाणी[5] ॥ हे तृणवाणी[6] सकळिक ॥ १७ ॥ अरे जेणें लंकेंत जाऊन ॥ दारापहर्ता[7] दशवदन ॥ तुझा कनिष्ठ बंधु रावण ॥ सकुळ जाण मारिला ॥ १८ ॥ आणि बिभीषणभक्ताकारणें ॥ लंकाधिपत्य[8] दिधलें जयानें ॥ तैसेचि देव जयाच्या कृपेनें ॥ स्वस्वस्थानें पावले ॥ १९ ॥ तोचि हा रावणांतक रघुवीर ॥ त्वद्वधार्थ आला साचार ॥ सवें भ्राते नर ऋक्ष[9] वानर ॥ आणि राक्षसवीर आहेती ॥ २० ॥ अरे तूं ह्मणविसी विश्वविजयी[10] ॥ परी हा दशमुखासम तुझाही ॥ सकुळ संहार करील पाहीं ॥ संशय नाहीं अणुमात्र ॥ २१ ॥ तुवां जिंतूनि सकळ देव ॥ तयांचें लुटिलें जैसें वैभव ॥ तैसा न चालेल येथें प्रभाव ॥ साक्षात् राघव असे हा ॥ २२ ॥ ऐसी आकाशवाणी स्पष्ट ॥ ऐकोनि तो लोकपीडक खष्ट ॥ सहस्रवदन रावण दुष्ट ॥ द्विगुणित रुष्ट जाहला ॥ २३ ॥

टी. १ धनुष्यें. २ कल्याण. ३ इंद्र. ४ ब्रह्मदेव. ५ शिव. ६ गवताप्रमाणें. ७ स्त्री हरणारा. ८ लंकेचें स्वामित्व. ९ आस्वल. १० विश्वाला जिंकणारा.

दिग्गजांचीं बैसतील टाँळीं[*] ॥ ऐसी फोडिली एक किंकाळी ॥ भयानक भ्रुकुटी[1] एकेमेळीं[2] ॥ विशाळभाळीं चढविल्या ॥ २४ ॥ खदिरांगारांचिये समान ॥ आरक्त केले सकळ नयन ॥ बाबरे ओंठ पावत स्फुरण ॥ फुगल्या तत्क्षण नाकपुड्या ॥ २५ ॥ अग्निज्वाळांपरि विशेष ॥ अत्युष्ण टाकित दीर्घ श्वास ॥ जैसा गंभीर मेघनिर्घोष[3] ॥ तैसा सरोष बोले पैं ॥ २६ ॥ ह्मणे रे पाहता काय ह्या नरा ॥ त्वरा करूनि धांवा धरा ॥ बांधूनि फोडा तोडा मारा ॥ भीड न जरा राखिजे ॥ २७ ॥ हा मानव आमुचा अरी[4] ॥ याचा निःपात कीजे सत्वरी ॥ उरग[5] कृशान[6] आणि वैरी ॥ लहानही तरी नुपेक्षावे ॥ २८ ॥ ऐसा असे शास्त्र[×]निर्धार ॥ ह्मणूनि सकळीं व्हावें क्रूर ॥ सत्वर याचा सहपरिवार ॥ चकनाचूर कीजिये ॥ २९ ॥ अहो मी सहस्रमुख रावण ॥ सर्वब्रह्मांडजेता[7] असून ॥ प्रत्यक्ष हा मजपुढें येऊन ॥ रणालागुन ठाकला ॥ ३० ॥ तस्मात् ह्याचें केवढें धैर्य ॥ आपणा मानितो वीरवर्य[8] ॥ मज वाटतें महदाश्चर्य ॥ पाहतों शौर्य आतांची ॥ ३१ ॥ ऐसें वदोनि तो विश्वारी[9] ॥ रावण आवेशा चढला भारी ॥ नाना शस्त्रें द्विसहस्रकरीं ॥ पुष्पकावरी टाकित ॥ ३२ ॥ चक्रें मुसळें तोमर पर्वत ॥ गदा शक्ति मुद्गर पडत ॥ जिकडे तिकडे असिलता[10] कुंत[11] ॥ चपळां[12]वत चमकती ॥ ३३ ॥ बाणांलागीं भिडले बाण ॥ तयांची गणना करील कोण ॥ मंडप झाला चहूंकडोन ॥ माजी पवन[13] शिरेना ॥ ३४ ॥ ऐसा रावण भडिमा-

---

टी. १ भोंवया. २ एकदम. ३ मेघाचा शब्द. ४ शत्रु. ५ सर्प. ६ अग्नि. ७ ब्रह्मांड जिंकणारा. ८ वीरांमध्यें श्रेष्ठ. ९ विश्वाचा शत्रु. १० तलवारी. ११ भाले. १२ विजांप्रमाणें. १३ वायु. * कानटाळीं. × शास्त्राचा निश्चय.

र ॥ चालविला असे पैं थोर ॥ तंव तयाची ती राक्षसी घोर ॥ सेनाही समग्र सरसावली॥३५॥ अत्यावेशें निशाचर सगळे ॥ विमानाप्रति कोपें धांवले ॥ नरवानररीसांसि आगळे ॥ वेगें लागले घातावया ॥ ३६ ॥ मुखें पसरोनियां विक्राळ ॥ कित्येकां गिळिती जैसे काळ ॥ एकांचे फोडूनि कंठनाळ ॥ रक्त घळघळ प्राशिती॥३७॥ कित्येकांतें पायीं धरिती॥गरगरां फिरवूनि आपटिती ॥ कित्येकांचीं डोकीं फोडिती ॥ हात तोडिती एकांचे ॥३८॥ कित्येकांचे पाय मोडिले ॥ कित्येकांचे डोळे काढिले ॥ कितिएक भूमीसि पाडिले ॥ प्राणा मुकविले कित्येक ॥३९॥ ऐसें त्या निशाचरीं दारुण ॥ रामसैन्याचें चालवितां कंदन ॥ ते मानव रीस वानरगण ॥ युद्धालागुन प्रवर्तले ॥४०॥ बाण गदा तोमर परिघ ॥ मुद्गर प्रास पट्टिश खड्ग ॥ शूल कुंत वृक्ष पाषाण नग ॥ टाकिती सवेग राक्षसांवरी॥४१॥ उभयसैन्यां पडली गांठी ॥ वीर धांवती उठाउठी ॥ शस्त्रास्त्रांची करिती वृष्टी ॥ पाहतां दृष्टी झांकुळत ॥४२॥ अन्योन्याचिये वधेच्छेनें ॥ आवेशें झुंजती उभय सैन्यें ॥ पाचारूनि येरयेरांकारणें ॥ देती उसणें सर्वेची ॥ ४३ ॥ रावणदळींचे निशाचर ॥ महाबलिष्ठ निधडे वीर ॥ त्यांहूनि रामाचे कपि रीस नर ॥ अधिक क्रूर सर्वही ॥४४॥ कुंत शूळ गदा मुद्गर परिघ ॥ निशाचरगण फेंकिती सवेग ॥ सर्वेचि वानर शिळा द्रुम नग ॥ टाकिती सवेग तयांवरी ॥ ४५ ॥ रीस राक्षसां भिडोनि तांतडी ॥ पोटीं नखें घालिती वांकडीं ॥ फाडूनियां सकळ कातडी ॥ काढिती आंतडीं बाहेर ॥ ४६ ॥ शस्त्रास्त्रयुद्धीं नर प्रवीण ॥ बा-

टी. १ राक्षस. २ परस्परांला. ३ घिट्ट. ४ भाले. ५ राक्षसगण. ६ वृक्ष. ७ पर्वत.

णापाठीं सोडिती बाण ॥ शक्ति गदा परिघादि दारुण ॥ शस्त्रें संपूर्ण टाकिती ॥४७॥ बिभी-
षणाचे असुर तामसी ॥ साह्य जे पातले श्रीरामासी ॥ तेही रावणाचिये सैन्याशीं ॥ रोषें युद्धा-
सी प्रवर्तले ॥ ४८ ॥ रावणाचे असुरवीर निंधडे ॥ त्यांहूनि बिभीषणाचे गाढे ॥ अन्योन्यां-
गीं फेंकूनि खांडे ॥ करिती तुकडे एकदांची ॥ ४९ ॥ तीं रामरावणदळें सकळ ॥ अन्यो-
न्यांसि झुंजतां सबळ ॥ कित्येक योद्धे सर्वांगविकळ ॥ होऊनि तत्काळ पडियेले ॥ ५० ॥
कित्येक झाले म्लानवदन ॥ कित्येक पडले मूर्छा येऊन ॥ एकांचे तुटले करचरण ॥ निरभि-
मान एक झाले ॥ ५१ ॥ सर्वांगें मोडूनियां क्षिती ॥ गडबडां लोळत पडले किती ॥ ऐशी
दोन्ही दळांची स्थिती ॥ झाली अती विपरीत ॥ ५२ ॥ ती पाहूनि श्रीराम भरत ॥ लक्ष्मण
शत्रुघ्न हनुमंत ॥ नळ नीळ सुषेण जांबवंत ॥ आणि बिभीषण इत्यादी ॥ ५३ ॥ तैसेचि अं-
गद आदिकरून ॥ अन्यही वीर सर्व उठोन ॥ तये घोररणांगणीं दारुण ॥ कराया रण प्रवर्त-
ले ॥ ५४ ॥ तों कालकंठादि रावणपुत्रक ॥ कोटीश पूर्णादि सेनानायक ॥ तैसेचि अन्यही प्र-
मुख प्रमुख ॥ राक्षस अनेक उठिन्नले ॥ ५५ ॥ ते सर्वही महायोद्धे असती ॥ युद्धीं कदा न
मागें फिरती ॥ ह्मणोनि त्या प्रतियोद्ध्यांप्रती ॥ पाहतां अती आनंदले ॥ ५६ ॥ आणि
रणोत्साहें गर्जना करित ॥ सत्राणें मांड्या बाहु ठोकित ॥ वांकड्यातिकड्या उड्या मारित ॥
खेळत नाचत चालले ॥ ५७ ॥ तें त्या पादप्रक्षेपांहीं ॥ आणि दंडास्फोटनादादिकांहीं ॥ न-

टी. १ धिट्ट. २ परस्परांच्या अंगावर. ३ सुरे. ४ पृथ्वी. ५ सेनापति. ६ जोरानें. ७ बाहु ठोकण्याच्या नादानें.

दीवनगिरींसहित मही ॥ लागली सर्वेही कांपावया ॥ ५८ ॥ आणि तयांच्या सिंहनादेंकरून॥
नभस्तल कोंदलें संपूर्ण ॥ ऐसें पाहूनि वानरगण ॥ शिळा घेऊन धांविन्नले ॥५९ ॥ तैं तयां-
शीं ते राक्षसश्रेष्ठ ॥ आनंदें झुजूं लागले बलिष्ठ ॥ एकांहूनि एक वरिष्ठ ॥ शस्त्रें तेजिष्ठ
सोडिती ॥ ६० ॥ पर्जन्यधारा मेघ वर्षती ॥ तैसे वानर शिळा टाकिती ॥ परी ते राक्षस च-
पळ अती ॥ शिळा झेलिती वरच्यावरी ॥ ६१ ॥ वानरदेह पर्वताकार ॥ तयांहूनिही राक्षस
थोर ॥ गदा परिघ तोमर मुद्गर ॥ आयुधें अपार वर्षती ॥ ६२ ॥ तो तयांचा पाहूनि उ-
त्कर्ष ॥ रामाचे नर कपि राक्षस रीस ॥ नानाप्रहरणें वर्षत सरोष ॥ लागले विशेष झुंजावया
॥ ६३ ॥ तैं रावणाचें चतुरंग दळ ॥ चहूंकडोनि धांवलें सकळ ॥ पुढें पायिक वीर प्रबळ ॥
प्रचंड अचळ जैसे पैं ॥ ६४ ॥ कांसा घातल्या असती घट्ट ॥ अंगीं कवचें लेइलीं नीट ॥ आ-
पादशिर खेटकें सदट ॥ खड्गें तिखट झळकती ॥ ६५ ॥ परिघ तोमर लोहार्गळा ॥ फरश
कोयते भिंडिमाळा ॥ गदा शक्ति असिलता विशाळा ॥ जैशा चपळा केवळ ॥ ६६ ॥ कुंत
यमदंष्ट्रा कांबिटे शूल ॥ क्रकच मुसळें शिळा मुद्गल ॥ वृक्षादि नानाप्रहरणें विपुल ॥ घेऊनि
चपळ धांवती ॥६७॥ तयांमागूनि अश्वांचे भार ॥ चपळ लोटले पैं अपार ॥ कीं ते तुरंगरत्नां-

---

टी. १ पृथ्वी. २ आकाश. ३ तेजस्वी. ४ नानाप्रकारचीं आयुधें. ५ रथ, हत्ति, घोडे व पायदळ असें चार प्रकारचें. ६ पायदळ. ७ पर्वत. ८ डोक्यापासून पायांपर्यंत. ९ ढाला. १० मोठीं. ११ गोफणगुंडे. १२ तलवारी. १३ विजा. १४ भाले. १५ अर्कस. १६ कर्वती. १७ घोड्यांचे. १८ घोडे हींच रत्नें यांचे. * लोखंडी आडणे ( मोठे जाड दांडे ). + धनुष्यें.

चे पूर ॥ सविस्तर विस्तारले ॥ ६८ ॥ कित्येक असती श्यामकर्ण ॥ पुच्छीं पिंवळे श्वेतांगवर्ण ॥ ताम्रखुर आरक्तनयन ॥ त्रिजगीं संपूर्ण गाती जयां ॥ ६९ ॥ मार्तंडरथींचा चिंतामणी ॥ जैसा चपळ चाले गगनीं ॥ तैसेचि एक आधारावांचुनी ॥ चपळचरणीं धांवत ॥ ७० ॥ एक धवळ एक सांवळे ॥ एक पारवे एक पिंवळे ॥ एक चकोरे एक जांबळे ॥ एक काजळे सुकुमार ॥ ७१ ॥ एक माणिकांपरि तेजाळ ॥ एक विद्रुमासमान लाल ॥ एक सिंदूररंगी चपळ ॥ कित्येक नीळ तैसेही ॥ ७२ ॥ कित्येक क्षीरे बदके गोजिरे ॥ हरितवर्ण एक केशरे ॥ हिंगुळरंगी विचित्र कबरे ॥ हंससाजिरे शशिकांती ॥ ७३ ॥ जंबुद्वीपींचे समीरगती ॥ शाकद्वीपींचे विचित्र शोभती ॥ कुशद्वीपींचे सबळ असती ॥ शंशांककांती क्रौंचींचे ॥ ७४ ॥ नागद्वीपींचे परम सुंदर ॥ शाल्मलींचे अति सुकुमार ॥ पुष्करद्वीपींचे वेगवत्तर ॥ उदकावर चालती ॥ ७५ ॥ एक गरुडासमानगती ॥ द्विजांऐसे अंतरिक्ष उडती ॥ खुणा दावितां परदळीं निरुती ॥ वेगें उतरती तत्काळ ॥ ७६ ॥ उच्चैःश्रव्याचे वंशज सुंदर ॥ समरांगणीं परम धीर ॥ कित्येक सिंहमुख गंभीर ॥ जैसे समीर चालीसी ॥ ७७ ॥ ऐसे नानादेशज नानावर्ण ॥ असंख्य वारू लोटले महान ॥ सर्वही सर्वगतिज्ञ ह्मणोन ॥ राखिती मन स्वारांचें ॥ ७८ ॥ वज्रपंजरीं पाखरिले असती ॥ रत्नालंकार अंगीं मिरवती ॥ मोतियांचे घोंस झुलती ॥ तुरे चमकती हीरकांचे ॥ ७९ ॥

---

टी. १ सूर्याच्या रथाचा. २ पोंवळ्याप्रमाणें. ३ हिरवे. ४ हंसाप्रमाणें सुंदर. ५ चंद्रासारखे तेजस्वी. ६ पक्ष्यांप्रमाणें. ७ इंद्राच्या घोड्याचे. ८ वायु. ९ नानादेशांत उत्पन्न झालेले. १० वज्रासारख्या घट्ट पाखरांनीं ( कवचांनीं ). ११ पांघुरलेले.

दिव्यरत्नखचित मोहळीं ॥ वदनीं झळकती तेजागळीं ॥ पृष्ठीं हेमांबरयुक्त चांगलीं ॥ जिनें बांधिलीं तळपत ॥ ८० ॥ मुखें वारंवार हिंसेती ॥ रणभूमीसि नाचत जाती ॥ दिव्य नेपुरें चरणीं गर्जती ॥ धरे न लागती पुढिल खुर ॥ ८१ ॥ वरी वज्रकवची बळवंत ॥ आरूढले राक्षस राउत ॥ हस्तांमाजी असिलता तळपत ॥ चपळांवत जयांचे ॥८२॥ तयांपाठीं मत्तगजभार ॥ लोटले असंख्य पर्वताकार ॥ जैसे ऐरावताचे कुमर ॥ श्वेत सुंदर चौदंती ॥ ८३ ॥ कित्येक नीळ अंजनाचळ ॥ तैसे असती महा विशाळ ॥ रत्नजडित झुली निर्मळ ॥ पृष्ठीं तेजाळ घातल्या ॥ ८४ ॥ वरी रत्नांचे चंवरडोलीं ॥ निशाचर बैसले महाबळी ॥ खङ्गादि शस्त्रें तेजागळीं ॥ असती जवळी जयांचे ॥ ८५ ॥ महाध्वज भेदिती निराळ ॥ घणघणा वाजती घंटा सबळ ॥ चांमरें रुळती बहुतेजाळ ॥ जैसे केवळ शशिरश्मी ॥ ८६ ॥ स्कंधांवरी माहुत बैसले ॥ गरुडचंचुवत अंकुश धरिले ॥ खुणावितां किंकाटत बळें ॥ परदळीं सगळे प्रवेशती ॥ ८७ ॥ तयांमागूनि दिव्य रथ ॥ प्रासादांवाणी उच्च विस्तृत ॥ वेगें लोटले असंख्यात ॥ चक्रें झळकत सूर्यापरी ॥ ८८ ॥ गगनचुंबित ध्वज सुंदर ॥ नानावर्णी तळपती वर ॥ धनुर्बाणादि शस्त्रें दुर्धर ॥ असती अपार भरियेलीं ॥ ८९ ॥ वांगदोरे धरूनियां हातीं ॥ धुरे बैसले कुशल सारथी ॥ मध्यें महानिशाचर रथी ॥ नानाकृती तिष्ठत ॥ ९० ॥ ऐसे ते चतुरंगदळभार ॥ सागरापरि असोनि अपार ॥ तयां-



टी. १ भरजरी वस्त्रांनीं युक्त. २ खिंकाळनी. ३ वज्राप्रमाणें दृढ आहेत कवचें ज्यांचीं. ४ मदोन्मत्त गजांचे समूह. ५ अंबारीत. ६ चंवऱ्या. ७ चंद्राचे किरण. ८ गरुडाच्या चोंचीप्रमाणें. ९ राजवाड्यांसारखे मोठे. १० लगाम. ११ अग्रभागीं.

माजील राक्षस घोर ॥ पर्वताकार सर्वही ॥ ९१ ॥ कित्येकांचे सर्वांगवर्ण ॥ सूर्याग्नींपरि देदी-
प्यमान ॥ कित्येक सजलमेघांसमान ॥ कृष्णवर्ण अत्यंत ॥ ९२ ॥ एक कर्पूरासमान श्वेत ॥
एक शेंदुरे एक आरक्त ॥ एक गोरे हिरवे पीत ॥ विचित्र असत कित्येक पैं ॥ ९३ ॥ एक-
ते कोदंडबाणधारी ॥ नाना शस्त्रें-एकांचे करीं ॥ एकीं शिळा पादप गिरी ॥ नानापरी धरि-
येले ॥ ९४ ॥ असो ऐसे रावणाचे अपार ॥ लोटले चतुरंगदळभार ॥ नाना रणतुरें परम
घोर ॥ वाजूं लागलीं एकसरें ॥ ९५ ॥ चंद्रवदना भेरी धडकती ॥ वाटे नादें बुडेल क्षिती ॥
शंख वाजतां सहजगती ॥ दुमदुमती दिगंतरें ॥ ९६ ॥ डंके दमामे गिडिबिडी ढोल ॥ त्यांत
झेंगटांचा कल्होळ ॥ तुतार्‍या श्रृंगें चौडकीं दुटाळ ॥ सनया कासाळ गर्जती ॥ ९७ ॥
काळुकर्णे भोंभों वाजत ॥ वाटे काळावरी कीं भुंकत ॥ असुरांचिये सिंहनादीं समस्त ॥ ब्रह्मांड
अत्यंत कोंदाटलें ॥ ९८ ॥ तें पाहूनियां राक्षसदळ ॥ वानरगण कोपले सकळ ॥ महाशिळा
पादप अचळ ॥ घेऊनि तत्काळ उठिन्नले ॥ ९९ ॥ सर्वेचि सर्व राक्षसांलागीं ॥ हाणूं लागले
शिळाद्रुमनगीं ॥ तैं ते असुरही कोपें वेगीं ॥ युद्धालागीं प्रवर्तले ॥ १०० ॥ पादपशिळागिरीं-
ची वृष्टी ॥ वानरांवरी करिती मोठी ॥ नानाविध शस्त्रांच्या कोटी ॥ फेंकिती नेटीं एकसरें
॥ १ ॥ निशाचरांचा मार घोर ॥ परी ते वानर पराक्रमी थोर ॥ तयांचा तो साहूनि मार ॥
ताडिती कठोर वृक्षीं तयां ॥ २ ॥ गिरिवरांचिये श्रृंगांसमान ॥ महाकाय जे यातुधान ॥ त-

टी. १ रणवाद्यें. २ नौबती. ३ पर्वत. ४ वृक्ष, शिळा आणि पर्वत यांची वृष्टि. ५ मोठ्या पर्वतांचे. ६ टेंकड्यांप्रमाणें. ७ राक्षस.

यांसि कित्येक वानर महान ॥ गिरिशृंगींच मर्दिती ॥ ३ ॥ कित्येक एकाएकीं उडती ॥ रथस्थवीरांलागीं मर्दिती ॥ एक गंजारोहांसि निरुती ॥ ओढूनि पाडिती धरणींयें ॥ ४ ॥ एक ते शिळाप्रहारेंकरून ॥ वाजिरोहांचे हरिती प्राण ॥ एक कित्येक असुरांलागुन ॥ पाडिती जाण मुष्टिघातें ॥५॥ अति चपळ वानरजाती ॥ तियेची सांगूं काय कृती ॥ वृक्षांवरूनि वृक्षांवरती ॥जैसे उडती अरण्यांत ॥ ६ ॥ तैसेचि सर्व असुरदळांत ॥ निशाचरांगांवर उडत ॥ जातां-जातां फळपानें तोडित ॥ तैसेंचि करित तेथेंही ॥७॥ कित्येकांचे उपटिती कान ॥ कित्ये-कांचे काढिती नयन ॥ कित्येकांचे मोडूनि चरण ॥ सर्वेचि रदन पाडिती ॥८॥ कित्येकांचीं तळहस्तकें ॥ हाणूनियां फोडिती मस्तकें ॥ कित्येकांचीं तोडूनि नाकें ॥ भरिती हाकें निरा-ळ ॥ ९ ॥ कित्येकांचीं विशाळ पोटें ॥ फाडिती प्रखरनखीं नेटें ॥ तैसींच एकांचीं कानपटें ॥ करचपेटें फोडिती ॥११०॥ ऐसें वानरीं अति दारुण ॥ चालवितां असुरकंदन ॥ कित्येक वीर यातुधान ॥ सर्वांगें मोडून पडियेले ॥ ११ ॥ कित्येक झाले थोंटे पांगळे ॥ एक डोळे फिरवित पडले ॥ एक मूर्छित होऊनि निजले ॥ एक ते मुकले प्राणासी ॥ १२ ॥ तो पाहूनियां सर्व आकांत ॥ उरले राक्षस उठले समस्त॥नानाशस्त्रें घेऊनि त्वरित॥कपिसैन्यांत प्रवेशले ॥१३ असिलतां शूल कुंत तीक्ष्ण ॥ परिघ भुशुंडी तोमर कठिण ॥ मुसळें मुद्गर गदा दारुण ॥ वेगें संपूर्ण वर्षती ॥१४॥ घेघे ह्मणोनि आँक्रंदती॥तीक्ष्ण शूळीं हृदयें भेदिती ॥ सर्वेचि गदा अर्गळा शक्ती ॥

टी. १ हत्तिस्वारांस. २ घोडेस्वारांचे. ३ दांत. ४ राक्षस. ५ तलवारी. ६ भाले. ७ ओरडती.

वेगें प्रेरिती भयंकर ॥ १५ ॥ जैशा पर्जन्यधारा अपार ॥ तैसे असुर वर्षती शर[1] ॥ मध्येंमध्यें शिळा द्रुमवर[2] ॥ आणि नगही[3] थोर फेंकिती ॥ १६ ॥ ऐशियेरीती मुहूर्तवरी[4] ॥ नानाप्रहरणें[5] वर्षतां असुरीं ॥ जिकडे तिकडे रणभूमीवरी ॥ शस्त्रेंचि सारीं पसरलीं ॥ १७ ॥ शूल गदा शक्ति परिघ ॥ इत्यादिकांचे वाढले ढीग ॥ ठायीं ठायीं शिळा द्रुम नग ॥ असंख्य अभंग पसरले ॥ १८ ॥ आणि राक्षसीं मर्दिल्या कपिदेहीं[6] ॥ झांकोळली सकळ मही[7] ॥ तैसीच रक्तमांसेंही पाहीं ॥ झाली सर्वही परिपूर्ण ॥ १९ ॥ तें भग्नशेष जे वानरगण ॥ ते आवेशा चढले पूर्ण ॥ भुभुःकारीं गर्जवीत गगन ॥ वेगें संपूर्ण उठिन्नले ॥१२०॥ जयजय यशस्वी रघुनाथ ॥ ह्मणोनि शिरले असुरदळांत ॥ महापादप शिळा पर्वत ॥ हाणूनि ताडित रक्तपांतें[8] ॥ २१ ॥ राक्षसवीरही महाबळी ॥ वेगें लोटले असुरदळीं ॥ उभय सैन्यें एकवटलीं ॥ घाई लागली युद्धाची ॥ २२ ॥ दोन्ही सेनासागर अपार ॥ उचंबळले मेदिनीवर ॥ वेगें नानाप्रहरणें कठोर ॥ परस्पर ताडिती ॥ २३ ॥ शस्त्रद्रुमनगवृष्टि दारुण ॥ चालली असे दोहींकडून ॥ त्यांतही चपळ वानरगण ॥ करिती रण अद्भुत ॥ २४ ॥ जें जें सांपडे हातासी ॥ तेणेंचि ताडिती असुरांसी ॥ रथें ताडूनि रथियांसी ॥ तत्काळ प्राणांसी मुकवीत ॥ २५ ॥ पर्वतें हाणिजे पर्वत ॥ तैसेचि गजें गजां ताडित ॥ अश्वें अश्वांसि स्वारांसहित ॥ हाणूनि पाडित भूमीसी ॥ २६ ॥ तैसेचि असुरीं असुरांलागुन ॥ ताडूनि घेती तयांचे प्राण ॥ आणि कित्येकांचीं शस्त्रें हिरोन॥

टी. १ बाण. २ मोठे वृक्ष. ३ पर्वत देखील. ४ दोन घटिकांपर्यंत. ५ आयुधें. ६ वानरांच्या अंगांवर. ७ पृथ्वी. ८ राक्षसांला.

तयींच तयांतें हाणिती ॥ २७ ॥ ऐशी वानरीं करितां कृती ॥ असुरही लागले तयेच रीती ॥ वानरीं वानरां हाणूनि किती ॥ पाडिती क्षिती तत्काळ ॥ २८ ॥ आणि कितेककपींचे हस्तांतील ॥ हिरोनि शिळा द्रुम[1] अचळ[2] ॥ तयींच तयांसि ताडूनि विपुळ ॥ भूमीसि तत्काळ निजविती ॥ २९ ॥ वानरवीर अति प्रबळ ॥ तैसेचि राक्षसही सकळ ॥ कित्येक गिरिशृंगीं प्रबळ ॥ परस्पर हाणिती ॥ १३० ॥ तेणें सर्वांगें भग्न होऊन ॥ भूमीवरी पडती तत्क्षण ॥ वीरांचिये सिंहनादेंकरून ॥ गगन संपूर्ण कोंदतसे ॥ ३१ ॥ तें पाहवया भयंकर युद्ध ॥ अप्सरागण गंधर्व सिद्ध ॥ आणि पुरंदरादिक[3] विबुध ॥ झाले सानंद सर्वही ॥ ३२ ॥ विमानीं बैसोनियां त्वरेंसीं ॥ येऊनि ठाकले आकाशीं ॥ राक्षस वानर परस्परांशीं ॥ आवेशेंसीं हाणित ॥ ३३ ॥ तैं एकांचे मांड्या ढोपर ॥ चरण जांघा तुटले कर ॥ कितिएक ते फुटोनि शिर ॥ भूमीवर पडियेले ॥ ३४ ॥ अंगदांसहित[4] महाभुज ॥ कितिएकांचे तुटले सहज ॥ सुवर्णकांची[5] सहित माज[6] ॥ मोडोनि भूमीस लोळती ॥३५॥ एक चरण एक हस्त ॥ एक कर्ण नासिकारहित ॥ अर्धांघ्रिकर ऐसे बहुत ॥ तवँका[7] देत तळमळती ॥ ३६ ॥ एकांचीं तुटलीं अर्धशिरें ॥ एकांची झालीं विकल गात्रें ॥ एक जीवन[8] सोडित नेत्रें ॥ सांडिती शस्त्रें हस्तींचीं ॥ ३७ ॥ कित्येक ते पादरहित ॥ भूमीवरी चरफडत ॥ एकीं विचकले पैं दांत ॥ बाहेर पडत कोथळे ॥ ३८ ॥ कित्येक अर्धमृत जाहले ॥ एक प्राणांतेंही मुकले ॥ कितेक ते पर्वतीं सगळे ॥ चुर-

टी. १ वृक्ष. २ पर्वत. ३ इंद्रादिक. ४ बाहुभूषणांसहित. ५ सोन्याच्या कमरपट्ट्यांसह. ६ कमर. ७ कुंथत. ८ पाणी.

डूनि झाले अदृश्य ॥ ३९ ॥ ऐसें बहुवेळपर्यंत पूर्ण ॥ युद्ध झालें परमदारुण ॥ उभयदळींचे वीर महान ॥ समसमान सर्वही ॥१४०॥ जय अथवा पराजय कांहीं ॥ कवणाचाही नच होई॥ तैं रामाचिये सर्ववीरांहीं ॥ केली घाई विचित्र ॥ ४१ ॥ एकसरें शिळा पादप गिरी ॥ अगणित फेंकिले राक्षसांवरी ॥ तैशींच अन्यही नानापरी ॥ वर्षिलीं सारीं प्रहरणें[1] ॥ ४२ ॥ तेणें असुरांचीं खेटकें[2] आणी ॥वज्रकवचें[3] तींही फुटोनी ॥ नखशिखांत सर्वांगें झणीं ॥ झालीं रणीं छिन्नभिन्न ॥ ४३ ॥ तैं गिरीपासूनि[4] जळाचे ओझर ॥ वर्षर्तूंत[5] स्रवती निरंतर ॥ तैसे असुरांगांतूनि पाझर ॥ चालले घोर शोणिताचे[6] ॥ ४४ ॥ ते सर्वही एकत्र होउनी ॥ पूर लोटले समरांगणीं ॥ वर्षाकाळींचे[7] सरितांवाणी[8] ॥ दुस्तर नदी जाहल्या ॥ ४५ ॥ रक्तनीरौघ[9] वाहती दुथडी ॥ गजप्रेतांच्या झाल्या दरडी ॥ वीरशिरें कमठपृष्ठें[10] गाढीं ॥ अश्वप्रेतें महामेकर[11] ॥ ४६ ॥ बाबरझोटी केशजाळ[12] ॥ नद्यांमाजी तेंचि शैवाल[13] ॥ महाकोदंडें[14] तेचि विशाळ ॥ लहरीकल्लोळ शोभती ॥ ४७ ॥ हस्त तरती शस्त्रेंसीं[15] ॥ तेचि मीन रक्तनदीसी ॥ पाद वाहती वक्रगतींसीं ॥ तेचि तेथें महासर्प ॥ ४८ ॥ पडले गजांचे अलंकार ॥ घंटा घागुरिया नेपुर ॥ तेचि नद्यांमाजी दर्दुर[16]॥ लहानथोर किरकिरती ॥ ४९ ॥ वीरीं त्यक्त जे वृक्ष बहुत ॥ तेचि तीरींचे उपटले दिसत ॥ ठायींठायीं पडले पर्वत॥ तेचि शोभत द्वीप पैं ॥ १५० ॥ महारथ ध्वजेंसीं वाहत ॥ तींच तारवें

---

टी. १ आयुधें. २ ढाला. ३ दृढकवचें देखील, ४ पर्वतांपासून. ५ पर्जन्यकाळीं. ६ रक्ताचे. ७ पर्जन्यकाळींचे. ८ नद्यांप्रमाणें. ९ रक्तरूपी उदकाचे ओघ. १० कांसवाच्या पाठी. ११ मोठे मगर. १२ केसांचे समूह. १३ शेवाळ. १४ मोठीं धनुष्यें. १५ शस्त्रांसह. १६ बेडूक.

शिडांसहित ॥ भूषणमणि रिचवले तेथ ॥ तीच वाळू सरितींची ॥ ५१ ॥ ऐशा अत्यंत भयानक ॥ नदी प्रवर्तल्या अनेक ॥ गृध्र भालुवा काकादिक ॥ मांसभक्षक आनंदले ॥ ५२ ॥ त्या रक्तनद्यांसि विलोकून ॥ थरथरां कांपती भीरुजन ॥ मनस्विवीरजनांचें मन ॥ हर्षपरिपूर्ण होतसे ॥ ५३ ॥ असो ऐशियेरीतीं समर ॥ प्रवर्तला असतां घोर ॥ रावणदळींचे निशाचर ॥ पावले अपार निधनासी ॥ ५४ ॥ आणि कित्येक जे बळी ओंगळे ॥ तेही छिन्नभिन्नांग पडले ॥ कित्येक अंगें चुकवूनि उरले ॥ पळोनि गेले ते सर्व ॥ ५५ ॥ तैं राक्षसांचिये नगरींत ॥ कोलाहल माजला बहुत ॥ घरोघरीं निशाचरी सतत ॥ आक्रोशें रडत बैसल्या ॥५६॥ हिकडे सकळ वानरगण ॥ आनंदें उचंबळले पूर्ण ॥ ऐसें रामाचें सकळ सैन्य ॥ विजयसपन्न जाहलें जैं ॥ ५७ ॥ तैं इद्रादि सर्व सुधापानी ॥ गंधर्व चारण सिद्ध मुनि आणी ॥ त्रिजगींचे सकळही प्राणी ॥ आनंदें गर्जते जाहले ॥ ५८ ॥ तेणेंही ते वानर समस्त ॥ पुनश्च झाले अति हर्षित ॥ जयजय यशस्वी रघुनाथ ॥ ह्मणोनि नाचत थैथया ॥ ५९ ॥ सिंहनादपूर्वक थोर ॥ करिते जाहले भुभुकार ॥ तेणें नादें भरोनि अंबर ॥ दिगंतरें कोंदाटलीं ॥ १६० ॥ ऐसें वाल्मीकमुनीनें समस्त ॥ कथिलें भारद्वाजाप्रत ॥ आतां रावणाचें कृत्य अद्भुत ॥ पुढिल्या प्रसंगीं वर्णिजेल ॥६१॥ ती कथा परमपावन ॥ श्रोतीं असावें सावधान ॥ यालागीं मी सीतानंदन ॥ हस्त जोडून प्रार्थितों ॥६२॥ स्वस्ति श्रीमदद्भुतरामविजय ॥ वाल्मीयाद्भुतोत्तरकांडहृदय ॥ ऐकोत सज्जन होऊनि तन्मय॥ एकविंशाध्याय मधुर हा॥१६३॥ ॥इति अध्यायः२१॥

टी. १ भित्रे, २ धिट्टवीरांचें. ३ मृत्यूला. ४ अधिक, मोठे.

श्रीः॥ ॥ जयजय श्रीरघुनंदना ॥ जय चंडकिरणकुलमंडणा[1] ॥ कौसलेंद्रतनया[2] गभरत्ना ॥ करुणाघना[3] दाशरथे ॥ १ ॥ मुनिजनमानसारविंदमित्रा[4] ॥ नवघनश्यामा कोमलगात्रा ॥ भरताग्रजा पद्मदलनेत्रा ॥ परमपवित्रा श्रीरामा ॥ २ ॥ समरधीरा अयोध्यानायका ॥ अखिलप्रजासुखदायका ॥ शरणागतभयहारका ॥ ताटिकांतका मखपाळा[5] ॥ ३ ॥ कौशिकप्रिया[6] अहल्योद्धरणा ॥ प्रचंडशिवकोदंडभंजना ॥ मंगळभगिनीमनमोहना[7] ॥ भृगुनंदनाभिमानहरा[8]॥४॥ पितृवचनपाळका रघुनाथा ॥ विदेहनंदिनीलक्ष्मणसमेता[9] ॥ विपुळजटामुकुटमंडिता[10] ॥ धनुर्बाणहस्ता अभंगा ॥५॥ गुहकप्रेमबद्धांतरंगा[11] ॥ सततसेवितमहर्षिसंघा ॥ कृतकाननस्थराक्षसभंगा ॥ मायाकुरंगांगभेदना[12] ॥ ६ ॥ अरुणात्मजमुक्तिदायका[13] ॥ अंजनीतनयज्ञानबोधका ॥ भास्करसुतप्रियकारका[14] ॥ शक्रजांतका[15] अविनाशा ॥ ७ ॥ रामेश्वरलिंगप्रतिष्ठापका ॥ अगाधजीवनशिळातारका ॥ शतयोजनसेतुबंधका ॥ सुरमोदका[16] वीरमणी ॥ ८ ॥ राक्षसकुलकाननछेदना ॥ दशमुखरावणप्राणहरणा ॥ सकळवृंदारकबंधमोचना ॥ बिभीषणपालना दीनबंधू ॥ ९ ॥ सुमित्रातनयप्राणआधारा ॥ भरतनयनपद्मादिवाकरा ॥ कौसल्याहृदयारविंदभ्रमरा ॥

---

टी. १ सूर्यवंशाच्या भूषणा. २ कौसल्येच्या पुत्रा. ३ दयेच्या मेघा. ४ मुनिजनाच्या मनोरूपी कमळांस प्रफुल्लित करणाऱ्या सूर्या. ५ विश्वामित्राचा यज्ञ रक्षिणाऱ्या. ६ विश्वामित्राचे प्रिया. ७ सीतेचें मन मोहित करणाऱ्या. ८ परशुरामाचा गर्व हरणारा. ९ सीतालक्ष्मणसहिता. १० पुष्कळ जटांच्या मुकुटानें सुशोभिता. ११ गुहकाच्या प्रेमानें ज्याचें मन बांधलें आहे. १२ मारीचास मारणाऱ्या. १३ जटायूस मुक्ति देणाऱ्या. १४ सुग्रीवाचे प्रियमित्रा. १५ वाळीच्या शत्रु. १६ देवांस आनंदित करणारा.

परमोदारा अयोध्याप्रभू ॥ १० ॥ विद्वज्जनमानसमराळा ॥ देवाधिदेवा त्रिभुवनपाळा ॥ पतितपावना दीनदयाळा ॥ स्वजनवत्सला जगद्गुरू ॥ ११ ॥ अविद्याघोरकाननदहना ॥ विश्वंभरा मुनिजनरंजना ॥ जगदुद्धारा दुर्जनभंजना ॥ जगज्जीवना जगदात्मया ॥ १२ ॥ जगदाधारा चतुरास्यजनका ॥ अनंतकोटिब्रह्मांडनायका ॥ उत्पत्तिस्थितिप्रलयकारका ॥ निरुपाधिका परब्रह्मा ॥ १३ ॥ स्वसंवेद्या पुराणपुरुषा ॥ प्रणवस्वरूपा मायाविलासा ॥ वेदांतसारा जगन्निवासा ॥ अनंतवेषा श्रीरामा ॥ १४ ॥ अनंगदहनहृदयारामा ॥ योगिजनमनविश्रामा ॥ स्वभक्तकामनाकल्पद्रुमा ॥ सुपूर्णकामा रामचंद्रा ॥ १५ ॥ तुझी कथा परम अद्भुत ॥ न लागे तियेचा कोणा अंत ॥ सांपडेल नभाचें गणित ॥ किंवा अंत सागराचा ॥ १६ ॥ कीं मेदिनीचें रजःकण ॥ कदाचित गणवतील जाण ॥ तैसेचि नाना प्रयत्न करून ॥ नक्षत्रें संपूर्ण गणवतील ॥ १७ ॥ चपळ धांवतां अनिळ ॥ तयाचीही मोट बांधवेल ॥ सौदामिनी अत्यंत चंचल ॥ तीही धरवेल करामाजी ॥ १८ ॥ धरा तोलवेल कदाचित ॥ असाध्यही साधवेल निश्चित ॥ परी राघवा त्वद्गुण सतत ॥ वर्णितां अंत न लागेची ॥ १९ ॥ व्यासवाल्मीकादि कवीश्वर ॥ जयांच्या बुद्धीसि नाहीं पार ॥ तिहीं वर्णितां निरंतर ॥ अंत साचार न लागेची ॥ २० ॥ चतुःपंचषट्सहस्रवदन ॥ तेही भागले संपूर्ण ॥ आम्नायही नेतिनेति ह्मणोन ॥ शेवटीं झाले

---

टी. १ विद्वज्जनाच्या मनोरूपी मानससरोवरींच्या हंसा. २ अज्ञानरूपी घोर अरण्यास जाळणारा. ३ ब्रह्मदेवाच्या पित्या. ४ शिवास सुख देणारा. ५ वायु. ६ वीज. ७ ब्रह्मदेव, शंकर, कार्तिकस्वामी आणि शेष. ८ वेद. ९ असे नव्हत असे नव्हत.

तटस्थ ॥ २१ ॥ तेथें मानवशलभबाळ ॥ गुणांबर केंवी क्रमूं शकेल ॥ तरी सांडूनि अभिमान सकळ ॥ त्वद्गुण केवळ वर्णावे ॥ २२ ॥ गंगाप्रवाह सर्व न शोषवे ॥ ह्मणोनि तृषाक्रांत नच राहावें ॥ तैसे राघवाचे गुण भावें ॥ सदा वर्णावे यथामती ॥ २३ ॥ ऐसें बोलती सज्जन सर्व ॥ तोचि अंतरीं धरूनि भाव ॥ पुढती पुढती त्वद्गुणवैभव ॥ वर्णाया ल्हाव घेतसें ॥ २४ ॥ तरी कृपा करूनि रघुनाथा ॥ परमाद्भुत पुढिल कथा ॥ माझिये मुखें रसपूरिता ॥ तुझी तूंच बोलवीं ॥ २५ ॥ असो पूर्वाध्यायीं निरूपण ॥ श्रीरामाचे वानरगण ॥ निशाचरांसि पराभवून ॥ विजयी पूर्ण जाहले ॥ २६ ॥ आतां कथा गोड बहूत ॥ अद्भुतरसें परिपूरित ॥ तरी सज्जनश्रोतीं श्रवणार्थ ॥ सादरता राखिजे ॥ २७ ॥ जों जों श्रोते श्रवणा सादर ॥ तों तों कथारस वाढे अपार ॥ चंद्रासि देखतां पूर्णाकार ॥ जैसा सागर उल्हासे ॥ २८ ॥ ह्मणोनि सकळ श्रोतयांनीं ॥ सादर असावें श्रवणालागुनी ॥ असो श्रीमद्वाल्मीकमुनी ॥ भारद्वाजासि सांगत ॥ २९ ॥ सकळ पळाले यातुधान ॥ विजयी झाले वानरगण ॥ तो अरिप्रताप देखून ॥ सहस्रवदन कोपला ॥ ३० ॥ शुंडादंड पिळितां द्विप ॥ कीं लातेनें ताडितां महासर्प ॥ कीं नासिकीं हाणितां मृगाधिप ॥ जैसा सकोप चवताळे ॥ ३१ ॥ कीं महातपस्वी अपमानिला ॥ कीं वैश्वानर घृतें शिंपिला ॥ कीं कल्पांतरुद्र क्षोभला ॥ तैसा कोपला रावण तो ॥ ३२ ॥ मग समीरतुल्य वेगवत्तर ॥ ऐशा रथीं बैसोनि सत्वर ॥ प्रळयाग्नीपरि अति दुर्धर ॥ शक्ति प्रखर उचलिली

टी. १ मानवरूप पतंगाचें बाळ. २ गुणरूप आकाश. ३ राक्षस. ४ शत्रूंचा पराक्रम. ५ हत्ती. ६ सिंह. ७ अग्नि. ८ वायूप्रमाणें.

॥ ३३ ॥ सिंहनादें भरिलें गगन ॥ रामसैन्यांत शिरला तत्क्षण ॥ महार्णवामाजी[1] महान ॥
जैसा मीन प्रवेशे पैं ॥ ३४ ॥ तों तयासि ते वानरादिक ॥ हीनबळ दिसले सकळिक ॥ तेणें
तो महात्मा सहस्रमुख ॥ राक्षसनायक आनंदला ॥ ३५ ॥ आणि तो त्या वानरांमाझारी ॥
स्वबळें शोभला पुरंदरारी[2] ॥ जैसा गजेंद्रसंघाभीतरी ॥ शोभे केसरी[3] स्वप्रतापें ॥ ३६ ॥ मग
त्या राक्षसाधिपें देख ॥ ते नररीसवानरादिक ॥ एक क्षणेंचि मारावे सकळिक ॥ ऐसें प्रथम
इच्छिलें ॥ ॥ ३७ ॥ परी तो सहस्रमुख रावण ॥ स्वप्रतापेंचि शोभे पूर्ण ॥ ह्मणोनि तेणें स्वां-
तरीं अन्य ॥ पुनश्च विचार केला कीं ॥ ३८ ॥ हे नर राक्षस गोलांगुल[4] ॥ क्षुद्रें[5] आणि अत्यंत
निर्बळ ॥ ऐसे असूनियां सकळ ॥ मूर्खही केवळ आहेती ॥ ३९ ॥ हे अन्यद्वीपीं राहत असोनी ॥
माझिये युद्धासि अभिलाषुनी ॥ धनप्राणांची आशा सांडुनी ॥ आजि या स्थानीं पातले ॥ ४० ॥
परी मी प्रतापी देवदेवारी[6] ॥ काय लोटूं ह्या क्षुद्रांवरी ॥ जंबुकांवरी[7] धांवतां केसरी ॥ पुरुषार्थ
निर्धारीं दिसेना ॥ ४१ ॥ अलिकांवरी[8] अरुणानुज[9] ॥ कीं पिपीलिकेंवरी[10] धावतां गज ॥ कीं
खद्योतांवरी[11] लोटतां सतेज ॥ ग्रहराज[12] न शोभेची ॥ ४२ ॥ तैसाचि मीही लोटतां ह्यांवर ॥
शोभणार नाहीं हा निर्धार ॥ शस्त्र घालितां क्षुल्लकांवर ॥ पंडित थोर न मानविती ॥ ४३ ॥
आणि ह्या क्षुद्र नरादिकांसी ॥ मारूनि मज प्राप्ति कायसी ॥ बिडाल[13] मारूनि गजेंद्रासी ॥

---

टी. १ मोठ्या समुद्राच्या ओघांत. २ इंद्राचा शत्रु ( रावण ). ३ सिंह. ४ माकडें. ५ लहान. ६ देवांच्या देवांचा ( ब्रह्मा, विष्णु व शिव यांचाही ) शत्रु. ७ कोल्ह्यांवर. ८ किडींवर. ९ गरुड. १० मुंग्यांवर. ११ काजव्यांवर. १२ सूर्य. १३ मांजर.

काय विशेष उपयोग ॥ ४४ ॥ तरी हे सकळ क्षुद्रप्राणी ॥ जेथूनि पातले या स्थानीं ॥ तेथेंचि द्यावे पैं पोंचवूनी ॥ हेंचि करणी बहुयोग्य ॥ ४५ ॥ आणि ऐसेंचि म्यां केलें असतां ॥ ह्या क्षुद्रांचा घात न होतां ॥ मम प्रतापाचीही योग्यता ॥ यांसि तत्वता कळेल ॥ ४६ ॥ ऐसा अंतरीं विचार करून ॥ रावणें उचलिलें शरासन[१] ॥ सवेंचि वातास्त्र योजून ॥ शत्रूंवरी प्रेरिलें ॥ ४७ ॥ अद्भुत सुटला प्रभंजन[२] ॥ श्रीरामदळ पावलें भ्रमण ॥ वातचक्रीं रज कीं तृण ॥ जैसें भ्रमण पावतें ॥ ४८ ॥ ते नर कपि रीस यातुधान ॥ आले ज्याज्या देशापासुन ॥ त्यात्या देशीं त्या वातास्त्रेंकरून ॥ क्षणांत जाण घालविले ॥ ४९ ॥ तस्करांसि जैसे राजदूत ॥ अर्धचंद्र[३] देऊनि घालवित ॥ कीं स्वपक्षवातें विनतासुत[४] ॥ दिगंतीं उडवित शलभांसी[५] ॥ ५० ॥ तैसे त्या सहस्रवदनें म्हणी ॥ उडविले अस्त्रवेगेंकरुनी ॥ तैं ते सर्वही स्वस्वसदनीं ॥ पावोनि विस्मित जाहले ॥ ५१ ॥ म्हणती आम्ही कोठें असतां ॥ पुनश्च कोठें पातलों आतां ॥ भुली पडली आम्हां तत्वता ॥ कीं स्वप्नावस्था असे ही ॥ ५२ ॥ आम्ही सकळ महाप्रतापी ॥ मानव रीस राक्षस कपी ॥ श्रीरामासवें सुखस्वरूपी ॥ पुष्करद्वीपीं पावलों ॥ ५३ ॥ तेथें रावण सहस्रमुख ॥ युद्धार्थ आला आम्हां संमुख ॥ सवें निशाचर भयानक ॥ असंख्यात होते पैं ॥ ५४ ॥ तयांसंगें अत्यंत दारुण ॥ आम्हीं सकळीं केलें रण ॥ नानाप्रहरणीं[६] मार मारून ॥ राक्षसगण पाडिले ॥ ५५ ॥ प्राणासिही मुकविले बहुत ॥ अवशिष्ट पळाले नगरांत ॥ आम्हांसि विजय

---

टी. १ धनुष्य. २ वायु. ३ गचांडी. ४ गरुड. ५ ,टाळांस. ६ नानाप्रकारच्या आयुधांनीं.

झाला प्रात ॥ ऋषि समस्त आनंदले ॥ ५६ ॥ तैं सहस्रमुख रावण वहिला ॥ स्यंदनारूढ धांविन्नला ॥ आमुच्या दळांत प्रवेशिन्नला ॥ ऐसा देखिला सकळिकीं ॥५७॥ पुढें पाहतों तों स्वस्वगृहांत ॥ बैसलों असों यथास्थित ॥ रामरावणादि नाहीं दिसत ॥ तस्मात् अद्भुत काय हें ॥ ५८ ॥ आमुचें चित्त असे भ्रमलें ॥ ह्मणोनि काय हें ऐसें दिसलें ॥ कीं कोणें इंद्रजाळ पसरिलें ॥ किंवा देखिलें स्वप्नची ॥ ५९ ॥ रामासंगें गेलों पुष्करीं ॥ राक्षस संहारिले समरीं ॥ इत्यादि सर्वही स्वप्नाभीतरी ॥ पाहिलें जरी ह्मणावें ॥ ६० ॥ तरी राक्षसगणीं युद्धीं तेथें ॥ शस्त्रीं प्रहारिलें आह्मांतें ॥ तेणें अंगीं पडलेलीं क्षतें ॥ प्रत्यक्ष येथें दिसताती ॥ ६१ ॥ ह्मणोनि भ्रमतों ह्मणतां नये ॥ आणि हें स्वप्नही नव्हे निश्चयें ॥ तरी हें अद्भुत काय आहे ॥ विचार न ये अंतरीं ॥ ६२ ॥ भारद्वाजा प्रळयसमीर ॥ तैसा जयाचा वेग घोर ॥ तये वातास्त्रें थोरथोर ॥ वीर समग्र फसविले ॥ ६३ ॥ भरत लक्ष्मण शत्रुघ्न ॥ हनुमंत सुग्रीव जांबवान ॥ अंगद नळ नीळ सुषेण ॥ गंधमादन गवाक्ष ॥ ६४ ॥ आणि ऋषभादि कपि सकळिक ॥ तैसेचि पैं बिभीषणप्रमुख ॥ क्रूर प्रतापी राक्षस अनेक ॥ वातास्त्रें देख फसविलें ॥ ६५ ॥ असो ते वानर रीस मर्त्य ॥ तैसेचि निशाचरही समस्त ॥ अक्षत ऐसे स्वगृहाप्रत ॥ पावोनि विस्मित जाहले ॥ ६६ ॥ आणि चहूंकडे विलोकिती ॥ परी कोठें दिसेना सीतापती ॥ ह्मणोनि तयाविषयीं अती ॥ शोक करिती सकळिक ॥ ६७ ॥ ह्मणती हे प्रभो सीताधवा ॥ राजाधिराजा करुणार्णवा ॥ आह्मांवि-

टी. १ रथावर बसून. २ गारुड. ३ युद्धांत. ४ आंगास क्षत पडल्यावांचून.

षयीं आजि राघवा ॥ कां कीं देवा उबगलासी[1] ॥ ६८ ॥ आह्मी तव पदाब्जाठायीं ॥ अलिवत[2] लीन
असोनिही ॥ दयाघना आजि त्वां हृदयीं ॥ कोप हा कायी धरियेला ॥ ६९ ॥ सेवीत अस-
तां त्वत्पादपद्मा ॥ दूर कां भिरकाविलें आह्मां ॥ जानकीजीवना श्रीरामा ॥ कवणे कामा
चुकलों असों ॥ ७० ॥ ह्मणोनि तुवां करोनि कोप ॥ आह्मां झुगारिलें दूर अमूप[3] ॥ तथापि
असोंचि सुखरूप ॥ कोपप्रताप विचित्र तुझा ॥ ७१ ॥ समर्थाचा कोप दारुण ॥ तोही क-
ल्याणा होय कारण ॥ ऐसें बोलती पंडितजन ॥ अनुभवा पूर्ण आलें तें ॥ ७२ ॥ दशमुखें
तुझी हरिली जाया ॥ ह्मणोनि तुवां मारिलें तया ॥ तथापि तोही मोक्षनिलया[4] ॥ पावोनि
झाला सुखरूप ॥ ७३ ॥ आणि मारीच कबंध इत्यादिक ॥ दुष्ट निशाचरही अनेक ॥ तुझि-
या कोपप्रतापें देख ॥ अक्षय सुख पावले ॥ ७४ ॥ तैसेचि आह्मीही तत्वता ॥ सुखें पावलों
स्वस्वनिकेतां[5] ॥ परी तुझियाविषयीं आतां ॥ थोर चिंता लागली असे ॥ ७५ ॥ तो सहस्रमुख
रावण ॥ महाबलिष्ट अति दारुण ॥ तयाशीं तूं एकलाचि राहुन ॥ कैसें रण करशील ॥ ७६ ॥
तो द्विसहस्रपाणी कठोर ॥ महाकाय पर्वताकार ॥ तूं तों द्विभुज लघुशरीर ॥ अति सुकुमार
साजिरा ॥ ७७ ॥ द्विसहस्रकरीं तो तुजवरी ॥ शस्त्रें वर्षतां वर्षधारांपरी ॥ कैशी तुझी उरेल
उरी ॥ ह्मणोनि अंतरीं चिंतितों ॥ ७८ ॥ श्रीरामा तूं आमुचा धनी ॥ आह्मी तुझे सेवक अ-
सोनी ॥ आजि सकळां टाकोनि झणी ॥ कवणे स्थानीं पावलास ॥ ७९ ॥ दाही दिशा दि-

टी. १ कंटाळलास. २ भृंग्याप्रमाणें. ३ पुष्कळ. ४ मोक्षास. ५ आपापल्या गृहास.

सती उदास ॥ सकळ ब्रह्मांड झालें वोस ॥ लाजिरवाणें मुख विशेष ॥ कैसें लोकांस दावावें ॥ ८० ॥ आतां आमुची काय गती ॥ कोण सांभाळील आह्मांप्रती ॥ तुजवांचूनि जानकीपती ॥ नसे जगतीं आधार ॥ ८१ ॥ कैसा होशील दृष्टिगोचर ॥ अंतरीं न सुचे कांहीं विचार ॥ अहा कटकटा काय हें दुर्धर ॥ संकट घोर आणिलेंसी ॥ ८२ ॥ आह्मां अंधांची काठी हिरोन ॥ कोठें दिधली झुगारून ॥ आह्मां निर्धनाची गांठ सोडून ॥ विधात्या कां रे घेतलीस ॥ ८३ ॥ रघुराज केवळ चिंतामणी ॥ चिंतिलें पुरवी रात्रंदिनीं ॥ तो आजि आमुचे हस्तांतुनी ॥ निर्दया ओढुनी घेतलास ॥ ८४ ॥ आतां आह्मीं काय करावें ॥ कवणालागीं शरण रिघावें ॥ मातापितरांचिये स्वभावें ॥ कवण आह्मां रक्षील ॥ ८५ ॥ अहा रामा राजीवनेत्रा ॥ नवघनश्यामा स्मरारिमित्रा ॥ जगद्वंद्या परमपवित्रा ॥ कां आजि आह्मां उपेक्षिलें ॥ ८६ ॥ आतां आमुचें व्यर्थ जीवित ॥ इत्यादिरीतीं स्वस्वगृहांत ॥ ते नरवानरादिक समस्त ॥ शोक करित आक्रोशें ॥ ८७ ॥ इकडे पुष्करद्वीपीं देख ॥ सीतेसहित रघुनायक ॥ सहस्रमुखरावणासंमुख ॥ पुष्पकविमानीं होता जो ॥ ८८ ॥ तयासि वातास्त्रवेग वहिला ॥ हालवावया नाहीं शकला ॥ जैसा तैसाच असे ठाकला ॥ नाहीं चळला अणुमात्र ॥ ८९ ॥ आणि संगें होते महर्षिजन ॥ तेही तैसेच राहिले जाण ॥ हें काय ऐसें झालें ह्मणोन ॥ आश्चर्यमात्र पावले ॥ ९० ॥ आणि महाभाग्यवती सीता ॥ तीही चळली नाहीं तत्वता ॥ देखूनियां त्या

टी. १ अहा प्रारब्धा. २ कमलनेत्रा. ३ नव्या मेघाप्रमाणें श्यामवर्णा. ४ शिवाचे मित्रा.

अस्त्रं[1]जवाता ॥ हंसत राहिली तेथेंच ॥ ९१ ॥ श्रीरामाचा दळभार ॥ विपुळ असोनियां सा-
चार ॥ क्षणांत गंधर्वनगरा[2]कार ॥ मिथ्या समग्र जाहला ॥ ९२ ॥ ऐसें पाहूनि ऋषि स-
मस्त ॥ स्वं[3]स्तिस्वस्ति ऐसें बोलत ॥ सकलारिष्टशांत्यर्थ बहुत ॥ जपते झाले शांतिसूक्तें ॥ ९३ ॥
आणि रामरावणांचें युद्ध ॥ पाहाया नभीं इंद्रादि विबु[4]ध ॥ अप्सरागण गंधर्व सिद्ध ॥ इत्यादि पा-
तले होते जे ॥ ९४ ॥ तयीं तें रावणाचें कर्म उग्र ॥ पाहूनि केला हाहाकार ॥ आणि ह्मणती
ह्या असुरेंद्रें घोर ॥ काय हें दुष्कर कृत्य केलें ॥ ९५ ॥ पूर्वीं एकदां चक्र[5]पाणी ॥ गरुडावरी
आरूढोनी ॥ ह्या सहस्रमुख रावणालागुनी ॥ माराया जेव्हां धांवला ॥ ९६ ॥ तैं सहस्रमुखीं
ह्या रावणें ॥ अट्टहासपूर्वक लीलेनें ॥ गर्जना केली उच्चस्वरानें ॥ तेणें भं[6]गणें रिचवलीं ॥ ९७ ॥
आणि सवेंचि हरि गरुडासहित ॥ वामहस्तें फेंकिला क्षारा[7]ब्धींत ॥ परी तो स[8]नातन रमा[9]-
कांत ॥ ह्मणोनि जिवंत राहिला ॥ ९८ ॥ तेव्हांपासूनि यासि देव ॥ सिद्ध चारण गणगंधर्व ॥
यक्ष विद्याधर मानव ॥ इत्यादि सर्व भीतसों ॥ ९९ ॥ जं[10]बुंक अथवा मृग[11]यूथ ॥ शार्दू[12]लांचा गंध
न घेत ॥ कीं मृगें[13]द्रांचे वासाप्रत ॥ गजेंद्र जैसे नच घेती ॥ १०० ॥ कीं गरुडाचा गंध विशेष ॥ कदा
न सोसवे उरगांस[14] ॥ कीं ससाणापक्ष्याचा वास ॥ इतर पक्षी नच घेती ॥ १ ॥ तेंवीच आह्मी कोणी
कदाही ॥ याचा गंधही घेंत नाहीं ॥ पूर्वीं याणें जो शेषशायी ॥ क्षाराब्धीठायीं फेंकिला ॥ २ ॥ तो-

टी. १ अस्त्रापासून झालेल्या वायुस. २ आकाशांत नगराकृति ढग दिसतात त्याप्रमाणें. ३ कल्याण कल्याण. ४ देव. ५ विष्णु. ६ नक्षत्रें. ७ खाऱ्या समुद्रांत. ८ जन्मादिरहित. ९ लक्ष्मीचा पति. १० कोल्हे. ११ हरिणांचा कळप. १२ व्याघ्राचा. १३ सिंहाचे. १४ सर्पांस.

पं हा विष्णु सनातन देव ॥ दशरथापोटीं पावला उद्भव ॥ आमुचे सुदैवें रावणा राघव ॥ जिंकूनि वैभव वाढवू पां ॥ ३ ॥ ऐसें ते देवगण समस्त ॥ परस्परांप्रति बोलत ॥ पुढें काय होतें तें पाहत ॥ गगनीं गुप्त राहिले ॥४॥ तों तो सहस्रमुख रावण ॥ रामासि लहानसा देखून ॥ हा क्षुद्र आहे ऐसें मानुन ॥ गर्जना करिता जाहला ॥५॥ आणि तयाचें तें दुष्कर कर्म ॥ विलोकूनियां श्रीराम॥ स्वयें असोनि पूर्णकाम ॥ पावला परम आश्चर्य ॥ ६ ॥ मग वधाया त्या रावणासी ॥ महाक्रोध धरिला मानसीं॥तों उरले राक्षसश्रेष्ठ तामसी ॥ किलकिलशब्दें गर्जिन्नले ॥७॥ असो तो राघव पद्मनयन ॥ तया शत्रूसि जिंकिण्यालागुन ॥ महाकोपें प्रलयाग्नीसमान ॥ जाज्वल्यमान जाहला जैं ॥८॥ तैं तयासि धरण्याविषयीं ॥ असमर्थ झाली सकळ मही ॥ आणि सप्तसागरांसहित पाहीं ॥ सर्व ग्रहही कांपिन्नले ॥९॥ ऐसें वाल्मीकमुनीनें प्रीतीं ॥ कथिलें भारद्वाजाप्रती ॥ आतां रामरावणयुद्ध निरुती ॥ पुढच्या प्रसंगीं वर्णिजेल ॥११०॥ तें कथानक परम पूत ॥ श्रोतीं ऐकिजे सावचित्त ॥ यालागीं मी रघुनाथसुत ॥ जोडुनि हस्त प्रार्थितों ॥ ११ ॥ स्वस्ति श्रीमदद्भुतरामविजय ॥ वाल्मीकीयाद्भुतोत्तरकांडहृदय ॥ ऐकोत सज्जन होऊनि तन्मय ॥ द्वाविंशाध्याय मधुर हा ॥ ११२ ॥ छ ॥

अध्यायः समाप्तः ॥ २२ ॥

---

टी. १ जन्मादिरहित.





श्रीगणेशायनमः ॥ ॥ जयजयाजी श्रीपरमेश्वरा ॥ त्रिगुणातीता दयासागरा ॥ सच्चिदानंदस्व-
रूपा अक्षरा ॥ वेदांतसारा अप्रमेया ॥१ ॥ जय जगदंकुरा जगन्मया ॥ जगज्जीवना जगदाश्र-
या ॥ जगन्मोहना जगद्विलया ॥ अनंतमायाविभंजना ॥ २ ॥ निष्कलब्रह्मविज्ञानांजना ॥ स-
नकादिकमानसरंजना ॥ अखिलब्रह्मानंदभुंजना ॥ निरंजना निरुपाधिका ॥ ३ ॥ सर्वाध्यक्षा
सर्वहेतुका ॥ सर्वसाक्षिया सर्वात्मका ॥ सर्वातीता सर्वोद्धारका ॥ सर्वदायका सर्ववंद्या ॥ ४ ॥
सर्वचित्तपरीक्षका आद्या ॥ सर्ववेदशिरःप्रतिपाद्या ॥ सर्वानंदकंदा स्वसंवेद्या ॥ सर्वविद्यासुनिधा-
ना ॥ ५ ॥ निर्मला निःसंगा निर्गुणा ॥ निर्द्वंद्वा निष्क्रिया निष्कारणा ॥ निर्मोहा निर्लोभा सनाता-
तना ॥ निरभिमाना राघवेंद्रा ॥ ६ ॥ सकळकल्याणगुणसमुद्रा ॥ जानकीनयनचकोरचंद्रा ॥
निशाचरमत्तद्विरदमृगेंद्रा ॥ प्रतापरुद्रा परिपूर्णा ॥ ७ ॥ भक्तेच्छापूरका करुणाघना ॥ भावें
वंदितों रघुनंदना ॥ पुढें बोलवूनि ग्रंथरचना ॥ पुरवीं कामना सकळिक ॥ ८ ॥ पूर्वाध्यायां-
तीं शत्रुक्षयार्थ ॥ श्रीराम कोपतां अत्यंत ॥ राक्षसीं किलकिलाट केला बहुत ॥ एतावद्वृत्त जा-
हलें ॥ ९ ॥ पुढें कथा वर्तली कैसी ॥ श्रोतीं ऐकिजे सावचित्तेंसीं ॥ आदिकवि श्रीवाल्मीकऋ-
षी ॥ भारद्वाजासी सांगत ॥ १० ॥ म्हणती जैं तो सहस्रानन ॥ राक्षसगणासहरावण ॥ कि-

टी. १ सत्यज्ञानानंदस्वरूपा. २ प्रमाणरहिता. ३ पूर्णब्रह्माचें अनुभवज्ञान प्राप्त होण्याविषयीं अंजनरूपा. ४ सकल ब्रह्मानंदाला भोगणारा. ५ उपनिषदांनीं प्रतिपादिलेला. ६ सर्व विद्यांचा उत्तम ठेवा. ७ आदिमध्यांतरहिता (निरंतर सारखा असणारा). ८ सीतेच्या नेत्ररूपी चकोरांला चंद्राप्रमाणें आनंद देणारा. ९ राक्षसरूप मस्तहत्तींस मारणाऱ्या सिंहा. १० इतकें. * निष्कलंका.

लकिलाट शब्द करून ॥ गर्जना करूं लागला ॥ ११ ॥ तैं तो यांतूंचा सहजशत्रू[2] ॥ शत्रुनि[3]-
बर्हण कौसल्यापुत्र ॥ गर्जत आहे आपुला अमित्र[4] ॥ पाहूनि विचित्र कोपला ॥ १२ ॥ लातेनें
ताडितां महासर्प ॥ कीं शुंडा पिळितां खवळे द्विप ॥ कीं नासिकीं ताडितां महाप्रताप ॥ व्या-
घ्र सकोप होय जेंवी ॥ १३ ॥ कीं अपमानितां तपस्वी क्रूर ॥ कीं घृतें शिंपितां वैश्वानर[6] ॥
कीं काननीं[×] मत्तगजेंद्रावर ॥ मृगेंद्र क्रूर खवळे पैं ॥ १४ ॥ किंवा प्रळयीं महासमुद्र ॥ कीं खवळे जै-
सा कल्पांतरुद्र ॥ तैसा तो साक्षात् राघवेंद्र ॥ श्रीरामचंद्र खवळला ॥ १५ ॥ मग कल्पांतवि-
जूचें भावंड ॥ कीं प्रळयींचा जैसा द्वितुंड ॥ तैसें महातेजस्वी प्रचंड ॥ वेगें कोदंड उचलिलें
॥ १६ ॥ सवेंचि प्रत्यंचा चढवून ॥ टणत्कार केला दारुण ॥ तेणें दिगंतरांसह संपूर्ण ॥ त्रिभु-
वन जाण कोंदाटलें ॥ १७ ॥ वज्रठाण मांडिलें पुढती ॥ निर्जरगण कौतुक पाहती ॥ कल्या-
ण होवो श्रीरामाप्रती ॥ हेंच चिंतिती मुनि सर्व ॥ १८ ॥ चंडप्रताप सीताजीवन ॥ कोदंडीं
योजूनि असंख्य बाण ॥ आकर्ण[10] ओढी ओढून ॥ वेगें संपूर्ण सोडित ॥ १९ राक्षसवर्में लक्षू-
नि पाहीं ॥ रामबाण जाती लवलाहीं ॥ कित्येकांतें शिरूनि हृदयीं ॥ पाडिती मही[11] तत्काळ
॥ २० ॥ कित्येकांचीं शिरें तोडित ॥ कित्येकां तिळप्राय खंडित ॥ कित्येकांचे पाय छेदित ॥
बाह्या तोडित एकांच्या ॥ २१ ॥ राक्षसपुंगव[12] महाघोर ॥ पर्वतांपरि शरीरें थोर ॥ परी राम-

---

टी. १ राक्षसांचा. २ स्वभावतःशत्रु. ३ शत्रूंचा नाश करणारा. ४ शत्रु. ५ हत्ती. ६ अग्नि. ७ दोन तोंडाचा (अग्नि). ८ धनुष्य. ९ धनुष्याची दोरी. १० कानापर्यंत. ११ पृथ्वीवर. १२ श्रेष्ठराक्षस. × अरण्यांत.

बाण वज्रकठोर ॥ करिती चूर तयांचा ॥ २२ ॥ श्रीरामाचें कौशल्य अद्भुत ॥ अलातचक्रा-
सम कोदंड दिसत ॥ तेथें शर केव्हां लावित ॥ आणि केव्हां सोडित न कळे पैं ॥ २३ ॥ रा-
क्षस तुटोनि धरेसि पडती ॥ तेचि मात्र प्रेक्षकां दिसती ॥ बाणसंयोगविसर्गरीती ॥ कवणा
निगुती न दिसेच ॥ २४ ॥ संख्यारहित निशाचरवीर ॥ रामें वधिले क्षणाभीतर ॥ जैसा क-
ल्पांतरुद्र क्रूर ॥ जीव अपार संहारितो ॥ २५ ॥ तें रामाचें कर्म दारुण ॥ पाहूनियां तो सह-
स्रानन ॥ प्रळयवैश्वानरासमान ॥ कोपें पूर्ण प्रज्वळला ॥ २६ ॥ सर्व सैनिकां सारूनि मागें ॥
रहंवर पुढें लोटिला वेगें ॥ तयांसि ह्मणे हो न भरतां रागें ॥ क्षणमात्र उगें राहिजे ॥ २७ ॥
तुह्मी राक्षस वीर गाढे ॥ तुमचे विशाळ देह केवढे ॥ तुमच्या दारुणप्रतापापुढें ॥ हें बापुडें
मनुष्य काय ॥ २८ ॥ परी नराचें मांस गोड ॥ तयाची मजला बहु आवड ॥ ह्मणोनि तुह्मां
करूनि आड ॥ लवंडसवड पातलों ॥ २९ ॥ तरी तुह्मी कोणी न कोपावें ॥ प्रेक्षकांपरि स्व-
स्थ राहावें ॥ मीच झुंजतों याचिये सवें ॥ कौतुक पाहावें सकळिकीं ॥ ३० ॥ हा आकस्मिक
शत्रु पातला ॥ यासि मारितों मीच एकला ॥ सर्वेचि सर्व भूमंडळाला ॥ निर्मानुष करितों पैं
॥ ३१ ॥ आणि निर्जरगण सर्व वधितों ॥ क्षणांत त्रिदिव निर्देव करितों ॥ लाहानथोर गि-
रिही फोडितों ॥ तैसेचि शोषितों सप्तार्णव ॥ ३२ ॥ आदित्यादि सकळ ग्रहां ॥ हांसडूनि
धरणी पाडितों पाहा ॥ सकळ जीवां करवितों हाहा ॥ न लगे महा आयास ॥ ३३ ॥ वीर हो

टी. १ कोलित गरगरां फिरवावें त्याप्रमाणें. २ धनुष्यास बाण लावण्याची व सोडण्याची रीत. ३ प्रळयाग्नीप्रमाणें. ४ रथ. ५ लगबगीनें.

बहु सांगूं काय़ी ॥ आजि ह्या त्रैलोक्यमंडळाठायीं ॥ राक्षसांविणें कोणी नाहीं ॥ ऐसें लवलाहीं मी करितों ॥ ३४ ॥ ऐसें बोलोनियां तो रावण॥ रामासि पाचारी युद्धालागुन ॥ ह्मणे रे मूर्खा तुझें हें मरण ॥ पाहें दारुण ओढवलें ॥ ३५ ॥ आजि मी ह्या तीक्ष्ण खड्गेंसीं ॥ निळप्राय छेदूनि तुजसी ॥ माझिये सर्व अनुचरांसी ॥ निश्चयेंसीं तर्पीन ॥ ३६ ॥ पूर्वीं त्वां मारिले निशाचर ॥ ह्मणोनि येथें आलासि सत्वर ॥ परी हें नव्हे तें लंकापुर ॥ कीं दशकंधर[१] मी नव्हें ॥३७॥ ऊर्णनाभी[२] कल्पी मनीं ॥ स्वतंतूंनीं[३] वेष्टीन धरणी ॥ कीं वृश्चिक पुच्छ उभारूनी॥ अंगारावरी धांवत ॥३८॥ भूगोल ग्रासूं इच्छी मक्षिका ॥ कीं सुपर्णावरी[४] धांवे अळिका ॥ कीं बळें धांवें पिंपीलिका[५] ॥ हेमाद्रीसी[६] उचलाया॥३९॥कीं मदोन्मत्तगजेंद्राशीं ॥ गोवत्स धांवे झुंजायासी॥ किंवा हरिण शार्दूळाशीं[७] ॥ झोंबी घ्यावया धांवत ॥ ४० ॥ कीं गंडभैरवावरी[८] काक ॥ कीं महामृगेंद्रावरी[९] जंबुक[१०] ॥ भुजगनाथावरी[११] मूषक ॥ जैसा सवेग धांवावा ॥ ४१ ॥ कीं मध्याह्नींच्या सूर्याप्रत ॥ जिंकावया खद्योत[१२] धांवत ॥ कीं सागरोदकशोषणार्थ ॥ शलभ[१३] जैसा सरसावे ॥ ४२ ॥ कीं वडवानळ धगधगित ॥ त्यासि ग्रासूं पतंग धांवत ॥ तैसा तूं मानववंशी[१४] यथार्थ ॥ मजशीं युद्धार्थ पातलासी ॥ ४३ ॥ परी अंतरीं करीं विचार ॥ मी राक्षस पर्वताकार ॥

---

टी. १ दशमुख रावण. २ कोळिनांवाचा किडा. ३ आपल्या पोटांतून जे सुतासारखे तंतू निघतात त्यांणीं ( कोळिस्तानें ). ४ गरुडावर. ५ मुंगी. ६ मेरुपर्वत. ७ वाघास. ८ सिंहास देखील उचलून नेणारा जो पक्षीविशेष त्यावर. ९ सिंहावर. १० कोल्हा. ११ नागांच्या राजावर ( शेषावर ). १२ काजवा. १३ टोळ. १४ मनुष्याच्या वंशांत उत्पन्न झालेला.

तूं सूक्ष्म मानव सुकुमार ॥ कैसा समर करशील कीं ॥ ४४ ॥ यावर बोले रघुनाथ ॥ अरे हा तुजला विचार किमर्थ ॥ संमुख ठाकल्या शत्रु युद्धार्थ ॥ वीरीं युद्धचि कीजिये ॥ ४५ ॥ मी थोर आणि शत्रु लहान ॥ हा विचार वीरां नलगे जाण ॥ तूं पर्वताकार देहवान ॥ आणि मी लाहान सत्यची ॥४६॥ परी ज्यामाजी पराक्रम नाहीं ॥ तो बहु विशाळ असोनि कायी ॥ अजगरादिक स्थूळदेही ॥ स्वल्प कीं महीं आहेत ॥ ४७ ॥ भस्माच्छादित लघु कृशानू[१] ॥ क्षणांत जाळितो महावनू ॥ आकाशीं दिसतो सूक्ष्म भानू ॥ प्रकाश घनू पृथ्वीभरी ॥ ४८ ॥ वज्र धाकुटें दिसतें परी ॥ महागिरींचें चूर्ण करी ॥ कीं दृष्टीसि न भरे केसरी[२] ॥ परी विदारी गजेंद्रातें ॥ ४९ ॥ घटोद्भवाचा[३] देह लहान ॥ परी सागर प्राशिला संपूर्ण ॥ अत्यंत खुजट दिसे वामन ॥ आटिलें त्रिभुवन ढेंगेंत ॥ ५० ॥ अत्यंत सूक्ष्म पिपीलिंका[४] ॥ परी विव्हळ करी सर्पनायका[५] ॥ तैसाचि मी तुज सहस्रमुखा ॥ मारीन एका क्षणांत ॥ ५१ ॥ तुज मी लहान दिसतों मानव ॥ परी पाहा घेतों तुझा जीव ॥ गगनीं पाहाती इंद्रादिदेव ॥ तदिच्छा[६] सर्व पुरवितां ॥ ५२ ॥ हें ऐकतां सहस्रानन ॥ कृतांतापरि हाक देऊन ॥ ह्मणे रे मूर्खा तुझें मरण ॥ सन्निध येऊन ठाकलें ॥ ५३ ॥ ह्मणोन जल्पसी[७] कायनाकांहीं ॥ तिळमात्रही विचार नाहीं ॥ काळदंडापरि मत्कराठायीं ॥ ही गदा पाहीं तळपताहे ॥ ५४ ॥ इयेनें तुझा हा मस्तक ॥ फोडूनियां टाकितों देख ॥ मदोन्मत्त करेणुनायक[८] ॥ फोडितो जैसें कपित्थ[९] पां ॥ ५५ ॥ ऐसें बोलूनि तो

टी. १ अग्नि. २ सिंह. ३ अगस्तिऋषीचा. ४ मुंगी. ५ शेषास. ६ इंद्रादिदेवांची इच्छा. ७ बडबडतोस. ८ गजेंद्र. ९ कंविठ.

रावण ॥ रामासि आरंभी युद्ध दारुण ॥ द्विसहस्रकरीं दैदीप्यमान ॥ शस्त्रें संपूर्ण उचलिलीं ॥ ॥५६॥ तयेसमयीं रामचंद्रासी ॥ परमानंद जाहाला मानसीं ॥ टणत्कारूनियां प्रत्यंचेसीं[1] ॥ वज्रठाणेंसीं ठाकला॥५७॥मग दोघांचा द्वैरथ[2] समर ॥ प्रवर्तला अत्यद्भुत घोर ॥ कीं जो पाहतां थोरथोर ॥ वीरही समग्र कांपती ॥५८॥ सर्वांगीं रोमांच उभारती ॥ तत्काळ दृष्टिही झांकुळती ॥ दोघेही वीर प्रबळ अती॥प्रेक्षकां दिसती विचित्र ॥५९॥एक बळी एक वासव[3] ॥ एक त्रिपुर एक शिव ॥ एक कैंठभ एक माधव ॥ किंवा केशव आणि मधू ॥६०॥ कीं भार्गव[4] आणि कार्तवीर्य[5] ॥ कीं तारक आणि कार्तिकेय[6] ॥ कीं वासुकि आणि वैनतेय[7] ॥ आवेशा काय चढिन्नले ॥६१॥ कीं वीरभद्र आणि दक्ष ॥ कीं गजासुर आणि गणाध्यक्ष[8] ॥ कीं वराह आणि हिरण्याक्ष ॥ पातले प्रत्यक्ष यारूपें ॥ ६२ ॥ सहस्राश्वयुक्त महास्यंदन ॥ वरी बैसलासे सहस्रानन ॥ जैसा कां सहस्रशिखरवान[9] ॥ शैलेंचि[10] महान प्रत्यक्ष ॥ ६३ ॥ तालीदिक[11] महाद्रुम जैसे ॥ द्विसहस्रकर दिसती तैसे ॥ दशदिशांतरें हाकेसरसें ॥ भरित आवेशें झुंजत ॥ ६४ ॥ शक्रधनुष्यापरि[12] प्रचंडें ॥ कित्येक घेतलीं कोदंडें[13] ॥ नानाकारविषें[14]दिग्धतोंडे ॥ शरजुंबाडे सोडित ॥ ६५ ॥ कित्येक हस्तीं अनेक गदा ॥ श्रीरामावरी फेंकी एकदा ॥ महागिरींचा करतील चेंदा ॥ ऐसे

---

टी. १ धनुष्याचे दोरीस. २ ज्यांत तिसरा रथ नाहीं असा ( द्वंद्वयुद्ध ). ३ इंद्र. ४ परशुराम. ५ सहस्रार्जुन. ६ कार्तिक स्वामी. ७ गरुड. ८ गणपति. ९ हजार टेंकड्या आहेत ज्यास. १० पर्वत. ११ साग्वानादिक. १२ कधींकधीं आकाशांत नानारंगी रेषांची धनुष्याकृति दिसते तिच्या प्रमाणें. १३ धनुष्यें. १४ नानाकृति असून ज्यांच्या मुखीं विषाचें पाणी दिलेलें आहे.

मुद्गर टाकित ॥६६॥ यमदंष्ट्रांपरि विक्राळ ॥ क्रकचही हाणी राक्षसपाळ ॥ प्रळयानळापरि ते-
जाळ ॥ शक्ति विशाळ सोडित पैं ॥ ६७ ॥ जैसे केवळ काळदंड ॥ तैशा लोहार्गळा टाकी
प्रचंड ॥ कित्येकहस्तीं परिघ वितंड ॥ फेंकी उदंड क्षणक्षणा ॥ ६८ ॥ महाद्रींचा करणार चूर ॥
ऐसे घण हाणी अपार ॥ कित्येकहस्तीं वारंवार ॥ तीक्ष्ण तोमर फेंकी पां ॥ ६९ ॥ वडवाग्नीहू-
नि तेजागळे ॥ कित्येककरीं फेंकित भाले ॥ काळजिह्वेपरि कराळें ॥ बहु करवालें टाकित ॥७०॥
कित्येकीं टाकी महा पाश ॥ कित्येकीं हाणी तीक्ष्ण फरश ॥ दारुण सुऱ्या तीक्ष्ण पट्टीश ॥
प्रास अंकुश कित्येकीं ॥ ७१ ॥ भिंडिमाळा मुसळें कुऱ्हाडे ॥ खड्गें बोथाट्या वज्रें खांडे ॥
चक्रें कोयते लोहदंडे ॥ नागर दुतोंडे तैसेची ॥ ७२ ॥ असो ऐशीं द्विसहस्रकरीं ॥
शस्त्रें वर्षत नानापरी ॥ तंव तो शरयूतीरविहारी ॥ कौशल्य करी विचित्र ॥ ७३ ॥
चपळेहूनि तेजाधिक ॥ दिव्य बाण सोडिला एक ॥ तेणें सहस्रमुखाचीं देख ॥ शस्त्रें सक-
ळिक छेदिलीं ॥ ७४ ॥ उदया पावतां चंडकिरण ॥ नक्षत्रें लोपती संपूर्ण ॥ कीं महामेघजा-
ळालागुन ॥ जैसा प्रभंजन विध्वंसी ॥ ७५ ॥ कीं अंतरीं प्रगटतां बोध ॥ सकळ पातकें
करी दग्ध ॥ कीं जैसें आत्मज्ञान विशुद्ध ॥ हरी अगाधदुःखांतें ॥ ७६ ॥ तैंवीच जानकी-
जीवनें पाहीं ॥ एकेचि बाणें लवलाहीं ॥ सहस्राननाचीं शस्त्रें सर्वही ॥ छेदूनि पाडिलीं एकी-
कडे ॥ ७७ ॥ तें श्रीरामाचें कृत्य अद्भुत ॥ पाहूनि कोपला राक्षसनाथ ॥ महावेगें सर्व करीं

टी. १ यमाच्या दाढांसारखे. २ कर्वत. ३ तलवारी. ४ पट्टे. ५ शरयूनदीच्या तीरीं क्रीडा करणारा (राम). ६ सूर्य. ७ वायु.

अमितें ॥ शस्त्रें सोडित रामावरी ॥ ७८ ॥ परी रामाचें दिव्य संधान ॥ तत्काळ टाकी सर्व तोडून ॥ एक शर सोडितां त्यापासून ॥ अगणित बाण उपजती ॥ ७९ ॥ जैसा एकुलता एक पुत्र ॥ तयाचा वंश वाढे पवित्र ॥ जळीं तेल पडतां अणुमात्र ॥ जैसें सर्वत्र पसरे पैं ॥८०॥ कीं पिशुनाप्रत गुज बोलतां ॥ बाहेर पसरे क्षण न लागतां ॥ कीं संतांवरी उपकार करितां ॥ यश न सांगतां विस्तरे ॥ ८१ ॥ कीं सत्पात्रीं अर्पितां दान ॥ कीर्ति सर्वत्र पसरे जाण ॥ तेंवीच रामें एक बाण ॥ सोडितां तत्क्षण बहु होती ॥ ८२ ॥ तें विचित्र शरसंधान ॥ पाहूनि रावण तुकावी[३] मान ॥ ह्मणे हा मानव योद्धा निपुण ॥ न ढळे ठाण अणुमात्र ॥ ८३ ॥ मग तेणें जपोनियां मंत्र ॥ सोडिलें प्रळयपर्जन्यास्त्र ॥ हस्तिशुंडासमधारीं सर्वत्र ॥ मेघ जळ वर्षू लागले ॥ ८४ ॥ तें पाहूनियां रघुवीरें ॥ समीरास्त्र सोडिलें त्वरें ॥ अति अद्भुत सुटलें वारें ॥ अंबुद सारे भंगले ॥ ८५ ॥ वैराग्यें भवदुःखें विरत ॥ तैसा पर्जन्य लोपला समस्त ॥ तरी तो अस्त्रोद्भव महावात ॥ वेगें वाहात अधिकची ॥ ८६ ॥ उडों लागले वृक्ष पाषाण ॥ रजें कोंदाटलें गगन ॥ निशाचर वीरही संपूर्ण ॥ चालले उडोन दिगंतीं ॥ ८७ ॥ तों रावणें शैलास्त्र सोडिलें ॥ महापर्वत आड ठाकले ॥ पक्ष्यांपरि कित्येक वहिले ॥ पडूं लागले रामावरी ॥८८॥ जैसें मायाजाळ अद्भुत ॥ तैसे सर्वत्र दिसती पर्वत ॥ ठायींच कोंडिला सकळ वात ॥ निशाचरनाथ आनंदला ॥ ८९ ॥ इतुक्यामाजी जानकीवर ॥ प्रेरिता झाला वज्रशर ॥ अंस्त्रोद्भव

टी.. १ असंख्य २ चाडखोराजवळ. ३ हालवी. ४ वातास्त्र. ५ मेघ. ६ पर्वतास्त्र. ७ अस्त्रापासून झालेले. * सीतापति.

सर्व गिरिवर[1] ॥ चकनाचूर पैं केले ॥९०॥ मग रावणें दैदीप्यमान ॥ दावाग्न्यस्त्र[2] सोडिलें दारुण ॥ त्यावरि रामें प्रेरूनि वारुणें[3] ॥ सर्व दावाग्न विझविला ॥ ९१ ॥ करितां सारासार श्रवण ॥ कामादिषडरि[4] जाती जिरून ॥ तैसा वारुणें सर्व दावाग्न ॥ न लागतां क्षण निरसला ॥ ९२ मग रावणें अब्धिमंत्र[5] जपिला ॥ चहूंकडोनि सागर लोटला ॥ रामें प्रेरूनि अगस्त्यास्त्राला ॥ समुद्र शोषिला क्षणांत ॥ ९३ ॥ दोन्ही वीर अत्यंत प्रबळ ॥ अस्त्रविद्येमाजी कुशळ ॥ अस्त्रप्रत्यस्त्रें वेळोवेळ ॥ प्रेरिती सबळ परस्परां ॥९४॥ असुरें पापास्त्र मोकलिलें ॥ तें रामें नामास्त्रें निरसिलें ॥ आत्मज्ञान प्रगटतां भलें ॥ जैसें वितुळे भवदुःख ॥ ९५ ॥ सहस्रास्य सोडी गांधर्व ॥ गांधर्वेंचि निवारी राघव ॥ पुढें रावणें प्रेरितां दैवं[6] ॥ दैवेंचि राघव निवारी तें ॥ ९६ ॥ माहेश्वर सोडी असुरेंद्र ॥ तेणेंचि तें निवारी रामचंद्र ॥ रावणें प्रेरितां माहेंद्र* ॥ राघवेंद्र तेंचि सोडी ॥ ९७ ॥ ऐसा अस्त्राअस्त्री समर ॥ प्रवर्तला अत्यंत घोर ॥ शेखीं[7] रावणें ब्रह्मास्त्र प्रखर ॥ राघवावर मोकलिलें ॥ ९८ ॥ त्यावरी रामें तेंचि प्रेरिलें ॥ अस्त्रअस्त्रांचें युद्ध लागलें ॥ अग्निज्वाळाकल्लोळ आगळे ॥ व्यापीत चालले त्रिभुवना ॥ ९९ ॥ त्रस्त झाले सकळ जीव ॥ विमानें घेऊनि पळाले देव ॥ काय हा कल्पांत आला अभिनव[8] ॥ ह्मणोनि सर्व ओरडती ॥ १०० ॥ कटकटा आतां काय गती ॥ कोण आह्मां रक्षील जगतीं ॥ ईश्वरा

---

टी. १ मोठे पर्वत. २ वणवा उत्पन्न करणारें अस्त्र. ३ वरुणदेवता ज्याची (उदकास्त्र). ४ कामादिक साहा शत्रु. ५समुद्राचा मंत्र. ६ देवास्त्र. ७ शेवटीं. ८ नवा. ९ अगा प्रारब्धा. * इंद्र आहे देवता ज्याची, (ज्यापासून इंद्र उत्पन्न होऊन ते लढतात).

धांव पाव ह्मणती ॥ धरणीं पडती चरफडत ॥ १ ॥ तो सर्वप्राण्यांचा आकांत ॥ पाहूनि दो-
न्ही वीर चकित ॥ तीं आपुलालीं अस्त्रें त्वरित ॥ आकर्षिते जाहले ॥ २ ॥ आणि सर्वांचि श्री
रामचंद्र ॥ गर्जिन्नला जैसा मृगेंद्र ॥ तें ऐकूनियां राक्षसेंद्र ॥ कोपला रुद्र तैसा पैं ॥ ३ ॥ पुढें
कर्तव्याकर्तव्य कांहीं ॥ न सुचे पैं तयाचे ह्रदयीं ॥ मग निर्वाणींचें सर्पास्त्र पाहीं ॥ राघवाठा-
यीं सोडिलें ॥ ४ ॥ तैं रावणाच्या धनुष्यापासून ॥ स्वर्णभूषित सुटत जे बाण ॥ ते सक-
ळही सर्प दारुण ॥ विषोल्बण होऊनियां ॥ ५ ॥ भयानक ऐसीं मुखें पसरित ॥ विषाग्निज्वा-
ळाकल्लोळ वमित ॥ रामचंद्रावरी वेगें धांवत ॥ येऊनि व्यापित चहूंकडे ॥ ६ ॥ साक्षाद्वासु-
कीचिये समान ॥ सर्व सर्पांचे देह महान ॥ कांति पाहतां देदीप्यमान ॥ तप्तकांचन केवळ
॥७॥ कालकूटाचें भावंड ॥ ऐसें विष परम प्रचंड ॥ तोंडें तींही अत्यंत वितंड ॥ जैसें तोंड अं-
तकाचें ॥ ८ ॥ असो ऐसे पन्नग दारुण ॥ रामावरी येत धावून ॥ दशदिशा आणि गगन ॥
सर्पींच संपूर्ण कोंदलें ॥ ९ ॥ जिकडे पाहावें तिकडे ॥ सर्पचि दिसती चहूंकडे ॥ विधिहरशे-
षादि बहुतोंडे ॥ होती बापुडे त्यां गणितां ॥ ११० ॥ ऐशा त्या सकळ पन्नगांतें ॥ विलोकि-
तां श्रीरघुनाथें ॥ गारुडमंत्र जपोनि त्वरितें ॥ तार्क्ष्यास्त्र निरुतें प्रेरिन्नलें ॥ ११ ॥ आकर्ण ओ-
ढूनि कोदंड ॥ बाण सोडी अनंत क्रोड ॥ ते सर्वही तत्काळ प्रचंड ॥ सौवर्ण गरुड होऊनियां
॥ १२ ॥ तये समरांगणाभीतरी ॥ विचरूं लागले परोपरी ॥ एकेक महापन्नगावरी ॥ एकेक



टी. १ सिंह. २ विषानें भयंकर. ३ कठिण. ४सर्प. ५ ब्रह्मदेव, शिव आणि शेष इत्यादि. ६ गरुडाचा मंत्र. ७ गरुडास्त्र. ८ सोन्याचे.

सर्पांरी लोटला॥१३॥जिकडेतिकडे स्वर्णकाय ॥ दिसूं लागले वैनतेय॥ सहस्रास्य ह्मणे हायहा-
य ॥ काय हा अपाय ओढवला ॥ १४ ॥ रावणाचे विषोल्बण बाण ॥ सर्परूपी भयानक
महान ॥ परी त्यांहूनिही अतिदारुण ॥ शर सौपर्ण रामाचे ॥ १५ ॥ तयीं त्वरा केली बहुत॥
तीक्ष्णनखतुंडीं संहारित ॥ ते शत्रूचे सर्पशर समस्त ॥ एके क्षणांत लोपविले ॥ १६ ॥ प्रति-
हत झालें आपुलें अस्त्र ॥ पाहूनि कोपला सहस्रवक्त्र ॥ कल्पांतकाळींचा जैसा मित्र ॥ तैसे नेत्र
लाल केले ॥ १७ ॥ मग जैसा कोणी मूर्ख मानव ॥ आपुला न चाले कांहीं उपाव ॥ ह्मणोन
दुजावरी दुःस्वभाव ॥ करितो वर्षाव दगडांचा ॥ १८ ॥ तेंवीच रावणें साचार ॥ विपरीत कृत्य
केलें थोर ॥ पाषाणांचा वर्षाव घोर ॥ राघवावर चालविला ॥ १९ ॥ पर्जन्यधारा मेघ वर्षत ॥
कीं टोळधाडी वृक्षीं पडत ॥ तैसेचि पाषाण असंख्यात ॥ अवचित येऊं लागले ॥१२०॥ तयां
पाहूनि रघुनंदन ॥ वेगें सोडी असंख्य बाण॥ अचुक तयाचें शरसंधान॥ समर्थ कवण वर्णा-
वया ॥ २१ ॥ कल्पांतींच्या चपळा निघती ॥ तैसेचि रामाचे शर दिसती ॥ पाषाणांतें फो-
डूनि पुढती ॥ सर्वेचि शिरती रावणांगीं ॥२२ ॥ सपक्ष उरग नगां जडले ॥ कीं पाठमोरे मयू-
र बसले ॥ तैसे रामाचे शर आगळे ॥ दिसूं लागले सर्वांगीं ॥ २३ ॥ तेणें अशुद्धाचे
ओझर ॥ अंगीं चालले वेगवत्तर ॥ नगीं गैरिकयुक्त निर्झर ॥ वाहाती झर्झर जैसे कां ॥ २४ ॥
जैसा किंशुकवृक्ष फुलला॥ कीं महीनगेंद्र सिंदूरें चर्चिला॥ तैसाचि तैं राक्षसेंद्र वहिला ॥ दिसूं

टी.१गरुड.२विषानें तीक्ष्ण(भयंकर).३गरुडरूपी.४सूर्य.५सर्प.६पर्वताला.७रक्ताचे.८गेरूनेंयुक्त.९झरे.१०पळसाचे वृक्ष.११मोठापर्वत.

लागला आरक्त ॥ २५ ॥ तथापि रामाचे शर अमित ॥ वेगें येऊनि अंगीं शिरत ॥ ह्मणोनि कल्पांतींच्या समुद्रवत ॥ कोपें अत्यंत खवळला ॥ २६ ॥ मग तुकावीत सहस्र मुंडे ॥ ठोकूनि द्विसहस्र दोर्दंडें ॥ शक्रधनुष्यापरी प्रचंडें ॥ सहस्र कोदंडें उचलिलीं ॥ २७ ॥ आणि सर्व सज्य करूनि पाहीं ॥ टणत्कारिलीं लवलाहीं ॥ सवेंचि घोरशरांचा त्यांहीं ॥ वर्षाव घाई चालविला ॥२८॥ तेणें कौसल्यात्मजाचे बाण ॥ क्षणांत लोपले संपूर्ण ॥ जैसा घोर सुटतां पवन ॥ मेघ संपूर्ण वितुळती ॥ २९ ॥ कीं सूर्योदयें भगणें लोपती ॥ तैशीच तयांचीं झाली गती ॥ असुरेंद्र बाण सोडी किती ॥ तयांची गणती नाहींच ॥१३०॥ वर्षर्तूमाजी पर्जन्यधारा ॥ पर्वतीं वर्षती गा द्विजवरा ॥ तैसेचि रामावर एकसरां ॥ बाण भरभरा कोसळत ॥ ३१ ॥ दिशा विदिशा धरित्री गगन ॥ बाणींच झालें परिपूर्ण ॥ जिकडेतिकडे मार्गणाविण ॥ न दिसे आन कांहींच ॥३२॥ ते रावणाचे असंख्य शर ॥ वेगें रुततां सर्वांगाभीतर ॥ श्रीराम झाला दुःखातुर ॥ लागले पाझर अश्रुद्धाचे ॥ ३३ ॥ राम केवळ रोहिणीरमण ॥ रावणराहुग्रस्त पाहून ॥ देव गंधर्व सिद्ध चारण ॥ ऋष्यादि संपूर्ण घाबरले ॥ ३४ ॥ स्वस्थ बैसली गांजीलमाशी ॥ तियेसि चाळवितां गति जैशी ॥ तेंवीच आमुची या समयासी ॥ गति सार्यांसी झाली असे ॥३५॥ अंतरीं झाले अति दुःखित॥कर्तव्याकर्तव्य न सुचे किंचित॥ह्मणती रेरे विधात्या अवचित ॥ काय हा अनर्थ मांडिलासी॥३६॥ब्रह्मांडविजयी हा रावण ॥ काळाहूनिही महादारुण ॥ अति

टी. १ वायु. २ नक्षत्रें. ३ बाणांवाचून. ४ रक्ताचे. ५ चंद्र. ६ रावणरूपराहूनें ग्रासला. ७ कठिण ( दुःखयुक्त ).

सुकुमार कौसल्यानंदन ॥ जैसें सुमन शिरीषाँचें ॥ ३७॥ आतां वांचेल कैसा साचार॥ ह्मणोन आकांत करिती थोर ॥ तों जिकडेतिकडे नानाप्रकार ॥ उत्पात घोर उद्भवले ॥ ३८ ॥ शी-तरश्मीची प्रिय कामिनी ॥ प्राजापत्य नक्षत्र रोहिणी॥ तयालागीं बुधग्रह ह्मणी॥ आक्रमोनि-यां साक्षेपें॥ ३९ ॥ स्वकीयगतीसि टाकून ॥ तेथेंचि पावला सुस्थिरपण ॥ कीं जेणें प्रजांचें अकल्याण ॥ होणार ह्मणोन कळोन ये ॥१४०॥ आणि सागर झाला पेटल्यापरी ॥ धूमकल्लो-ळ चालले अंबरीं ॥ गिरींमागोन धांवतकीं गिरी ॥ ऐशा लहरी उठिन्नल्या ॥ ४१ ॥ खवळ-ल्या जळें बहुवेगेंसीं ॥ वाढत चालले सर्व आकाशीं ॥ वाटे कीं स्पर्धे दिवाकरासी ॥ स्पर्शा-वयासी धांवत ॥ ४२ ॥ सूर्याचे झाले मंद किरण ॥ प्रकाशही लोपला संपूर्ण ॥ तथापि कल्पां-तकाळाहून ॥ उष्णता दारुण उद्भवली ॥ ४३ ॥ तैसाचि त्या दिवाकरानिकट ॥ धूमकेतुयुक्त तिखट ॥ कॅबंध दिसूं लागला सघटें॥ जोकां विकटंसूचक पैं ॥४४॥ आणि खराश्वँरीसांचे परी ॥ निर्घोष करित नानापरी ॥ ऐसे पुरुषाधम अंबरीं॥ नानापरी उद्भवले ॥ ४५ ॥ औ-त्पातिक शब्द कठोर ॥ चहूंकडे उदेले घोर ॥ दुर्गंधयुक्त तीक्ष्ण समीर ॥ लागला भरभर वाहावया ॥ ४६ ॥ चहूंकडे धूळी कोंदली ॥ दशदिशांतरें धुंद झालीं ॥ निराळांतूनि भगणें आगळीं ॥ मेदिनीतळीं रिचवत ॥४७॥ इत्यादि नाना महोत्पात ॥ सर्वत्रही उदेले बहुत ॥ इतुक्यामाजी जानकीकांत॥ कोपें अत्यंत खवळला ॥४८॥ खदिरांगाराचिये समान ॥ आ-

टी. १ चंद्राची. २ व्यापून. ३ सूर्यास. ४ धडें. ५ मोठा. ६ संकटसूचविणारा. ७ गद्धे, घोडे व रीस यांचे. * शिरसाचें.

रक्त केले दोन्ही नयन ॥ रम्यभ्रुकुटी वक्र करून ॥ चढविल्या तूर्णे निढेळावरी ॥४९॥ कल्पांतींचा तीक्ष्ण समीर ॥ तैसे उच्छ्वास सोडी घोर ॥ प्रळयपांवकापरि प्रखर ॥ सर्वही शरीर संतापलें ॥१५०॥ तैं सहस्रमुखा दग्ध कराया ॥ अग्नीच पातला कीं ये ठाया ॥ ऐसी ती राघवाची काया ॥ लागली दिसाया सकळिकां ॥ ५१ ॥ असो ऐसा तो रघुनंदन ॥ प्रकोपें होतां परिपूर्ण ॥ तयाची कोपमुद्रा पाहून ॥ भूंतें संपूर्ण त्रासलीं ॥ ५२ ॥ व्याघ्रसिंहद्रुमशिळांसहित ॥ प्रज्वळूं लागले महापर्वत ॥ नदीवनपुरग्रामांसमेत ॥ धरा समस्त कांपिन्नली ॥ ५३॥ तैसाचि महासमुद्रही सगळा ॥ पूर्वींहूनिही बहु खवळला ॥ ऐसा एकाहूनि एक आगळा ॥ प्रवर्तू लागला अनर्थ ॥ ५४ ॥ तों राघवें केली काय परी ॥ धुसधुसणाऱ्या सर्पापरी ॥ अत्युग्र दीप्त शर सत्वरी ॥ काढूनि करीं घेतला ॥ ५५ ॥ जोकां पूर्वीं लंकापुरींत ॥ योजिला होता रावणवधार्थ ॥ जेणें अमृतकूपिकासहित ॥ तत्प्राण समस्त हरियेले ॥ ५६ ॥ जो अगस्त्यमुनीनें त्या रघुनाथा ॥ प्रथमचि देऊनि ठेविला होता ॥ आणि तेव्हांचि जयाविषयीं तत्वता॥कथिलें होतें ऐसें कीं॥५७॥हा इंद्रादिकांच्या अमिततेजांहीं ॥ ब्रह्मयें निर्मूनि दिला तूं घेईं ॥ पुढें हा रावणाच्या युद्धाठायीं ॥ तद्वधाविषयीं योजावा ॥ ५८ ॥ ऐसें सांगूनि जोकां अर्पिला ॥ आणि त्याच्याही पूर्वीं वहिला ॥ त्रैलोक्यजयेच्छुपुरंदराला ॥ स्वयंभें दीधला होता जो ॥५९॥ आणि जयाच्या सर्व पिसाऱ्यांवर ॥ संस्थापिला असे समीर ॥ तैसेचि फळकीं अग्निभास्कर॥वसती प्रखर सर्वदा॥६१०॥

टी. १सत्वर. २कपाळावर. ३अग्नीप्रमाणें. ४प्राणी. ५अधिक. ६प्रकार. ७दशमुखरावणाचे प्राण. ८दशमुखाच्या वधाकरितां. ९ब्रह्मदेवानें.

आणि जयाचें सर्व शरीरही ॥ आकाशमय असोनि पाहीं ॥मेरुमंदरांसम सदाही ॥ गु*रुत्वाविषयीं विलसे जो ॥६१॥ आणि जयाच्या वर तेजाळ ॥ स्थापिले असती लोकपाळ ॥ कुबेर वरुण यम हे सकळ ॥ वसती सबळ जयावरुती ॥६२॥ तैसाचि जो शरीरें सतत ॥ जाज्वल्यमान ऐसा वर्तत ॥ तेंवीच महासुखासहित ॥ सुवर्णभूषित असे जो ॥ ६३ ॥ सकळभूतांच्या तेजांहीं ॥ निर्मियेला असोनि पाहीं ॥ भास्कराचेंही तेज कांहीं ॥ जयाठायीं घातलें असे ॥ ६४ ॥ धूमयुक्त काळकृशानू[1] ॥ कीं दैदीप्यमान कल्पांतभानू[2] ॥ कीं प्रळयरुद्राचा तृतीय नयनू ॥ तैसाचि जणूं भासत जो ॥ ६५ ॥ आणि गजरथअश्वांच्या कोडी ॥ स्वसामर्थ्यें क्षणांत तो-डी ॥ लोहपरिघांचीं सहस्रें मोडी ॥ शैलही[3] फोडी असंख्यात ॥ ६६ ॥ नानारुधिरीं[4] असोनि भिजला ॥ मेंदपंकें[5] सदा माखला ॥ प्रत्यक्ष काळाहूनिही आगळा ॥ दारुण सकळां दिसे जो ॥ ६७ ॥ काक गृध्र बक वृक[6] श्वान ॥ राक्षसादि जे रक्तमांसादन[7] ॥ तयांसि जो नित्य नेमान ॥ भक्ष्य संपूर्ण देतसे ॥ ६८ ॥ तैसाचि जो समराठायीं ॥ सकळ राक्षसां भय देई ॥ दैत्यदानवांसि तो सदाही ॥ त्राहित्राहि[8] ह्मणवित ॥ ६९ ॥ सर्वशत्रूंची कीर्ति हरित ॥ निजजनांलागीं सदा रक्षित ॥ रणीं आपुला उत्कर्ष करित ॥ ऐसा समर्थ बाण जो ॥ १७० ॥ तोचि त्या राघवें तये वेळा ॥ काढूनियां हातीं घेतला ॥ मग वेदप्रोक्तमंत्रें[9] पहिला ॥ अभिमंत्रिला साचार

टी. १ प्रळयकाळचा अग्नि. २ कल्पांतकाळचा सूर्य. ३ पर्वत देखील. ४ नानाप्रकारच्या रक्तांनीं. ५ मेंदूच्या चिखलानें. ६ लांडगे. ७ रक्तमांस खाणारे. ८ रक्षण कर रक्षण कर. ९ वेदोक्तमंत्रानें. * जडपणाविषयीं.

॥ ७१ ॥ सर्वेचि कोदंडीं योजून ॥ महाप्रतापी रघुनंदन ॥ सहस्रवदनावर तो बाण ॥ वेगें सोडिता जाहला ॥ ७२ ॥ तें सहस्रविजूंचा कडकडाट ॥ तैसा शब्द उदेला अचाट ॥ असुरांमाजी बारावाट ॥ पळपळाट सुटला पैं ७३ ॥ रिता घट डळमळे जळीं ॥ तैसीं पृथ्वी हेलावूं लागली ॥ भोगींद्राची ग्रीवा सरकली ॥ बैसलीं ठाळीं दिग्गजांचीं ॥ ७४ ॥ सर्व कुळाचळ थर्थरत ॥ देवगण विमानें पळवित ॥ सर्व लोकां वाटलें निश्चित ॥ आजि कल्पांत होत आहे ॥ ७५ ॥ असो ऐसा जानकीजीवनें ॥ सहस्रमुखाच्या वधाकारणें ॥ प्रळयचपळेसम वेगानें ॥ महाबाण सोडिला जो ॥ ७६ ॥ तो गगनमार्गी जाऊनि तत्क्षण ॥ धूमपूर्वक पेटला जाण ॥ कल्पांतींचा जैसा कृशान ॥ जाज्वल्यमान होय पैं ॥ ७७ ॥ तें इंद्रप्रेरितवज्रासम ॥ असोनि तो दुर्धर्ष परम ॥ अनिवार्य असे अंतकासम ॥ ऐसा तयासी पाहूनियां ॥ ७८ ॥ रावणें धीर न सोडितां तत्क्षण ॥ तयापुढें सरसावून ॥ हुंकार करूनियां तो बाण ॥ वामकरें जाण धरियेला ॥ ७९ ॥ आणि सर्वेचि जानूनें तयाला ॥ आकर्षूनियां मोडिता झाला ॥ मत्तगजेंद्र इक्षुदंडाला ॥ जैसा अवलीळा भंगितो ॥ १८० ॥ ऐसा त्या सहस्रवक्रें सवेग ॥ तये शराचा करितां भंग ॥ महाप्रतापी जानकीरंग ॥ दुःखितांतरंग जाहला ॥ ८१ ॥ थकूनि गेले हातपाय ॥ ह्मणे कटकटा हायहाय ॥ पुढें आतां म्यां करावें काय ॥ कोणता उपाय योजावा ॥ ८२ ॥ हा निशाचर शत्रु प्रबळ ॥ अनिवार जैसा केवळ काळ ॥ क्षणांत उडविलें माझें दळ ॥ शस्त्रास्त्रें

टी. १ शेषाची. २ मान. ३ विंध्य, सह्य इत्यादि मुख्य पर्वत. ४ अग्नि. ५ निवारण्यास कठिण. ६ यमासारखा. ७ गुडघ्यानें. ८ उंसाला. ९ सहज.

सकळ लोपलीं ॥८३॥ अगस्त्यदत्त निर्वाण शरू ॥ जेणें वधिला दशकंधरू ॥ तोही ययानें बळें सत्वरू ॥ भंगिला करूं काय आतां ॥ ८४ ॥ ऐसा अंतरीं विचार करित ॥ समरांगणीं जानकीकांत ॥ प्राकृतजनवत चिंताक्रांत ॥ राहिला तटस्थ उभाची ॥ ८५ ॥ तंव त्या सहस्रमुखरावणें पाहीं ॥ क्रोधें खवळोनि जैसा अही ॥ क्षुरप्रशर काढोनि घाई ॥ कोदंडाठायीं योजिला ॥८६॥ स्वबळ वेचूनि संपूर्ण॥ कर्णवरी ओढिला बाण ॥ श्रीरामाचें हृदय लक्षून ॥ सोडिला जाण तत्काळ ॥८७॥ सहस्र विजा एकत्र मिळूनी ॥ एकदांचि पडाव्या कडकडोनी ॥ तैसाचि तो बाण तेक्षणीं ॥ गेला झणी कडकडत ॥ ८८ ॥ राघवाचें हृदय भेदून ॥ बाहेर निघाला पृष्ठांतून ॥ सर्वेचि मेदिनी फोडून ॥ पाताळीं संपूर्ण प्रवेशला ॥ ८९ ॥ तें पुष्पक विमानाआंत ॥ निःसंज्ञ पडला रघुनाथ ॥ चलनवलनादिकांसहित ॥ चेष्टा समस्त राहिल्या ॥१९०॥ प्राकृतजनाच्या प्रेतापरी ॥ दिसूं लागला ते अवसरीं ॥ गवाँक्षद्वारासमान उरीं ॥ छिद्र निर्धारीं पडियेलें ॥ ९१ ॥ अशुद्धांचा चालला ओघ ॥ नखशिखांत भिजलें अंग ॥ विखुरले सर्वालंकारभोग ॥ लोपला रंग नेत्रांचा ॥ ९२ ॥ सशैलवनाब्धि वसुंधरा ॥ कापूं लागली सर्व थर्थरा ॥ सर्वही भूतीं ते अवसरा ॥ हाहाकारा मांडियेलें ॥ ९३ ॥ अशेष मुनिगण झाले चकित ॥ कित्येक ऋषिजन भयभीत ॥ हाराम हाराम ऐसें वदत ॥ सुटले पळत चहूंकडे

---

टी. १ बाण. २ दशमुखरावण. ३ सर्प. ४ वस्तऱ्यासारखा तीक्ष्ण बाण. ५ कानापर्यंत. ६ बेशुद्ध. ७ खिडकी किंवा आंधारी याप्रमाणें. ८ रक्ताचा. ९ पर्वत, वनें व समुद्र यांसह. १० पृथ्वी. ११ प्राण्यांनीं. १२ सर्व. * पायांच्या नखापासून शेंडीपर्यंत.

॥९४॥ असो ऐसा जानकीजीवन ॥ युद्धीं निश्चेष्ट पडतां तत्क्षण ॥ स्वयें शत्रु जिंकिला ह्मणून ॥ सहस्रवदन आनंदला ॥९५॥ संपलें मानूनि रणकृत्य ॥ रणांगणीं करूं लागला नृत्य ॥ जैसा रुद्र प्रदोषीं नित्य ॥ तांडवनृत्य करितो पैं ॥ ९६ ॥ तों गगनोदरांतूनि अमित ॥ होऊं लागले महोल्कापात ॥ आणि राक्षस कल्पांतमेघवत ॥ आनंदें गर्जूं लागले ॥१९७॥ तैं त्या समया सकळ जन ॥ महाप्रळयकाळासमान ॥ मानूनियां अत्यंत दारुण ॥ दुःख परिपूर्ण जाहले ॥ ९८ ॥ ऐसें श्रीमद्वाल्मीकमुनीनें ॥ कथिलें भारद्वाजाकारणें ॥ तेंचि यथामति देशभाषेनें ॥ सज्जनांलागीं कथिलेंसे ॥ ९९ ॥ आतां श्रीमती जानकी सीता ॥ रणीं मारील त्या असुरनाथा ॥ ती कथा परमाद्भुत पूता ॥ पुढच्या प्रसंगीं वर्णिजेल ॥ २०० ॥ तरी सज्जनश्रोतीं सतत ॥ सावध असिजे तच्छ्रवणार्थ ॥ ह्मणोन मी श्रीसीतासुत ॥ जोडूनि हस्त प्रार्थिताहें ॥ १ ॥ स्वस्ति श्रीमदद्भुतरामविजय ॥ वाल्मीकीयाद्भुतोत्तरकांडहृदय ॥ ऐकोत सज्जन होऊनि तन्मय ॥ त्रयोविंशाध्याय मधुर हा ॥ २०२ ॥ ॥ इतित्रयोविंशाध्यायः ॥ २३ ॥

टी. १ आकाशांतून. २ अगणित. ३ मोठ्या विजा पडणें. ४ राक्षसांच्या राजास ( रावणास ).



श्रीगणेशायनमः ॥ जयजय श्रीदाशरथे रामा ॥ अनंतकल्याणगुणग्रामा[1] ॥ भक्तचकोराल्हादकसोमा[2] ॥ मेघश्यामा दिव्यरूपा ॥ १ ॥ जय इक्ष्वाकुकुलप्रदीपा ॥ स्वजनकामनाकल्पपादपा[3] ॥ निखिलराजराजाधिपा[4] ॥ सकळक्षपाचरनाशना[5] ॥ २ ॥ जय कौसल्यानंदवर्धना ॥ मेदिनीगर्भरत्नजीवना[6] ॥ संतसज्जनमनरंजना ॥ जगन्मोहना जगत्पती ॥ ३ ॥ तूं सच्चिदानंदघनमूर्ती ॥ अनाद्यनंत अव्यक्तगती ॥ सकळभावातीत निरुती ॥ मोक्षाधिपती साचार ॥ ४ ॥ तूं अज अजेय अव्ययाक्षर ॥ सर्वांतर्यामी सर्वागोचर ॥ सर्वधर्मात्मा सर्वाधार ॥ सर्वेश्वर सर्वपूर्ण ॥ ५ ॥ तूं निष्क्रिय निर्विकल्प निर्गुण ॥ निरामय निष्कल निष्कारण ॥ निष्कलंक निर्लोभ निरंजन ॥ निरभिमान निर्विकार ॥ ६ निर्विशेष निर्विशिष्ट अपार ॥ निर्लेप नित्य परात्पर ॥ जन्ममरणातीत[7] परमेश्वर ॥ निराकार असक्ष्य[9] तूं ॥ ७ ॥ परी स्वावतारलीलाप्रतापें[11] ॥ सकळजनांचीं हरावीं पापें ॥ ह्मणोनि नाना अवताररूपें ॥ धरिसी आपेंआपची ॥ ८ ॥ तुझी इच्छा तीच पैं माया ॥ माया तीच जनकतनया ॥ प्रतिबिंबवत ती तव जाया ॥ कीं जैसी छाया वृक्षाची ॥ ९ ॥ तुजतिजमाजी इहपरत्र ॥ भेद नसेचि वा अणुमात्र ॥ रूपद्वयें तूं एकचि स्वतंत्र ॥ क्रीडा विचित्र करितोसी ॥ १० ॥ तयांचें सर्व कराया वर्णन ॥ ब्रह्मांडा-

---

टी. १ अगणित शुभगुणांच्या समूहा. २ भक्तरूपी चातकपक्ष्यास आनंदित करणाऱ्या चंद्रा. ३ भक्तेच्छापूर्ण करणाऱ्या कल्पवृक्षा. ४ सर्वराजेश्वरांच्या स्वामी. ५ सर्वराक्षसांचे नाशका. ६ पृथ्वीच्या कन्येचा (सीतेचा) पति. ७ जन्ममरणरहित. ८ अस्पष्टगति (ज्याचें कृत्य कोणासही स्पष्ट समजत नाहीं). ९ कोणासही न दिसणारा. १० पूर्णब्रह्म. ११ आपल्या अवतारलीलांच्या प्रभावानें.

माजी समर्थ कोण ॥ शेषव्यासवाल्मीकादि- महान ॥ तेही संपूर्ण मूकावले ॥ ११ ॥ तेथें इ-
तरजनाची मती ॥ तव कृपेविण चालेल किती ॥ मीतों पामर अत्यल्पमती ॥ मूर्खत्वा मिंती
नसेच ॥ १२ ॥ नभींचा चंद्र घ्यावा स्वकरीं ॥ ऐसें बालक इच्छी अंतरीं ॥ तेंवीच विद्वत्ता
नसतां बरी ॥ केली परी म्यां साचार ॥ १३ ॥ तुझें अद्भुतचरित्र पहिलें ॥ वाल्मीकमुनीनें
जें वर्णिलें ॥ स्वदेशभाषें तेंचि सगळें ॥ मनीं इच्छिलें वर्णावया ॥ १४ ॥ परी त्वां कृपा के-
ली ह्मणोन ॥ येथवर कांहीं झालें वर्णन ॥ तूं वर्षतां कृपेचा घन ॥ मनोरथ पूर्ण होतात ॥१५॥
ऐसा तुझ्या कृपेचा महिमा ॥ ह्मणोनि वंदितों त्वत्पादपद्मा ॥ तरी कृपा करोनि सीतारामा॥
कथा उत्तमा वदवीं पुढें ॥ १६ ॥ पूर्वाध्यायांतीं रघुनाथ ॥ निश्चेष्ट पडला समरांत ॥ सकळ
भूतें झालीं दुःखित ॥ ऐसें अद्भुत वर्णियेलें ॥ १७ ॥ पुढें श्रीमद्वाल्मीकमुनी ॥ सांगती भार-
द्वाजालागुनी ॥ श्रीराम निश्चेष्ट पडला पाहुनी ॥ सर्वही मुनी घाबरले ॥ १८ ॥ कित्येक ते
सुटले पळत ॥ कितिएक थरथरां कांपत ॥ कित्येक हाहाकार करित ॥ कित्येक जपत शां-
तिसूक्तें ॥ १९ ॥ कित्येक व्याकुळ झाले मनीं ॥ तों त्या सकळ मुनिजनांनीं ॥ रामकांता
सीता विमानी ॥ पाहिली प्रहंसितवदनाच ॥ २० ॥ तैं वसिष्ठादि ऋषि संपूर्ण ॥ बोलते झाले
तियेलागुन ॥ सीते रामासि हा दुष्ट रावण ॥ कैसा श्रवण करविलास ॥ २१ ॥ तुज ही बुद्धि



टी. १ पार, प्रमाण. २ प्रकार. ३ खरोखर. ४ मेघ. ५ हास्ययुक्त आहे मुख जीचें.

उदेली कैसी ॥ बळेंचि सुखाब्धि आटविलासी ॥ स्वहस्तें स्वशिर तोडिजे तैसी ॥ गति सा-
यासी केलीस ॥ २२ ॥ सीते हा कर्मविपाक घोर ॥ उद्भवला पाहें दुर्निवार ॥ आतां यांतून
पाडील पार ॥ ऐसा प्रवर कोण असे ॥ २३ ॥ मातेविण परदेशी बाळें ॥ तैसेंचि आज सक-
ळां झालें ॥ पदरींचें सकळ पुण्य संपलें ॥ झणोनि फांकलें तव चित्त ॥२४॥ आतां योगादिक
सत्कर्मे ॥ बाई कैशीं चालतील नेमें ॥ दुष्टजनांचीं तोडूनि वर्मे ॥ कोण सद्धर्मे वागवील ॥२५॥
आतां अमरगणाची दुर्दशा ॥ निश्चयें होणार वाटते बहुशा ॥ स्वस्वस्थानप्राप्तीची आशा ॥
इंद्रादिदिगीशां नलगेच ॥ २६ ॥ सर्वकल्याणांचें निधान ॥ जयाचे आधारें चाले त्रिभुवन ॥
तोचि हा राम पावला पतन ॥ आतां कोठून शुभ होय ॥ २७ ॥ भरतादिक भ्राते सर्वही ॥
कोठें गेले ग यासमयीं ॥ सुकंठादि वानरश्रेष्ठ तेही ॥ कवणेठायीं पैं गेले ॥ २८ ॥ सुमंतादि
प्रधान वहिले ॥ तेही समस्त कोठें गेले ॥ सीते रामासि आजि हें आगळें ॥ काय पातलें वि-
परीत ॥ २९ ॥ आतां पुढें करावें काय ॥ अंतरीं न सुचे कांहीं उपाय ॥ अहा कटकटा हा-
यहाय ॥ श्रीरघुराय उठेल कैं ॥ ३० ॥ ऐसी त्या सर्वऋषींची वाणी ॥ ऐकूनि सीता
पाहे नयनीं ॥ तों श्रीराम त्या पुष्पकविमानीं ॥ मेल्यावाणी पडला असे ॥ ३१ ॥ जैसा
कोणी श्रीमान विषयी ॥ प्रियेसि दृढ धरूनि हृदयीं ॥ प्रेमें नयन मिटोनि पाहीं ॥ पर्य-
कांठायीं पहुडत ॥ ३२ ॥ तैसाचि तो कैवल्यदानी ॥ धनुर्बाणांतें हृदयीं धरूनी ॥ पुंडरीकेस-

टी. १श्रेष्ठ, मोठा. २यज्ञादि. ३इंद्रादि लोकपाळांस. ४ठेव. ५सुग्रीवादि. ६हे प्रारब्धा. ७पलंगावर. ८मोक्षदाता. ९ कमळासारखे.

म नेत्र मिटोनी ॥ रणांगणीं पडला असे ॥ ३३ ॥ आणि तयासमीपचि सबळ ॥ महा पराक्रमी
राक्षसपाळ[1] ॥ सहस्रमुखरावण विशाळ ॥ जैसा काळ गर्जताहे ॥ ३४ ॥ ऐसें पाहूनि जानकी बा-
ळा ॥ अट्टहासपूर्वक तेवेळा ॥ उच्चस्वरें गर्जूनि वेल्हाळा ॥ करी अवलीळां[2] विचित्र ॥ ३५ ॥
आपुल्या सुस्वरूपा त्यागुनी ॥ सर्वेचि झाली विकटरूपिणी ॥ जियेलागीं विलोकितां नय-
नीं ॥ काळही मनीं दचकेल ॥ ३६ ॥ क्षुधेनें अत्यंत कृश शरीर ॥ तेणें दिसे भयानक फार ॥
दोन्ही नयन सखोल घोर ॥ जैसे कोटर[3] वृक्षाचे ॥ ३७ ॥ आरक्त बुबुळें तयांभीतरी ॥ गर-
गरां फिरती चक्रांपरी ॥ तालवृक्षांची पावती सरी ॥ ऐशा निर्धारी दीर्घ जंघा[4] ॥ ३८ ॥ न-
वमेघांचा घडघडाट ॥ तैसी महागर्जना अचाट ॥ मुंडमालांचीं भूषणें सदैट ॥ गळां विकट[6]
रुळती पैं ॥ ३९ ॥ नानाअस्थींच्या क्षुद्रकिंकिणी ॥ नूपुरीं जडिल्या गर्जती चरणीं ॥ सांक-
ळ्या वाळे गुजरिया आणी ॥ बुगड्याहि कानीं तयांच्याच ॥ ४० ॥ सर्वावयव असती भीम[9] ॥
गतिवेगही घोर परम ॥ साक्षात्कल्पांतकाळासम ॥ असे पराक्रम बहु घोर ॥ ४१ ॥ गर्ध-
भापरी स्वर कठोर ॥ महाभयानक सर्व आकार ॥ लांब तोंड विक्राळ फार ॥ भुजा चार
विलसती ॥ ४२ ॥ चहूंकडे किळा फांकती ॥ ऐसा मुकुट तळपे निगुती ॥ जटांचे जुडपे लांब
अती ॥ सदा रुळती पाठीवर ॥ ४३ ॥ मुखाबाहेर जिव्हा कराळें[11] ॥ ळळळळित लोंबे सर्व
काळ ॥ वराह[12]केशांपरीस विशाळ ॥ रोमें सकळ अंगावरी ॥ ४४ ॥ प्रळयकाळींचा काळा मे-

टी. १राक्षसांचा राजा. २सहज. ३ढोली. ४जांघा. ५मोठीं. ६विक्राळ. ७घागऱ्या. ८पैंजणास. ९भयंकर. १०कांति. ११विक्राळ. १२डुकर.

घ ॥ तैसाचि कृष्ण सर्वांगरंग ॥ पाश घंटा खर्पर खड्ग ॥ धरिलीं दृढांग करांमाजी ॥ ४५ ॥
असो ऐशी जनकनंदिनी ॥ जाहली महाविकटरूपिणी ॥ आणि सर्वेंचि त्या विमानांतुनी ॥
सत्वर उडी टाकूनियां ॥ ४६ ॥ मूषकावरी काळसर्पिणी ॥ कीं उरगावरी पडावी श्येनी ॥
तैशीच निमिषामाजी जाउनी ॥ पडली स्यंदनीं रावणाचे ॥ ४७ ॥ आणि सर्वेंचि तीक्ष्ण क-
रवालें ॥ तयाचीं समस्त शिरकमळें ॥ निमिषमात्रामाजी स्वबळें ॥ टाकिलीं लीळें कापूनियां ॥
॥ ४८ ॥ कृषीवल कणसें कापी चटचटा ॥ कीं कोयतें रान तोडित झटझटा ॥ तैशींच शिरें
कापूनि तटतटा ॥ टाकिलीं पटपटा भूमीवरी ॥ ४९ ॥ तें सहस्रपद्मे शिवलिंगीं ॥ वाहवीं तै-
शीं त्या रणरंगीं ॥ शिरांची सहस्रावळ वेगीं ॥ वाहिली भूलिंगीं भासलें ॥ ५० ॥ अंजनाद्रीच्या
सभोंवती ॥ महाशिळा पडल्या असती ॥ तैशींच रावणदेहा भोंवती ॥ शिरें विशाळ पडि-
येलीं ॥ ५१ ॥ असो एवं ती जानकी देवी ॥ सहस्रमुखाचीं शिरें आर्घवीं ॥ क्षणमात्रामाजी
आहेवीं ॥ तोडिती झाली संक्षेपें ॥ ५२ ॥ तैं निघूनि गेले तयाचे प्राण ॥ धरेसि देह पडला
दारुण ॥ जैसा कीं विंध्याद्रीच महान ॥ शतयोजन पसरला ॥ ५३ ॥ तया पाहूनियां मुनिज-
न ॥ अंतरीं पावले समाधान ॥ तों त्या महादेवीनें दारुण ॥ रणकंदन मांडिन्नलें ॥ ५४ ॥ ना-
नाशास्त्रास्त्रकुशल रणीं ॥ जे अन्यही योद्धे वीरमानी ॥ तयांचीं शिरें प्रखरनखांनीं ॥ वेगें तो-
डोनी टाकित ॥ ५५ ॥ जैसी माळिणी मळ्यामाजी ॥ खुंटी फळें कीं पालेभाजी ॥ तेंवीच ए-

टी. १ दृढ. २ उंदिरावर. ३ सर्पावर. ४ घार. ५ तलवारीनें. ६ शेतकरी. ७ भूमिरूप लिंगावर. ८ सर्व. ९ युद्धांत. १० बुद्धिपुरःसर.

कांच्या शिरांच्या राजी ॥ नखीं सहजीं खुंटी पां ॥५६॥कितिएकांचीं कंठनाळें ॥ पिळूनि तो-
डी शिरकमळें ॥ कित्येकांचीं उंच कपाळें ॥ फोडूनि स्वबळें टाकित ॥ ५७ ॥ कित्येकांचीं
दोंदिल पोटें ॥ नखें घालूनि फाडी नेटें ॥ कित्येकांचीं हृदयकपाटें ॥ कोपरखुंटें फोडी तैं ॥
॥ ५८ ॥ हाणूनि महाखड्गांचे घाय ॥ कित्येकांचे तोडिले पाय ॥ कित्येकांचे विशाळ काय ॥
केले तिळप्राय छेदूनियां ॥ ५९ ॥ कित्येकांचे बाहुदंड ॥ तोडूनि केले खंडविखंड ॥ कित्ये-
कांचे मस्तक प्रचंड ॥ जैसे कूष्मांड फोडिन्नले ॥ ६० ॥ कित्येकांतें धरूनि चरणीं ॥ गरग-
रां फिरवूनि आपटी धरणीं ॥ व्याघ्रीपरी गुरगुरत रणीं ॥ विचित्र करणी चालविली ॥ ६१ ॥
अत्यावेशें घालूनि उडी ॥ कित्येकांचीं फोडी नरडीं ॥ कित्येकांच्या फाडूनि कुडी ॥ ओ-
ढी आंतडीं बाहेर ॥ ६२ ॥ कित्येकांतें ताडूनि हृदयीं ॥ पाठवी यमरायाचे गेहीं ॥ कित्ये-
क घोरखड्गांचे घायीं ॥ मांजेठायीं तोडिन्नले ॥ ६३ ॥ कित्येकांचे फाडूनि कोथळे ॥ तत्का-
ळ पंचप्राण हरिले ॥ वंशवत् उभे चिरूनि वहिले ॥ प्राणामुकविले कित्येक ॥ ६४ ॥ वज्र-
मुष्टिप्रहारें देख ॥ यमसदनीं प्रेषिले एक ॥ तैसेचि लत्ताघातें अनेक ॥ राक्षसनायक
संहारिले ॥ ६५ ॥ कित्येकांचीं करचपेटें ॥ हाणूनियां मोडिलीं मेटें ॥ कित्येकां फिरवूनि
उफराटें ॥ आपटी नेटें पृथ्वीवरी ॥ ६६ ॥ कित्येकांचे मस्तकभेदू ॥ करूनि काढी बाहेर
मेदू ॥ पृष्ठीवरी देऊनि पादू ॥ करी चेंदू एकांचा ॥ ६७ ॥ एकांलागीं शरीरवातें ॥

टी. १ पंगत. २ देह. ३ कोंहळे. ४ घरीं. ५ कंबरेंत. ६ वेळूप्रमाणें. ७ पाठविले.

उडवूनि पोंचवी यमसदनातें ॥ तैसेंचि केवळ दृष्टिपातें ॥ मारूनि एकांतें पाडी पैं ॥ ६८ ॥
पार्श्वभागेंसीं मारूनि धक्का ॥ कित्येकां पाठवी यमलोका ॥ कंठीं देऊनि अर्धशशांका ॥ अ-
की एकां मारूनियां ॥ ६९ ॥ कित्येकांवर हाणूनि खोंटा ॥ धरणीवरी पाडी पटपटा ॥ कि-
त्येकांच्या जिव्हा विकटा ॥ ओढूनि झटझटा कापित ॥ ७० ॥ एवं ती जनकात्मजा
सती ॥ राक्षसांसि महाभयदाती ॥ प्रळय करितहोत्साती ॥ चालवी पुढती समरातें ॥ ७१ ॥
केवळ महाट्टहासेंसीं ॥ कित्येक मुकविले प्राणांसी ॥ हुंकारमात्रेंचि कित्येकांसी ॥ दीर्घनिद्रेसी
पोंचविले ॥ ७२ ॥ कित्येकांचे पाठीकडे ॥ हाणूनि केले द्विधा तुकडे ॥ कित्येकांचे देह गाढे ॥
पाडिले हुंडे जैसे पैं ॥ ७३ ॥ कित्येकांतें केशीं धरूनी ॥ ओढूनियां पाडी धरणी ॥ सर्वांचि
लत्ताप्रहारें मर्दुनी ॥ सर्वांगें चुरोनी मारित ॥ ७४ ॥ अश्वरथसारथ्यांसह रथ्यांतें ॥ उचलूनि
आपटी भूमीवरुते ॥ गरगरां फिरवूनि महारथांतें ॥ आपटी मागुते तयांवरी ॥ ७५ ॥ गजा-
रोहांसह गजेंद्रांसी ॥ गजींच हाणूनि मारी त्वरेंसीं ॥ अश्वस्वारांसह अश्वांसी ॥ मारी भूमीसी
आपटूनियां ॥ ७६ ॥ उष्ट्रारोहांसह उष्ट्रें विशाळ ॥ आपटूनि मारी तत्काळ ॥ खरारोहांसह
खर सकळ ॥ आपटूनि सबळ संहारिले ॥ ७७ ॥ हस्तिपकांसह हस्ती उचलिले ॥ गगनीं कि-
त्येक भिरकाविले ॥ सागरामाजी कांहीं बुडविले ॥ कांहीं मारिले आपटूनियां ॥ ७८ ॥ रथां-
वरी रथ हाणून ॥ अश्वरथ्यांसह केलें चूर्ण ॥ कित्येक बळेंचि आकर्षून ॥ सागरीं बुडवून टाकिले

टी. १ कुशीनें. २ गचांडी. ३ याप्रमाणें. ४ मृत्यूप्रत. ५ बुडून. ६ उंटावर बसणारांसह. ७ गाढवावर बसणारांसह. ८ माहुतांसह

॥ ७९ ॥ कित्येकांलागीं कंठीं पाश ॥ घालूनि मुकविलें प्राणास ॥ कित्येक आपटूनि धरणी-
स ॥ यमसदनास पोंचविले ॥८०॥ कित्येकांचे स्कंधीं चढून ॥ शिरें उपटिलीं पिळवटून ॥ कि-
तिकांच्या माना मुर्गुटून ॥ हरिले प्राण तत्काळ ॥ ८१ दाबूनियां मुखनासिका ॥ कुम्कूनि
मारिलें कित्येकां ॥ जैसा कीं कलाल अजादिकां[1] ॥ क्रूरत्वें मारी बळेंची ॥८२॥ एवं त्या सर्व
निशाचरांसी ॥ निमिषामाजी मारूनि बळेंसीं ॥ जानकी देवी त्या रणभूमीसी ॥ विजयी जाण
जाहली ॥ ८३ ॥ मग राक्षसांच्या आंतांसहित ॥ मुडांच्या माळा करूनि त्वरित ॥ त्यांचींच
नाना भूषणें बहुत ॥ लेऊनि मिरवत साक्षेपें ॥ ८४ ॥ रावणाचिये घोरशिरांसी ॥ घेऊनि त्या
रणभूमीसी ॥ कंदुकक्रीडा[2] करावी ऐसी ॥ इच्छा मानसीं धरियेली ॥८५॥ तों तियेच्या रोमापा-
सून ॥ नानाकृति अतिदारुण ॥ मातृदेवता भिन्नभिन्न ॥ सहस्रशा जाण उद्भवल्या ॥ ८६ ॥
त्या सर्वही अट्टहास करित ॥ तये दारुणरणांगणांत ॥ सीतेसवें कंदुकलीलार्थ[3] ॥ उभ्या समस्त
राहिल्या ॥ ८७ ॥ तयांची सांगूं लागतां गणती ॥ मम एकमुखें नव्हे निश्चिती ॥ विधिं[4] हर
स्कंद[5] नागपती[6] ॥ हेही निरुती भागतील ॥८८॥ परी त्यांतूनि कित्येकींच्या आख्या[7] ॥ सां-
गतों ऐकें गा शिष्यमुख्या ॥ ज्या कल्याणरूपिणीनीं असंख्यां ॥ स्थिरचरत्रैलोक्यां व्यापि-
लें ॥ ८९ ॥ प्रभावती गोनसी श्रीमती ॥ पालिता प्रघसा जयावती ॥ बहुला गोपाली भोग-
वती ॥ कनकावती ध्रुवरत्ना ॥ ९० ॥ महाकाली भद्रकाली सेना ॥ महायशा कमला शोभ-

टी. १ बोकड इत्यादिकांस. २ चेंडूफळीचा खेळ. ३ चेंडूफळी खेळण्याकरितां. ४ ब्रह्मदेव. ५ कार्तिक स्वामी. ६ शेष. ७ नामें.

ना ॥ अप्सुजाता विशोका क्रोधना ॥ अमिताशना विशालाक्षी ॥ ९१ ॥ शतोलूखलमेखला पिंगाक्षी ॥ बृहदंबालिका कमलाक्षी ॥ कुक्कटिका आणि अलताक्षी ॥ लोहिताक्षी चंद्रसीता ॥ ९२ ॥ बहुपुत्रिका मालतिका ख्याता ॥ सुमला चतुष्पथनिकेता ॥ चक्रनेमि सन्नालिका श्वेता ॥ चतुष्पथरता वसुदामा ॥ ९३ ॥ पूतना क्रोशना असुदामा ॥ मेघस्वना चित्रसेना रामा ॥ सुभ्रु झंकारिका चटीतमा ॥ अतिद्रढिमा उत्तेजिनी ॥ ९४ ॥ वेणुवीणाधरा नंदिनी ॥ लंबास्या कंदूती तीर्थसेनी ॥ शलभी शत्रुंजया कल्याणी ॥ भवतारिणी महाकाया ॥ ९५ ॥ चत्वरवासिनी गीतप्रिया ॥ यशस्विनी कद्रुरोमा जया ॥ वेतालजननी नृत्यप्रिया ॥ कालाहि-काया भयंकरी ॥ ९६ ॥ जयप्रिया खेशया खरी ॥ सुगुणा पूषणा जनेश्वरी ॥ कामचारी ग-णा मंदोदरी ॥ मुकुटेश्वरी एकवक्रा ॥ ९७ ॥ पिशंगाक्षी रक्ताक्षी सुनेत्रा ॥ कंकिनी गंधरा वे-दमित्रा ॥ कटकिनी धरा पृथुवक्रा ॥ शुभ्रवस्त्रा वृद्धिकामा ॥ ९८ ॥ भूतितीर्था हृष्टा बहुदा-मा ॥ अन्यगोचरा माधवी सुदामा ॥ शतोदरी पिंडिका सुकूर्मा ॥ मेघवामा सुप्रसादा ॥ ९९ ॥ घमघमा अम्लोचा भवदा ॥ एकत्वचा निम्लोचा भगदा ॥ लंवपयोधरा परानंदा ॥ गोमहिषदा ऊर्ध्ववेणी ॥ १०० ॥ कोटरा विशिरा पृथुश्रोणी ॥ महाजरा कन्यका लंबिनी ॥ चतुर्भुजा ज-रायू मंथिनी ॥ मेघवाहिनी महाचूडा ॥ १ ॥ चतुष्कर्णी गोकर्णी हडा ॥ लोहमेखला हविर्पि-डा ॥ शिशुमारमुखी खंडखंडा ॥ महाचूडा खरकर्णी ॥ २ ॥ तैशीच एक कुल्हाकर्णी ॥ श-शोलूकमुखी सुरकर्णी ॥ भेरीस्वना महास्वना नौकर्णी ॥ महाकर्णी सुप्रतिष्ठा ॥ ३ ॥

उत्काथिनी कुंभिका मुकुटा ॥ एकचूडा धनदा शतघंटा ॥ बहुचूडा केतकी प्रतिष्ठा ॥ बलोत्कटा मेघरवा ॥ ४ ॥ मुखकर्णी तुंडी मनोजवा ॥ जटालिका भेडी कुंभश्रवा ॥ दहदहा समेडी शंखश्रवा ॥ विद्युज्जिव्हा महाबला ॥ ५ ॥ मधुलिहा एडी खटामला ॥ दीर्घजिव्हा मालिका अचला ॥ बहुयोजना सटोज्ज्वला ॥ लोहमेखला शतानंदा ॥ ६ ॥ खरजंघा जवेला आनंदा ॥ महावेगा सुभगा धनदा ॥ शंखलिका कामदा विभुदा ॥ पशुदा सुखदा भारती ॥ ७ ॥ मणिकुट्टिकाला पद्मावती ॥ कंदुका कंदालिका वपुष्मती ॥ महाबला लंबा वेगवती ॥ सुस्तनवती मत्सरिका ॥ ८ ॥ मधुकुंभा आणि सुवेदिका ॥ तडित्प्रभा सुप्रभा निष्कंटिका ॥ सुलोचना आणि काकलिका ॥ यक्षानीका विभिषणा ॥ ९ ॥ महिषानना जर्जरानना ॥ पयोदा कर्णप्रावरणा ॥ कर्णिका आणि द्विरोचना ॥ रोचमाना तैशीच ॥ ११० ॥ ह्या आणि अन्यही माता बहुत ॥ कोटींच्या कोटी असंख्यात ॥ सीतेसवें क्रीडाया तेथ ॥ अवचित प्राप्त जाहल्या ॥ ११ ॥ तयांच्या नानावर्णाकृती ॥ पृथक् पृथक् वर्णू किती ॥ तथापि कित्येकींच्या रूपस्थिती ॥ सांगतों निरुती द्विजवर्या ॥ १२ ॥ वक्षस्थळें दीर्घ बहुत ॥ ऐशा माता कित्येक असत ॥ एकींचे मुखांबाहेर दांत ॥ लांब अत्यंत तळपती ॥ १३ ॥ कित्येकींचीं विशाळ मुंडें ॥ जैशीं पर्वतशृंगें[1] प्रचंडें ॥ कित्येकींचीं सुदीर्घ तुंडें[2] ॥ गजेंद्रशुंडेसम दिसती ॥ १४ ॥ एक शृंगाररसभरित ॥ एक सुरम्यदर्शना दिसत ॥

टी. १ पर्वताच्या टेंकड्या. २ तोंडें.

एक यौवनावस्थापूरित ॥ विशेषें शोभत सर्वदा ॥१५॥ सुमाहात्म्यैंसीं युक्त कांहीं ॥ कित्येकी कामरूपिणी पाहीं ॥ निर्मांसशरीरा सर्वदाही ॥ असती ऐशाही कित्येकी ॥१६॥ सुधाकर्पूररौप्यांसमान ॥ कित्येकी असती श्वेतवर्ण ॥ नवनीरदासमान कृष्ण ॥ ऐशाही जाण कित्येकी ॥ १७ ॥ सुतप्तकांचनाचा गाभा ॥ तैशी एकींची सर्वांगशोभा ॥ महाविद्युल्लतेची आभा ॥ तैशीच प्रभा एकींची ॥ १८ ॥ जैसा धूमाचा सुरम्य रंग ॥ तेंवीच कित्येकी दिसती सुरंग ॥ अरुणापरी रक्तसर्वांग ॥ शोभती चांग कित्येकी ॥ १९ ॥ कित्येकी महाभाग्यवती ॥ कित्येकी दीर्घकेशी असती ॥ कित्येकींच्या सर्वांगदीप्ती ॥ विचित्र दिसती साचार ॥ १२० ॥ कित्येकी श्वेतवसना पाहीं ॥ ऊर्ध्ववेणीधरा ऐशा कांहीं ॥ लंबमेखला कटितटांठायीं ॥ शोभती सदाही एकींच्या ॥२१॥ कित्येकींचे नेत्र पिंगळे ॥ जैसे कीं मार्जारीचे डोळे ॥ कित्येकींचे आरक्त चांगले ॥ तैसेचि काळे एकींचे ॥ २२ ॥ कित्येकींचीं सुदीर्घ पोटें ॥ जैशीं कीं घोर गिरिकपाटें ॥ कित्येकींचे उरोज मोठे ॥ पर्वतकूटें तैसेचि पैं ॥२३॥ कित्येकींचे लंबायमान ॥ गर्धभीपरी असती कान ॥ लंबपयोधरा ऐशा आन ॥ कित्येक जाण धांवती ॥ २४ ॥ कित्येकींच्या कंठीं विशाळ ॥ रुंडमाळा रुळती सरळ ॥ कित्येकींच्या सर्वांगीं विपुळ ॥ भूषणें सकळ मुंडांचीं ॥ २५ ॥ कित्येकी ताम्रवर्णा सुवक्त्रा ॥ कित्येकी त्या हरितनेत्रा ॥ कित्येकींच्या

टी. १नव्या मेघाप्रमाणें. २कांति. ३श्वेत वस्त्रें नेसलेल्या. ४कंबरपट्टे. ५ कंबरेंत. ६ स्तन. ७ लांबआहेत स्तन ज्यांचे. ८ इतर. ९हिरवे नेत्र.

सुरम्य गात्रों ॥ पाहूनि त्रिनेत्रा भूल पडे ॥२६॥ इत्यादि नानावर्णाकृती ॥ आणि नानावस्त्रभू-षणवती ॥ ऐशा मातृदेवता सती ॥ विचित्र अती असोनियां ॥२७॥ सर्वदा सर्व शत्रुगणां-स ॥ युद्धीं भयदा होती विशेष ॥ स्वेच्छानुरूप यथावकाश ॥ नानारूपांस पैं धरिती ॥ २८ ॥ वेगें वायूसि उल्लंघिती ॥ मनोगतीसि मागें सारिती ॥ ऐशा माता पराक्रमवती ॥ सत्वरगती पातल्या ॥ २९ ॥ मग महागंडशैलांवाणी ॥ राक्षसांचीं शिरें घेउनी ॥ सीतेसंगें त्या रणमेदि-नी ॥ खेळूं तत्क्षणीं लागल्या ॥१३०॥ चेंडूफळी खेळती बाळा ॥ तैशीच करूं लागल्या ली-ळा ॥ तये दारुणरणमंडळा ॥ पाहतां सकळां भय वाटे ॥ ३१ ॥ काक भालुवा गृध्र कंक ॥ चहूंकडे बोंभाती देख ॥ रक्तमांसमेदांचा पंक ॥ भयानक पडला असे ॥ ३२ ॥ ओसगृहांप-रि ठायींठायीं ॥ शवें पडलीं असती पाहीं ॥ गंडशिळांपरि शिरांचे कांहीं ॥ ढीग सदाही भा-सत ॥ ३३ ॥ शवदहनालागीं ओंडे ॥ आणूनि टाकावे चहूंकडे ॥ तेंवीच करपादांचे तुकडे ॥ जिकडेतिकडे पैं दिसती ॥ ३४ ॥ असो ऐशा त्या रणमंडळीं ॥ खेळूं लागतां चेंडूफळी ॥ जनकजा देवी महाकाली ॥ आनंदें झाली परिपूर्ण ॥ ३५ ॥ राक्षसांचीं शिरें अगणित ॥ एका-मागें एक उडवित ॥ वायुवेगें माता धांवत ॥ हस्तीं झेलित वरच्यावरी ॥ ३६ ॥ कित्येक पडूनि धरित्रीवरी ॥ पुनश्च वेगें उडतां अंबरीं ॥ सर्वांचि एकी कुदोनि उपरी ॥ धरिती करीं तयांतें ॥ ३७ ॥ सर्वांचि एकी फेंकिती मागें ॥ दुजेबाजूच्या झेलिती वेगें ॥ मध्येंच कित्येकी

टी १ शरीराला. २ नानाप्रकारचीं वस्त्रें व भूषणें धारण केलेल्या. ३ ओरडती. ४ चिखल. ५ प्रेतें. ६ प्रेतें जाळण्याकरितां. ७ आकाशांत.

क्रीडारंगें ॥ स्वोस्वोत्तमांगें डोलविती ॥ ३८ ॥ कित्येकी संमुख ठाकून ॥ शिरें फेंकिती दों-
हींकडून ॥ मध्येंच तीं परस्परां लागुन ॥ पडती जाण धरित्रीवरी ॥ ३९ ॥ भूमीवरूनि सर-
पटत ॥ जातील ऐशीं कांहीं फेंकित ॥ तों संमुखींच्या माता त्वरित ॥ वांकूनि धरित दोंह-
स्तीं ॥१४०॥ कित्येकी उडविती समोर ॥ कांहीं फेंकिती धरणीवर ॥ कित्येकी त्या वर-
च्यावर ॥ झेलूनि समोर फेंकिती ॥ ४१ ॥ एकींपुढें एकी धांवती ॥ मीमी ह्मणोनि शिरें झे-
लिती ॥ ढेंगांतूनि मागील हातीं ॥ संमुख फेंकिती पुनश्च ॥ ४२ ॥ दोंहींबाजू माता अगणित॥
विचित्रगती वेगें धांवत ॥ कित्येकी त्या टाकूनि बोलत ॥ डाव हुकला ह्मणोनी ॥ ४३ ॥
चित्तीं जयाची धरूनि हाव ॥ पुनश्च क्रीडेचा घेती ल्हाव ॥ वायुवेगें मारिती धांव ॥ लाविती डाव
पररूपरां ॥ ४४ ॥ कित्येकी आपुल्याचि हस्तेंसीं ॥ एकामागें एक ऐशीं ॥ शिरें उडविती आका-
शीं ॥ पुनश्च तयांसी झेलित ॥४५॥ पुनश्च तीं नभीं उडवित ॥ वरच्यावरी स्वयेंचि झेलित ॥ऐशा
विचित्रगतीं बहुत॥ क्रीडा अद्भुत चालविली॥४६॥तेव्हां निशाचरांचीं[2] मुंडें ॥खालींवर जाती चहूं-
कडे॥टोळघाडीचिये पडिंपाडें[3]॥जिकडेतिकडे पैं दिसती॥४७॥आणि तयां झेलावया त्वरित ॥ऊं-
र्ध्वकृत[4] जे मातांचे हात ॥ तेतों मित्रपत्रेंच[5] कीं विस्तृत ॥ उभारलीं भासत सर्वांसी ॥ ४८ ॥
तें पाहूनि जनकबाळी ॥ महाबळा महाकाळी ॥ परमानंदभरें कोंदली ॥ थैथैया लागली ना-
चावया ॥४९॥ तैं तियेच्या पादप्रक्षेपांनीं[6] ॥ कांपूं लागली सर्व मेदिनी ॥ महावातें सागरँजीव-

---

टी. १ आपापलीं शिरें. २राक्षसांचीं. ३प्रमाणें (बरोबरीनें).४वर केलेले.५आबदागिरें.६पायउचलून टाकण्यानें. ७समुद्राच्या उदकांत.

नीं ॥ नौका जैसी डळमळते ॥१५०॥ नीरीं डुलती तुंबीफळें ॥ तैसे पर्वत कांपूं लागले ॥ सप्तसागर हेलावले ॥ उदक चाललें बाहेरी ॥ ५१ ॥ वनें उपवनें ग्राम नगरें ॥ सर्वांसि भरलें बहु कांपरें ॥ कडकडां मोडूनि पडती घरें ॥ गिरिशिखरें कोसळत ॥५२॥ महापादप उन्मळत ॥ नद नद्या सरें उचंबळत ॥ शिळाबंदीही मठ मोडत ॥ दुर्गें पडत कोसळोनी ॥ ५३ ॥ अश्वत्थपर्णाचिये परी ॥ थर्थरूं लागले दिक्करी ॥ पन्नगेश्वर आपुल्या शिरीं ॥ सांवरोनि धरी पृथ्वीतें ॥ ५४ ॥ तथापि ती सुस्थिर नोहे ॥ नौकेपरी उलटों पाहे ॥ तळीं दाढा दीधली वराहें ॥ तरीही होये कलतीच ॥ ५५ ॥ कूर्मही पृष्ठी सरसावित ॥ तथापि वेगें डळमळत ॥ महाकालीचें नृत्य अद्भुत ॥ भूतें समस्त त्रासलीं ॥ ५६ ॥ देवांचीं विमानें होतीं निराळीं ॥ तींही तेथूनि तयेकाळीं ॥ महाभयाचेनि अवनीतळीं ॥ कोसळूं लागलीं अकस्मात ॥ ५७ ॥ दिवाँकराचे वारू समस्त ॥ वाग्दोरे तोडूनि भयत्रस्त ॥ सैरावैरा सुटले पळत ॥ महा अनर्थ ओढवला ॥ ५८ ॥ सीतेचें तें स्वरूप घोर ॥ आणि त्याहूनिही नृत्य कठोर ॥ चालतां तियेचा धरणीस भार ॥ जेव्हां साचार साहवेना ॥५९॥ तयेसमयीं ती सकळ क्षिती ॥ तत्पादपीडित होत्साती ॥ पाताळीं जावयालागीं निगुती ॥ इच्छिती जाहली साक्षेपें ॥ १६० ॥ तों त्या सीतेच्या अट्टहासांनीं ॥ आणि मातांचिये हुंकारांनीं ॥ प्रळय होतो आजिचे दिनीं ॥ ऐसें लोकांनीं मानियेलें ॥ ६१ ॥ आणि हें काय पातलें दारुण ॥ आतां यांतूनि रक्षील क-

टी. १ उदकांत. २ भोंपळे. ३ किल्ले. ४ अष्टदिशांचे हत्ती. ५ शेष. ६ आकाशांत. ७ सूर्याचे. ८ तिच्या पायांनीं पीडित.

वण ॥ ऐसें मुखें बोलत जन ॥ जाहले संपूर्ण विव्हळ ॥ ६२ ॥ तों सकळदेवांची मंडळी ॥ आ-
जि धरा जाणार पाताळीं ॥ ऐसा तर्क करोनि तत्काळीं ॥ घाबरी झाली साचार ॥ ६३ ॥ आ-
णि मुखें ह्मणे हायहाय ॥ कोण हा ओढवला प्रळय ॥ आतां यासि करावें काय ॥ कवण उ-
पाय योजावा ॥ ६४ ॥ आतां कवणा जावें शरण ॥ दीनजनाचा कैवारी कवण ॥ ऐसा अं-
तरीं देव संपूर्ण ॥ करिती जाण विचार ॥ ६५ ॥ तों आशुतोष[1] शंकर भोळा ॥ अंतरामाजी
आठवला ॥ मग तो सकळनिर्जरांचा मेळा ॥ वेगें धांवला शिवापाशीं ॥६६॥ जयजयशब्दें
गर्जना करित ॥ घातले साष्टांग प्रणिपात[2] ॥ सर्वेचि संमुख ठाकोनि समस्त ॥ जोडूनि हस्त
प्रार्थिती ॥ ६७ ॥ ह्मणती जयजय श्रीशंकरा ॥ जयजय विभो गिरिजावरा ॥ गिरिराजेंद्रकोदं[3]-
डधरा ॥ गिरीश्वरा गिरिसदना ॥ ६८ ॥ जय गिरिभिच्छत्रुसूदना[4] ॥ गिरिगुहावासिजनजीव[5]-
ना ॥ गिरिराजभेदीसरिद्रमणा[6] ॥ गिरिराजवर्णा शशांकांका ॥ ६९ ॥ जय द्विपंचभुजा[7] पंच-
मुखा ॥ पंचाग्निसाधकप्रियकारका[8] ॥ द्विपंचवदनाभीष्टदायका[9] ॥ पंचेषुदाहका[10] पंचायतना[11] ॥
॥१७०॥ जय प्रपंचातीता त्रिलोचना ॥ त्रिपुरांतका त्रितापशमना ॥ त्रिमात्रात्मका[12] त्रिजग-
त्पावना ॥ त्रिवर्गसाधना[13] त्रिशूलधरा ॥७१॥ जय नागकुंडला नागेंद्रहारा ॥ नागेंद्रवलयी[14] ना-

ठी. १ लवकर संतुष्ट होणारा. २ नमस्कार. ३ त्रिपुरासुरास मारते वेळीं मेरूचें धनुष्य करून घेणारा. ४ दैत्यांचा नाश करणारा. ५ गुहांतून राहाणाऱ्या ऋषींचा प्रिय. ६ गंगेचा पति. ७ दशभुज. ८ पंचाग्निसांधकांचें प्रिय करणारा. ९ दशमुखरावणाची इच्छा पूर्ण करणार. १० मदनास जाळणारा. ११ मुख्य. १२ प्रणवात्मका. १३ धर्मार्थ कामाचें. १४मोठ्या सर्पांचींच कडीं केलीं आहेत ज्यानें.

गकेयूरा ॥ नागेंद्रयज्ञोपवीतधरा ॥ नागेंद्रचर्मपरिधाना ॥ ७२ ॥ जय दानवकुलनिकृंतना ॥ सज्जनार्तिहरा पतितपावना ॥ विष्णुवल्लभा विश्वोद्धरणा ॥ आद्यंतहीना स्वामिया ॥ ७३ ॥ तूं सर्वईशांचाही ईश ॥ ह्मणोनि ह्मणती तुज सर्वेश ॥ आणि कल्पांतींही नाहीं नाश ॥ ह्मणोनि अविनाश बोलिजेसी ॥ ७४ ॥ तुझा सर्वलोकोत्तर प्रभाव ॥ तुज भक्तिभावें भजतां सदैव ॥ निरसूनियां सर्व दुर्दैव ॥ प्रेमें अभिनव सुख देसी ॥७५॥ तूं पापियां भयंकर परम ॥ ह्मणोनि ह्मणती तुजला भीम ॥ सकळकल्याणांचें तूं धाम ॥ ह्मणोनि नाम शिव ऐसें ॥७६॥ सर्वदैत्यांचा साहसी मार ॥ ह्मणोनि तुजला ह्मणती कठोर ॥ परी साधुजनाविषयीं फार ॥ मृदुचि साचार अहेसी ॥ ७७ ॥ तूं काळाचाही असशी काळ ॥ ह्मणोनि ह्मणिजेसी काळकाळ ॥ आणि भक्तांविषयीं परमदयाळ ॥ भक्तवत्सल नाम तेणें ॥ ७८ ॥ सकळदानवां लाविसी भीती ॥ ह्मणोनि तुजला घोर ह्मणती ॥ परी सज्जनासि तों तुझी मूर्ती ॥ सौम्यचि निरुती दिसताहे ॥७९॥ ज्ञानोपदेशें तारिसी ह्मणोन ॥ तारक हें तुज अभिधान ॥ सर्वांहूनि तुज विशेष ज्ञान ॥ ह्मणोनि सर्वज्ञ ह्मणताती ॥१८०॥ शंकरा तुझा अपार महिमा ॥ वर्णितां तुझिये गुणनामां ॥ ठक पडलें निगमागमां ॥ कवणा सीमा सांपडेल ॥ ८१ ॥ तूं अनाथांचा नाथ एक ॥ दीनजनांचा प्रतिपाळक ॥ भक्तकैवारी पतितोद्धारक ॥ नसे आणिक कोणीही ॥ ८२ ॥ शंकरा तुझिये चरणा-लागुन ॥ अनन्यभावें रिघतां शरण ॥ सकळ संकटें निरसून ॥ सुखसंपन्न करितोस ॥ ८३ ॥ तूं देवदेवांचाही देव ॥ आप पर हा तुज ना भाव ॥ शरणागतां रक्षिसी सदैव ॥ याचा अनुभव सर्वां

असे ॥ ८४ ॥ त्रिपुरासुरें गांजिलें ह्मणोन ॥ तुजलागीं रिघतां शरण ॥ तत्काळ तयातें संहारून ॥ त्रैलोक्य संपूर्ण रक्षिलेंसी ॥ ८५ ॥ जेव्हां मातोनि अंधकासुर ॥ सर्व निर्जर केले जर्जर ॥ तें तूं धांवण्या धांवूनि सत्वर ॥ वेगें असुर संहारिला ॥ ८६ ॥ समुद्रमथनीं विष उदेलें ॥ तेणें त्रिभुवन पोळूं लागलें ॥ तेव्हां तुझीं स्मरतां पाउलें ॥ विष तें प्राशिलें स्वयें- ची ॥ ८७ ॥ ऐसा तूं शरण्य देवदेव ॥ दीनकैवारी करुणार्णव ॥ आहेसि हा पूर्ण अनुभव ॥ आह्मां सदैव आला असे ॥८८॥ ह्मणोन आह्मी सर्व मिळोन ॥ तव चरणा आलों शरण ॥ पाहा हें आजि कल्पांतासमान ॥ संकट दारुण पातलेंसे ॥ ८९ ॥ श्रीमद्राघवेंद्राची जाया ॥ सीता- नाम्नी जनकतनया ॥ श्रीराम रणीं पावला विलया ॥ ह्मणोनि आर्या कोपिन्नली ॥ ९० ॥रूप धरूनियां विकट ॥ नृत्य चालविलें असे उद्भट ॥ तेणें शैलाब्धिकाननासकट ॥ मेदिनी उलटूं पाहाताहे ॥ ९१ ॥ब्रह्मांडाचा होणार प्रळय ॥ भूतें करिताति हायहाय ॥ पुढें न सुचे कांहीं उपाय ॥ ह्मणोनि पाय धरिले हे ॥ ९२ ॥ तरी दयाळा कृपा करून ॥ सकळ भूतांचें करीं रक्षण ॥ निर्वाणीं रक्षक तुजवांचून ॥ नसे आन कोणीही ॥ ९३ ॥ ऐशी सुरांची प्रार्थनावा- णी ॥ ऐकूनि तोषला पिनाकपाणी ॥ ह्मणे देव हो चिंता त्यजूनी ॥ सकळीं स्वस्थानीं राहिं- जे ॥९४॥ तुमचें हें अभिनव भय ॥ समूळ निरसितों निःसंशय ॥ ऐसें बोलूनि पार्वतीप्रिय ॥ करी काय अवधारा ॥ ९५ ॥ रणांगणीं जानकी जेथ ॥ नाचत होती मातृकांसहित ॥ तये- स्थानीं तो कैलासनाथ ॥ पावला त्वरित स्वयेंची ॥९६॥ आणि सशैलवना धरादेवी ॥ यथा-

पूर्वें सुस्थिर व्हावी ॥ ह्मणोनि विचित्र माया शैवी ॥ तत्काळ नवी उद्भविली ॥९७॥ आत्म-
याचें करूनि स्तंभन ॥ प्रेतरूपधारी झाला आपण ॥ सीतेच्या पायांतळीं राहून ॥ तद्द्वार संपू-
र्ण साहिला ॥ ९८ ॥ ऐसा तो प्रेतरूपधारी शूली ॥ राहातां सीतेच्या पायांतळीं ॥ सशैलवना
धरा सगळी ॥ सुस्थिर झाली साचार ॥ ९९ ॥ तथापि जे उपरिस्थ लोक ॥ सत्यलोका-
पर्यंत अनेक ॥ ते सर्व सुस्थिर राहाया एक ॥ क्षणमात्र देख शकतना ॥२००॥ सीतेचे पाद-
शब्द थोर ॥ शिरश्चालनें अतिकठोर ॥ वारंवार निश्वाससमीर ॥ आणि हुंकार घोर तें-
सेची ॥१॥ यांचियेनि ते भूर्भुवादिक ॥ डळमळूं लागले सर्व लोक ॥ विप्रा तो समय भयानक ॥
काय अधिक निवेदावा ॥२॥ अरे त्या मेदिनीसुतेनें पाहीं ॥ रावणासि मारूनि लवलाहीं ॥ अत्या-
नंदें रणांगणाठायीं ॥ भयंकर नृत्य केलें जें ॥३॥ तयासि सर्व द्विजेंद्र येथ ॥ अंतरीं स्मरोनि भयभी-
त ॥ जयति जयति सीता सतत ॥ ऐसें बोलत साक्षेपें ॥४॥ आणि इंद्रादिक देवमंडळ ॥ आजि
भंगतें ब्रह्मांड सकळ ॥ ऐसें अंतरीं मानूनि केवळ ॥ दुःखित तत्काळ जाहले ॥५॥ ऐसें श्रीमद्वाल्मी-
क ऋषी ॥ सांगते झाले शिष्योत्तमासी ॥ तेंचि म्यां समस्त श्रोतयांसी ॥ यथामती कथियेलें ॥६॥
आतां ब्रह्मेंद्रादिदेव संपूर्ण ॥ जानकीचें करतील स्तवन ॥ ती कथा परम पावन ॥ पुढच्या
प्रसंगीं वर्णिजेल ॥७॥ तरी सकळसज्जनीं पूर्ण ॥ सावध राहिंजे श्रवणालागुन ॥ हेंचि मी श्रीरघु-
नाथनंदन ॥ करद्वय जोडून प्रार्थितों ॥८॥ स्वस्ति श्रीमदद्भुतरामविजय ॥ वाल्मीकीयताद्भुतोत्तरकां-
डहृदय ॥ ऐकोत सज्जन होऊनि तन्मय ॥ चतुर्विंशाध्याय मधुर हा ॥२०९॥ ॥ अध्याय ॥२४॥

श्रीगणेशायनमः ॥ ॥ जयजय प्रभो रघुवीरा ॥ कौसल्यात्मजा रणरंगधीरा ॥ इक्ष्वाकुकुल-
प्रकाशकरा ॥ परमोदारा श्रीरामा ॥१॥ जय विषकंठमनोविश्रामा ॥ अहल्योद्धारका पूर्णका-
मा ॥ त्रितापतप्तजनआरामा ॥ दुष्टत्रियामाचरांतका ॥२॥ अनंतकोटिब्रह्मांडजनका ॥ अनं-
तशयना जगद्व्यापका ॥ अनंतमायाचक्रचाळका ॥ अनंतशीर्षका अनंता ॥३॥ अनंतवेषा अजा
अच्युता ॥ सर्वात्मका षड्भावरहिता ॥ षड्रिपुछेदकप्रतापवंता ॥ षड्गुणसहिता गोविंदा ॥ ४ ॥
असंख्यविश्वांकुरमूलकंदा ॥ साधुहृदयारविंदमिलिंदा ॥ स्वजनचातकनवनीरदा ॥ सच्चिदानंदा
स्वसंवेद्या ॥५॥ जननमरणरोगवैद्या ॥ सकळवेदस्वरूपा आद्या ॥ वेद पाळका वेदवंद्या ॥ वेदांत-
वेद्या नारायणा ॥६॥ हे विश्वोद्भवस्थित्यंतकारणा ॥ रामा वंदितों तव चरणा ॥ ममहृदयीं करूनि
प्रेरणा ॥ पुढिल रचना बोलवीं ॥७॥ पूर्वाध्यायांतीं निरूपण ॥ सीतेचें नृत्य चालतां दारुण ॥ सर्व
ब्रह्मांड बुडतें जाणुन ॥ देव संपूर्ण घाबरले ॥ ८ ॥ पुढें कथा वर्तली कैसी ॥ वर्णितों ऐकिजे
सावपणेंसीं ॥ आदिकवि श्रीवाल्मीकऋषी ॥ भारद्वाजासी सांगत ॥ ९ ॥ ह्मणे गा विप्रेंद्रा सा-
वधान ॥ राहूनि ऐकें संपूर्ण ॥ जें तें सीतेनें क्रोधेंकरून ॥ नृत्य दारुण चालविलें ॥ १० ॥

---

टी. १ इक्ष्वाकुराजाच्या कुळास प्रकाशित करणारा. २ शंकराच्या मनास विश्रांति देणारा. ३ तापत्रयानें तप्त झालेल्या जनांस सुख देणारा. ४ दुष्ट राक्षसांचे नाशका. ५ शेषशायी. ६ अनंत आहेत शिरें ज्यास. ७ असणें, होणें, वाढणें, परिणाम पावणें, क्षीण होणें आणि नाश पावणें या सहाभावांनीं रहित. ८ कामादि साहा शत्रूंस तोडण्याविषयीं आहे पराक्रम ज्याचा. ९ साधूंच्या हृदयकमळांत भ्रमराप्रमाणें तल्लीन असणारा. १० स्वजनरूप चातकाची मेघाप्रमाणें तृप्ति करणारा. ११ सावधपणानें.

तैं तियेच्या क्रोधवेगास ॥ पाहूनि ब्रह्मदेवादि त्रिदश ॥ आणि ऋषिपितरांसह दिगीश ॥ अंतरीं विशेष घाबरले ॥ ११ ॥ मग ते सर्व एकत्र मिळोन ॥ सीतेलागीं कराया प्रसन्न ॥ समुद्युक्त झाले तत्क्षण ॥ करित स्तवन सादर ॥ १२ ॥ धरणीवरी वारंवार ॥ दंडवत् घातले नमस्कार ॥ पुनश्च जोडूनि उभय कर ॥ स्तुति मधुर आरंभिली ॥ १३ ॥ ह्मणती हे जगन्माते पाहीं॥ जीविणें अन्य कांहींच नाहीं ॥ निष्कलतत्वाचिये ठायीं ॥ एकत्वें सदाही वर्तत ॥ १४ ॥ ऐशी जी माहेश्वरी शक्ती ॥ ज्ञानरूपा स्वयंज्योती ॥ तीच तूं रामवल्लभा सती ॥ सीता भगवती आहेस ॥ १५ ॥ आणि जी स्वाभाविकी शक्ती ॥ तियेचें मूळ तूंच निश्चिती ॥ तुजविण तियेची उत्पत्ती ॥ नव्हे कदाही साचार ॥ १६ ॥ जैसी भानूची प्रभा निर्मळ ॥ तियेचें भानूच असे मूळ ॥ तेंवीच स्वाभाविकीचें सोज्वळ ॥ तूंचि मूळ आहेसी ॥ १७ ॥ आणि तीच तूं वैष्णवी नामक ॥ ह्मणजे सर्व ब्रह्मांडव्यापक ॥ ऐशी शक्ति असोनि एक ॥ कोपें अधिक प्रज्वळोनी ॥ १८ ॥ परमेश्वरस्वरूपाहुनी ॥ अन्यरूपातें स्वीकारुनी ॥ श्रीरामसंनिध ह्या रणांगणीं ॥ क्रीडा करित आहेस ॥ १९ ॥ आणि ती ही तूं अन्यदेवतां ऐसी ॥ अस्मदादिकांलागीं भाससी ॥ परी तूं सर्वजगासि करिसी ॥ जग हें तुझेंचि कार्य असे ॥ २० ॥ कार्य आणि कारण ॥ यांतूनि ईश्वर नव्हेचि कवण ॥ कर्तृत्वादिक संपूर्ण ॥ तुझेचि गुण साचार ॥ २१ ॥ जी तूं श्रीरामपत्नी सीता ॥ इयेच्या अधिष्ठानवशें सर्वथा ॥ देवीच्या स्वरूपत्वें तत्वता ॥ चार

टी. १ देव. २ दिक्पाळ ( लोकपाळ ). ३ परब्रह्माठायीं. ४ रामाची स्त्री. ५ आश्रय असल्यामुळें.

शक्ती आहेत ॥ २२ ॥ त्या शांति विद्या प्रतिष्ठा निवृत्ती ॥ ऐशानामीं प्रसिद्ध असती ॥ आणि परमेश्वरीं त्या शक्ती ॥ सदा वसती पूर्णपणें ॥ २३ ॥ तेणें त्या ईश्वरालागुन ॥ चतुर्व्यूह ऐसें ह्मणती जन ॥ संकर्षण वासुदेव प्रद्युम्न ॥ अनिरुद्ध हा चतुर्व्यूह ॥ २४ ॥ माये तूं जी ही परा भगवती ॥ इयेच्याच योगें देवही निरुती ॥ निरंतर स्वात्मानंदाप्रती ॥ उत्तमरीतीं भोगिताहे ॥ २५ ॥ आणि अतुल[1] अनादिसंसिद्ध ॥ जें महदैश्वर्य आहे प्रसिद्ध ॥ तें परमात्मयें रामें विशुद्ध ॥ तुझ्याचि संबंधें पविजेलें ॥ २६ ॥ ऐशी तीच ही तूं देवी एक ॥ सर्वेश्वरी निरुपाधिक ॥ सर्व भूतांची प्रवर्तक ॥ अचिंत्यरूपा[2] आहेसी ॥ २७ ॥ आणि जियेचेनि पुरुषोत्तम ईश ॥ मायावी होत्साता विशेष ॥ ह्या स्थिरचरात्मक सर्वजगास ॥ सदा भ्रमवित आहे पैं ॥ २८ ॥ तीच ही तूं मायात्मिका शक्ती ॥ सनातनी[3] सर्वाकारवती ॥ महेशाच्या वैश्वरूप्याप्रती[4] ॥ सदा प्रकाशित करितेस ॥ २९ ॥ ऐशी तूं सकळमायात्मिक ॥ सनातन शक्ति असोनि एक ॥ तुवांचि अन्य मुख्य अनेक ॥ शक्ति निर्मिल्या आहेती ॥ ३० ॥ त्यांत प्रथम ज्ञानशक्ती ॥ दुसरी असे क्रियाशक्ती ॥ तैशीच तिसरी प्राणशक्ती ॥ ऐसें हें त्रय मुख्य असे ॥ ३१ ॥ आणि सर्व शक्तींचे शक्तिमंत ॥ तेही तुवां निर्मिले समस्त ॥ यद्यपि शक्तींचीं नामें बहुत ॥ तरी मुख्य शक्ति एकची ॥ ३२ ॥ तैसाचि शिवही असे एक ॥ तया वांचूनि नाहीं आणिक ॥ ह्मणोनि सर्वीं शिवचि देख ॥ शक्तिमान बोलिजेतो ॥ ३३ ॥ तत्त्व

टी. १ अनुपम. २ जियेच्या रूपाचें चिंतन करतां येत नाहीं अशी. ३ निरंतर असणारी. ४ विश्वरूपपणाला.

द्रष्टे योगि समस्त ॥ शक्तिशिवांचा अभेद पाहात ॥ जगीं शक्ति तितुकी यथार्थ ॥ जानकीदेवीच एक असे ॥ ३४ ॥ आणि शक्तिमंत तितुके जाण ॥ एक राघवचि असे आपण ॥ जगांत सीतारामांविण ॥ नसे आन कांहींच ॥ ३५ ॥ आणि पुराणांमाजी तत्ववाद्यांहीं ॥ हाचि विशेष कथिजेतो पाहीं ॥ कीं श्रीरामपत्नी वैदेही ॥ विश्वेश्वरी भोग्या असे ॥ ३६ ॥ आणि भगवान् रघुनायक ॥ मुख्य भोक्ता असे देख ॥ मंता राम आणि मति एक ॥ सीता ऐसें जाणिजे ॥ ३७ ॥ माते तुझी स्वरूपस्थिती ॥ जाणाया समर्थ कोण जगतीं ॥ जैशी जैशी जयाजी मती ॥ तैसेचि तर्किती केवळ ॥ ३८ परी अचल एक सर्वगत ॥ सूक्ष्म सनातन कूटस्थ ॥ अजर चैतन्यस्वरूप अनंत ॥ निष्कल परब्रह्म जें ॥ ३९ ॥ तेंचि पैं तुझें मुख्य स्थान ॥ ऐसें पाहती योगिजन ॥ ईश्वराऐसेचि सकळ गुण ॥ असती पूर्ण जिये माजी ॥ ४० ॥ तीच तूं साक्षात्परमेश्वरी ॥ आनंदाब्धिइच्छिणाऱ्यांवरी ॥ सर्वप्रकारें धात्रीपरी ॥ कृपा करूनि साक्षेपें ॥ ४१ ॥ तयांचे संसारताप सर्व ॥ ईश्वराश्रयें हरिसी सदैव ॥ माते तुझें विचित्र वैभव ॥ यथार्थ सर्व नेणवेची ॥ ४२ ॥ ऐसी तूं महेश्वरी जानकीये ॥ तुझें सामर्थ्य लोकोत्तर आहे ॥ तरी सर्वभूतांचा संहार माये ॥ त्वां न कीजिये एधवां ॥ ४३ ॥ आतांच त्वां ह्या रावणातें ॥ सपरिवार मारूनि स्वहातें ॥ चतुर्दशभुवनात्मकजगातें ॥ सुखी निगुतें केलेंसी ॥ ४४ ॥ ऐसें असतां पुनश्च नूतन ॥ ऐशीही नृत्यकळा चालवून ॥ सर्व जगाचा संहार दारुण ॥ किं

टी. १ दुसरें. २ सर्वांतर्यामी (सर्वव्यापक). ३ निरंतर असणारें (जन्मादिरहित). ४ जरारहित. ५ दाईप्रमाणें.

कारण करितेस ॥ ४५ ॥ जरी तान्ह्या बाळकावर ॥ स्वयें माताच होईल क्रूर ॥ तरी त्या बाळें जोडूनि कर ॥ कवणा सादर विनवावें ॥ ४६ ॥ पक्ष्यांवर कोपेल निराळ[1] ॥ तरी ते कैसे वांचतील ॥ किंवा मीनांतें[2] टाकील जळ ॥ तरी रक्षील कोण तयां ॥ ४७ ॥ एतदर्थ[3] विचार करीं ॥ तूं जगाची माता खरी ॥ क्रूरता टाकूनियां सत्वरी ॥ रक्षण करीं जननीये ॥ ४८ ॥ ऐसी ब्रह्मदेवादिकांची वाणी ॥ ऐकूनियां ती जनकनंदिनी ॥ संतुष्ट होत्साती तत्क्षणीं ॥ तयांलागुनी बोलत ॥ ४९ ॥ ह्मणे देव हो तुह्मी समस्त ॥ वदलेति तें सर्व यथार्थ ॥ परी पाहा हा समय अद्भुत ॥ अति विपरीत पातला ॥ ५० ॥ माझा पति पुंडरीकनयन[4] ॥ क्षुरप्रें[5] हृदयीं विद्ध[6] होउन ॥ पुष्पकामाजी रघुनंदन ॥ प्रेताप्रमाण पडलासे ॥ ५१ ॥ अहो हा माझा प्राणप्रिय ॥ येथें पावला असतां विलय[7] ॥ मी जगद्धित इच्छितें काय ॥ करीन प्रलय क्षणामाजी ॥ ५२ ॥ पहा हें चराचर सकळ ॥ याचा करतें एकचि कवळ[8] ॥ आतां मजपुढें ठाकेल काळ ॥ तरी त्या तत्काळ गिळीन ॥ ५३ ॥ ऐसी तियेची सरोष वाणी ॥ ऐकूनि भ्याले सुधापानी[9] ॥ हाहाकार केला तत्क्षणीं ॥ सकळ मेदिनी[10] थरारली ॥ ५४ ॥ मग पुष्पकामाजी रघुनाथ ॥ शवतुल्य[11] पडला होता जेथ ॥ तेथें सकळदेवांसहित ॥ सावित्रीकांत[12] पावला ॥ ५५ ॥ सर्वेचि आपुल्या अमृतहस्तीं ॥ स्पर्श केला त्या राघवाप्रती ॥ तेणें तो मंगळभगिनीपती[13] ॥

टी. १ आकाश. २ मत्स्यांला. ३ याविषयीं. ४ कमलाप्रमाणें आहेत नेत्र ज्याचे असा (राम). ५ वस्त्र्याप्रमाणें प्रखर बाणानें ६ भिन्न (वेद). ७ नाश (मृत्यु). ८ ग्रास. ९ देव. १० पृथ्वी. ११ प्रेताप्रमाणें. १२ ब्रह्मदेव. १३ जानकीचा पति ( राम ).

पावला स्मृती तत्काळ ॥५६॥ आणि निजेला उठे अकस्मात ॥ तैसाच उठला सीताकांत ॥ प्रज्ञनयन आकर्ण विस्तृत ॥ पुशित बोलत आवेशें ॥५७॥ म्हणे रेरे रावणा नष्टा ॥ सहस्रमुखा पापिया भ्रष्टा ॥ सर्वत्रिभुवना पीडूनि दुष्टा ॥ बहुत चेष्टा लाविल्यास ॥ ५८ ॥ माझे नर वानर राक्षस ॥ यांसि त्वां दीधला बहु त्रास ॥ असो आतां तयाचें विशेष ॥ फळ अशेष भोगीं तूं ॥५९॥ आजि तूं माझ्या बाणसंघेंसीं ॥ छिन्नभिन्नांग होऊनि त्वरेंसीं ॥ यमाच्या भ्रूकुटिभीषणास्यासी ॥ निश्चयेंसीं पाहाशील ॥ ६० ॥ ऐसें बोलत रघुनंदन ॥ हातीं घेऊनि धनुर्बाण ॥ पुढें पाहे तों देव संपूर्ण ॥ हस्त जोडून तिष्ठत ॥ ६१ ॥ आणि प्राणाहूनिही प्रिय अत्यंत ॥ जानकी न दिसे कोठें तेथ ॥ मातृकांचे गणमात्र बहुत ॥ रणीं दिसत चहूंकडे ॥ ६२ ॥ आणि त्यांमाजी रणांगणीं ॥ काली देखिली विकटरूपिणी ॥ जियेसि चार भुजा आणी ॥ जिव्हा वदनीं ललललित ॥ ६३ ॥ खड्गखर्परें उभयहातीं ॥ अति भयानक धरलीं असती ॥ शवरूपशिवाच्या हृदयावरती ॥ करूनि स्थिती नाचताहे ॥६४॥ महाभयानक सर्व आकार ॥ रुधिर प्राशित वारंवार ॥ महावृक्षींचे जैसे कोटर ॥ तैसे घोर नेत्र दिसती ॥६५॥ सर्वदा क्षुधाक्रांत पोट ॥ जगद्ग्रासार्थ उत्साह उद्भट ॥ गळां मुंडमाळांचीं विकट ॥ भूषणें सघट रुळती पैं ॥ ६६ ॥ प्रळयकाळींचा अंधकार ॥ तैसा अंगाचा वर्ण घोर ॥ विकटास्यांतूनि निरंतर ॥ घर्घरस्वर चाललासे ॥ ६७ ॥ राक्षसांचिये अंत्रांसहित ॥ मुंडमाळा लेइल्या असत ॥

टी. १ कानापर्यंत. २ वक्रभोंवयांनीं भयानक अशा मुखाला. ३ प्रेतरूपधारी शिवाच्या. ४ रक्त. ५ पक्ष्यादि राहाण्याच्या ढोली. ६ मोठीं.

शिरकरोट्या नेत्रगोळ त्यांत ॥ असंख्यात रुळती पां ॥ ६८ ॥ ऐसी ती स्वयें असोनि एक ॥
तियेऐसेचि भयानक ॥ इतर मातृगणही देख ॥ भोंवती अनेक असती जे ॥ ६९ ॥ तयां संगें
त्या रणांगणांत ॥ परमानंदें असे क्रीडत ॥ रावणांचीं मुंडें सतत ॥ कंदुकवत फेंकिताहे ॥७०॥
आणि थैथै नाचे विचित्रगती ॥ तैशाच मातृकाही नाचती ॥ एकींपुढें एक धांवती ॥ शिरें
झेलिती चेंडूंपरी ॥ ७१ ॥ आणि राक्षसांचीं कबंधें त्यांत ॥ तियेसंगें नाचताहेत ॥ गजादि-
कांचीं शकलें बहुत ॥ पडलीं असत सर्वत्र पैं ॥ ७२ ॥ महारथांचे होऊनि तुकडे ॥ विखुरले
असती चहूंकडे ॥ गदा परिघ शर चापें खांडे ॥ असंख्य पडले आहेत ॥ ७३ ॥ हस्तपादशिर
संयुक्त ॥ एकही राक्षस नसे तेथ ॥ सर्वावयव तुटोनि समस्त ॥ पडले असत चहूंकडे ॥७४॥
जे जे कबंध तेथें नाचती ॥ त्यांसचि मात्र पाद असती ॥ तयांवाचूनि सर्वांचीं निरुती ॥
झालीं आहेती खंडखंडें ॥७५॥ आणि रावणाचा कबंध घोर ॥ नाचत आहे कालीसमोर ॥
द्विसहस्रकरीं शस्त्रें प्रखर ॥ भयंकर चमकती ॥७६॥ असो ऐसें तें यमपुरीसमान ॥ अति
भयानक रणांगण ॥ आणि मातृगणासहवर्तमान ॥ काली नर्तन करिताहे ॥७७॥ तें सर्व दे-
खूनि रघुनाथ ॥ अंतरीं झाला बहु चकित ॥ महाभयें शरीर समस्त ॥ थर्थर कांपूं लागलें ॥
॥ ७८ ॥ हातांतून धनुष्यबाण ॥ मेदिनीवरी पडले जाण ॥ पद्मापरि प्रफुल्ल नयन ॥ तेही त-
त्क्षण मिटले पैं ॥ ७९ ॥ ऐशी रामाची झाली स्थिती ॥ देव पडले संशयावर्तीं ॥ आतां करा-

टी. १ चेंडूप्रमाणें. २ धडें. ३ तुकडे. ४ नृत्य ( नाच ). ५ टवटवित. ६ संशयाच्या भोंवऱ्यांत. + खड्गें.

वें काय पुढती ॥ कवणासि मती सुचेना ॥ ८० ॥ तैं हस्त जोडूनियां विधाता ॥ विनयें निववी सीताकांता ॥ ह्मणे हे प्रभो कैवल्यनाथा[2] ॥ काय ही अवस्था मांडिलीस ॥ ८१ ॥ तूं रावणाच्या शराघातें ॥ अति विव्हल पडलास येथें ॥ आणि रावण चढला कोपातें ॥ ऐसें सीतें देखिलें जैं ॥ ८२ ॥ तैं इयेनें केली तांतडी ॥ विकटरूपिणी झाली रोकडी ॥ विमानांतूनि लवंडसवडी[3] ॥ टाकिली उडी आवेशें ॥ ८३ ॥ सवेंचि रणांगणीं ठाकून ॥ हस्तीं घेतलें खड्ग दारुण ॥ राक्षसेंद्राचीं शिरें तत्क्षण ॥ रोषें संपूर्ण तोडिलीं ॥८४॥ तैसेचि सर्व निशाचरही ॥ मारूनियां पाडिले महीं ॥ तरुण बाळ कीं वृद्ध ह्या ठायीं ॥ एकही नाहीं उरविला ॥८५॥ मग आपुल्या रोमकूपांतून ॥ ह्या सर्व मातृका उत्पादून ॥ यांचिये संगें ही सीता आपण ॥ क्रीडत पूर्ण नाचताहे ॥ ८६ ॥ रामा इयेचा प्रभाव अद्भुत ॥ वर्णावया कवण समर्थ ॥ अस्मदादिक जे विबुधनाथ[4] ॥ हेही कुंठित होतसों ॥ ८७ ॥ प्रभो तूं निष्क्रिय[5] निर्विकार ॥ परी इयेच्या साह्यें साचार ॥ जगदुत्पत्तिस्थितिसंहार ॥ निरंतर करितोसी ॥ ८८ ॥ इयेच्या साह्याविण कांहींही ॥ कराया तुज सामर्थ्य नाहीं ॥ हेंचि सर्वां कळविण्याविषयीं ॥ इणें हें सर्वही केलेंसे ॥८९॥ जी तव कांता प्राणप्रिया ॥ सीतानाम्नी विदेहतनया[6] ॥ तीच ही पाहें आजि ह्या ठाया ॥ विकटरूपिणी जाहली ॥ ९० ॥ प्रभो ही सदसद्व्यक्तिहीन[7] ॥ वस्तुता असोनियां निर्गुण ॥ कारणपरत्वें साक्षात्सगुण ॥ होते जाण साचार ॥ ९१ ॥ ही खचितचि आहे जानकी ॥ तरी आतां

---

टी. १ ब्रह्मदेव. २ मोक्षपति. ३ सत्वर. ४ मोठमोठे देव. ५ क्रियारहित. ६ जनकाची कन्या. ७ चांगली किंवा वाईट व्यक्ति जिला नाहीं.

तूं सर्व भय टाकीं ॥ सावध होऊनियां त्रिलोकी ॥ कृपें विलोकीं सत्वर ॥ ९२ ॥ ऐशी श्रवणें- सुखदा आणि ॥ आत्महिता परमकल्याणी ॥ पद्मासनाची ऐकूनि वाणी ॥ श्रीराम मनीं संतो- षला ॥ ९३ ॥ तत्काळ सर्व टाकिलें भय ॥ अंतरींचा फिटला संशय ॥ सर्वांग झालें निरामय ॥ हृदयीं धैर्य प्रगटलें ॥ ९४ ॥ मग तो प्रभु सीताजीवन ॥ अंतरीं किंचित् विचार करून ॥ ह- ळूच उघडूनियां नयन ॥ सीतेसि पाहता जाहला ॥ ९५ ॥ ऐसें श्रीमद्वाल्मीकऋषी ॥ सांगते झाले स्वशिष्यासी ॥ पुढें रामचंद्र जानकीसी ॥ सहस्रनामांनीं स्तवील ॥ ९६ ॥ तें सीतासहस्रनामा- त्मक ॥ उत्तम स्तोत्र पुण्यकारक ॥ आणि इहपरत्र सुखदायक ॥ पुढच्या प्रसंगीं वर्णिजेल ॥ ९७ ॥ तरी तयाच्या श्रवणार्थ ॥ श्रोतीं सप्रेम असावें सतत ॥ हेंच मी श्रीरघुनाथसुत ॥ जोडूनि ह- स्त विनवितों ॥ ९८ ॥ स्वस्ति श्रीमदद्भुतरामविजय ॥ वाल्मीकीयाद्भुतोत्तरकांडहृदय ॥ ऐकोत सज्जन होऊनि तन्मय ॥ पंचविंशाध्याय मधुरहा ॥ ९९ ॥ इति पंचविंशाध्यायः समाप्तः

टी. १ कानास सुख देणारी. २ ब्रह्मदेवाची. ३ निरोगी.



॥ श्रीगणेशायनमः ॥   ॥ जयजय श्रीजानकी[1]रंगा ॥ कौसल्या[2]हृदयारविंदभृंगा ॥ उरुजटा[3]मुकुटमंडितोत्तमांगा ॥ सुकुमारांगा घनश्यामा ॥ १ ॥ अपराजिता पुरुषोत्तमा ॥ मायाचक्रचाळका पूर्णकामा ॥ विरंचिजनका[*] परब्रह्मा ॥ मंगल[+]धामा राघवेंद्रा ॥ २ ॥ संसार[4]गजविदारकमृगेंद्रा ॥ पतितपावना गुणसमुद्रा ॥ सूर्यकुळभूषणा रामचंद्रा ॥ प्रतापरुद्रा रघुराया ॥३॥ जगज्जीवना जगदात्मया ॥ दीनजनैक[5]करुणावरुणालया ॥ जगन्मोहना सर्वानंदमया ॥ अजा अजेया निरंजना ॥ ४ ॥ अपार[6]मायाश्रममोचना ॥ सनकसनंदनादिमनरंजना ॥ अज्ञान[7]ध्वांतचंडकिरणा ॥ अहल्योद्धरणा रणधीरा ॥ ५ ॥ दानव[8]काननवैश्वानरा ॥ भवहृद[9]यारविंदभ्रमरा ॥ स्वजनें[10]चातकजलधरा ॥ परमोदारा परब्रह्मा ॥६॥ आद्यंतरहिता सच्चिद्घना ॥ अमला अनंता नारायणा ॥ सुमति देऊनि रघुनंदना ॥ ग्रंथरचना वदवीं पुढें ॥ ७ ॥ पूर्वाध्यायांतीं निरूपण ॥ चतुराननें श्रीरामालागुन ॥ सीतेच्या रूपांतराचें कारण ॥ समूळ संपूर्ण कथियेलें ॥ ८ ॥ आतां कथा अत्यंत रसिक ॥ श्रोतीं श्रवणा धरावी बीकें[11] ॥ रघुवीरभक्त मुनि वाल्मीक ॥ ह्मणती ऐक मुनिवर्या ॥ ९ ॥ अरे तें ब्रह्मयाचें ऐकूनि वचन ॥ महाभुज राम पद्म-

---

टी. १ सीतेच्या पति. २ कौसल्येच्या पुत्रा. ३ पुष्कळ जटांच्या मुकुटानें मंडित आहे मस्तक ज्याचें. ४ संसाररूप हत्तीस विदारणाऱ्या सिंहा. ५ दीनजनांविषयीं दयेच्या सागरा. ६ अपार जी माया तियेच्या श्रमापासून सोडविणारा. ७ अज्ञानरूप अंधकाराचा नाशक. ८ दानवरूप अरण्यास जाळणाऱ्या अग्नि. ९ शिवाचे हृदयकमळांत भ्रमराप्रमाणें राहाणारा. १० भक्तरूपी चातकांस तृप्त करणारा मेघच. ११ प्रीति. * ब्रह्मदेवाच्या पित्या. + सकळ कल्याणांचे स्थाना.

लोचन ॥ किंचित पावला समाधान ॥ हळुहळू नयन उघडिले ॥ १० ॥ आणि कांपतकांपत सत्वर ॥ मस्तकें नमन केलें भूवर ॥ महाकालीचें तेज प्रखर ॥ असे दुर्धर ब्रह्मांडीं ॥ ११ ॥ तेणें तो मंगळभगिनीजीवन ॥ चकितभयाकुळ ऐसा तत्क्षण ॥ तिये परमेश्वरीसि दोन ॥ करकंज[1] जोडून बोलत ॥ १२ ॥ ह्मणे ग देवी शंशाकवदने[2] ॥ मृगेंद्रमध्ये[3] विशालनयने ॥ तूं कोण कोठून येणें ॥ केलेंसि नेणें कांहींच ॥ १३ ॥ ह्मणोनि मी पुसतों तुजप्रत ॥ तरी तूं कोण आहेसि निश्चित ॥ हें मज पृच्छकालागीं समस्त ॥ सांगें यथार्थ महादेवी ॥ १४ ॥ ऐशी रामाची ऐकूनि भारती[4] ॥ मग ती योगियां अभयदाती ॥ परमेश्वरी महाशक्ती ॥ श्रीरामाप्रती बोलत ॥ १५ ॥ ह्मणे राघवा सांगतें ऐक ॥ जियेलागीं मुमुक्षुलोक ॥ अनन्य अव्यय आणि एक ॥ आहे ऐशी पाहताती ॥ १६ ॥ आणि जियेच्या आश्रयें निरुतीं ॥ महेशोंसि[5] महेशता प्राप्ती ॥ तीच मी साक्षात् परमा शक्ती ॥ आहें निश्चिती जाण पां ॥ १७ ॥ तेंवीच सर्व प्राणिमात्रांचा ॥ मी मुख्य आत्मा असें साचा ॥ शुद्धचैतन्यपणें सर्वांच्या ॥ शरीरामाजी वसताहें ॥ १८ ॥ मी साक्षात् कल्याणरूपिणी ॥ सर्वविज्ञानात्मक असोनी ॥ सर्वमूर्तीची मजपासुनी ॥ प्रवृत्ति होय जगांत ॥ १९ ॥ मी सदा विनाशरहित ॥ कदा न लागें माझा अंत ॥ मम महिमा अति अद्भुत ॥ आणि अनंत असे पैं ॥ २० ॥ संसारसागरापासून ॥ भक्तांसि मीच तारित्यें जाण ॥ ब्रह्मांडामाजी मजवांचून ॥ नसे आन[6] कांहींच ॥ २१ ॥ असो राघवा आतां तूतें ॥ परमदिव्य

टी. १ हस्तकमळें. २ चंद्रमुखी. ३ सिंहाप्रमाणें बारीक आहे कंबर जिची. ४ वाणी. ५ महेश्वरास. ६ इतर.

दृष्टि मी देतें ॥ तियें माझिये ऐश्वरपदातें ॥ सावधचित्तें विलोकीं तूं ॥ २२ ॥ ऐसें बोलूनि-यां ती भगवती ॥ विराम पावली आदिशक्ती ॥ तों तियेचें परमात्मरूप निरुती ॥ रामें अ-वचितीं पाहिलें ॥ २३ ॥ तें दिव्य स्वरूप अलौकिक ॥ काय वर्णूं मी एकमुख ॥ कोटिसूर्यां-समान देख ॥ सर्वत्र बीक[1] पसरलें ॥ २४ ॥ सहस्रज्वाळाकल्लोळ विशाळ ॥ तयीं व्यापिलें सर्व निराळ ॥ शतशः प्रदीप्तकाळानळ ॥ तैसेंच केवळ दिसे पैं ॥ २५ ॥ महादंष्ट्रा विक्राळ अस-ती ॥ तेणें दुर्धर्ष दिसे जगतीं ॥ जटामंडलें मंडित अती ॥ त्रिशूळ हातीं धरियेला ॥ २६ ॥ ऐसें अत्यंत भयदायक ॥ घोर स्वरूप असोनि एक ॥ पुनश्च तेंचि रम्य सुरेख ॥ दिसे देख कैसें कीं ॥ २७ ॥ कोटिशारदद्विजराज[2] ॥ तैसें विलसे सर्वांगतेज ॥ सुशांत सौम्य मुखपंकज[3] ॥ प्रफुल्ल सहज स-र्वदा ॥ २८ ॥ अनंत ऐश्वर्यें मूर्तिमंत ॥ तयेस्वरूपीं सदा वसत ॥ चंद्रकळा सुरेख बहुत ॥ भाळीं सतत प्रकाशे ॥ २९ ॥ रत्नजडित किरीट शिरीं ॥ हस्तीं शोभे गदा साजिरी ॥ पदपं-कजीं नूपुरें बरीं ॥ हंसांपरी रुणझुणत ॥ ३० ॥ अम्लानपंकजमाळा[4] कंठीं ॥ दिव्य अंबरें[5] वि-लसे कटीं ॥ नानादिव्यगंधांची उटी ॥ सर्वांगीं गोमटी विलसत ॥ ३१ ॥ हस्तीं शंखचक्रें प-वित्र ॥ त्रिगुणात्मक तीन नेत्र ॥ अंगावरी शोभे विचित्र ॥ चर्मोपवस्त्र[6] साजिरें ॥ ३२ ॥ जया जैशी इच्छा अंतरीं ॥ तैशीच तया दिसे सत्वरी ॥ सर्वब्रह्मांडाचिये भीतरी ॥ आणि बाहेरी असोनियां ॥ ३३ ॥ बाह्याभ्यंतराहूनिही पर ॥ सदा वर्ते निर्विकार ॥ सर्वशक्तिमय सर्वाकार ॥

टी. १ तेज. २ शरदृतूंतील चंद्र. ३ मुखकमळ. ४ कधींच न सुकणाऱ्या कमळांची माळ. ५ वस्त्र. ६ चर्माचें आंगवस्त्र.

साक्षात साचार सनातन ॥ ३४ ॥ असंख्यात चरण पाणी ॥ असोनियां सर्वबाजूंनीं ॥ असंख्य नयन मुखें आणी ॥ शिरेंही असती तैशींच ॥ ३५ ॥ आणि सर्वविश्वासि व्यापून ॥ पूर्णपणें विलसे आपण ॥ नानाभूषणें देदीप्यमान ॥ शोभा कवण वर्णील ॥ ३६ ॥ आणि जयाच्या पदाब्जालागुनी ॥ ब्रह्मा इंद्र उपेंद्र आणी ॥ योगींद्रही हस्त जोडुनी ॥ स्तवित राहिले आहेती ॥ ३७ ॥ ऐसें तें सर्वलोकातीत ॥ अचिंत्यातर्क्य श्रुतिप्रणीत ॥ परमात्मस्वरूप अत्यद्भुत ॥ परम दिव्य असे पैं ॥ ३८ ॥ तयासि त्या दिव्यदृष्टीनें पूर्ण ॥ पाहूनियां तो रघुनंदन ॥ अंतरामाजी चकित होऊन ॥ अत्यंत जाण घाबरला ॥ ३९ ॥ तैं त्यापरमेश्वरीनेंच पाहीं ॥ आवेश केला तयाच्या देहीं ॥ तेणें तो पुनश्च लवलाहीं ॥ सावध कांहीं जाहला ॥४०॥ मग मन योजूनि ईश्वराठायीं ॥ ॐकारातें स्मरत हृदयीं ॥ अष्टोत्तरसहस्रनामांहीं ॥ स्तविता झाला तियेतें ॥ ४१ ॥ तीं त्या परमेश्वरींचीं नामें ॥ विप्रवरा सांगतों अनुक्रमें ॥ जीं कां पढतां नित्य प्रेमें ॥ मानव नेमें मुक्त होय ॥ ४२ ॥ ॥ ॐसीता उमा परमाशक्ती ॥ अनंता निष्कला शांता शाश्वती ॥ अमला माहेश्वरी चिच्छक्ती ॥ नित्या परमा अक्षरा ॥ ४३ ॥ शिवात्मा अचिंत्या केवलानंता ॥ परमात्मिका अनादी मायातीता ॥ एका अनेकविभागस्था ॥ अव्यया शुद्धा देवात्मा ॥ ४४ ॥ सुनिर्मला महामाहेश्वरी ॥ सर्वगोचरा अयुताक्षरी ॥ महादेवी रावणांतकरी ॥ शक्ता काष्ठा निरंजना ॥ ४५ ॥ सर्वांतरस्था रम्या निवृत्ती ॥ अतिलालसा जानकी शांती ॥ मिथिलानंदा व्योममूर्ती ॥ राक्षसांतविधायिनी ॥४६॥

रामवक्षस्थलालया अच्युता ॥ सर्वात्मिकोमा विद्या लता ॥ ज्योतीरूपा मलवर्जिता ॥ व्योमाधारा व्योममयी ॥ ४७ ॥ सर्वेषांप्रतिष्ठा पुरुषेश्वरी ॥ अमृतप्रदा प्राणेश्वरी ॥ अनादिनिधना योषा ईश्वरी ॥ अमृतस्यांतसंश्रया ॥ ४८ ॥ नंदप्रथमजा कलाकुला ॥ कारणात्मा परमाकला ॥ प्राणेश्वरप्रिया नाभि कला ॥ प्राणरूपा प्रधानम् ॥ ४९ ॥ मातामही महिषवाहिनी ॥ सर्वशक्ति काष्ठा सनातनी॥महिमास्पदा आकाशयोनी ॥ अनादि ज्योत्स्ना इंदूची॥५०॥ सर्वकार्यनियंत्री दुरासदा ॥ मूलप्रकृति महानंदा ॥ सर्वभूतेश्वरेश्वरी वृद्धा ॥ सर्वयोगेश्वरेश्वरी ॥५१॥ योगस्था बालिका तरुणी ॥ अव्यक्तगुणा वृषवाहिनी ॥ महामाया संसारयोनी वृद्धमाता जरातुरा ॥ ५२ ॥ शवासना संसारसारा ॥ चितांतस्था सुदुष्पूरा ॥ सकला दुर्निरीक्ष्या दुर्वारा ॥ प्राणविद्या प्राणशक्ती ॥ ५३ ॥ सर्वशक्तिसमुद्भवा योगिनी ॥ महाविभूति शब्दयोनी ॥ दुर्धर्षा सर्गस्थित्यंतकारिणी ॥ सुदुर्वाच्या दुरत्यया ॥५४॥ परमात्मा अनाद्यनंतविभवा ॥ पुरुषोबली नादाख्या ध्रुवा ॥ चिन्मयी मूलप्रकृतिसंभवा ॥ नादविग्रहा शब्दमयी ॥ ५५ ॥ प्रधानपुरुषातीता पुराणी ॥ प्रधानपुरुषात्मिका व्यापिनी ॥ पुंसामादि पुरुषरूपिणी ॥ भूतांतरात्मा कूटस्था ॥ ५६॥ महापुरुषसंज्ञिता प्रधाना ॥ जन्ममृत्युजरातीता गुणा ॥ त्रितत्वा क्षेत्रज्ञा अव्यक्तलक्षणा ॥ अनवच्छिन्ना सुप्रवेशिनी ॥५७॥ सर्वशक्तिसमन्विता प्रकृती ॥ अनादिमायासंभिन्ना महती ॥ महामायासमुत्पन्ना शक्ती ॥ तामसी व्यक्ताव्यक्तात्मिका ॥ ५८ ॥ पौरुषं शुक्ला कृष्णा रक्ता ॥ प्रसूतिका स्वकार्या व्यक्ता ॥ प्रथमजा ब्राह्मी हृदिस्थिता ॥ ब्रह्म-

संश्रया ब्रह्ममूर्ती ॥ ५९ ॥ ब्रह्मास्या सत्या कार्यजननी ॥ जैत्री जयश्री जयशालिनी ॥ जित्वरी जयदा ज्ञानरूपिणी ॥ वैराग्यैश्वर्यधर्मात्मा ॥ ६० ॥ अपायोनि स्वयंभूति सुखदा ॥ संक्षोभकारिणी मानसी शुभदा ॥ अंबिका भुक्तिमुक्तिफलमदा ॥ तत्वसंभवा महालक्ष्मी ॥ ६१ ॥ सुभा शर्वाणी ईश्वराणी ॥ माहेश्वरीसमुत्पन्ना रुद्राणी ॥ शंकरार्धशरीरिणी भवानी ॥ सर्वेश्वरी नित्या सर्ववर्णा ॥ ६२ ॥ मुदितमानसा सुमंगला ॥ ब्रह्मेंद्रोपेंद्रनमिता पद्ममंगला ॥ शंकरेच्छानुवर्तिनी कमला ॥ परमानंददायिनी श्री ॥ ६३ ॥ ईश्वरार्धासनगता रात्री ॥ रघूत्तमपतिव्रता सावित्री ॥ गुणाढ्या सर्वा हिमवत्पुत्री ॥ पार्वती सकृद्विभाविता ॥ ६४ ॥ लक्ष्मी समुद्रपरिशोषिणी ॥ योग्या ज्ञानमूर्ति विकाशिनी ॥ अनंतोरसिस्थिता भगिनी ॥ सरोजनिलया योगदा ॥ ६५ ॥ शुभ्रा योगनिद्रा सुदर्शना ॥ सरस्वती सर्वविद्या सुशोभना ॥ जगज्ज्येष्ठा विचित्रमुकुटानना ॥ वरदा वाच्या वासवी ॥ ६६ ॥ सर्वार्थसाधिका वागीश्वरी ॥ सर्वविद्या कीर्ति विश्वंभरी ॥ महाविद्या पूजा विभावरी ॥ गुह्यविद्या आणि आत्मविद्या ॥ ६७ ॥ सर्वविद्या आत्मभाविता श्रुती ॥ स्वाहा स्वधा सिद्धि मेधा धृती ॥ नाभि सुनाभि माधवी सुकृती ॥ सौम्या शोभा नरवाहिनी ॥ ६८ ॥ वंशकरी लीला मानिनी ॥ परमेष्ठिनी भोगदायिनी ॥ त्रैलोक्यसुंदरी कामचारिणी ॥ रम्या सुंदरी पापहरा ॥ ६९ ॥ महामहिषमर्दिनी कांता ॥ हंसाख्या दिव्याभरणभूषिता ॥ नंदिनी महानुभावमध्यस्था ॥ जगत्सृष्टिविवर्धिनी ॥ ७० ॥ व्योमनिलया आदित्यवर्णा ॥ चित्रांबरधरा विवाहना ॥ नियंत्रा कौमारी लेलिहाना ॥ मंत्रवा-

हस्था विरूपाक्षी ॥ ७१ ॥ भद्रकालिका वृषासनगता ॥ मयूरवरवाहिनी नियता ॥ गौरी महा-
काली सुरार्चिता ॥ अदिति रौद्री पद्मगर्भा ॥ ७२ ॥ भव्या महासुरविनाशिनी ॥ कामपूरा
विभावरी कर्षिणी ॥ भीमा प्रणतर्द्धिविवर्धिनी ॥ अनवद्यांगी महाफला ॥ ७३ ॥ मोक्षप्रदायि-
नी यशस्विनी ॥ सामगीति भक्तार्त्तिनाशिनी ॥ दीक्षा भवभावविनाशिनी ॥ सर्वातिशायिनी
विद्या पैं ॥ ७४ ॥ महेंद्रविनिपातिनी विनया ॥ विद्याधरी भवांगनिलया ॥ सर्वशक्तिप्रदायि-
नी अलया ॥ सर्वेश्वरप्रिया वेदगर्भा ॥ ७५ ॥ दीप्ता तार्क्षी मोहनाशिनी ॥ धीमती समुद्रांतर-
वासिनी ॥ नित्यसिद्धा भव्या मनोन्मनी ॥ निराधारा निरामया ॥ ७६ ॥ श्रेष्ठा सगुणा षड्-
गुणात्मिका ॥ महाभगवती अकलंका ॥ निःसंकल्पा निरातंका ॥ विनयप्रदा कामधेनू ॥७७॥
ज्वालामालासहस्राढ्या उर्वी ॥ वसुदेवसमुद्भवा गुर्वी ॥ ब्रह्मवृक्षाश्रया देवदेवी ॥ भक्तिग-
म्या परायणा ॥ ७८ ॥ जरातीता वेदांतविषया ॥ दक्षिणा दहना ज्ञानज्ञेया ॥ सर्वभूतनम-
स्कृता बाह्या ॥ योगमाया विभावज्ञा ॥ ७९ ॥ महेंद्रोपेंद्रभगिनी गती ॥ महामोहा महीयसी
मती ॥ सर्वसमुद्भूति महामती ॥ सत्या ख्याति प्रतिज्ञा चित् ॥ ८० ॥ बीजांकुरसमुद्भूति शा-
स्त्री ॥ महाशक्ति महारात्री ॥ शांकरी संवित् जगद्धात्री ॥ महाशाला वैश्वानरी ॥ ८१ ॥ महा-
योगेंद्रशायिनी पूज्या ॥ गंधर्वयक्षसेविता अपूज्या ॥ विकृति देवसेना गिरिजा ॥ गुहप्रिया शिवा-
नंदा ॥८२॥ शची दुःस्वप्ननाशिनी माता ॥ हव्यवाहांतरा मरुत्सुता ॥ गार्गी जगद्योनि जगन्मा-
ता ॥ महापीठा गुहोत्पत्ती ॥ ८३ ॥ दुर्विनेयस्वरूपिणी बृहती ॥ गुहांबिका बुद्धि बुद्धिमती

॥ जन्ममृत्यु त्रिनेत्रा त्रिमूर्ती ॥ ब्राह्मी ब्रह्माणी जरातिगा ॥ ८४ ॥ प्रभा पुरुषांतरवासिनी ॥ दिविसंस्थिता तपस्विनी ॥ समाधिस्था सुरूपा तारिणी ॥ सर्वेंद्रियमनोमाता ॥ ८५ ॥ संसारतारिणी विद्या तपिनी ॥ सर्वभूतहृदिस्थिता तापिनी ॥ ब्रह्मवादिमनोलया भाविनी ॥ भयावनी ब्रह्मभूता ॥ ८६ ॥ संसारपरिवर्तिका धरा ॥ हिरण्मयी विश्वा निराहारा ॥ भोगदा धारिणी कल्पांतरा ॥ महारात्री सुमालिनी ॥ ८७ ॥ सत्वशुद्धिकरी उन्मीलनी ॥ शुद्धि मलत्रयविनाशिनी ॥ सौम्या सर्वप्रत्ययसाक्षिणी ॥ चंद्रवदना सर्वसहा ॥ ८८ ॥ पद्मधारिणी जगत्प्रिया ॥ जगन्मूर्ति अमृताश्रया ॥ तांडवासक्तमानसा निराश्रया ॥ विद्येश्वरप्रिया विचित्रांगी ॥ ८९ ॥ निरंकुशरणोद्भवा विद्या ॥ परापरविधानज्ञा भेद्या ॥ महापुरुषपूर्वजा वंद्या ॥ चक्रहस्ता जितश्रमा ॥ ९० ॥ विद्युज्जिव्हा भिन्नसंस्थाना ॥ विद्यामयी तैजसी अभिन्ना ॥ सहस्राक्षी ज्वालिनी मान्या ॥ सहस्रश्रवणात्मजा पैं ॥ ९१ ॥ सद्मनाव्याप्ता पद्मरोधिका ॥ सहस्ररश्मिपद्मस्था विशोका ॥ महेश्वरपद्माश्रया रौद्रिका ॥ महादेवमनोरमा ॥ ९२ ॥ सिंहरथा ब्रह्महृदया ॥ व्योमलक्ष्मी महादेवाश्रया ॥ नलिनी ब्रह्मविष्णुशिवप्रिया ॥ अमितप्रभा चेकितानी ॥ ९३ ॥ विश्वेश्वरी शोकनाशिनी ॥ विमानस्था पद्मवासिनी ॥ अनाहता भ्रांति कुंडलिनी ॥ सतांकीर्ति शतानंदा ॥ ९४ ॥ वाग्देवता वंशविहारिणी ॥ सर्वभूताशयस्थिता वशिनी ॥ ब्रह्मकला क्षोभिका भगिनी ॥ सर्वशक्त्यासमारूढा ॥ ९५ ॥ कालकारिणी कलावती ॥ भगवत्पत्नी व्योमशक्ती ॥ ब्रह्मर्षि सर्वदा क्रियाशक्ती ॥ जनशक्ति पुण्या सर्ववित् ॥ ९६ ॥ परागति भोक्री ग-

णातीता ॥ गुह्यशक्ति कांता गुह्यातीता ॥ पुरंदरपुरःसरा योगमाता ॥ सर्वतोभद्रा पुष्करिणी ॥९७॥ गुहावली कपिलाकपिला ॥ विश्वेश्वरेश्वरी विद्युन्माला ॥ पोषणी भूतिभूषणा सकला ॥ कनकाभा माला ल्हादिनी ॥ ९८ ॥ परमैश्वर्यभूतिदा गंधा ॥ गंधदायिनी धन्या सुगंधा ॥ केशनाशिनी परमानंदा ॥ योगरूपिणी भानुमती ॥९९॥ सुमंत्रा मंत्रिणी नर्मोदया ॥ मनोजवा वशिनी शिरोहया ॥ बीजरूपा तापसी प्रक्रिया ॥ योगिज्ञेया वेदरूपिणी ॥ १०० ॥ भेदाभेदविवर्जिता पीवरी ॥ मनोरक्षी सुरभी मनोहरी ॥ वेदशक्ति योगेश्वरेश्वरी ॥ धार्मिकाणांशिवप्रदा ॥ १ ॥ पंचब्रह्मसमुत्पत्ति पूर्णा ॥ महाशक्ति पिंगललोचना ॥ दीप्ति पंकजायतलोचना ॥ परमात्मात्मविग्रहा ॥ २ ॥ रजोरूपा नांदिवल्लभा ॥ नंदिनी भारती दुर्लभा ॥ विश्वावस्था कनकप्रभा ॥ रत्नगर्भा मनोमयी ॥ ३ ॥ वेदविद्याप्रकाशिनी दुर्गा ॥ अचिंत्यमहिमा महावेगा ॥ अचिंत्या दुर्लेखा सत्ववेगा ॥ धनरत्नाढ्या धनाध्यक्षा ॥४॥ परापरविभेदिका आद्या ॥ सर्वप्रहरणोपेता नंद्या ॥ वीरमुक्ति विहायसी मध्या ॥ काम्या अनाद्या धनुष्पाणी ॥ ५ ॥ त्रिविक्रमपदोद्भूता चंडी ॥ हृत्कमलोद्भूता कूश्मांडी ॥ प्रभावती सत्क्रिया गारुडी ॥ परमातारणप्रिया ॥६॥ नित्यशुद्धा चर्चिका रजनी ॥ पुष्पनिरंतरा कात्यायनी ॥ शांतविग्रहा स्वर्णमालिनी ॥ हिरण्यवर्णा रत्नमाला ॥ ७ ॥ मंदराद्रिनिवासा शारदा ॥ विश्वप्रमाथिनी महानंदा ॥ पद्मनिभा पृथ्वी नामवेदा ॥ अमृतोद्भवा पद्मासना ॥ ८ ॥ नित्यतुष्टा महेंद्रभगिनी ॥ धुन्वती दृषद्वती कल्याणी ॥ सूर्यमाता वाच्या शंखिनी ॥ प्रधानपुरुषेशाना पैं ॥ ९ ॥ जगन्मंत्र-

प्रवर्तिका माया ॥ वरेण्या वरदर्पिता दुर्जया ॥ पंचभूतवरप्रदा कलिप्रिया ॥ सर्वशक्त्याश्रया-श्रया ॥ १० ॥ वीरभद्रहितप्रिया चैत्री ॥ संवत्सरा कराला कालरात्री ॥ यशोदा कलिकल्म-षहंत्री ॥ गिरेःपुत्री गरुडासना ॥ ११ ॥ भक्तानांवरदायिनी स्वस्था ॥ पिंगलाकारा जगन्माता ॥ तपस्विनी पद्मिनी विरक्ता ॥ खरारूढा परमालिनी ॥ १२ ॥ जगत्सं-पूरणी वरेश्वरी ॥ सांख्ययोगप्रवर्तिका खेचरी ॥ ऐश्वर्यरत्ननिलया गौरी ॥ सांख्या शुंभा-री पराध्यी ॥ १३ ॥ कंबुग्रीवा जयंती इंद्रजा ॥ हृद्धहारम्या स्मृति वारिजा ॥ साम्यस्था भ-क्ति खरध्वजा ॥ यथाध्वपरिवर्तिनी ॥ १४ ॥ सर्वविज्ञानदायिनी पुष्टी ॥ शंखचक्रगदाधरा तु-ष्टी ॥ संकल्पसिद्धा नित्यदृष्टी ॥ गणाग्रणी सर्वमाता ॥ १५ ॥ गुह्योपनिषद् क्रियावती ॥ व-नमालिनी लोहिता मुक्ती ॥ भीषणा धीरा अमृता व्याप्ती ॥ विश्वामरेश्वरेशाना १६ ॥ अंबिको-पांतसंश्रया शिवा ॥ नरनारायणोद्भवा ॥ भ्रूमध्यनिलया अपूर्वा ॥ अनंतशयना नृसिंही॥१७॥ महाज्वाला सुप्रभा सुमूर्ती॥ दैत्यमाथिनी महामूर्ती ॥ सुतरा अशेषदेवतामूर्ती ॥ कलाकलित-विग्रहा ॥ १८ ॥ प्रधानपुरुषावली असना ॥ सर्वकामधुक् सरोजनयना ॥ निरिंद्रिया विचित्र-गहना ॥ शाश्वतस्थानवासिनी ॥ १९॥ अष्टादशभुजा निरानंदा॥ अगोत्रा महाविभूतिदा ॥ गोप्त्री धर्मकामार्थमोक्षदा ॥ सत्यसंधा स्थानेश्वरी ॥ १२० ॥ त्रिशूलवरधारिणी गोप्त्री ॥ दै-त्यदानवनिर्मात्री ॥ गणात्मिका चाणूरहंत्री ॥ निशुंभविनिपातिनी ॥ २१॥ संकर्षणसमुत्पत्ति अवर्णा ॥ वर्णरहिता अनंतवर्णा ॥ नीलोत्पलदलप्रभा निवर्णा ॥ बीजसंभवा निरालोका॥२२॥

वैराग्यज्ञाननिरता गौरी ॥ गुह्यरूपा गोमती शंकरी ॥ लिंगधारिणी परमेश्वरी ॥ सत्यमात्रा अ-
संख्येया ॥ २३ ॥ धर्माधर्मानुवर्जिता सांख्या ॥ शांतमानसा अप्रमेयाख्या ॥ गुणांतरा काश्यपी
शिवाख्या ॥ गव्यप्रिया मधुसूदनी ॥२४॥ गणेश्वरनमस्कृता शून्या ॥ त्रिसंध्या संधिवर्जिता मनो-
ज्ञा ॥ सांख्ययोगसमुद्भवा जन्या ॥ गोश्री सर्ववादाश्रया॥२५॥शुद्धकुलोद्भवा अनन्यस्था॥श्रीस-
मुत्पत्ति भेदरहिता ॥ महाश्री त्रिविधा त्रितत्वमाता ॥ सर्वशक्तिविनिर्मुक्ता पैं ॥२६॥ बिंदुना-
दसमुत्पत्ति विसंगा ॥ सीता वेदवेदांगपारगा ॥ तमःपारेप्रतिष्ठिता दीर्घा ॥ शिवज्ञानस्वरूपि-
णी ॥ २७ ॥ सुसूक्ष्मपदसंश्रया दुर्ज्ञेया ॥ कालकर्णिका चित्रनिलया ॥ शांत्यतीता भिन्नविष-
या ॥ निराश्रया शास्त्रयोनी ॥ २८ ॥ निर्विकारा मलातीता ॥ कौमुदी कामुकी नवोद्भूता ॥
क्रियामूर्ति तारा ललिता ॥ वामलोचना नारायणी ॥ २९ ॥ पुरुहूता अमृतास्वादा ॥ हेमी प-
रापरविभूतिदा ॥ पुरुप्लुता अमृत्यु मणिदा ॥ श्रीवसुप्रदा मनस्विनी ॥ १३० ॥ परांतजातम-
हिमा दांता ॥ अशोच्या देवकी मन्युमाता ॥ वडवा हेमाभरणभूपिता ॥ सत्यदेवता समुद्भूती
॥ ३१ ॥ विभ्राजमाना महानिद्रा ॥ महामन्युसमुद्भवा समुद्रा ॥ हिरण्यरजतप्रिया बलींद्रा ॥
हिरण्या राजती ककुद्मिनी ॥ ३२ ॥ विद्या शांतिदा शांतिवर्धिनी ॥ ऐंद्री लक्ष्म्यादिशक्तिज-
ननी॥ संकर्षणा त्रिशक्तिजननी ॥ शक्तिचक्रप्रवर्तिका ॥३३॥ स्वाहा षडूर्मिपरिवर्जिता ॥ ज-
गद्धात्री त्रैलोक्यनमिता ॥ कामयोनी प्रद्युम्नदयिता ॥ कर्मकरणी वैष्णवी ॥ ३४ ॥ दुर्जेया
प्रचंडा किरीटिनी ॥ चंडविक्रमा कामरूपिणी ॥ महोत्कटा हंसगति पावनी ॥ युग्मदृष्टि त्रि-

लोचना ॥ ३५ ॥ युगांतदलनात्मिका वाणी ॥ वेदाविद्याव्रतरता पोषणी ॥ खिला विंध्यपर्वतवासिनी ॥ धर्मशीला अनिलासना ॥ ३६ ॥ हिमवन्मेरुनिलया स्वधा ॥ कैलासगिरिवासिनी सिद्धा ॥ वीरा ज्योतिष्टोमफलप्रदा ॥ वियन्मात्रा करीषिणी ॥ ३७ ॥ वृषावेशा नीतिज्ञा तनया ॥ सिनीवाली अयोध्यानिलया ॥ मन्मथोद्भूता वाहनप्रिया ॥ विद्याधरप्रिया वहंती ॥ ३८ ॥ सेविता सेवा आप्यायंती ॥ सेविका मात्रा गरुत्मती ॥ कंप्रा विद्याधरनिराकृती ॥ महाकाळसमुद्भवा ॥ ३९ ॥ चतुर्वर्गप्रदर्शिता धात्रीशा ॥ वीणावादनतत्परा श्रीशा ॥ श्रीमती श्रीफली श्रीनिरासा ॥ अरुंधती हिरण्याक्षी ॥ १४० ॥ वपुःसंगससुद्भवा श्रीधरी ॥ वसुंधरासमुद्भवा श्रीकरी ॥ श्रीधरा सुसेना सर्वेश्वरी ॥ वसुमती वसोर्धारा ॥ ४१ ॥ ईशवीरणी वरारोहा ॥ हरिप्रिया सुकीर्ति वराहा ॥ अनंतदृष्टि वज्रविग्रहा ॥ दैत्यसिंहानांनिहंत्री पैं ॥ ४२ ॥ सिंहवाहिनी धनदप्रिया ॥ सिंहिका वामा चंद्रनिलया ॥ बलज्ञा बलदा छिन्नसंशया ॥ अमृतस्रवा लेलिहाना ॥४३॥ नित्योदिता अमृतजीविनी ॥ अक्षुद्रा उत्सुका सौदामिनी ॥ स्वयंज्योति मलहारिणी ॥ मलिना चांद्री वज्रदंष्ट्रा ॥ ४४ ॥ वज्रजिव्हा मंगल्या मंगला ॥ कंबलाश्वतरप्रिया माला ॥ वैदेही धर्मशास्त्रार्थकुशला ॥ त्रिसंध्या गांधर्वी गारुडी ॥ ४५ ॥ कक्षा भ्रुकुटीकुटिलानना ॥ जनानंदा साध्वी शवासना ॥ शाक्री सुरेंद्रमाता सुद्युम्ना ॥ शक्रासनगता समीक्षा ॥ ४६ ॥ कंसप्राणापहारिणी इष्टा ॥ कर्णिकारकरा शिष्टेष्टा ॥ शिष्टप्रपूजिता विशिष्टा ॥ सत्प्रतिष्ठा सुषुम्ना ॥ ४७ ॥ हर्षवर्धिनी युगावर्ता ॥ युगंधरा प्रत्यक्षदेवता ॥ नारी शतरूपा श-

तावर्ता ॥ सूर्यसंस्थिता धराधरा ॥ ४८ ॥ ज्ञानपारगा सुरभी सुरा ॥ दिव्या दिव्यगंधा दिवा-
परा ॥ विश्वधर्मिणी धर्मांतरा ॥ धर्माधर्मविनिर्मात्री ॥ ४९ ॥ धर्मशक्ति धर्मज्ञा धर्मात्मा ॥
धर्मपूर्वा धर्ममध्या विधर्मा ॥ धर्मांतरा धर्ममयी सूक्ष्मा ॥ धर्मवाहना धर्मलभ्या ॥ १५० ॥
नाथ्या देवता परदेवता ॥ कामेश्वरेश्वरी देवमाता ॥ सर्वतोमुखी कलातीता ॥ सुसूक्ष्मज्ञानरू-
पिणी ॥ ५१ ॥ भद्रकाली दुरतिक्रमा ॥ कपालीशा दुष्कंपा रामा ॥ शशिप्रभा कमला शं-
भुवामा ॥ महापुरुषसाक्षिणी ॥ ५२ ॥ धर्मोपदेशा कलामूर्ती ॥ धनप्रिया विनता विवृत्ती ॥
सदाशिवा सर्वा वियन्मूर्ति ॥ देवमूर्ति आणि अमूर्तिका ॥ ५३ ॥ असो ऐशिया सहस्रनामां-
नीं ॥ श्रीरामचंद्र कोदंडपाणी ॥ सीतेलागीं हस्त जोडुनी ॥ सादर स्तविता जाहला ॥५४॥
हे भारद्वाजमुने मच्छोत्र ॥ हें सीतासहस्रनामस्तोत्र ॥ श्रीरामचंद्रोक्त अतिपवित्र ॥ आणि वि-
चित्र असे पैं ॥५५॥ हें जे कां भक्तिभावें पठती ॥ कीं विप्रमुखें पठविती ऐकिती ॥ ते पु-
ण्यात्मे होऊनि अंतीं ॥ मोक्षाप्रती पावतात ॥ ५६ ॥ आणि विप्र क्षत्रिय वैश्य जे कोणी ॥
भक्तिभावें पठती अनुदिनीं ॥ इहलोकीं ते सुख पावुनी ॥ अंतीं ब्रह्मचि होतात ॥५७॥ आ-
णि हें जेकां शूद्र ऐकती ॥ तेही ह्याच्या माहात्म्यें जगतीं ॥ पावोनि धनधान्यादि विभूती ॥
अंतीं सद्गती पावतात ॥ ५८ ॥ हें सीतासहस्रनामस्तोत्र ॥ सर्वपापहारि पवित्र ॥ सकळजना
इह[2] परत्र[3] ॥ असे विचित्र सुखदातें ॥ ५९ ॥ आणि महामारी नृप अग्नि चोर ॥ क्षयकुष्ठादि[4]

टी. १ अगा माझ्या शिष्या. २ या लोकीं ( जिवंत आहे तों पर्यंत ). ३ मेल्या नंतर (स्वर्गादि लोकीं. ) ४ क्षयरोग व कोढ इत्यादि.

व्याधि घोर ॥ अनावृष्टि अतिवृष्टि दुर्धर ॥ तैशींच थोर रिपुचक्रें ॥ १६० ॥ इत्यादिकांच्या भयालागुन ॥ सर्वसंकटांसह निरसून ॥ सदा सर्वत्र शांतिकर पूर्ण ॥ असे जाण उत्तम हें ॥ ॥ ६१ ॥ जेंजें जया अत्यंत इष्ट ॥ तें तें याणें लाभतें स्पष्ट ॥ विश्वामाजी याहूनि श्रेष्ठ ॥ नसे साधन दुजें कांहीं ॥ ६२ ॥ सीतासहस्रनाम हें जेथें ॥ उत्तमरीत्या पठिजेतें ॥ सराम सीता वसते तेथें ॥ संशय येथें नसेची ॥ ६३ ॥ ह्या स्तोत्राचिये प्रतापें ॥ विविध घोर महापापें ॥ तैशींच सर्वही अतिपापें ॥ समूळ विलय पावतात ॥ ६४ ॥ ऐसें हें सहस्रनामस्तोत्र ॥ सर्वसुखद इहपरत्र ॥ स्वमुखें श्रीघनश्यामगात्र ॥ बोलला असे मुनिवर्या ॥ ६५ ॥ ऐसी श्रीवाल्मीकें तत्वता ॥ भारद्वाजासि कथिली कथा ॥ आतां पुढें श्रीरामोक्ता ॥ सीतास्तुती वर्णिजेल ॥ ६६ ॥ तरी भावें करावी श्रवण ॥ श्रोतीं असावें सावधान ॥ हेंचि तयां मी सीतानंदन ॥ हस्त जोडून प्रार्थितों ॥ ६७ ॥ स्वस्ति श्रीमदद्भुतरामविजय ॥ वाल्मीकीयाद्भुतोत्तरकांडहृदय ॥ ऐकोत सज्जन होऊनि तन्मय ॥ षड्विंशाध्याय मधुर हा ॥१६८॥

॥ इति अध्यायः २६ ॥



श्रीगणेशायनमः ॥ ॥ जयजय श्रीरणरंगधीरा ॥ रविकुळभूषणा रघुवीरा ॥ सकलनिशाचर कुलांतकरा ॥ परमोदारा श्रीरामा ॥ १ ॥ अयोध्यानाथा मेघश्यामा ॥ परमानंदा मंगलधा- मा ॥ मन्मथदहनहृदयारामा ॥ आत्मारामा स्वामिया ॥ २ ॥ परात्परा अव्यक्ता अव्यया ॥ प्रणवस्वरूपा परमात्मया ॥ अनाथनाथा भक्तकैवारिया ॥ क्षीराब्धिवासिया सनातना ॥ ३ ॥ चतुरास्यजनका निरंजना ॥ पुराणपुरुषा आदिनारायणा ॥ अनाद्यनंता जगज्जीवना ॥ सत्य- ज्ञानानंदरूपा ॥ ४ ॥ अपारमायाचक्रचाळका ॥ अनंतकोटिब्रह्मांडजनका ॥ निजजनमोक्षसु- खदायका ॥ मायामनुजवेषधरा ॥ ५ ॥ मंगळभगिनीमनमोहना ॥ करुणार्णवा रघुनंदना ॥ पुढें उत्तम ग्रंथरचना ॥ बोलवीं प्रार्थना हीच माझी ॥ ६ ॥ पूर्वाध्यायामाजी पवित्र ॥ वर्णिलें सहस्रनामस्तोत्र ॥ पुनश्च वाल्मीकि नारदछात्र ॥ भारद्वाजासी सांगत ॥ ७ ॥ ह्मणे गा ऐकें सावधान ॥ एवं तो श्रीरघुनंदन ॥ त्या सहस्रनामस्तोत्रें स्तवून ॥ हर्षपरिपूर्ण जाहला ॥ ८ ॥ प्रेमपूर्वक धरणीवर ॥ दंडवत् केला नमस्कार ॥ आणि पुनश्च जोडूनियां कर ॥ विनवी सा- दर ऐसें कीं ॥ ९ ॥ हे परमेश्वरी जें इं येथ ॥ तुझें ऐश्वररूप घोर दिसत ॥ यासि पाहूनियां मी सांप्रत ॥ अति भयभीत झालों असें ॥ १० ॥ तरी तूं कृपा करीं देवी ॥ अन्यस्वरूप मज दावीं ॥ जेणें भीति जाऊनि आघवी ॥ धृतिही नवी उद्भवेल ॥ ११ ॥ ऐशी रामाची ऐकू-

टी. १ सर्व राक्षसकुलाचा नाश करणारा. २ सर्वकल्याणांचे स्थाना. ३ मदनास जाळणारा जो शिव त्याच्या मनास सुख देणारा. ४ ब्रह्मदेवाच्या पित्या. ५ जन्ममरणरहिता. ६ सीतापते. ७ नारदाचा शिष्य. ८ याप्रमाणें. ९ धैर्य देखील.

निं वाणी॥ प्रसन्न झाली जनकनंदिनी ॥ विकटरूपालागीं गोपुनी ॥ सुरूप तत्क्षणीं दाविलें ॥१२॥ तयाच्या सौंदर्याची सरी ॥ नाहींच सर्व त्रैलोक्याभीतरी ॥ रमाउमादिक सुंदरी परी ॥ सम निर्धारी नव्हेत ॥ १३ ॥ जैसें केवळ स्वर्णपंकज ॥ तैसें सर्वांग मृदुसतेज ॥ प्रफुल्लसहस्त्रपत्रांबुज ॥ तैसा सुगंध सर्वांगीं ॥ १४ ॥ खंजरीटमृगमीनांहून ॥ नयन असती शोभायमान ॥ कलभशुंडादंडासमान ॥ भुजा दोन विलसती ॥ १५ ॥ एकवटलें कीं भ्रमरकुळ ॥ तैसे केश कुरळनीळ ॥ नागिणीपरी वेणी सरळ ॥ मांजी विपुळ नग असती ॥ १६ ॥ विकसित जैशीं रातोत्पलें ॥ तैशीं विलसती पादतळें ॥ विद्रुमांहूनि रक्त सोज्वळें ॥ करकमळें विराजती ॥ १७ ॥ उत्तमशोभायुक्त कपाळ ॥ वरी त्रैलोक्यमोहक विशाळ ॥ कुंकुमतिळक सद्वर्तुळ ॥ सदा सोज्ज्वळ विलसे पैं ॥ १८ ॥ सुंदरसर्वांगीं सतत ॥ नानारत्नभूषणें तळपत ॥ विशाळमाळा हेमनिर्मित ॥ कंठीं रुळत साजिऱ्या ॥ १९ ॥ नेपुरांची शोभा अपार ॥ अंगीं तळपे परिधानांबर ॥ मौक्तिकजाळी कंचुकीवर ॥ जडली सुंदर विलसे पैं ॥ २० ॥ ईषत्सुहास्ययुक्त वदन ॥ शारदेंदूहूनिही प्रसन्न ॥ आरक्त ओष्ठ बिंबासमान ॥ शुद्ध रदन हिरे जैसे ॥ २१ ॥ त्रैलोक्यींचें सौंदर्य सगळें ॥ गाळूनि कीं हें रूप ओतिलें ॥ कीं अनं-

टी. १ विक्राळस्वरूपास. २ गुप्त करून. ३ बरोबरी. ४ सुवर्णाचें कमळ. ५ फुललेलें सहस्त्रदली कमळ. ६ खंजरीट ह्मणून पक्षिविशेष. ७ हत्तीच्या छाव्याच्या शुंडेप्रमाणें. ८ वेणीमध्यें. ९ अलंकार. १० लालकमळें. ११ पोंवळ्याहून. १२ चांगला वर्तुळ. १३ नेसलेलें वस्त्र. १४ किंचित् हास्यानें युक्त. १५ शरदृतूंतील चंद्रापेक्षां. १६ तोंडल्याप्रमाणें. १७ दांत. * सुवर्णाच्या.

तमहिम्यांचें हें पहिलें ॥ स्थानचि ठाकलें प्रत्यक्ष ॥ २२ ॥ ऐशा त्या दिव्यरूपालागुन ॥ पाहूनियां तो रघुनंदन ॥ अंतरींचें भय टाकून ॥ आनंदें पूर्ण जाहला ॥ २३ ॥ आणि ह्मणे ग परमेश्वरी ॥ आजि सकळजगाभीतरी ॥ मम जन्माचें सर्वपरी ॥ सार्थक्य निर्धारी जाहलें ॥२४॥ तैसेंचि माझें तपही समस्त ॥ आजि सफळ झालें निश्चित ॥ अहा सर्व ब्रह्मांडोदरांत ॥ भाग्यवंत मीच असें ॥ २५ ॥ अग ज्यापेक्षें मूळकारण ॥ अव्यक्त तेंचि तूं असोन ॥ प्रसन्न होत्साती मजलागुन ॥ साक्षाद्दर्शन दीधलेंस ॥ २६ ॥ तस्मात् सकळजगाठायीं ॥ मजसम धन्य कोणी नाहीं ॥ स्वैयंभ्वादिदेवेशांसिही ॥ नव्हेसि कदाही प्रत्यक्ष ॥ २७ ॥ तूं सर्वविश्वासि आदिभूत ॥ तुजमाजी प्रधानादि वसत ॥ त्वांचि निजसामर्थ्यें अद्भुत ॥ विश्व समस्त सर्जिलें ॥ २८ ॥ तूंच याचें करिसी पाळण ॥ तुजमाजीच हें होतें लीन ॥ तूंच सकळप्रकारीं पूर्ण ॥ मुख्य कारण आहेसी ॥ २९ ॥ त्रिजगन्माते मी अल्पमती ॥ त्वद्रूपगुणांसि वर्णूं किती ॥ कित्येक लोक विकृतीपरती ॥ प्रकृती ह्मणती तुजलाच ॥ ३० ॥ आणि परमात्मवेत्ते इतर ॥ ते तुज शिव ह्मणती सादर ॥ जैसें जयाचें ज्ञान परिकर ॥ तैसेंचि साचार तर्किती ॥३१॥ साक्षात् पुरुष महान् प्रकृती ॥ ब्रह्मा ईश्वर अविद्या निकृती॥ आणि माया कालादि शतशः निगुती ॥ झालीं असती तुजमाजी ॥३२॥ तूं ती परमाशक्ति निश्चित ॥ जी परमेष्ठिनी सर्व विख्यात ॥ तूं आदिमध्यावसानरहित ॥ ह्मणोनि नित्य बोलिजेसी ॥ ३३ ॥ तूं वस्तुता सर्व भेदांनीं ॥ सर्वदाही

टी. १ सर्वप्रकारांनीं. २ प्रत्यक्ष न दिसणारें ( परब्रह्म ). ३ ब्रह्मदेवादि जे देवदेव त्यांसही. ४ प्रकृत्यादि. ५ उत्पन्न केलें.

विमुक्त असोनी ॥ सकळ भेद तुजलागुनी ॥ समाश्रयूनि राहातात ॥३४॥ देवि तुज परमेश्व-
रीला ॥ अधिष्ठूनियां पुरुष वहिला ॥ प्रधानादिक सर्व जगाला ॥ उत्पन्न करूनि साक्षोपें ॥३५॥
नानाकृत्यादिविकारांप्रत ॥ पाववित असतो सतत ॥ योगेशि तुझा प्रभाव अद्भुत ॥ कोण
समस्त वर्णील पैं ॥ ३६ ॥ तुजशींच संगत होऊनि देव ॥ निजानंदासि भोगितो सदैव ॥ तूंचि
परमानंदस्वरूप सर्व ॥ आणि तूंचि आनंददायिनी ॥ ३७ ॥ जयासि ह्मणती महदाकाश ॥
ह्मणजे सर्वव्यापक अविनाश ॥ केवळ तेजोमय अशेष ॥ कल्याणरूप निष्कलंक ॥ ३८ ॥
आणि सूक्ष्मापेक्षां सूक्ष्म अत्यंत ॥ आदिमध्यावसानरहित ॥ परब्रह्म ऐसें ज्यासि ह्मणत ॥ तें
तूंच खचित आहेसी ॥ ३९ ॥ स्वर्गवासी सकळ देव ॥ त्यांमाजी जो मुख्य वासव ॥ तयाच्या
रूपें तूं स्वयमेव ॥ स्वर्गी सदैव विलससी ॥ ४० ॥ ब्रह्म हें वेदासि अभिधान ॥ ब्रह्म जाण-
ती ते ब्रह्मविद् जाण ॥ ब्रह्मवेत्त्यांमाजी प्रधान ॥ ब्रह्मा तो तूं आहेस ॥ ४१ ॥ सांख्यवेत्त्यां-
माजी प्रवर ॥ कपिल तोही तूंच साचार ॥ रुद्रांमाजील मुख्य शंकर ॥ तोही तूंच
असशी पैं ॥ ४२ ॥ द्वादशादित्यांतील प्रमुख ॥ उपेंद्र तो तूं असशी एक ॥ अष्टवसूंत
पावकनामक ॥ वसुगण तो तूंच असशी ॥ ४३ ॥ सर्ववेदांत सामवेद ॥ श्रेष्ठ तो तूं आहेसि
अगाध ॥ सर्व छंदांत श्रेष्ठ विशुद्ध ॥ गायत्रीछंद तूंच पैं ॥ ४४ ॥ सर्वविद्यांत श्रेष्ठ अती ॥
जिणें कळे आत्मरूपस्थिती ॥ ती अध्यात्मविद्या भगवती ॥ तूंच आहेस साचार ॥ ४५ ॥

टी १ नानाप्रकारच्या आकारादि विकारांला. २ इंद्र. ३ मुख्य. ४ आत्मज्ञान जिणें प्राप्त होतें ती.

गति हें मोक्षादिकांसि नाम ॥ त्या सर्वगतींत अत्युत्तम ॥ जीकां साक्षात् कैवल्य-
नाम ॥ परमगती ती तूंच ॥ ४६ ॥ सकळब्रह्मांडाभीतरी ॥ असंख्य शक्ति आहेत परी ॥ तींत
मुख्य मायाख्य साजिरी ॥ ती तूं निर्धारी आहेस ॥ ४७ ॥ प्रबळ तेचि पाळक हारक ॥ ह्मणो-
नि ते ह्मणिजेति चाळक ॥ सर्वचाळकांमाजी प्रमुख ॥ काळ तोही तूं असशी ॥ ४८ ॥ सक-
ळगुह्यांत गुह्य अती ॥ ॐकार तो तूं आहेस भगवती ॥ सर्ववर्णांत श्रेष्ठ निगुती ॥ ब्राह्मण तो
तूंच पां ॥ ४९ ॥ अखिलआश्रमांमाजी वर ॥ गृहस्थाश्रम तूं साचार ॥ ब्रह्मेंद्रादिईश्वरांत
ईश्वर ॥ महेश्वर तूंच असशी ॥५०॥ ब्रह्मांडींच्या सर्व पुरुषांत ॥ परमश्रेष्ठ पुरुष विख्यात ॥
सकळभूतांच्या हृदयांत ॥ वसतो सतत तो तूंची ॥ ५१ ॥ उपनिषदांत जें विशुद्ध ॥ पर-
मश्रेष्ठ गुह्योपनिषद ॥ तें तूंच असशी ऐसें विशद ॥ बोलती विबुध सर्वही ॥ ५२ ॥ भूपां-
माजी ईशनशक्ती ॥ तीही तूंच असशी भगवती ॥ युगांमाजी कृतयुग निश्चिती ॥
तुझीच विभूती पैं होय ॥ ५३ ॥ अर्चिरादिसर्वमार्गांत ॥ आदित्य तोही तूं निश्चित ॥
सर्ववाचांत मुख्य विख्यात ॥ सरस्वती तूंच आहेसी ॥ ५४ ॥ चारुरूपवती ज्या नारी ॥
तींत लक्ष्मी तूंच निर्धारी ॥ सर्वमायावियांमाजी हरी ॥ परमश्रेष्ठ तो तूंच ॥ ५५ ॥
सर्वसतींत अरुंधती ॥ श्रेष्ठ तीही तूंच भगवती ॥ सकळपक्ष्यांत श्रेष्ठ अती ॥ तार्क्ष्य तो तूंच
आहेस ॥ ५६ ॥ सकळसूक्तांमाजी उत्तम ॥ पुरुषसूक्त तें तूं हा नेम ॥ सर्व सामांत ज्येष्ठनाम ॥

टी. १ समर्थ. २ स्पष्ट. ३ ज्ञाते. ४ पालन करण्याची शक्ति. ५ सुंदररूपवती. ६ सर्व पतिव्रतांत. ७ गरुड. ४ श्रेष्ठ.

साम उत्तम तें तूंच ॥५७॥ सर्व जप्यमंत्रांत प्रधान ॥ सावित्री[1] तूच असशी जाण ॥ यजुषांत शतरुद्रियाभिधान ॥ तेंही तूंच आहेसी ॥५८॥ पर्वतांमाजी मुख्य मेरू ॥ तो तूंच असशी हा निर्धारू ॥ सकळनागांमाजी प्रवरू[2] ॥ अनंतनाग तो तूंच ॥५९॥ सर्वांत जो जो श्रेष्ठ अत्यंत ॥ तो तो तूंच आहेस निश्चित ॥ ब्रह्मांडीं जितुकें वस्तुजात[3] ॥ त्यांत तूं ब्रह्म परिपूर्ण ॥६०॥ असो देवि बहु सांगूं कायी ॥ त्वन्मयचि आहे जग सर्वही ॥ तूं ज्यामाजी वसत नाहीं ॥ ऐसें कांहीं नाहींच ॥ ६१ ॥ परमेश्वरि तव रूपें अनंत ॥ त्यांत जीं मुख्य विभूतिमंत ॥ त्यांचेंचि-मात्र वर्णन येथ ॥ करितों किंचित यथामती ॥ ६२ जेंकां यावत्परिछेदशून्य ॥ मनोवाचां अगोचर मान्य ॥ नित्य केवळ निर्मळ अनन्य ॥ अनंत धन्य साचार ॥ ६३ ॥ आणि जें आदिमध्यांतहीन ॥ सर्वांसि आद्य परिपूर्ण ॥ त्या तव ब्रह्मस्वरूपालागुन ॥ करितों नमन साक्षेपें ॥ ६४ ॥ आणि वेदांच्या विज्ञानेंकरुनी ॥ सर्व अर्थ निश्चयिले जयांनीं ॥ ते जगेत्प्रसूति[4] जयापासुनी ॥ झाली ऐसें पाहाती ॥ ६५ ॥ ऐसें जें कां परमनामक ॥ आनंदमात्ररूप एक ॥ तयासि मी जोडूनि हस्तक ॥ प्रणाम करितों सर्वदा ॥ ६६ ॥ अशेषकारणदेहांत ॥ प्रविष्ट ऐसा असोनि सतत ॥ सूक्ष्माच्या[5] संयोगवियोगांप्रत ॥ हेतुभूत विख्यात जो ॥ ६७ ॥ आणि जया नाहीं जन्ममरण ॥ केवळ तेजोमय परिपूर्ण ॥ ऐसें जेंकां प्राणाभिधान[6] ॥ त्वद्रूप तयातें वंदितों ॥ ६८ ॥ आणि जया आदिअंत नाहीं ॥ जें जगदात्मरूप असूनिही ॥ प्रकृतीहून परतें

टी. १ गायत्री. २ श्रेष्ठ. ३ सर्व पदार्थ. ४ जगाची उत्पत्ति. ५ लिंगदेहाच्या. ६ प्राण हें आहे नाम ज्याला.

सदाही ॥ विभिन्नचि राही साचार ॥ ६९ ॥ ऐसें जें पुरुषनामक ॥ अव्यक्तवपु कूटस्थ एक ॥ तें तुझेंचि रूप अलौलिक ॥ तयासि वंदितों साक्षेपें ॥ ७० ॥ जयाच्या आश्रयें सर्व असती ॥ आणि सर्वजगांत जयाची वसती ॥ ह्मणोनि सर्वत्र असोनि गती ॥ जया नसती जन्ममरणें ॥७१॥ आणि अणूहूनिही अणु असून ॥ महताहूनिही अति महान ॥ ऐसें जें पुरुषानुरूप जाण ॥ त्वद्रूप तयासी वंदितो ॥ ७२ ॥ आणि जळसंस्थित अलौलिकें ॥ जें चतुर्दशभुवनात्मक ॥ तव व्यष्टिविराड्रूप एक ॥ तयासि देख वंदितों ॥ ७३ ॥ आणि ज्याचे विचित्र भेद-अनंत ॥ अनंत भूतें वसती जयांत ॥ आणि जयाचा पुरुषचि नाथ ॥ असे सतत एकची ॥ ७४ ॥ ऐसें जें कां जगदंडसंज्ञक ॥ सर्वाद्य अशेषवेदात्मक ॥ तुझें समष्टिविराट्स्वरूप एक ॥ तयासि नमन करितों पैं ॥ ७५ ॥ जेणें स्वतेजें ब्रह्मांड भरिलें ॥ ऐसें जें रविमं-डळस्थ वहिलें ॥ तव स्वरूप तेजागळें ॥ तयासि नमन करितों मी ॥ ७६ ॥ तेंवीच जया शक्ति अनंत ॥ सहस्र मूर्धे सहस्र हात ॥ पुरुष पुरातन अत्यंत ॥ ऐसें ह्मणत जयासी ॥ ॥ ७७ ॥ आणि सदा करी जळीं शयन ॥ ऐसें जें नारायणाभिधान ॥ तुझेंचि स्वरूप तयालाा-गुन ॥ करितों नमन साक्षेपें ॥ ७८ ॥ जैसा युगांतकाळींचा अनळ ॥ तैसें परम तीक्ष्ण तेजा-ळ ॥ विशाळदंष्ट्रायुक्त विक्राळ ॥ वंदिती सकळ देव जया ॥७९॥ आणि ब्रह्मांडनाशासि का-रण ॥ ऐसें जें तुझें काळाभिधान ॥ दारुण रूप तयालागुन ॥ साष्टांग नमन करतों मी

टी. १ सूक्ष्माहूनिही. २ अनुपम. ३ नारायणनामक. ४ अग्नि. ५ काळनांवाचें.

॥८०॥ जें सकळप्रमाणरहित ॥ भूमितळीं वसे सतत ॥ अशेषभारोद्वहनार्थ ॥ महासमर्थ साजिरें ॥८१॥ फणासहस्रें शोभित परम ॥ ऐसें जें तव अनंतनाम ॥ नागाकृति स्वरूप उत्तम ॥ तयासि प्रणाम करितों मी ॥ ८२ ॥ ब्रह्मात्मतानंदरसाचें ॥ जें अद्वितीय ज्ञातें साचें ॥ कमळभवांडीं ऐश्वर्य ज्याचें ॥ कुंठित नव्हे कदाही ॥ ८३ ॥ आणि जया शोभती तीन नेत्र ॥ युगांत झाला तरी पवित्र ॥ जें अवशिष्ट राहूनियां विचित्र ॥ नभीं सर्वत्र नाचतसे ॥ ८४ ॥ ऐसें जें तुझें परमाद्भुत ॥ रुद्रस्वरूप सर्व विख्यात ॥ तयालागीं मी जोडूनि हात ॥ भक्तिभावें वंदितों ॥८५॥ जेथें शोकाचा नाहीं लेश ॥ आनंदचि भरला विशेष ॥ जेणें दुःख निरसूनि अशेष ॥ सर्वत्र हर्ष कोंदाटिला ॥ ८६ ॥ जयाच्या पादयुग्माप्रती ॥ सर्व सुरासुर भावें अर्चिती ॥ आणि जें विमल पवित्र अती ॥ कोमलकांती शुभ्रवर्ण ॥ ८७ ॥ ऐसें जें हें प्रत्यक्ष सोज्वळ ॥ तुझें रूप दिसतें विशाळ ॥ यासि मी जोडूनि करयुगेळ ॥ नमन करितों जगदंबे ॥ ८८ ॥ इतुकें बोलूनि रघुनाथ ॥ वैदेहीलागीं प्रेमें पाहत ॥ भक्तिभावें जोडूनि हात ॥ पार्श्वीं स्वस्थ उभा ठेला ॥ ८९ ॥ तें ती त्या जगत्पतीची वाणी ॥ ऐकूनि सीता हंसत तत्क्षणीं ॥ ह्मणे हे प्रभो कोदंडपाणी ॥ माझें वचन एक ऐक ॥ ९० ॥ रावणाच्या वधाकरितां ॥ जें म्यां रूप धरिलें आतां ॥ याच रूपें हे नरेंद्रनाथा ॥ मानसोत्तरीं वसतें मी ॥९१॥



टी. १ सर्व भार वाहाण्यास. २ शेषनामक. ३ ब्रह्मांडांत. ४ आकाशांत. ५ दोन हात. ६ सीतेप्रत. ७ बाजूला. ८ राहिला. ९ रामाची. १० हातांत धनुष्य धरणारा (हे रामचंद्रा). ११ सर्व राजांच्या राजा. १२ ह्या मानसोत्तर पर्वतावर. * दोन्ही पायांप्रत.

तूं स्वयें नीलरूप असून ॥ रावणें तुज ताडिलें तयान ॥ सर्वांगीं लोहितत्वें मिसळून ॥ नील-लोहित झालासी ॥ ९२ ॥ आतां ह्या ऐशा तुजसहित ॥ मी सर्वदा वसतें येथ ॥ तरी इच्छा असेल तो त्वरित ॥ वर मागून घेईं तूं ॥ ९३ ॥ तें ऐकूनियां रघुवीर ॥ ह्मणे देवी मी तुजबरोबर ॥ अंशभागें ह्या गिरींद्रावर ॥ निरंतर राहीन ॥ ९४ ॥ ऐसें निश्चयूनियां सर्व ॥ भारद्वाजा मग तो राघव ॥ त्या परमेश्वरीलागीं स्तवींव ॥ वर याचिता जाहला ॥ ९५ ॥ ह्मणे महाभागे देवि सीते ॥ जें ऐश्वररूप दाविलें येथें ॥ तें मन्मनांतूनि जाइना परतें ॥ ऐसा मातें वर देईं ॥ ९६ ॥ आणि कल्याणात्मके वैदेही ॥ अन्यही एक वर देईं ॥ माझे शूर त्रैलोक्यविजयी ॥ भरतादिक बंधू जे ॥ ९७ ॥ आणि सुग्रीव बिभीषणादिक ॥ जे मम सैन्यासह सैनिक ॥ नर वानर राक्षस सकळिक ॥ रावणें कोठें उडविले ॥ ९८ ॥ ते सर्वही पुनश्च निरुती ॥ शीघ्र भेटावे ग मजप्रती ॥ ऐसें बोलूनि तो रघुपती ॥ निवांत उभा राहिला ॥ ९९ ॥ इतुक्यामाजी नभीं विशेष ॥ दुंदुभींचा लागला घोष ॥ सीतारामांवर निर्दोष ॥ पुष्पवर्षाव जाहला ॥ १०० ॥ तैं ती सीता हंसोनि किंचित ॥ पुनश्च बोलली राघवाप्रत ॥ रामा तुझे सर्व मनोरथ ॥ पूर्ण होतील निश्चयें ॥ १ ॥ तें ऐकूनियां रघुनंदन ॥ आनंदें झाला परिपूर्ण ॥ विरिंचादि देव संपूर्ण ॥ स्वस्वस्थाना पाठविले ॥ २ ॥ आणि सर्वांचि घेऊनि सीतेला ॥ स्वदेशीं जाया सिद्ध झाला ॥ ऐसें वाल्मीकमुनि शिष्याला ॥ कथिता झाला सविस्तर ॥ ३ ॥

टी. १ आरक्तपणा. २ स्तुति करण्यास योग्य. ३ आकाशांत. ४ नौबतीचा, नगाऱ्यांचा. ५ ब्रह्मदेवादि.

आतां सीतेसह घननीळ ॥ अयोध्येमाजी राज्य करील ॥ ती कथा साद्यंत निर्मळ ॥ सांगेल पुढिल्या अध्यायीं ॥ ४ ॥ तरी श्रोतेजनीं श्रवणार्थ ॥ सावध असावें एतदर्थ ॥ तयांसि मी रघुनाथसुत ॥ जोडूनि हात प्रार्थितों ॥ ५ ॥ स्वस्ति श्रीमदद्भुतरामविजय ॥ वाल्मीकीयाद्भुतोत्तरकांडहृदय ॥ ऐकोत सज्जन होऊनि तन्मय ॥ सप्तविंशाध्याय मधुर हा ॥ १०६ ॥

॥ इति २७ अध्यायः ॥



श्रीगणेशायनमः ॥ ॥ जयजयाजी परमेश्वरा ॥ निर्गमागमतनो[1] सर्वाधारा ॥ वृंदारकवंद्या[2] वे-
दांतसारा ॥ परात्परा परमानंदा ॥ १ ॥ अजा[3] अजेया जगदादिकंदा ॥ भक्तहृदयारविंदामिलिं-
दा[4] ॥ मुमुक्षुचातकनवनीरदा[5] ॥ कैवल्यप्रदा[6] नारायणा ॥ २ ॥ विश्वेश्वरा विश्वकारणा ॥ विश्व-
व्यापका विश्वजीवना ॥ विश्वात्मया विश्वहरणा ॥ निरंजना घननीळा ॥ ३ ॥ पुराणपुरुषा नि-
त्या अखिला[7] ॥ निरुपाधिका अजिता अमला ॥ प्रणवात्मका अच्युता अचला ॥ सुमंगला[8] अ-
विनाशा ॥ ४ ॥ पद्मभूजनका[9] पयोधिवासा[10] ॥ पद्मायना कल्मषनाशा ॥ पद्मालयाहृदयवि-
लासा[11] ॥ परमहंसा सनातना ॥ ५ ॥ लीलामनुजवेषधारका[12] ॥ असुरकुलकाननछेदका[13] ॥ नि-
खिलवृंदारकबंधमोचका[14] ॥ धर्मरक्षका रघुवीरा ॥ ६ ॥ कौसल्याहृदयांबुजभ्रमरा ॥ दशरथात्म-
जा परमउदारा ॥ सुमित्रात्मजप्राणआधारा ॥ जनकजावरा श्रीरामा ॥ ७ ॥ तव कृपेच्या बळें
समस्त ॥ संपत आला असे हा ग्रंथ ॥ आतां कळसाध्याय रसभरित ॥ वदवीं यथार्थ कैसा तो ॥ ८ ॥
पूर्वाध्यायांतीं तमालनीळें[15] ॥ पुष्करद्वीपाहूनि वहिलें ॥ अयोध्येप्रति जाया इच्छिलें ॥ ऐसें झा-
लें कथानक ॥ ९ ॥ आतां कळसाध्याय पावन ॥ मांजी[16] सुरस असे कथन ॥ वाल्मीकि भा-

---

टी. १ वेद व शास्त्ररूपी आहे तनू ज्याची. २ देवांनीं वंदिण्यास योग्य. ३ जन्मरहिता. ४ भक्तांच्या हृदयरूपी कमळांत राहणाऱ्या भ्रमरा. ५ मुमुक्षुरूपी चातकाची तृषा शांत करणाऱ्या मेघा. ६ मोक्षदात्या. ७ सर्वात्मका. ८ कल्याणरूपा. ९ ब्रह्मदेवाच्या पित्या. १० क्षीरसागरांत वसणारा. ११ लक्ष्मीच्या हृदयीं क्रीडा करणारा. १२ लीलेनें मनुष्यवेष धरणारा. १३ राक्षसरूपी अरण्यास तोडणारा. १४ सर्व देवांचें बंधन तोडणारा. १५ तमालपत्राप्रमाणें श्यामवर्ण. १६ ह्या अध्यायांत.

रद्वाजालागुन ॥ प्रेमें विवरून सांगत ॥ १० ॥ ह्मणे गा विप्रा मग तो राम ॥ काकुत्स्थकुलज वीरोत्तम ॥ सीतेसि आलिंगूनि सप्रेम ॥ अंतरीं परम आनंदला ॥ ११ ॥ पुष्पकारूढऋषींसहित ॥ जावया सज्जला अयोध्येप्रत ॥ वामांगीं नेटकी सीता शोभत ॥ घनीं चमकत वीज जेंवी ॥१२॥ मग रामाज्ञा होतांचि सत्वर ॥ विमानें आक्रमिलें अंबर ॥ दोनसहस्रयोजनावर ॥ वेगें सुंदर उंचावलें ॥१३॥ जंबूद्वीपासि लक्षून ॥ पुष्पक चाललें वेगेंकरून ॥ पौर्णिमेचा रोहिणीरमण ॥ पश्चिमेलागुन जाय जेंवी ॥ १४ ॥ कीं महासागरीं तारूं मोठें ॥ समीरबळें लोटत नेटें ॥ तैसेंचि तें विमान गोमटें ॥ चाललें नेटें साचार ॥१५॥ इकडे अयोध्यावासी सकळ ॥ आतां कैं दिसेल घननीळ ॥ ह्मणोनि चित्तीं होऊनि व्याकुळ ॥ चरफडत आहेती ॥१६॥ तों तें विमान पवनगती ॥ वेगें पातलें अयोध्येप्रती ॥ नाना घंटा घणघणा वाजती ॥ नाद जगतीं पसरला ॥१७॥ तो शब्द कानीं पडतांक्षणीं ॥ श्रीराम आला जाणिलें जनीं ॥ भरतादि भ्राते योधमुख्य आणी ॥ प्रजाजन सर्व आनंदले ॥१८॥ सर्वेचि रामाच्या दर्शनार्थ ॥ महावेगें चालले धांवत ॥ तरुण बाल वृद्ध कीं आर्त ॥ नाहीं गृहांत राहिले ॥१९॥ क्षुधाक्रांत क्षीराब्धिप्रती ॥ देखूनि जैसे धांव घेती ॥ कीं बहुदिवसीं मातेप्रती ॥ पाहतां धांवती बाळकें ॥२०॥ कीं देखूनियां सफल द्रुम ॥ झेंपावती बहु विहंगम ॥ तैसेचि सर्व पाहाया राम ॥ अतिसप्रेम धांविन्नले ॥ २१ ॥ सर्वजनांच्या नेत्रांतून ॥ प्रेमाश्रुधारा चालल्या जाण ॥ तिहीं सवस्त्र देह भिजून ॥ भूमिही क्लिन्न जाहली ॥२२॥ तंव आका-

टी. १उघड करून. २काकुत्स्थ राजाच्या कुलांत झालेला. ३मेघांत. ४आकाश. ५चंद्र. ६सुंदर. ७मुख्य योद्धे. ८वृक्ष. ९ पक्षी. १० ओली.

शांवूनि विमान ॥ राजद्वारीं उतरलें जाण ॥ जैसा तेजें दैदीप्यमान ॥ चंडकिरण प्रत्यक्ष ॥ २३ ॥ मग सीतेसह घनसावळा ॥ पुष्पकांतून खालीं उतरला ॥ सवें सिद्धर्षिमुनींचा मेळा ॥ पवित्र भला शोभतसे ॥ २४ ॥ तों भरतादि भ्राते समस्त ॥ प्रधान मंत्री योद्धे आप्त ॥ आणि सर्व प्रजाजनही त्वरित ॥ धांवत तेथ पावले ॥ २५ ॥ त्यांहीं सकळऋषींसि प्रथम ॥ प्रणाम केले यथानुक्रम ॥ तदनंतर श्रीसीताराम ॥ दोघें सप्रेम वंदिलीं ॥२६॥ तें त्या राघवें सर्वजनाला ॥ यथार्ह आशीर्वाद दीधला ॥ आणि सर्वांचि त्या पुष्पकाला ॥ कथिता झाला ऐसें कीं ॥ २७ ॥ विमाना तूं जाऊनि सत्वर ॥ बिभीषणादिक रात्रिंचर ॥ आणि सुग्रीवादि सर्व वानर ॥ घेऊनि येथें परत ये ॥२८॥ ती रामाज्ञा वंदूनि विमान ॥ मनोवेगें गेलें उडोन ॥ मग राम सर्वांसहवर्तमान ॥ सदनीं जाण प्रवेशला ॥ २९ ॥ गुरु ब्राह्मण वसिष्ठादिक ॥ प्रथम वंदिले सकळिक ॥ तदनंतर कौसल्यादिक ॥ माता सकळिक वंदिल्या ॥३०॥ पुढें सभेमाजी जाउनी ॥ आरूढला दिव्यसिंहासनीं ॥ भोंवती मंत्री महाजन आणी ॥ सर्वही मुनी शोभत ॥३१॥ लक्ष्मण शत्रुघ्न रामावरी ॥ चांमरें ढाळिती सोंजिरीं ॥ वाळव्यजन घेऊनि करीं ॥ भरत पवन घालित ॥ ३२ ॥ नागरिक प्रजा मांडलिक ॥ स्वस्वस्थानीं बैसले सकळिक ॥ सुवर्णवेत्रधारी अनेक ॥ स्तंभांजवळिक राहिन्नले ॥३३॥ ऐसी सुंदर सभा भरली ॥ मंगलतुरांची घाई लागली ॥ सकळ नगरी शृंगारिली ॥ सर्वत्र उत्सव चालला ॥ ३४ ॥ तों पुष्पक

टी. १ सूर्य. २ यथायोग्य. ३ चंवऱ्या. ४ सुंदर. ५ वाळ्याचा पंखा. ६ नगरांतील. ७ सरदार. ८ सोन्याच्या काठीवाले भालदार.

विमानें केली घाई ॥ रामाज्ञेप्रमाणें लवलाहीं ॥ राक्षस आणि कपि सर्वही ॥ आणूनि तेथें उ-
तरिले ॥ ३५ ॥ ते जयजय रघुवीर ह्मणत ॥ सभेमाजी गेले धांवत ॥ नयनीं देखतां सीताकां-
त ॥ हर्षाब्धि बहुत उल्हासला ॥ ३६ ॥ सर्वेंचि घातलीं लोटांगणें ॥ पादाब्जीं पडले अलीं-
प्रमाणें ॥ आशीर्वाद देऊनि त्यांकारणें ॥ रघुनंदनें उठविले ॥ ३७ ॥ मग त्या सर्वांसि क्षेम
पुसून ॥ सभेंत बैसविले यथामान ॥ आबालवृद्ध सकळ जन ॥ आनंदें पूर्ण जाहले ॥ ३८ ॥
मग राघवें सर्वांलागुन ॥ पुष्करद्वीपींचें वर्तमान ॥ सीतेनें स्वयें वधिला रावण ॥ इत्यादि सं-
पूर्ण कथियेलें ॥ ३९ ॥ तें ऐकूनियां जन समस्त ॥ अंतरीं झाले अति विस्मित ॥ साधुसाधु
ऐसें बोलत ॥ शिरें डोलवित आनंदें ॥ ४० ॥ सीता साक्षाच्चिच्छक्ति खरी ॥ आणि श्रीराम
हा आहे हरी ॥ हें मुख्य तत्व जाणोनि अंतरीं ॥ परमानंदें कोंदले ॥ ४१ ॥ तैं राघवेंद्रें लोक-
रीतीं ॥ अनेक गोष्टी सांगूनि पुढती ॥ नानावस्त्रें भूषणें प्रीतीं ॥ देऊनि सर्व गौरविले ॥ ४२ ॥
आणी स्वस्वस्थाना जावयास ॥ आज्ञा दीधली सर्वजनांस ॥ तेव्हां त्यांहीं राघवेंद्रास ॥ केले
साष्टांग प्रणाम पैं ॥ ४३ ॥ आणि जयजय यशस्वी रघुनाथ ॥ ऐसें अत्यानंदें बोलत ॥ ते
सीतारामांचें चरित गात ॥ गेले त्वरित स्वस्थाना ॥ ४४ ॥ मग सभेंत ऋषिमंडळ ॥ होतें
तेंही उठलें सकळ ॥ सीतेसहित तमालनीळ ॥ स्तवूनि विपुळ गौरविला ॥ ४५ ॥
आणि सर्वेंचि तदाज्ञा मागुनी ॥ उत्तम आशीर्वाद देउनी ॥ स्वस्वस्थाना सकळ मु-

टी. १ भ्रमराप्रमाणें. २ कुशल. ३ उत्तम, चांगलें. ४ राम. ६ तत्काळ.

नी ॥ आनंदें जाते जाहले ॥ ४६ ॥ पुढें सीतेसह रघुनाथ ॥ अयोध्येमाजी सदा वसत ॥ भरतादि सर्वबंधूंसहित ॥ राज्य करित नीतीनें ॥ ४७ ॥ दुष्ट संहारिले समूळ ॥ निष्कंटक केलें भूमंडळ ॥ दानधर्मादि करूनि विपुळ ॥ विप्र सकळ सुखविले ॥ ४८ ॥ शरयूनदीचे पवित्रतीरीं ॥ यज्ञ करित परोपरी ॥ सकळदेवांचें सर्वपरी ॥ हिताचि करी साक्षेपें ॥ ४९ ॥ अकरासहस्रवर्षें पुरीं ॥ आणि किंचित्अधिकही काळवरी ॥ जानकीजीवन राज्य करी ॥ मेदिनी सारी सानंद ॥ ५० ॥ दुःखासि नाहीं कोठें ठाव ॥ दारिद्र्याचें बुडालें नांव ॥ जरा मृत्यु चितादि भाव ॥ निर्मूळ सर्व जाहले ॥ ५१ ॥ हरीनें अवतार धरिले बहुत ॥ परी रामावतारीं सुख अत्यंत ॥ नर पशु पक्ष्यादि जीव समस्त ॥ आनंदीं सतत निमग्न ॥ ५२ ॥ सर्वकल्याणगुणांचें निधान ॥ जो कैवल्यदाता रमारमण ॥ तोचि साक्षात् जानकीजीवन ॥ रघुनंदन अवतरला ॥ ५३ ॥ हें तत्व जाणूनियां निर्जर ॥ किन्नर गंधर्व विद्याधर ॥ आणि महोरगादि निरंतर ॥ रामासि साचार वंदिती ॥ ५४ ॥ श्रीरामाचें राज्य पवित्र ॥ अधर्म नाहींच अणुमात्र ॥ सीतेसहित राजीवनेत्र ॥ परमानंदें वर्ततसे ॥ ५५ ॥ वाल्मीकि ह्मणे गा बुद्धिमंता ॥ भारद्वाजमुने भाग्यवंता ॥ हें अद्भुत रामायण तत्वतां ॥ तुज म्यां आतां कथियेलें ॥ ५६ ॥ यामाजी श्रीरामकथायुक्त ॥ कथिलें आहे थोडेंचि अद्भुत ॥ शतकोटीमाजी तों बहुत ॥ असे विस्तृत वर्णियेलें ॥ ५७ ॥ परी तें सकळ सांगावया ॥ इच्छित नाहीं गा मु-

टी. १ मोक्ष देणारा. २ लक्ष्मीचा पति (विष्णु). ३ देव. ४ मोठे सर्पादिक. ५ कमलनेत्र (राम).

निवर्या ॥ पुनरुक्ति होईल ह्मणोनियां ॥ भय हृदया वाटतें ॥ ५८ ॥ आणि चतुराननें पैं दहि-
लें ॥ अति गुप्तही असे राखिलें ॥ यालागींही म्यां तें सगळें ॥ नाहीं कथिलें साचार ॥ ५९ ॥
असो अद्भुतोत्तरकांडांत ॥ कथिलें हें आहे वेदवत ॥ यासि जे श्रवण पठण करित ॥ तयां ला-
भत परब्रह्म॥६०॥ही अद्भुतरामकथा शुद्ध ॥ इयेचा श्लोक किंवा श्लोकार्ध ॥ प्रभातीं कीं मध्यान्हीं
सावध ॥ राहूनि विशद ऐकती ॥ ६१ ॥ ते आधिव्याधिविमुक्त जगतीं ॥ सर्व भोग भोगूनि अंतीं ॥
परमदिव्यगतीसि पावती ॥ पुनरावृत्ती असेना ॥ ६२ ॥ पंचवीससहस्ररामायण ॥ सर्व पढतां जें
फळ पूर्ण ॥ तेंचि याच्या श्लोकमात्रेंकरून ॥ लाभतें जाण मानवांसी ॥ ६३ ॥ जेणें आपुल्या
जन्माठायीं ॥ हें अद्भुतरामचरित्र कदाही ॥ अभ्यासिलें कीं ऐकिलें नाहीं ॥ तयाचें सर्वही
व्यर्थ होय ॥ ६४ ॥ तो जन्मला ऐसा दिसत ॥ तरी गर्भवासींच असे पचत ॥ जैसा भ्रूण
तैसाचि सतत ॥ दुःखें अनंत भोगितसे ॥६५॥ हें अद्भुत श्रीरामचरित ॥ जो भक्तीनें ऐके सम-
स्त ॥ तयासि मातेच्या उदरांत ॥ पुनश्च रिघावें लागेना ॥ ६६ ॥ तो गर्भवासापासूनि सुट-
तो ॥ अंतरींचा संदेह फिटतो ॥ प्रपंचाचा खटला तुटतो ॥ स्वयेंचि होतो रामरूप ॥६७॥ अरे
हें अद्भुतरामचरित्र ॥ सर्वब्रह्मांडामाजी पवित्र ॥ ययाचें महत्त्व अति विचित्र ॥ असे सर्वत्र प्रसिद्ध
पैं ॥६८॥ एकदां विरिंचें देवांदेखत ॥ ऋगादि चार वेद समस्त ॥ आणि हें अद्भुतरामचरित ॥
तुळेनें यथार्थ तोलिलें ॥६९॥ तें हें सकळवेदांहून ॥ गौरवें अधिक शोभलें जाण ॥ ब्रह्मांडामाजी
याच्या समान ॥ आणिक पावन नाहींच॥७०॥मंदाकिनीच्या तीरीं पहिलें ॥ इंद्रें मज ऊा होतें प्र-

श्रिलें ॥ ह्मणोनि तयासि जें म्यां वहिलें ॥ यथार्थ कथिलें होतें पैं ॥७१॥ तेंचि हें अद्भुतरामचरित ॥ आजि म्यां तुज कथिलें येथ ॥ भारद्वाजा तूं सर्व जगांत ॥ आहेसि खचित भाग्यवान ॥७२॥ ह्मणोनि लाभलें तुजलागुन ॥ नातरी लाभणार कोठून ॥ अरे रामायण हें महारत्न ॥ निरुपम असे साचार ॥ ७३ ॥ हें ब्रह्महृदयक्षीराब्धींत ॥ प्रथम उद्भवलें यथार्थ ॥ तेथूनि नारदाच्या हृदयांत ॥ येऊनि समस्त राहिलें॥७४॥पुढें तयापासूनि पाहीं ॥ येऊनि राहिलें माझ्या हृदयीं॥ आणि तेंचि निःशेष सर्वदाही ॥ ब्रह्मलोकीं वसताहे ॥ ७५ ॥ त्यांतूनि किंचित भूमंडळीं ॥ आणि किंचित राहिलें पाताळीं ॥ तैसेंचि स्वर्गीं इंद्राजवळी ॥ किंचिन्मात्र राहिलें ॥ ७६ ॥ अरे रामायण-महासागर ॥ ययाचा कोण जाणील पार ॥ विधि मी आणि देवर्षिवर ॥ हे मात्र साचार जाणताहों ॥ ७७ ॥ आह्मां तिघांविणें चौथा ॥ त्रिजगीं नसे कोणी जाणता ॥ हें सर्व जाणूनियां तत्वता ॥ सुस्थिर आतां होईं तूं ॥ ७८ ॥ अरे अद्भुतोत्तरकांडांत ॥ जें कां कथिलें आहे विस्तृत ॥ तेंचि आतां पुनश्च येथ ॥ संक्षेपें सांगतों तुजलागीं ॥ ७९ ॥ श्रीरामजन्माचा वृत्तांत ॥ आरंभीं सांगूनियां समस्त ॥ श्रीमतीचें पवित्र चरित ॥ अत्यद्भुत कथियेलें ॥ ८० ॥ वैकुंठलोकीं रमेनें वहिला ॥ नारदाचा अपराध केला ॥ ह्मणोनि तयानें कोपें रमेला ॥ शाप दीधला दारुण ॥ ८१ ॥ तयानें ती क्षीराब्धिनंदिनी ॥ जे दंडकारण्यस्थ महामुनी ॥ तयांच्या रक्तें गर्भरूप होउनी ॥ राहिली उदरीं मयजेच्या ॥ ८२ ॥ मग तिणें

टी. १ ब्रह्मदेवाच्या हृदयरूपी क्षीरसागरांत. २ देवर्षींमध्ये श्रेष्ठ ( नारद ). ३ लक्ष्मीनें. ४ क्षीरसमुद्राची कन्या (लक्ष्मी).

तो गर्भ पाडिला ॥ तंव तो कन्यारूप दिसला ॥ सर्वांचे कुरुक्षेत्रीं वहिला ॥ स्वयें गाडिला भूतळीं ॥ ८३ ॥ तदनंतर कांहीं काळें ॥ कुरुक्षेत्रीं जनकनृपाळें ॥ पाचारूनि विप्रर्षिमंडळें ॥ आरंभिला महायज्ञ ॥ ८४ ॥ तैं स्वर्णलांगलें ती क्षिती ॥ शोधूं लागला तो नृपती ॥ तंव त्या हलाग्रा लागूनियां ती ॥ कन्या वरती उद्भवली ॥ ८५ ॥ तीच जगज्जननी सीता ॥ जनकाची होय दुहिता ॥ ऐशी सीता जन्माची कथा ॥ अद्भुत तत्वता कथियेली ॥ ८६ ॥ पुढें जानकीसि पर्णून ॥ अयोध्ये चालतां रघुनंदन ॥ मार्गीं भार्गवरामें येउन ॥ तयालागुन गांठिलें ॥ ८७ ॥ तैं त्या रामें धरूनि कोप ॥ आपुलें दाविलें विश्वरूप ॥ भार्गवाचा सकळ दर्प ॥ हरिला ऐसें कथियेलें ॥ ८८ ॥ पुढें ऋष्यमूकीं रामाप्रती ॥ भिक्षुरूपें भेटला मारुती ॥ रामें आपुली चतुर्बाहुमूर्ती ॥ सुंदर दाविली मारुतीस ॥ ८९ ॥ तेव्हां तयातें रामालागुन ॥ तूं कोण इत्यादि केला प्रश्न ॥ रामें तयासि कृपा करून ॥ दिव्य ज्ञान उपदेशिलें ॥ ९० ॥ तें सर्व जाणूनियां मारुती ॥ समाधान पावला अती ॥ हृदयीं ध्याऊनि राममूर्ती ॥ केली स्तुती हें कथियेलें ॥ ९१ ॥ तदनंतर श्रीराघव ॥ आणि वानराधिपति सुग्रीव ॥ ह्या उभयतांचें सख्य अपूर्व ॥ झालें तें सर्व कथियेलें ॥ ९२ ॥ पुढें रामाचें आज्ञावचन ॥ सागरें मानिलें नाहीं ह्मणोन ॥ लक्ष्मण कोपें संतप्त होउन ॥ सागरीं पडता जाहला ॥ ९३ ॥ तैं तयाच्या अंगतापें सकळ ॥ सागराचें शोषलें जळ ॥ सकळ भूतें झालीं विकळ ॥ इत्यादि विपळ वर्णिलें से ॥ ९४ ॥ पुढें

टी. १ लागलाच. २ सोन्याच्या नागरानें. ३ पृथ्वी. ४ नागराच्या फाळाला.

दशांस्या वधूनि रघुवीर ॥ अयोध्येंत राज्यीं बैसल्यावर ॥ श्रीरामदर्शना थोरथोर ॥ मुनीश्वर पातले जे ॥ ९५ ॥ तयांसंनिध जनकेजें पहिला ॥ रामासमक्ष वृत्तांत कथिला ॥ तों ऐकूनियां घनसावळा ॥ चकित झाला अत्यंत ॥ ९६ ॥ आणि मानसोत्तरशैलावर ॥ सहस्रांस्य रावण निशाचर ॥ वसत आहे अत्यंत क्रूर ॥ इत्यादि समग्र जाणूनियां ॥ ९७ ॥ नर वानर राक्षसगण ॥ आणि बंधु मित्र सर्वे घेउन ॥ सीतेसहित रघुनंदन ॥ पुष्करद्वीपीं पावला ॥९८॥ तेथें प्रवर्तला समर ॥ रावणें उडविले रामाचे वीर ॥ निश्चेष्ट पाडिला रघुवीर ॥ हाहाकार प्रवर्तला ॥९९॥ तैं सीतेनें घोररूप धरून ॥ सपरिवार मारिला रावण ॥ विरिंचादिनिर्जरीं तत्क्षण ॥ केलें स्तवन सीतेचें ॥ १०० ॥ तों राघव उठोनि बैसला ॥ काळीसि पाहूनि घाबरला ॥ नामसहस्रें स्तव केला ॥ वर दीधला कालिकेनें ॥ १ ॥ मग सीतेसह रघुनंदन ॥ अयोध्येप्रत पातला तत्क्षण ॥ रीस वानर राक्षसगण ॥ येऊनि संपूर्ण भेटले ॥ २ ॥ राज्यीं बैसला राजीवनेत्र ॥ आनंद पसरला सर्वत्र ॥ ऐसा हा वृत्तांतसंग्रह विचित्र ॥ तुज पवित्र कथियेला ॥ ३ ॥ अरे ह्या वृत्तांतसंग्रहातेंही ॥ पढती तयांसि लवलाहीं ॥ श्रीरामभक्ति लाभते पाहीं ॥ संशय नाहीं अणुमात्र ॥ ४ ॥ हें रामाचें चरित्र निर्मळ ॥ भक्तिभावें पढतां सकळ ॥ पापमुक्त होऊनि केवळ ॥ पावेल विपुलसुकृतासी ॥ ५ ॥ सर्व तीर्थस्नानाचें पुण्य ॥ समरीं विजय सर्वमान्य ॥ तैसेंचि सर्व यज्ञाचें पुण्य ॥ पावोनि धन्य होईल ॥ ६ ॥ अचिंत्यरूप श्री-

टी. १ दशमुखरावणास. २ सीतेनें. ३ सहस्रमुखरावण. ४ चिंतन करण्यास अशक्य आहे रूप ज्याचें.

राम आणी ॥ साक्षाद्भगवती भूनंदिनी ॥ यांसि अनन्यभावेंकरुनी ॥ जोकां अनुदिनीं भजेल ॥ ७ ॥ आणि ह्या पुण्यचरितासि पाहीं ॥ पढेल किंवा ऐकेल कदाही ॥ तोही मातेच्या उदराठायीं ॥ पुनश्च नाहीं जन्मणारा ॥ ८ ॥ ऐसें वाल्मीकमुनीनें प्रीतीं ॥ कथिलें भारद्वाजाप्रती ॥ तेंचि म्यां येथें यथामती ॥ स्वदेशभाषें वर्णिलेंसे ॥ ९ ॥ श्रीमद्वाल्मीकिमुनिप्रोक्त ॥ अद्भुतरामायण विख्यात ॥ गीर्वाणभाषामूळ ग्रंथ ॥ सर्व जगांत पूज्य असे ॥ ११० ॥ तयाचा भावार्थ घेऊन ॥ लिहिला हा ग्रंथ संपूर्ण ॥ राघवें कृपा केली ह्मणून ॥ ग्रंथ परिपूर्ण जाहला ॥ ११ ॥ हा अद्भुतरामविजयग्रंथ ॥ याचा कर्ता श्रीरघुनाथ ॥ परशुराम हें नाम निमित्त ॥ उगेंचि पुढें केलें असे ॥ १२ ॥ हा ग्रंथ पुण्यपावन ॥ सकेळपुरुषार्थाचें निदान ॥ कीं हा ग्रंथरूपें सीताजीवन ॥ रामचि आपण प्रगटला ॥ १३ ॥ राम तोचि वैकुंठनाथ ॥ क्षीराब्धिशायी रमाकांत ॥ तयाचे सद्धर्मरक्षणार्थ ॥ मत्स्यकूर्माद्यवतार जे ॥ १४ ॥ त्यांमाजील षष्ठावतार ॥ परशुराम रेणुकाकुमार ॥ तयाचें क्षेत्र शूर्पाकार ॥ कोंकणनामें विख्यात जें ॥१५॥ तेथें राजापुरनामें प्रसिद्ध ॥ नगरी आहे पूर्वसिद्ध ॥ तत्समीप धूतपापेश्वराभिध॥ ग्राम विशुद्ध आहे जो ॥ १६ ॥ तयेग्रामीं धूतपापेश्वर ॥ शिवलिंग आहे पापहर ॥ तयाचें पूजक साचार ॥ घगवेनामक कुळ जें ॥ १७ ॥ तये कुळीं सर्वगुणसपन्न ॥ जो सदाशिवतुल्य सदाशिवाभिधान ॥ तयाची पत्नी गुणनिधान ॥ पार्वती जैशी पार्वती ॥ १८ ॥ तियेच्या पोटीं

टी. १ सीता. २ धर्म, अर्थ, काम व मोक्ष ह्या चारी पुरुषार्थांचें. ३ मूळकारण. ४ लक्ष्मीचा पति (विष्णु). ५ सुपासारख्या आकाराचें.

विठ्ठलासमान ॥ विठ्ठलनामा सदाशिवनंदन ॥ वेदशास्त्रांमाजी प्रवीण ॥ तैसाचि ज्योतिः-
शास्त्रींही ॥ १९ ॥ तयाची पत्नी रुक्मिणी ॥ रुक्मिणीपरी सद्गुणखाणी ॥ तियेच्या उदरीं
विठ्ठलापासुनी ॥ रघुनाथनामें जन्मला ॥ १२० ॥ तो प्रसिद्ध रघुनाथशास्त्री ॥ अतिप्रवी-
ण तर्कालंकारीं ॥ आणि व्याकरणाख्यमहासागरीं ॥ निरंतर पोंहतसे ॥ २१ ॥ त-
याची पत्नी सती सीता ॥ तीच होय माझी माता ॥ रघुनाथशास्त्री माझा पिता ॥ तीं
उभयतां विख्यात ॥ २२ ॥ त्या उभयतांपासून ॥ परशुरामशर्मा मी उत्पन्न ॥ मातापित्यांचे
पवित्र चरण ॥ सदा अंतरीं ध्यात असें ॥ २३ ॥ मातापितरें अत्यंत सदय ॥ त्यांहीं प्रेरिलें
माझें हृदय ॥ श्रीमदद्भुतरामविजय ॥ प्राकृतभाषें वर्णीं तूं ॥२४॥ ह्मणोनि मीं तयांचे चरणा ॥
वंदूनि प्रारंभ केला वर्णना ॥ पितृकृपें ह्या ग्रंथाची रचना ॥ यथावकाश करितसें ॥ २५ ॥
ऐसे लोटतां कांहीं दिवस ॥ वृत्तांत घडला विशेष ॥ कीं जयाचेनी माझ्या मनास ॥ अति
उल्हास जाहला ॥ २६ ॥ राजापुर ग्रामीं राहणार ॥ तेथींचा असोनि जमेदार ॥ पोत-
दारीचाही अधिकार ॥ जयाकडे चालतसे ॥ २७ ॥ ह्मणोनि जयाचें उपनांव ॥ पोतदार हें
चालत सदैव ॥ धूतपापेश्वर आराध्यदेव ॥ वतनी गांव रिंगणें ॥ २८ ॥ तयाचे वंशीं उत्पन्न ॥
महापुरुष बल्लाळाभिधान ॥ तयाचा पुत्र गुणनिधान ॥ मोरेश्वर शर्मा विख्यात ॥२९॥ तयाचा
पुत्र वासुदेव ॥ जो भगवत्परायण सदैव॥नानाविध ग्रंथ अभिनव॥मुद्रूनि सर्वप्रसिद्ध करी॥१३०॥

टी. १ नवीन. २ छापून.

तेणें येऊनि मम सदना ॥ देखतां ह्या ग्रंथाची रचना ॥ आनंद झाला तयाच्या मना ॥ केली सूचना मजलागीं ॥३१॥ कीं हा अद्भुत ग्रंथ परिकर ॥ रचूनि पूर्ण करीं सत्वर ॥ लोकोपकारालागीं सुंदर ॥ मुद्रूनि प्रसिद्ध करिन मी॥३२॥ ती तयाची ऐकूनि भारती ॥ मजला आनंद झाला अती ॥ स्मरोनि वडिलांच्या पायांप्रती ॥ ग्रंथ पुढती चालविला ॥३३॥ इतर कार्यें सोडूनि जाणा ॥ करूं लागलों शीघ्र रचना ॥ वडिलांच्या कृपें आजच्या दिना ॥ ग्रंथ समाप्त जाहला ॥३४॥ शके अठराशें पंधरांत ॥ विजयवत्सरीं चैत्रशुक्लांत ॥ रविसुतवार पौर्णिमा तिथ ॥ तेदिनीं ग्रंथ पूर्ण झाला ॥ ३५ ॥ मातापित्यांच्या कृपेंकरून ॥ मुंबापुरीं ग्रंथ झाला पूर्ण ॥ एकदां करितां श्रवणपठन ॥ पापें संपूर्ण भस्म होती ॥३६॥ ह्या ग्रंथाचें नित्य नेमान ॥ शुचिर्भूतपणें करितां पूजन ॥ आधिव्याध्यादि अति दारुण ॥ दुःखें संपूर्ण निवटतील ॥ ३७ ॥ या ग्रंथाचा करितां संग्रह ॥ लोपतील सर्व विघ्नसमूह ॥ पवनवेगें अंबुवाह ॥ जैसे क्षणांत वितुळती ॥ ३८ ॥ याणें पुत्र पौत्रादि संतती ॥ आणि अखंडित होय संपत्ती ॥ इहलोकीं मनोरथपूर्ती ॥ तैसाचि अंतीं मोक्ष लाभे ॥ ३९ ॥ असो ह्या सकळग्रंथें सर्वथा ॥ प्रीति होवो श्रीरघुनाथा ॥ या ग्रंथाचा मूळकर्ता ॥ श्रीरघुनाथ असे पैं ॥१४०॥ तेणें अंतरीं जेंजें प्रेरिलें ॥ तेंतें येथें पत्रीं लिहिलें ॥ न्यून अथवा अधिक झालें ॥ तरी तेणेंच क्षमाकीजिये ॥ ४१ ॥ हा अठ्ठाविसअध्यायात्मक ॥ ग्रंथ जाहला अलौकिक ॥ भक्तिभावें संत सकळिक ॥ श्रवण पठण करोत

टी. १ घरीं. २ मनोहर. ३ वाणी. ४ सूर्याच्या पुत्राचा वार (शनिवार). ५ मुंबईत. ६ मनोव्यथा व रोग इत्यादि. ७ मेघ (ढग.)

पें ॥१४२॥ आतां जोडूनि दोन्हीं करांसी ॥ प्रार्थितों सकळसज्जनांसी ॥ प्राकृतभाषें ही कथा ऐसी ॥ यथामती वर्णिली म्यां ॥ ४३ ॥ यांत न्यूनाधिकता असेल ॥ तरी सज्जनीं व्हावें दयाळ ॥ मज मानूनि आपुलें बाळ ॥ क्षमाचि केवळ कीजिये ॥ १४४ ॥ हा ग्रंथ पावन परम ॥ ययानें प्रसन्न होऊनि राम ॥ श्रोत्यावक्त्यांलागीं उत्तम ॥ भुक्तिमुक्ति देवो सदा ॥१४५॥ ही रामकथा पुण्यपावनी ॥ जैशी रामें प्रेरिली मनीं ॥ तैशीच देशभाषें वर्णुनी ॥ श्रीरामचरणीं अर्पिलीसे ॥ ४६ ॥ स्वस्ति श्रीमद्भुतरामविजय ॥ वाल्मीकीयाद्भुतोत्तरकांडहृदय ॥ ऐकोत सज्जन होऊनि तन्मय ॥ अष्टाविंशतितमोध्याय मधुर हा ॥ १४७ ॥ ॥ श्रीसीतारामचंद्रार्पणमस्तु ॥ ॥ शुभंभवतु ॥ ॥छ॥ ॥छ॥ ॥छ॥

॥ इति अष्टाविंशतितमोध्यायः ॥ २८ ॥

॥ ग्रंथः संपूर्णः ॥

श्रीरस्तु.

## ओवी संख्या.

| अध्याय | ओवी संख्या | अध्याय | ओवी संख्या | अध्याय | ओवी संख्या |
|---|---|---|---|---|---|
| १ | १३३ | ११ | १०५ | २१ | १६३ |
| २ | ९५ | १२ | १२६ | २२ | ११२ |
| ३ | १८० | १३ | ६४ | २३ | २०२ |
| ४ | १६३ | १४ | ८० | २४ | २०१ |
| ५ | १४२ | १५ | ८८ | २५ | ९१ |
| ६ | १०२ | १६ | ६४ | २६ | १६८ |
| ७ | १६४ | १७ | १०५ | २७ | १२७ |
| ८ | १५२ | १८ | २१७ | २८ | १४७ |
| ९ | १२२ | १९ | १४४ | ओव्यांची संख्या. | ३६७३ |
| १० | १०६ | २० | ९४ | ग्रंथ संख्या. | ४५०० |

हा ग्रंथ **वासुदेव मोरेश्वर पोतदार** यांणीं वेदशास्त्रसंपन्न राजमान्य राजश्री

**परशुराम रघुनाथ शास्त्री घगवे**

यांजकडून संस्कृत **अद्भुतरामायणाच्या** आधारानें ओंवीबद्ध

तयार करवून मुंबईंत "**प्रबोधरत्नाकर**" छापखान्यांत छापविलें.

शके १८१५.

